# स्त्रीचें रम्य शीरोभूषण

मृदु, कुरळ, काळाभोर चकचकीत असा
केशकलाप कोणत्या स्त्रीस
आवडणार नाहीं?



असा सुंदर
केशकलाप
प्राप्त करून
देणारें.

# कामिनिया ऑईल.

( मधुर व आल्हादकारक सौगंधिक खजिना )

( रजिस्टर्ड ) हें एकच तेल असून तें प्रत्येक स्त्रीचा जसा सौभाग्यालंकार आहे, त्याचप्रमाणें तें मानसिक श्रम पडणाऱ्या पुरुषांसाठीं व विद्यार्थ्यांसाठीं फारच जरूरीचें आहे. हें तेल लावतांच संतप्त झालेलें डोकें शांत होऊन मेंदूस थंडावा येतो, मन उल्हासित होतें. याचा सुवास अत्यंत मधुर व मोहक आहे. एक वेळ वापरून खात्री करा.

एक बाटलीस १ रु. ट. ख. ५ आणे; ३ बाटल्यांस २॥= ट. ख. १२ आणे.

**धी ॲंग्लो इंडियन ड्रग आणि केमिकल कंपनी, जुम्मा मशीद, मुंबई नं. २**

सुवाक्येन गीतेन युवतीनां च लीलया। यस्य न द्रवते। चित्तं स वै मुक्तोथवा पशुः।

सरसवाङ्मयरत्नमालेचें ४३ वें रम्य रत्न.

# दिलबहार.



लेखिका—

भगिनी सौ० वज्रचूडेमंडित जानकीबाई देसाई.

गृहलक्ष्मी--प्रेमळसवत--चारुगात्री ' इ. इ. कर्त्री.



संपादक व प्रकाशक

तात्या नेमिनाथ पांगळ.

चालक—सरसवाङ्मय प्रसारक मंडळी, मुंबई. नं. ४
व ४३८ रविवार पेठ पुणें शहर.

मुद्रक.

लक्ष्मण भाऊराव कोकाटे. ३०० सदाशिव पेठ पुणें.
" हनुमान प्रेस. "



आवृत्ति १ ली.
पुस्तक नं. ७५

किंमत साडेतीन रुपये.

वर्ष ९ वें.
मे १९२१ इ.

ॐ नमः सिद्धेभ्यः ।

# संपादकीय दोन शब्द व आत्मनिवेदन.

भगवत्कृपेनें सरस्वाङ्मयरत्नमालेचें ४३ वें रम्य ऐतिहासिक रत्न प्रस्तुत प्रसिद्ध होत आहे. या ' दिलबहार ' कथानकाच्या लेखिका सर्वत्र विश्रुत असून सुंदर कादंबऱ्या लिहिण्याचें त्यांचें लेखनकौशल्य अश्रुतपूर्व आहे. ताजमहाल, प्रेमळ बवत, गृहलक्ष्मी, सौभाग्यतिलक, वाक्-गात्री वगैरे रमणीयत्वाचा चटका लावणाऱ्या हृदयंगम व उदात्त कथानकांनीं रसिक वाचकांचीं अन्तःकरणें जितकीं आकर्षिलीं आहेत त्याच्या शतपटीनीं महाराष्ट्र ललितवाङ्मयाचें भांडार अलंकृत केलें आहे.

प्रस्तुत कथानक ऐतिहासिक, अत्यंत रम्य, नवरसपूर्ण व विविध प्रसंगांनीं ओथंबलेलें असल्यानें आरंभापासून अखेरपावेतों मनोरंजक पण बोधप्रदहि झालेलें आहे. यांतील कथाभाग विशेषतः करुणरस परिप्लुत असल्यानें तो अत्यंत हृदयस्पर्शी झाला आहे. यांतील थोर कुळांतील नायिकेवर कर्माच्या गहनगतीमुळें अनेक बिकट प्रसंग ओढवल्यामुळें तिच्या सत्वाची नशीबानें परीक्षाच पाहिली आहे व अखेर परिक्षेंत ती तंतोतंत उतरल्यामुळें तिला त्याबद्दल तसें अमोल पारितोषिकहि दिलें गेलें आहे. सेवाधर्म हा परम बिकट धर्म आहे, आणि तशा बिकटतेनें सेवाधर्म करणारे सेवकहि विरळ आहेत. तानाजीनें शिवबासाठीं आत्मयज्ञ केला; पण कर्तव्यपूर्ण सेवाधर्म पालन करून आपलें नांव अजरामर केलें; पन्नादाईनें सेवाधर्म संरक्षण करण्यासाठीं आपल्या पुत्राचा बळी देऊन " सेवादीव्य " करून दाखविलें; त्याचप्रमाणें या कथानकांतील नायिकेनें आपल्या धन्याची इज्जत संरक्षण करण्यासाठीं स्वतःची " सत्य, न्याय व पावित्र्य " या त्रयीच्या जोरावर पराकाष्ठा केली व उत्कृष्ट सेवाधर्म पालन करून आपलें नांव संस्मरणीय केलें आहे. असलें उदात्त कथानक खरोखर आमच्या गुणग्राही वाचकांना पटेलच पटेल यांत आह्मांस मुळींच शंका नाहीं. सारांश, असें रम्यतम कथानक लिहून दिल्याबद्दल आम्ही सौ. लेखिकाभगिनीचे अत्यंत आभारी आहोंत.

या खेपेस समशेरबहादर व दिव्याखालीं अंधेर हीं कथानकें प्रसिद्ध करण्याचा फार हेतु होता, पण तीं वेळेवर तयार न झाल्यानें, प्रस्तुतचें रम्य कथानक वाचकांना सादर केलें आहे. पुढील खेपेस " समशेरबहादर " व दिव्याखालीं अंधेर " हीं अत्यंत रम्य व बहारीचीं ५०० पृष्ठांचीं

कथानकें आमच्या रसिक वाचकांना जुलईअखेर रु. २-५-० च्या व्ही. पी. नें सादर केलीं जातील, तरी हस्तें-परहस्तें नवीन ग्राहकांचे साह्य पाठवून यापुढें शुक्लेंदुवत् सतत लोभ ठेऊन या ग्रंथमालेस आश्रय द्यावा अशी आग्रहाची विनंति आहे.

* * * * *

आजवर ज्या पितृदेवाच्या प्रेमछत्राखालीं आम्हांस या ग्रंथमालेची सेवा निरलसपणें व प्रापंचिक चिंता न वाहतां, करतां आली व ज्यांच्या प्रेमळ सहवासांत आतांपर्यंत ३८ वर्षांचें आयुष्य निष्कलंकपणांत व्यतित झालें ते आमचे परमपूज्य, परम प्रेमळ, परम स्वधर्मभक्तिपरायण व धर्म-दयामतिवत्सल तीर्थरूप—

## दादासाहेब नेमीनाथ अनंतराज पांगळ.

हे इन्फ्ल्युएंजा साथीच्या तापानें गेल्या चैत्र वद्य १० रोजीं दोनप्रहरीं ३॥ वाजतां ( ता. १०-४-२३ रोजीं ) भगवन्नामघोष चालू असतां, आम्हांस शोकसागरांत लोटून देवलोकास गेले, हें कळविण्यास पराकाष्ठेचें दुःख होत आहे ! त्यांच्या वाणींत इतकी कांहीं अजब रसवंती होती, कीं, ज्याशीं त्यांचा एकवेळ परिचय होई त्यांना हे सदैव निकट असावेत व त्यांच्या प्रेमळ सहवासाचा लाभ व्हावा असेंच वाटे. हे गानकलाभिज्ञ व स्वतः गवई आणि तंतुवाद्य-वादक होते. सुरेल गाण्याचे ते फारच चाहते होते. मेहनतीनें गवई-गाणें गाणाऱ्याचे यद्यपि ते प्रशंसा करीत तथापि सुरेल लयीचें गाणें त्यांना मनापासून विशेष आवडत असे, कधीं कधीं तशा गाण्याच्या उत्कृष्टतेमुळें त्यांना आनंदाश्रुहि येत. त्यांनीं अनेक जुन्या गवयांचें गाणें ऐकिलें असून त्यांना गवई गाणें विशेष समजत असे प्रो. अबदुलकरीम, प्रो. भास्करबुवा, प्रो. वझेबुवा, प्रो. छन्नुबुवा, सवाई गंधर्व, वगैरे सुप्रसिद्ध तज्ज्ञ मंडळी गावयास बसली म्हणजे "नाथ, तुम्ही आमच्याजवळ बसा" असें आग्रहानें म्हणत. जें गाणें ऐकिल्यानें हृदयास हेलकावा बसतो तेंच 'उत्कृष्ट गायन' असें ते म्हणत. सु-स्वरांचे ते फारच चहाते होते व कोमल तीव्र स्वरांच्या कामगतीपासून तर त्यांना कमालीचा आनंद होत असे.

हे स्वतः [ जैन असून ] धर्मशास्त्राचे उत्तम ज्ञानी होते. स्वतः धर्मशास्त्राचें नित्य एक तासभर रात्रीं ८ ते ९ वाजेपर्यंत बार्शी जिनमंदिरांत प्रवचन सांगत. शिवाय नित्य देवपूजा-ध्यान-स्वाध्याय यांत एक तास

तरी ते व्यतित करीत. अभक्ष्यभक्षण-अपेयपान, इंग्रजी औषधरुपानें सुद्धां त्यांनीं केव्हांच केलें नाहीं. त्यांची परोपकारी वृत्तीहि अनुकरणीय होती. ज्यांना एकवार आपलें म्हटलें त्यांना ते कधींच अंतर देत नसत. उपकार करणाऱ्या कित्येक लोकांनीं त्यांच्याशीं कित्येकवेळां अपकाराचें वर्तन केलें तथापि त्याबद्दल द्वेषभाव मनांत न वागवितां त्यांनीं अपकारकर्त्यांशीं पुनः पुनः उपकारच केला व त्याला कायमचें लाजविलें. आत्मनः प्रतिकूलानि ।। परेषां न समाचरेत् ।। हा आमच्या वडील साहेबांचा नेहमींचा बाणा असे व या त्यांच्या या वर्तनानें ते सर्वप्रिय होते. ऑल इंडिया जैन शेतवाळ एज्युकेशनल कॉन्फरन्सचे ते व्हाइस प्रेसिडेंट होते. जैनसमाजांत सर्वत्र त्यांची मान्यता मोठी होती. नेहमीं राजरस्त्यानें जाणें व दिलदार अंतःकरणानें वागणें त्यांना आवडत असे. त्यांना जैनेतर मंडळींत ' मित्रसमूह ' दांडगा होता व वडिलसाहेबांना तो परोपरीनें मानही देत होता. त्यांचें वाङ्मयप्रेम व काव्यरसिकता प्रशंसनीय होती. त्यांच्या स्वभावासंबधानें सन्मान्य जैन कवि व येथील प्रसिद्ध पत्रकार सजीवनकर्ते यांनीं आपल्या एप्रीलच्या ७१८ अंकांत थोडक्यांत मार्मिक शब्दचित्र रेखाटलें आहे तेंच आम्ही येथें देत आहोंत:—

"हे शेतवाळ जैन समाजाच्या पंचायतीचे मुख्य पंच होते. जातींतील मतभेद किंवा कोणतेंही जातिविषयक प्रकरण विकोपाला जाऊं न देतां सलोख्यानें मिटविण्याकडे यांची प्रवृत्ति असे. या शांत वृत्तीला शोभेसाच यांच्या ठिकाणचा दुसरा प्रशंसनीय गुण म्हणजे यांची जन्मजात मार्मिकता होय. हे विशेष शिकलेले नव्हते, पण कोणत्याही विषयाचें मर्म यांना फार मार्मिक रीतीनें आकलन होत असे, ललितवाङ्मयावरीलही यांचें प्रेम दांडगें होतें. तशा प्रकारच्या पुस्तकांचें वाचन झालें नाहीं असे दिवस त्यांच्या आयुष्यांत फार थोडे गेले असतील. इतकेंच त्यांचें धार्मिक ग्रंथवाचनावरही प्रेम होतें त्यांच्या स्वाध्यायांत आमरण कधीं खंड पडलेला नाहीं. त्यांना सार्वजनिक पुराण सांगण्याचीही फार हौस असे. बार्शीत त्यांच्या जीवनक्रमांत हा एक नित्याचा विषय होऊन बसला होता. रात्रीं मंदिरांत ८ वाजतां पुढील चौरंगावर चव्वाळ ठेवून सुलभ भाषेत पुराणाचा अर्थ कथन सांगणारी त्यांची शांत आणि प्रेमळ मूर्ति ज्यांनीं पाहिली आहे त्यांना तिची सहजासहजी विस्मृति होणें अशक्य आहे. दादांच्या ठिका-

णाची रसिकताही वाखाणण्याजोगी होती. सुंदर काव्यांत किंवा रमणीय अद्य वाङ्मयांत ते तत्काळ रंगून जात. असें वाङ्मय त्यांच्या पुढें कितीही वेळां वाचीत राहिलें तरी त्यांना त्याचा कंटाळा येत नसे. इंग्रजी शिक्षणाचा गंधही नसलेल्या दादांच्या ठिकाणची ही काव्यवाङ्मयाची गोडी आणि त्याच समाजांतल्या इंग्रजी शिक्षणाच्या टाकीनें थोडें बहुत तरी तासलेल्या शेंकडों तरुणांची या बाबतींतील दगडाची किंवा ओंडक्याची निश्चलता, या दोनही गोष्टी एक समयावच्छेदेंकरून डोळ्यांपुढें उभ्या राहिल्या म्हणजे या जोमानें भरारणाऱ्या नवांकुरासंबंधीं मन जेवढें निराशेनें भरून जातं, त्याच्या शतपट त्या कालखड्गप्रहारानें उन्मळून पडलेल्या पुराणतरुसंबंधानें आदर वाटूं लागतो ! या दृष्टीनें दादांचा चिरयोग प्रत्येक सहृदयाच्या अंत:करणाला चटके देत राहील यांत शंका नाहीं. दादांच्या ठिकाणचा सर्वांत महत्त्वाचा गुण म्हणजे त्यांची गायनकला. त्यांच्यासारखा या कलेचा मर्मज्ञ निदान जैनसमाजांत तरी कोणी नव्हता असें म्हणावयाला हरकत नाहीं. त्यांनीं या कलेप्रित्यर्थ दीर्घ तपश्चर्या केली होती आणि तींत ते चांगले यशस्वी झाले होते, हें त्यांच्या गानश्रवणाचा लाभ ज्यांना ज्यांना झाला आहे त्यांना ठाऊक आहेच. हा आपल्या ठिकाणचा गुण आपल्या घराण्यांत राहावा अशी त्यांची फार इच्छा होती. पण त्यांच्या धाकट्या चिरंजीवांच्या निधनाबरोबर त्यांची ही आशा लयाला गेली. दादांचा जन्मही फार सुखांत गेला. त्यांना प्रपंच्याकरितां स्वत: कष्ट किंवा दगदग सोसण्याचा प्रसंग कधींच आला नाहीं. त्यांच्या वडिलांच्या खांद्यावरची प्रपंचाची धुरा खालीं येते न येते तोंच त्यांच्या चिरंजीवांनीं तिला मान दिली, आणि वडिलांच्या कारकीर्दी इतके किंबहुना कांकणभर अधिक सुखांत आणि अधिक आनंदांत त्यांच्या पितृभक्त चिरंजीवाच्या कारकीर्दींत त्यांचें आयुष्य गेलें. त्यांच्या गोड स्वभावामुळें त्यांचें स्वजातीय व परजातीय मित्रमंडळहि बरेंच मोठें होतें. किंबहुना त्यांत परजातियांचाच भरणा अधिक आहे. त्यांची छापही लोकांवर आश्चर्यकारक रीतीनें पडत असे. त्यामुळें पुष्कळांचीं कामें त्यांच्या मार्फत सहज होत आणि तेही आपल्या हातून होणारीं कामें परोपकार बुद्धीनें मोठ्या खुषीनें करीत, अशा प्रकारचा पुढारी नाहींसा झाल्यानें शेतवाळ जैन समाजाची मोठी हानी झाली आहे. ती लौकर भरून निघणें कठीण आहे. शेतवाळ समाज हा बि-

ज्यांच्या दृष्टीनें अत्यंत मागासलेला समाज आहे. यामुळें या समाजांत पंचायत पद्धतीला अद्यापि फार महत्त्व आहे. ती नष्ट करणें शक्यच नाहीं. पण तिला सर्वांच्या परिस्थित्यनुरूप योग्य वळण देऊन तिच्यांतील प्रगति-विन्मुखता नष्ट करावी असें कांहीं मंडळींनीं नुकतेंच ठरविलें होतें. या कामीं दादांच्या सहायाची फार जरूर होती. कारण ते या रणांगणावरचे 'भिष्माचार्य' होते. त्यांनीं या कामीं पूर्ण सहाय करण्याचें कबूलही केलें होतें. पण त्यांच्या अकस्मात् मृत्युनें ही अशा सर्वस्वी नष्ट झाली. इ० इ० "

सारांश, आमचे सन्मान्य तीर्थरूप आपल्या वयाच्या ५९ व्या वर्षी बार्शी मुक्कामीं आपल्या वाड्यांत केवळ एकाएकीं अवघे ४।५ दिवसच दोषित ज्वरानें आजारी पडून दिवंगत झाले. त्यांच्या स्मशान यात्रेस बार्शी नागरिकांचा मोठा समूह लोटला असून तेथील सुप्रसिद्ध नागरीक श्रीयुत रामभाऊ साने वकील यांनीं त्या प्रसंगीं वडिलांच्या प्रेमळ व गोड स्वभावाचें वर्णन करून तारीफहि केली. वडिलांच्या मृत्युनिमित्त बार्शीच्या नागरिकांनीं एक दिवस सर्व बाजार व दुकानें बंद ठेऊन शोक व्यक्त केला. त्यांच्या मृत्युबद्दल दुःखप्रदर्शनार्थ व त्यांच्या आत्म्याला सुखशांति मिळो म्हणून सभाहि भरवून आपलें दुःख व्यक्त केलें. त्यांच्या अनेक मित्रांनींहि आम्हांकडे दुःखप्रदर्शक पत्रें पाठवून वडिलांविषयीं अलोट प्रेम व्यक्त केलें. अशा प्रेमळ पितृदेवाच्या चिरवियोगाबद्दल आम्हांस आजन्म दुःख वाटेल यांत नवल कसलें? तथापि जगाच्या रहाटीकडे पाहून व भरे एक त्याचा दुजा शोक वाहे ॥ अकस्मात तोही पुढें जात आहे ॥ या समर्थांच्या उक्तयनुसार आमचीहि पुढें तीच गति आहे हें लक्षांत घेऊन, प्रिय वाचकहो! सत्वेषु मैत्रिं गुणिषु प्रमोदं ॥ सर्वेषु जीवेषु कृपा परत्वं ॥ माध्यस्तभावं विपरीत वृत्तौ ॥ सदा ममात्मा विदधातु देव! ॥ याप्रमाणें आमची सर्वकाळ वृत्ति राहो, आणि वाङ्मयसेवा, समाजसेवा, धर्मसेवा व राष्ट्रसेवा यांत आमचें उरलेलें जीवन (अंशतः तरी) व्यतित होवो, अशी परमेश्वराजवळ प्रार्थना करीत व यापुढें शुक्लेंदुवत् कृपा लोभ असो द्यावा, अशी अपेक्षा बाळगून कर्तव्यपरायणतेमुळें लांबलेला हा प्रास्ताविक व आत्मनिवेदनपर लेख आटोपता घेतों.

रविवार पेठ — पुणें.
ता. २५।५।२३

सर्वांचा नम्रबांधव व साहित्यभक्त
**तात्या नेमिनाथ पांगळ.**

ज्यांच्या प्रेमछत्राखाला आम्हास [illegible]
वर ४३ वाङ्मयरत्नांची रत्नमाला घालून तिची निश्चिंतपणें उपासना कर[illegible]
आली ते आमच्या गृहसाम्राज्याचे सम्राट—



एवढेंच नव्हे, तर या भूतलावरील आमचे साक्षात् ईश्वरस्वरूप ' पितृदेव परमपूज्य तीर्थरूप स्वर्ग० **दादासाहेब नेमिनाथ अनंतराज पांगळ** य[illegible] चरणीं हें वाङ्मयरत्न प्रेमपुरःसर समर्पण करीत आहोंत.

—भग्नहृदयी

"बालोद्यान" प्रेस, पुणें.

**तात्या नेमिनाथ पां**[illegible]

Sow. T. R. Malati Bai

# दिलबहार.



## कथासूत्र.



दिल्लीचा नामजादा सम्राट शिकंदर लोदी हा जसा ज्ञानानें तसाच गुणांनींही चांगला असल्यामुळें प्रजानुरंजन कसें करावें हें चांगल्या प्रकारें जाणत होता, आणि त्यामुळें तत्कालिक निरनिराळ्या देशाधिपतींपेक्षांही तो श्रेष्ठ गणला जात असे. जरी प्रजेला त्याची भीति वाटत होती तरी त्याच्यावर सर्वांची विलक्षण भक्ति असल्यामुळें आबाल-वृद्ध स्त्री-पुरुषांना तो मान्य होता. त्याच्यापुढें मान लवविण्याला कोणालाही कमीपणा वाटत नसे. त्याचें द्रव्यभांडार, व राज्यरक्षणासाठीं असंख्य सैन्य जय्यत तयारीनें ठेवलेलें होतें. राज्यांत सुखसमृद्धि नांदत असल्यामुळें व प्रजाही निष्ठापूर्ण राजभक्तिपारंगत असल्यामुळें त्याच्या कारकीर्दीत तंटेबखेडे, बंडें, चोऱ्या, दरवडे वगैरे प्रकारसे होत नसत.

सम्राट स्वतः न्यायासनावर बसून प्रजेच्या तक्रारी ऐकून घेत असे. आलेल्या मुकदम्यांतील वादीप्रतिवादींचे जाबजबाब स्वतःच्या कानानें ऐकून योग्य तो निकाल देणें हें आपलें कर्तव्य आहे असें तो मानी. गरीबांना मोफत घरें बांधून देणें, विहिरी, धर्मशाळा बांधणें, रस्त्याच्या दोन्ही बाजूंना झाडें लावून प्रवाशांचा मार्ग सुखावह करणें, वगैरे कितीतरी लोकहिताच्या गोष्टी करण्याकडे त्याच्या खजिन्यांतील पैसा खर्च होत असे. प्रजेच्या सुखदुःखांकडे लक्ष पुरविणें हेंच प्रत्येक राजराजेश्वराचें ध्येय असलें पाहिजे असें तो नेहमीं ह्मणे आणि त्याप्रमाणें वागे.

पण ईश्वरानें अशा प्रकारें त्याला सुखी करूनही त्याला मनस्तापानें अखंड तळमळत राहण्याचा प्रसंग आला होता. त्याच्या राज्यांत जरी शांतता नांदत होती तरी अन्तःकरण मात्र रात्रंदिवस अस्वस्थतेनें तळमळत होतें. त्याला कोणा बाहेरील जबरदस्त शत्रूची भीति होती असें नाहीं. किंवा

शेजारचा एकादा मांडलिक राजाही त्याच्याविरुद्ध कृष्णकारस्थान उठवीत होता असेंही नाहीं. हृदयांत अहर्निश पेटणाऱ्या या आगीचें कारण त्याच्या घरांतच होतें. अन्तःकरणांत धडाडणाऱ्या चिंतेच्या या तीक्ष्ण ज्वाला त्याच्या सर्वांगाचा ग्रास करूं पहात होत्या. कोणताही सामंत अथवा अमीर-उमराव यांच्याशीं या प्रलयाग्नीचा कांहीं संबंध नव्हता.

सम्राटच्या अस्वस्थतेचें कारण निराळेंच होतें. दिलबहार आणि गुल-बहार नांवाच्या त्याच्या दोन मुली होत्या. त्यांपैकीं दिलबहार हिला लहान-पणापासून मोकळ्या हवेंत फिरण्याचा शोक असल्यामुळें ती आपल्या दाई-बरोबर रोज सायंकाळीं नदीकिनाऱ्यावर हवाफेर करण्यासाठीं जाई व नौकेंत बसून जलविहारहि करी. अशाप्रकारें फिरून आल्यानन्तरचा तिचा तो प्रफुल्ल चेहेरा पाहून बादशाहालाही समाधान वाटे; पण हा आपला आनंद फार वेळ टिकणारा नाहीं हें त्या बिचाऱ्याला काय माहीत! मनुष्याचें जीवन हें भवितव्यतेच्या दोरीला बांधून त्या दोरीला ईश्वरानें स्वतःच्या हातांत घेत-लेली असते. मनुष्याला हें कसें समजणार! तो स्वतःच्या कर्तृत्वाची प्रौढी मिरवण्यांत गढून गेलेला असतो. सूत्रधारी जगन्नियन्त्याचे मार्ग त्याला कसे कळणार!

एके दिवशीं सायंकाळीं पांच वर्षांची छोटी दिलबहार आपल्या दाईसह खोजाला बरोबर घेऊन नेहमींप्रमाणें यमुना नदीवर जाऊन कैवर्तकानें आण-लेल्या नौकेंत बसली. मसायूद खोजाच्या देखरेखेखालीं हा जलविहार चाल-ला होता व दिलबहारही हंसत हंसत मोठमोठ्यानें टाळ्या वाजवून आपला आनंद व्यक्त करीत होती. इतक्यांत दुर्दैवानें जोराचें वादळ सुरू झालें व मोठमोठ्या लाटा उसळूं लागल्या. नावाड्याला नाव आवरेना. इतकेंच नव्हे तर तीराला आणतां आणतां ती नाव उपडी पडली. नावाडी दाईसह पाण्याच्या तळाशीं गेलीं. तीं दोघेंही एकदां सुद्धां पाण्यावर दिसलीं नाहींत. मसायूद मात्र कसाबसा त्या भयंकर नदींतून बाहेर पडला व जिवापाड मेह-नत करून त्यानें दिलबहारचा तपास केला; पण त्याला यश आलें नाहीं. तेव्हां तो अगदीं दुःखित अन्तःकरणानें छाती बडवून घेतच राजमहालांत आला व स्फुन्दस्फुन्दून रडत रडत त्यानें दिलबहारच्या शोचनीय मृत्यूची बातमी सर्वांना सांगितली. पाण्यांत बुडून मरण पावलेल्या शाहजादीच्या

प्रेताचा तपास करण्यांत आला. सर्वांनीं नदींत शोधून पाहिलें. चोहोंकडे लोक रवाना झाले; पण कुणालाही तिचा मृतदेह सांपडला नाहीं.

सम्राट अगदीं निराश झाला. त्याला सर्व सुखोपभोग विषासारखे वाटूं लागले. त्यानें लागलीच जाहिरनामा प्रसिद्ध केला कीं, ' माझ्या पाण्यांत बुडालेल्या मुलीचा जो मनुष्य शोध लावून देईल त्याला मी एक लाख मोहोरा बक्षीस देईन. ' पण या जाहिरनाम्याला चार पांच वर्षे झालीं तरी कुणाकडुनही कांहीं बातमी आली नाहीं. दिलबहार जिवंत आहे कीं मेली हेंहि त्याला कोणी सांगेना. तिचा मृत देह मिळाला नसल्यामुळें सम्राटाला फारच काळजी वाटूं लागली व मन अगदीं अस्वस्थ होऊन गेलें.

पांच वर्षे पर्यंत अशाप्रकारें वाट पाहून झाल्यानंतर दिलबहार खात्रीनें मरण पावली असली पाहिजे असें सम्राटनें ठरविलें आणि तिच्या स्मरणार्थ त्यानें लाल दगडाची प्रासादतुल्य कबर बांधविली. या प्रासादांत मध्यभागीं पांढऱ्या मर्मर प्रस्तराचें रत्नखचित गृह निर्माण करून त्यांत मृतकन्या दिलबहार हिची एक सोन्याची प्रतिमा स्थापन केली व प्रवेशद्वाराच्या वरच्या जागीं एका शीलेवर त्यानें पुढीलप्रमाणें एक लेख कोरविला. " अजूनही माझ्या पाण्यांत बुडालेल्या मुलीची जो कोणी खबर आणून देईल तो सत्कुलोत्पन्न व स्वजातीय असल्यास त्याला मी माझी मुलगी देईन व या कन्यादानाबरोबरच, पन्नास मणांची केलेली ही सुवर्णप्रतिमाही त्याला वरदक्षणा म्हणून मिळेल. इतकेंच नव्हे तर माझ्यामागून माझ्या राज्याचा अर्धाभागहि त्याला देण्यांत येईल. "

अशा तऱ्हेचा शिलालेख खोदविल्यावरही चार वर्षे निघून गेलीं. कोणी दिलबहारसंबंधीं कांहींही बातमी आणली नाहीं. त्यामुळें सम्राटला सर्वांचा फार राग आला व क्रोधावेशांत त्यानें प्रतिज्ञा केली कीं, " जो मनुष्य यापुढें माझ्या मुलीची बातमी आणील त्याला मी तावडतोब सुळावर चढवीन. "

पण याचा परिणाम काय होणार हें दिसतच होतें. बऱ्या लोकांची लहर बऱ्या लोकांनाच दुःखकारक व्हायची. दिलबहारचें एकादें चित्र अथवा तिच्यासारखी एकादी मुलगी कुठें कुणाला आढळली तर त्या बाबतींत जो तो मौनव्रत स्वीकारूं लागला. कारण प्रत्येकाला आपल्या जिवाची भीति ही होतीच. यामुळें दिलबहार जिवंत आहे कीं मेली हें समजण्याला कांहींच

मार्ग राहिला नाहीं. अशी ही पांच वर्षे निघून गेलीं. कालाचा अप्रतिहत प्रवाह चालूच होता. दिलबहारची रहस्यमय मृत्युकहाणी रहस्यांतच राहिली. कित्येक लोक ती विसरूनही गेले; पण त्या समाधिमंदिरांतील सोन्याच्या प्रति मेमुळें केव्हां केव्हां तो सगळा इतिहास प्रत्येकाला आठवत असे व दिलबहारचें पुढें झालें तरी काय, असा ज्याच्या त्याच्या अन्तःकरणांत एकच प्रश्न उभा राही; पण बादशहाच्या भीषण प्रतिज्ञेमुळें तो कुणालाही उच्चारवत नसे.

दिलबहारची धाकटी बहीण गुलबहार ही सौंदर्यशालिनी होती; पण ती अत्यंत गर्विष्ठ असल्यामुळें आपल्याच दिमाखांत नेहमीं मग्न असे. बादशाहा दुःखांत असल्यामुळें तिच्याकडे लक्ष द्यायला त्याला अवसरच मिळत नसे. ती मन मानेल तसें वागे. सम्राटला तें दुःखद होई; पण एकुलती एक पोर तिला आपण शासन तें काय करणार असा मनाशीं विचार करून तो डोळ्यांवर कातडें ओढी. या अशा प्रसंगीं त्याला दिलबहारची आठवण होऊन फार गहिंवर येई; पण ताबडतोब प्रतिज्ञेची आठवण होऊन तो स्तब्ध होत असे. अर्थात् त्याच्या अन्तःकरणाची तळमळ कशानेंच शांत होण्यासारखी नव्हती. त्याचा चोहोंकडून कोंडमारा झाला होता. अपत्य स्नेह विलक्षण असतो म्हणतात तें खोटें नाहीं. कन्यावियोगानें बादशाहाचें रक्त तिळतिळ आटे, असें म्हटलें तरी चालेल.

---

# प्रकरण १ लें.

—:०:—

## ' जगांत माझं असं कोणीच नाहीं !

" तूं जें सांगितलेंस तें ऐकून माझ्या जिवाचा कसा थरकांप होत आहे."

" मीं हें खोटें सांगितलें असें कां तुला वाटतें ? "

" खुदा कसम ? "

" होय खुदा कसम ! मी हजरतचें नांव घेऊन विश्वासपूर्वक सांगतों कीं मालकांचा सर्वस्वी घात झाला असून त्यांच्यावर चोहोंबाजूंनीं संकटें येऊं लागलीं आहेत ! "

" शिलक कांहींच नाहीं का ? "

" एक कवडीसुद्धां नाहीं. "

" तसं झालें तर काय उपाय करावा मुबारक ? "

" देनेवाला खुदा. तसाच लेनेवालाही तोच आहे. ज्यावेळीं कारभार चालू होता, व लोकांनाही भरपूर पैसे मिळत होते त्या वेळीं मोहोरांच्या थैल्या खजिन्यांत येऊन पडत असत, पण काळ बदलला. खुदानें पाठ फिरविली आणि भाग्यचक्र विरुद्ध गतीनें फिरूं लागलें, त्यावेळीं वृक्षांच्या छायेप्रमाणें सगळें कांहीं अदृश्य झालें आणि नन्दनवनाचें स्मशान बनलें. "

" लाखों रुपये आणि हांडे भरलेले जवाहीर केवळ एका वर्षांतच नाहींसें झालें ? "

" कां नाहींसें होणार नाहीं ? चालत्या काळांत कोणाचा तरी हितोपदेश त्यांनीं ऐकला का ? दोन हातांनीं पाण्यासारखा पैसा उधळला. मित्रमंडळीच्या आनन्दोल्लासांत आणि बाजारबसवींच्या गाण्याबजावण्यांत गढून गेल्यामुळें त्यांना कशाचेंच भान राहिलें नाहीं. पिपेंच्या पिपें शिराजी खलास होऊन गेली. ओंठाचा पेला बाजूला सरेना. वेश्यांच्या गानालापांमुळें कांहीं ऐकूं येईना, आणि हांजीहांजीखोर स्वार्थी मित्रांच्या हल्ल्यांतून स्वतःच्या जिवाला दूर करवेना; अर्थात् याचा परिणाम व्हायचा तोच झाला. एका वर्षांत सुखसौभाग्याला भडाग्नी देऊन मालकांची स्वारी आसवांनीं हात धुऊं लागली. मी कांहीं बोललों अथवा समजाविलें तर ते माझ्या अंगावर चाबूक घेऊन धांवत असत. माझा तरी इलाज होता का ? तुझ्यावर त्यांचें किती प्रेम ?, पण तुझ्या समजावणीचाही कांहीं उपयोग झाला नाहीं. उलट तुझा त्यांनीं धिक्कारच केला ! दलिये ! खुदाची इच्छा कुणाला फिरवितां येईल बरें ! जें व्हायचें तें होऊन गेलें आणि त्यामुळें आमचे मालक रस्त्यावरचे भिकारी बनले. सावकार लोकांचे तगादे सुरू झाले आहेत; पण यांच्याकडून कुणालाच कांहीं मिळणें शक्य नाहीं, हें आह्मांला दिसतच आहे. पैसा संपून गेला आणि आपली चैन चालेना असें आढळून येतांच हांस हो ठोकून कार्यभाग साधणारी मित्रमंडळीही कमी झाली. ज्यांच्या आनंदासाठीं त्यांनीं आपलें सर्वस्व घालविलें ते ' लंगोटीयार ' मालकांच्या हातांत नरोटी देऊन पसार झाले. इतकेंच नव्हे तर ते भेटायला गेले असतां त्यांना आपलीं तोंडें चुकवूं लागले. कित्येकांनीं तर आपल्या दारांतूनच हांकवून

लावलें. कुणीं तर प्रत्यक्ष तोंडावर त्यांचा अपमानही केला ! आतां काय राहिलें बरें ? "

" मुबारका ! खरोखर मला आश्चर्य वाटतें ! ही दुनिया इतकी स्वार्थपर आहे का ? या जगांत पैशालाच इतका श्रेष्ठपणा का बरें दिला जावा ? खुदातालापेक्षांही त्याचा अधिकार ज्यास्त असूं शकेल का ? निमकहराम होणें हाच मनुष्याचा धर्म काय ? ज्याच्या सुखासाठीं इतका पैसा उधळला व आपल्या भावी सुखाचा क्षणभरहि विचार केला नाहीं त्यांना दारांतून घालवून द्यावें हाच खरा मित्रधर्म काय ? त्यांची भेटही घेऊं नये ? परमेश्वर याचा न्याय करणार नाहीं असें वाटतें कां तुला मुबारक ? गरिबाचा वाली ईश्वर आहे ना ? "

" आहे; पण त्याच्या न्यायावर अवलंबून राहणारा माणूस कांहीं दगडधोंडा नव्हे. त्याला सुख-दुःख तहानभूक सर्व कांहीं आहे त्या दुष्ट व स्वार्थसाधु मित्रांना यथायोग्य शासन होईलच. आपण जगरूढीकडेसच लक्ष देऊन दिवस घालविले पाहिजेत. संसारांत सुखाचे दिवस कांहीं कायमचे रहात नाहींत. दलिये ! प्रकाश आणि काळोख यांचा पर्यायक्रम चुकलेला नाहीं. आमचे मालक आश्रयदाते व आश्रितवत्सल असल्यामुळें कपट कसें करावें व लोक कसे फसवितात हें पूर्वी त्यांना कळूनच येत नाहीं. हा पैसा त्यांनीं केवळ स्वतःच्या आनंदासाठीं उधळला असेंहि म्हणतां येत नाहीं. परोपकारासाठीं दान खैरात करण्यांतच त्यांचा खजिना रिता झाला आहे. दलिया ! पैसा गेला तर तो मिळवितां येतो; पण मनुष्य गेलें तर तें पुन्हां मिळवितां येईल का ? भिकारी मनुष्य रोजगार करून तरी पैसा मिळवील कीं नाहीं ? मग गरिबी येतांच मनुष्यानें स्वतःच्या जिवाला कां कंटाळावें ? आणि इतरांनीं तरी तो गरीब म्हणून त्याचा तिरस्कार का करावा ? आमच्या मालकांना खुदानें दीर्घायुषी करावें. तुझी खात्री असूं दे दलिये, अबू अयूबचा मुलगा इब्राहीम कधींही गरीब राहणार नाहीं. आलेली वेळ निघून जाईल आणि पूर्वीपेक्षांही चांगली वेळा आपल्याला येईल. मालक धनवान झाले कीं, आपल्याला काय कमी आहे ? नुकतीच त्यांना आपली स्थिति कळूं लागली आहे. त्यांचे डोळे उघडले आहेत. आतांपासून ते फार सावधपणानें वागूं लागतील. त्यांचें अन्तःकरण फारच दयाळू आहे. दुसऱ्याचें

थोडेसें दुःख पहातांच त्यांचे डोळे भरून येतात. स्वतःच्या पुढचें जेवणाचें ताट ते भुकेलेल्या भिकाऱ्याला देऊन टाकतात! खरेंच असल्या खर्चानेंच त्यांचें द्रव्यभांडार शून्यमय झालें, पण मला वाटतें त्यांचा तो खजिना लवकरच पूर्णपणें भरून निघेल. त्यांना कशाचीही ददात पडणार नाहीं."

"मुबारक! तुझ्या तोंडांत साखर पडो. तूं त्यांचा आवडता नोकर तशीच मीही त्यांची आवडती मोलकरीण आहें. उदारहृदय मालकाच्या सकरुण चेहऱ्याकडे पाहून त्यांच्या सुखासाठीं जिवाचें रान करून आम्हीं हे बरं वाईट दिवस घालविले. तेव्हां ते अक्षय सुखी असावे असें आम्हांला वाटणारच. खुदाताला त्यांचें भलें करो! त्यांचें कल्याण व्हावें म्हणून प्रत्येक दिवशीं सकाळीं मशिदींतील एका बाजूच्या जागेंत जाऊन मी प्रार्थना करतें हें तर तुला माहीतच आहे. तो दयाळू प्रभु माझ्यासारख्या अभागिनीची प्रार्थना मुळींच ऐकणार नाहीं काय?"

दोघां दासदासींत वरील भाषण चाललें होतें हें सांगायला नकोच. नोकराचें नांव मुबारक आणि दासीचें नांव दलिया होतें हेंहि समजून चुकलेंच आहे. मालकाचें नांव अली इब्राहीम असें असून हीं दोघेंहि आपल्या धन्याशीं इमानेंइतबारें वागणारीं चाकरमाणसें होतीं.

इब्राहीमचा बाप अबू अयूब हा दिल्लीच्या बादशाहाचा मुकीम असून त्याचें जन्मस्थान अजमीर हें होतें. त्यानें अजमीरांतच प्रासादतुल्य राजवाडा बांधून व मुलासाठीं अगणित ऐश्वर्य ठेवून परलोकीं गमन केल्यामुळें एकुलता एक मुलगा अली इब्राहीम हा अगदीं उघडा पडला असें जरी ह्मणतां येत नाहीं तरी त्याच्यावर कुणाचा दाब राहिला नाहीं एवढें मात्र खरें.

अली इब्राहीम हा अरबी आणि फारसी भाषेंत चांगला प्रवीण असून त्या कालीं जितकें शिक्षण संपूर्ण झालें असतां समाजांत विद्वान् ह्मणून ख्याति मिळवितां येत असे, तितकें सगळें शिक्षण इब्राहीमनें मिळविलेलें होतें; पण एवढा मोठा विद्वान् होऊन ती त्याची सगळी विद्वत्ता मातीमोल झाली. दुर्दैवानें स्वार्थी मित्रांच्या जाळ्यांत तो सांपडला.

मरणाच्या वेळीं अबू अयूबनें रोख पांच लक्ष रुपये व असंख्य जडजवाहीर खजिन्यांत भरून ठेविलेले होते. स्वतःच्या कष्टानें मिळविलेलें हें द्रव्य मुलगा स्वस्थ बसून राहिला तरी त्याला पुरून उरेल व दुसऱ्याच्या

तोंडाकडे पहाण्याचा प्रसंग येणार नाहीं. अशी म्हाताऱ्या अबू अयूबची मरतेवेळीं खात्री झालेली होती. पण त्याच्या त्या एकनिष्ठ आशेची पूर्ण निराशा झाली व त्याच्या दिवंगत आत्म्याला अश्रु ढाळण्याचा प्रसंग आला.

पण याचें कारण काय असणार! बापानें मुलाच्या हातांत दिलेल्या दिव्याचा भलत्याच कामीं उपयोग केला गेल्यामुळें घराचा उज्ज्वलपणा वाढविणें बाजूलाच राहून तें घर स्मशानांतील चितेप्रमाणें जळूं लागलें! तारुण्य, अगणित ऐश्वर्य, सर्वस्वावर स्वतःचें पूर्ण आधिपत्य, अविचारीपणा, आणि आपुलेपणाचा विसर या सर्व गोष्टी एकत्र झाल्यावर जो प्रकार होतो तोच याही टिकाणीं झाला. अबू अयूबच्या मनांत होतें कीं, मुलाचा विवाह करून एक सुंदरशी सून घरांत आणावी व त्यासाठीं त्यानें अनेक कुलीन कुमारिकांचा तपासही केला होता. एके ठिकाणीं तर वधूनिश्चयही झाला होता; पण त्याच्या आकस्मिक मृत्यूमुळें हें मंगल कार्य जागच्या जागींच राहिलें व चिरंजिवांनीं निरंकुशत्वामुळें पाण्यासारखा पैसा उधळण्याला सुरवात केली.

वाग्निश्चित वधूचा बाप, अबू अयूबच्या मृत्यूनंतरही इब्राहीमशीं आपल्या मुलीचा विवाह व्हावा म्हणून खटपट करीत होता; पण त्याचा तो हेतु तडीला गेला नाहीं. इब्राहीमनें त्याला स्पष्ट सांगितलें कीं, 'विवाह करून आयुष्यभर गुलामगिरींत खितपत पडण्याला मी तयार नाहीं आणि विवाह करण्याचा माझा मुळींच विचार नाहीं. आपली ही खटपट आणि उपदेश व्यर्थ आहे. आपण माझ्यासमोर वर्णन केलेले विवाहानन्तरचे रम्य देखावे माझ्या मनाला मोहित करूं शकत नाहींत.

कुणी कुणी असेंहि अनुमान केलें कीं, 'वाग्निश्चित वधूला नकार देऊन इब्राईमसाहेब आतां आपल्या सुंदर दासीबरोबर निका लावणार आहेत!' त्या कालीं विकत घेतलेल्या दासी बटक्यांशीं विवाह करण्याची चाल मुसलमानांत होती. खुद्द त्याच्या खलीपानेंही विकत घेतलेल्या स्त्रियांशीं विवाह केल्याबद्दलचा उल्लेख आढळतो. मग ही लोकवार्ता तरी खोटी कशी मानावी? पण बापाच्या मृत्यूनंतर जेव्हां इब्राहीमनें दोहों हातांनीं पैशाची धूळधाण करायला सुरवात केली तेव्हां लोकांनीं असा तर्क केला कीं हे राजेश्री

आतां अविवाहित राहून वारांगनांच्या जलशांतच आपलें आयुष्य खर्ची घालणार ! आणि याचा परिणाम असा झाला कीं, कोणीही त्याला आपली मुलगी द्यायला येईना व सर्व समाज एकप्रकारें त्याचा तिरस्कारच करूं लागला.

वर उल्लेख केलेली ' सुंदर दासी—दलिया' ही अबूअयूबनें बरीचशी रक्कम देऊन एका काश्मिरी सौदागराजवळून विकत घेतली होती. दलिया, रूपानें व गुणानें अप्रतिम होती. मोठ्या लोकांच्या घरांत शोभण्यासारखें तिचें वर्तन होतें. उदारहृदयाचे मालक अबूअयूब यांनीं दलियेच्या सद्गुणांनीं मुग्ध होऊन तिला आपल्या मुलीप्रमाणें पाळलें होतें. आणि यामुळेंच इब्राहीमच्या वाड्यांत तिचा बराच अधिकार चालत असे. प्रत्यक्ष इब्राहीमलाही उपदेशाचे दोन शब्द सांगायला ती माघार घेत नसे. इतर दासदासीपेक्षां तिचा दर्जा फार मोठा मानला जात असे व ती केवळ एकाद्या अन्तःकरणशून्य गुलामाप्रमाणें राबतही नसे

काय तें दलियेचें दिव्य सौंदर्य ! तिचें वय वीस वर्षांचें असेल नसेल. नवप्रस्फुटीत कमलाप्रमाणें दिसणारा तिचा तो उत्साहयुक्त व हंसणारा चेहरा पाहून कोणीही मुग्ध होत असे. विश्रांतीसाठीं कपोलापर्यंत गेलेले व कृष्णतारकेनें सुंदर दिसणारे नेत्र भ्रंगपदचिन्हित कमदलाप्रमाणें शोभत होतें. पाठीवरून कटिप्रदेशापर्यंत रुळणारा कृष्णकुन्तलभार अलिकुलापेक्षां मनोरम दिसत होता. तिचे ते गुलाबी रंगानें उठावदार दिसणारे गाल, सामान्य परिश्रमांनीं मुद्दां प्रखर सूर्यकिरणांनीं संतप्त झाल्याप्रमाणें आरक्त दिसत असत. दासीरूपानें घरांत वावरणाऱ्या या सौंदर्यशालिनी दलियेला पाहून तिचा तरुण मालक इब्राहीम एकदे वेळीं प्रेमविमुग्ध होऊन म्हणे, " दलिये ! दलिये ! तूं किती सुंदर दिसतेस बरें ? माझ्या हृदयांतील अतृप्त आकांक्षा तूं पूर्ण करणार नाहींस का ? या घराला राजराजेश्वरीच्या रूपानें शोभा आणण्याचें काम तुझें आहे. तूं या घराची राणी नाहीं का होणार ? मालकीण व्हावें असें तुला कधीं वाटत नाहीं का ? "

दयाळू अन्तःकरणाच्या मालकानें उच्चारलेलें हें प्रेमगीत दलियेनें ऐकलें. कठोरपणानें त्या गीताची उपेक्षा केली नाहीं अथवा कधीं आशाजनक असें उत्तरही दिलें नाहीं. ती तटस्थ राहिली. कुणालाही तिनें आपल्या

अन्तःकरणाचा थांगपत्ता लागूं दिला नाहीं. तरी पण इब्राहीमला वाटलें असतें तर तो तिच्याशीं बलपूर्वक विवाह करूं शकला असता. कारण ती त्याची विकत घेतलेली दासी होती; पण दलियेचा तरूण मालक चरित्रहीन नव्हता. तो दालियेच्या सौंदर्याची प्रशंसा करी, तिच्याकडे प्रेमाची भिक्षा मागे, तिच्याकडून आशाजनक उत्तर न मिळाल्यामुळें तो निराश अन्तःकरणानें दीर्घ सुस्कारे सोडी; पण त्यानें कधींही तिला विवाहाच्या बाबतींत आग्रह केला नाहीं अथवा त्रास दिला नाहीं. कारण त्याच्या त्या प्रेमांत काम-किल्मिषाचा गंधही नव्हता. वासनेच्या कर्दमांत त्यानें आपल्या प्रेमाचीं फुलें पददलित केलीं नव्हतीं.

फुललेलें फूल पाहून अनेक लोक ज्याप्रमाणें आपल्या नेत्रांचें पारणें फेडून घेतात. मधुर आवाज असलेल्या व्यक्तीचें स्वर्गीय संगीत ऐकून ज्याप्रमाणें पुष्कळ लोक आपल्या कर्णेन्द्रियाचें समाधान करून घेतात, त्याप्रमाणें तरूण इब्राहीम दालियेचें वीणाविनिन्दित मंजूळ भाषण ऐकून आणि परीनाही लाजविणारें तिचें सौंदर्य पाहूनच समाधान मानीत असे. आपणाला इतकें जरी कायमचें सुख मिळालें तरी पुरें आहे असें त्याला वाटे. आणि हाच त्याचा मुख्य स्वार्थ होऊन बसला होता.

मरते वेळीं अबू अयूबनें दालियेला दोन हजार मोहरा बक्षिस दिल्या आणि दासीपणांतून मीं मुक्त केलें आहे असें सांगितलें. तूं आतां कुणाचीही गुलाम नाहींस. तुला स्वतंत्रपणानें कुठेंहि जातां येईल. आपल्या बापानें दलियेला स्वातंत्र्य दिलें आहे ही गोष्ट इब्राहीमलाही माहीत होती. अर्थात इच्छेला येईल तिकडे तिला जातां येईल हें तो जाणून होता; पण ती गेली नाहीं. तिच्या अन्तःकरणाची परिक्षा पहावी म्हणून इब्राहिमनें तिला 'तूं हा नोकरीचा पेशा सोडून कुठेंहि जा. मी तुला निरोप द्यायला तयार आहें.' असें सांगून पाहिलें; तरी पण ती जाण्याला तयार झाली नाहीं. उलट तिनेंच त्याला सांगितलें, "मी निराश्रित आहें. जगांत माझं असं कोणीच नाहीं. मी कुठं जाऊं आणि कुणाकडे राहूं ? मला आपलेपणानें जवळ घेईल असा माझा एकही आप्त नाहीं. माझ्या स्वर्गस्थ धनीसाहेबानीं मला मुलीप्रमाणें मानलें आणि माझें तसें पालनही केलें. यःकश्चित् दासी म्हणून माझी त्यांनीं कधींही उपेक्षा केली नाहीं. तेव्हां या स्वार्थी जगांत मला एकाएकी स्थितींत

सोडण्याचें निष्ठुर कर्म आपणही करूं नये. मी माझा भार आपणांवर घालणार नाहीं. इतरांसारखे चार धंदे करून आजपर्यंत जसें आयुष्य घालविलें तसेंच पुढेंहि घालवीन. माझ्या मुक्ततेचा इतिहास आह्मां दोघांवांचून कुणालाही माहीत नाहीं. तेव्हां लोकापवादाचीही भीती बाळगण्याचें कारण नाहीं. पुढें कांहींही होवो; पण मला अशा या तारुण्यांत जुना असलेला आश्रय सोडून जाणें ह्मणजे फारच कठीण काम आहे. तुटलेल्या कड्यावरून धांवत जायला पत्करेल; पण आज बाहेर तोंड काढून एकाकी स्थितींत जगांत वावरणें फारच भयंकर आहे. मला स्वातंत्र्य नको. मी कायमचीच आपली परिचारिका होऊन राहीन. आंगभर वस्त्र आणि घांसभर अन्न मिळालें कीं मला आणखीं कांहींही नको." इब्राहीम यावर काय बोलतो! तो गप्प राहिला.

---

# प्रकरण २ रें.

—:※:—

## ' ईश्वरावर विश्वासून राहायचं ! '

सध्यां पुष्कळ दिवसपर्यंत चाललेल्या उधळपट्टीनें वडिलार्जित संपत्तीचा निकाल झाल्यामुळें इब्राहीमला फारच कठीण दिवस आलेले होते. आपलें आतां पुढें कसें होईल याच काळजींत त्याचा प्रत्येक दिवस जात होता. लाखों मोहोरा आणि असंख्य जवाहीर स्वप्नाप्रमाणें अकस्मात् नाहींसें झाल्यामुळें त्याला चोहोंकडे उजाड दिसत होतें. शहरांत असलेल्या दोन घरांचें भाडें येत असे; पण तींहि सावकाराकडे गहाण पडल्यामुळें उत्पन्नाचा तोहि मार्ग बंद झालेला होता. चांगल्या अमृतासारख्या फळांच्या वृक्षांनीं गजबजलेल्या कांहीं बागा होत्या; पण त्याही क्रमाक्रमानें सावकाराच्या ताब्यांत गेल्या. अर्थात् राहात्या घरावांचून आतां कांहींच शिल्लक राहिलेलें नव्हतें.

" सुखाचे सांगाती सगे सोयरे!" इब्राहीमच्या या कठीण काळीं त्याला मदत करण्याचा कांहींही उपाय न करितां आपल्या घरीं निघून गेले. इतकेंच नव्हे, तर कित्येकांनीं त्याची निंदा करायलाही सुरवात केली. एकाद्या नाट्यशालेप्रमाणें गजबजून गेलेला तो वाडा हळू हळू स्मशानासारखा भयाण

दिसूं लागला व उज्ज्वल प्रकाशाचे दिवे नाहींसे झाल्यामुळें अमावास्येच्या काळोखानें त्याची भीषणता वाढूं लागली. सावकारांनीं तगाद्याला सुरवात केली होतीच. कुणीं कुणीं तर काजीकडे फिर्याद लावण्याचेंहि भय दाखविलें. त्यांत कोणी सहृदय आणि प्रसंग जाणणारे होते, त्यांनीं इब्राहीमची वाईट वेळ पाहून आपल्या कर्जरोख्यांच्या मुदती वाढवून घेतल्या.

केवळ नाचगायन आणि मद्यपानोत्सव यांतच इब्राहीमची सगळी संपत्ती उधळली गेली नाहीं हें आह्मीं पूर्वीं सांगितलेंच आहे पापाच्या अपव्ययाबरोबर पुण्यार्जनासाठीं केलेल्या योग्य दानाचीही नोंद होत होती. एका सराईखान्याचा सर्व खर्च याच्या देणगीवर चालत असे. रोज सकाळींच सराईखान्याचा मालक येई आणि तीन रुपये घेऊन जाई. एवढ्या रकमेंत तेथें येणाऱ्या गोरगरीब पाहुण्याचा योग्य परामर्ष घेतला जात असे. पण आतां चोहोंबाजूंनींच पडती कळा आली असल्यामुळें हें दैनिक दानही बंद पडलें होतें आणि आश्चर्य हें कीं, अशा रीतीनें इब्राहीमकडून येणारी रक्कम दोन तीन महिन्यापूर्वींच बंद झाली असतांही तो सराईखाना अथवा अतिथीशाला पूर्वीप्रमाणेंच चालू होती. तिच्या रोजच्या कार्यक्रमांत मुळींच बदल झालेला नव्हता! एके दिवशीं त्यानें त्या सराईखान्याच्या मालकाला बोलावून आणून विचारलें, " या दोन महिन्यांत माझ्याकडून तुला सराईखान्याचा खर्च मिळालेला नाहीं आणि मी तर ऐकतों तुझी धर्मशाळा पूर्वीप्रमाणेंच चालू आहे याचा अर्थ काय? "

यावर सराईखान्याचा मालक कांहींसा आश्चर्यचकित होऊन ह्मणाला, "मला वाटतें कामाच्या गर्दीमुळें आपणाला कित्येक गोष्टींची विस्मृति होत असावी. आपल्या दयाळूपणानें मिळणाऱ्या पैशावरच अजूनपर्यंत सराईखान्याचा खर्च चाललेला आहे. मात्र पूर्वीं ज्याप्रमाणें मी येथें येऊन रोजच्या रोज पैसा घेऊन जात असें त्याप्रमाणें आतां न्यावा लागत नाहीं. मला घरच्याघरीं बसून हे तीन रुपये मिळत असतात. प्रत्येक दिवशीं सकाळींच मी माझ्या बिछान्यावरून उठलों कीं तेथेंच रुपयांची पिशवी मला आढळते व त्याला एक चिठीही गुंडाळलेली असते. त्या चिठींतील पुढील मजकूर होता:—

" ही रक्कम ह्मणजे अल्ली इब्राहीम साहेबांनीं दिलेलें दैनिक दान आहे.

खुदाशपथ. ही चिठी फाडून टाकून तूं आंतील रुपये घ्यावे आणि ही गोष्ट कुणाजवळहि बोलूं नये. रकमेचा विनियोग रोजच्याप्रमाणें करावा."

अशा प्रकारचा असल्यामुळें मी त्याचा कुणापाशींहि उच्चार करीत नसें.'

सराईवाल्याचें हें बोलणें ऐकून इब्राहीमला अतिशय आश्चर्य वाटलें. सराईखान्यांत अशा गुप्तपणानें रुपये ठवून येणारी व्यक्ति कोण त्याला ठरवितां न आल्यामुळें त्याला एक प्रकारची विलक्षण उत्सुकता वाटूं लागली. स्वतःची निष्कांचनावस्था होऊन दोन महिने झाले. अर्थात् आज दोन महिने अशा रीतीनें गुप्त दान देणारा गृहस्थ आहे तरी कोण? दुसऱ्याच्या नांवावर गुप्त दान करणारा उदार दाता या पृथ्वीच्या पाठीवर कोणीतरी असेल कीं नाहीं, याबद्दल त्याला संशय वाटत असल्यामुळें हें भाषण ऐकून तो अगदीं मूढच झाला आणि विचार करूं लागला.

कांहीं झालें तरी शेवटीं असा एक कठीण दिवस आला कीं, त्या दिवशीं इब्राहीमच्या हातांत एक पैसाहि नाहीं असें झालें. यापूर्वीच त्यानें आपल्या विकत घेतलेल्या दासदासी सोडून दिले होते. यामुळें त्याचा गजबजलेला मोठा वाडा अरण्यांतील गुहेप्रमाणें निर्जन झाला होता. चोहोंकडे निस्तब्धता आणि उदासीनता यांवांचून दुसरें कांहींही दिसत नव्हतें. दिवाणखान्यांतील व रंगमहालांतील सगळ्या शोभेच्या वस्तु विकल्या गेल्या होत्या. त्यामुळें मोठमोठे दिवाणखानें आणि बैठकीच्या जागा अगदीं ओस पडल्या होत्या.

घरांतील जुन्या पुराण्या दासदासींपैकीं कोणी अन्न न मिळाल्यामुळें, तर कोणी पगार न मिळाल्यामुळें व आपल्या मालकाला आलेली गरीबी दिसत असल्यामुळें एकेक याप्रमाणें निघून गेल्या. शेवटीं विश्वासून व सेवातत्पर दालिया आणि मुबारक हीं दोनच चाकरमाणसें राहिलीं. इब्राहीमनें यांना शेंकडो वेळा जा ह्मणून सांगितलें. माझ्याबरोबर तुह्मी उपास कां काढतां? 'दुसरा धनी पहा' असें कितीदां तरी सांगितलें, पण तीं गेलीं नाहींत.

दालिया ही दासी खरी; पण इब्राहीम तिला फारच दयाळूपणानें वागवी. या कठीण प्रसंगीं सुखदुःखाच्या दोन गोष्टी बोलायला तिच्यावांचून त्याला दुसरें कोणीही प्रेमाचें माणूस नव्हतें. दालियेचें सौंदर्य अप्रतीम होतें. ती केवळ सुंदर होती असेंच नाहीं तर तिचे गुणही वाखाणण्यासारखे होते.

तिनें आपल्या मालकाच्या करमणुकीसाठीं गायनाचा अभ्यास केला होता. आणि नृत्यकलेंतही ती चांगली निष्णात झाली होती. तिचें बोलणें फारच मधुर असून ती लाजाळू होती. त्यामुळें तिच्या सौंदर्याची खुलावट फार बहारीची दिसत असे. तिच्या नेत्रांत व चेहेऱ्यावर कारुण्यतेचें तेज विलसत होतें. त्यामुळें इब्राहीमला तरी ती एक देवता आहे असें वाटे.

तसाच त्याचा नोकर मुबारक हाही विलक्षण स्वामीनिष्ठ व सेवापरायण मनुष्य होता. त्याचें सगळेच गुण वाखाणण्यासारखे होते. तो जुन्या काळचा माणूस असून बापाच्या वेळेपासून त्या घरांत नोकरी करीत होता. त्याच्या आंगांत सिंहाचें सामर्थ्य होतें आणि त्या सामर्थ्याचा तो घरगुती व बाहेरची सर्व कामें करण्याकडे उपयोग करीत असे. इब्राहीमचा त्याच्यावर प्रगाढ विश्वास होता आणि त्यानेंहि पुष्कळ दिवस याच घरांतील निमक खाल्लेलें असल्यामुळें मनानेंहि कधीं अविश्वास दाखविला नाहीं. सुखाच्या दिवसांत मालकाच्या बरोबरीनें त्यानें सुख भोगलें. अकृतज्ञता ह्मणजे काय हें त्याला मुळींच माहीत नव्हतें. स्वतःच्या सुखासाठीं कोणती एक गोष्ट करावी असेंहि त्याला वाटत नव्हतें. त्यामुळें तो प्रत्येक गोष्टींत त्याची आपल्या मालकावरची निष्ठा दिसून येत असे व त्यांतच त्याला खरा आनंद वाटे.

एकदां दालिया आणि मुबारक दोघेच एका दिवाणखान्यांत बसून बोलत होतीं.

दालिया म्हणाली, "मुबारक! आपण कशाला नसती काळजी करावी? सगळ्या कांहीं गोष्टी परमेश्वराच्या स्वाधीनच्या आहेत. आज आमच्या मालकाच्या हातांत एक पैसाही नाहीं; पण चाललं आहे कीं नाहीं. मनुष्याच्या उपजीविकेची काळजी आपल्यापेक्षां देवाला जास्त असते. तो कुणालाच कधीं उपाशी ठेवीत नाहीं."

हें ऐकून मुबारक किंचित् हंसून ह्मणाला, " होय. ह्मणणें बरोबर आहे. तुझ्यासारखी देवदूती ज्या ठिकाणीं आहे, त्या ठिकाणीं केव्हांच कांहीं कमी पडणार नाहीं. तूं देवलोकची परी आहेस!"

"काय बोलतोस हें मुबारक! तुझ्यासारख्या माणसानें कांहीं तरी विचार करावा!"

कसला विचार करायचा! मला सगळें कांहीं समजतें बरें! मी लहान-

पणापासून तुला ओळखतों. थोरल्या मालकांनीं मरतेवेळीं तुला दोन हजार सोन्याचीं नाणीं दिलीं आहेत, शिवाय अजूनपर्यंतचा तुझा तनखाही तुझ्याजवळच मौजूद आहे आणि आजच्या प्रसंगीं तूंच त्यांतून सगळा खर्च चालविला आहेस. सध्यांचा रोजचा खर्च चालविणारी तूंच. तुझ्या हृदयाचा हा उदारपणा आणि जन्मस्वभाव पाहून मी तर इतका मुग्ध होऊन जातों कीं, माझ्या नेत्रांतून अश्रु वाहूं लागतात. अगदीं आपण होऊन तुझा कायमचा गुलाम होऊन राहावें असें वाटतें. खरोखर, तुझी योग्यता फारच मोठी आहे. ”

“ मुबारका ! तुंच का बोलत आहेस हा ! वा: बोलण्यांत तर तूं अगदीं मौलाना झालास ! चूप. आतां या बाबतींत एक शब्दही बोलायचा नाहीं. ते पहा. मालक इकडेसच येत आहेत.पहा. त्यांचा तो उतरलेला चेहरा पाहून मला तर फारच भीति वाटूं लागली आहे. कदाचित् त्यांच्यावर कांहीं तरी नवीनच संकट आलें नसेल कशावरून ? मुबारक ! अशा वयांत आपल्या मालकांची ही स्थिति पाहून मला फारच वाईट वाटतें. ” असें म्हणून दालियेनें आपले डोळे पुसले व दीर्घ सुस्कारा सोडून ती आपल्या मालकाची वाट पाहूं लागली.

याच वेळीं इब्राहीम तेथें आला आणि खिन्नपणानें म्हणाला, “ तूं आतां काय बोलत होतीस दालिये ? मला वाटतें माझ्यासारख्या हतभागी मालकासंबंधानेंच कांहीं तरी बोलणें निघालें असावें. असणारच तसें ! तुम्हांला तरी माझ्यावांचून दुसरें काय सुचणार ? ”

दालिया आपल्या प्रभूला सलाम करून नम्रपणानें म्हणाली, “ नाहीं. मालक! आम्ही गरीब नोकर माणसें ! आपल्यासंबंधीं आम्हीं काय बोलणार ! मी ऐकलें कीं, आपण त्या सैतानी उमरशेखकडे गेलां आहां, तेव्हां काय होतें कोण जाणे ! अशी काळजी वाटून त्यासंबंधानें आम्ही बोलत होतों. शिवाय आपणाला यायला विलंब लागला त्यामुळें ती काळजी ज्यास्त दुणावली. उमरशेखचा कारभार फार मोठा आहे आणि त्याच्या इतका श्रीमंत या बाजारांत कोणीही नाहीं हें मला माहीत आहे; पण तो किती नीच आहे, हें मी जाणून असल्यामुळें आपल्याबद्दल मला काळजी वाटत होती. त्याला पैशावांचून दुसरें कांहींही दिसत नाहीं. त्याला पैशा-

पुढें कशाचीही मातब्बरी वाटत नाहीं, त्यामुळें कदाचित् आपले व त्याचें तोंडाला तोंड होईल आणि त्या स्थितींत तो कांहीं तरी अपमानकारक शब्द बोलल्यास तो सावकार असल्यामुळें आपणाला ते ऐकून घ्यावे लागतील; कदाचित् भलताच प्रसंग यायचा, त्यामुळें मीं अगदीं वाटेला डोळे लावून बसलें होतें. ”

इब्राहीम एक दीर्घ निश्वास सोडून म्हणाला, “ दलिये ! तुझें अनुमान खरें आहे. खरोखरच आज त्याच्या बरोबर माझें चांगलेंच भांडण झालें. तुझ्याजवळ मी कधींच कांहीं लपविलें नाहीं मग हें तरी कशाला लपवूं ! सोन्याचें नाणें नव्हे पण तांब्याचें एक नाणेंहि या प्रसंगीं माझ्याजवळ नाहीं. मी असा अगदीं निष्कांचन झाल्यामुळें हा वाडा गहाण ठेवून कांहीं रकम काढण्याच्या इराद्यानें मी त्याच्या घरीं गेलों होतों. नाहीं तर त्या दुष्ट उमरशेखच्या इथें जाण्याचा माझा मुळींच इरादा नव्हता; पण तो माझ्या म्हणण्याला नाकबूल झाला. उलट किरकोळ देण्यापैकीं असलेले चारशें रुपये आत्तांच्या आतां पाहिजेत म्हणून हट्ट धरून बसला. आणि नंतर दलिये, तो मला जे शब्द बोलला ते माझ्यानें तुझ्यापुढें; सांगवत नाहींत ! हाय ! असले शब्द ऐकून घेण्याचा माझ्यावर प्रसंग यावा ना ? ”

आपल्या दयाळू धन्याची ती कळकळ पाहून दलियेला गहिंवर आला. ती सद्गदीत होऊन म्हणाली, “ आश्रितवत्सल प्रभो ! देवानंतर जर मला कुणाची प्रथम आठवण होत असेल तर तीआपलीच ! माझे अन्नदाते आपणच आहां ! ही अभागिनी कायमचीच आपल्या वडलांच्या अन्नावर पोसली गेली आहे. लहानपणच्या कांहीं आठवणी स्वप्नांतील छायेप्रमाणें अस्पष्ट रीतीनें मला दिसतात खऱ्या पण मला वाटतें त्या सगळ्या स्वप्नमयच असाव्या. फार लांबच्या कंदाहर प्रांतांतून आपल्या वडलांनीं मला एका काश्मिरी सौदागराकडून विकत घेऊन येथें आणलें. आणि त्यांच्याकडूनच मला ही हकीकत समजली. आपल्या आश्रयाला आल्यापासून आपला उदारपणा आणि दयाळुत्व या दोन गुणांनीं मोहित होऊन मी स्वतःलाही विसरलें. आपल्या दासीचीही दासी होऊन राहाण्यांत जो थोरपणा आहे तो दुसऱ्या कशांतही नाहीं हें मी समजून चुकलें. आपलें व आपल्या वडलांचें दयेचें ऋण फेडणें हें मला या जन्मांत तरी शक्य नाहीं. मला त्या उपका-

रांतच राहिलें पाहिजे. म्हणून म्हणतें कोणीही कितीही कठोरतेनें मला बोललेलें असलें तरी ते शब्द आपल्या तोंडून मला ऐकूं आल्यास त्यांची कठोरता कितीतरी कमी होईल. तेव्हां जें कांहीं आपण मला सांगणार असाल तें अगदीं मोकळ्या मनानें सांगा. कारण मला तें पूर्वीच समजलेलें आहे. ”

“ तुला काय समजलें आहे दलिये ? ” इब्राहीमनें आश्चर्यानें विचारिलें.

“ तो सैतान उमरशेख मला गुलामाप्रमाणें विकत घेण्याची इच्छा करीत आहे.

“ होय होय. दलिये ! तुझा अंदाज बरोबर आहे. त्यानें माझ्याकडेहि असेच उद्गार काढले. मला असलें हें बोलणें ऐकून घेण्याचा प्रसंग यावा ना ? ”

“ काय करायचं. हुजूर ? प्रसंग आला खरा ! पण आपण अगदीं वाईट वाटून घेऊं नये. मी आपला आश्रय इतक्या सहज रीतीनें कधींही सोडणार नाहीं. ज्या देवासारख्या इब्राहीमला मीं माझे मालक समजून दिवस घालविले, त्यांना अशा वेळीं सोडून जाणें हें केव्हां तरी मला योग्य दिसेल का ? अशा मूर्तिमंत देवाला सोडून मी त्या सैतानाची सेवा चाकरी करीन असें आपणाला वाटतें तरी कसें? त्याचें अन्तःकरण किती नीच आहे हें मीं एका प्रसंगावरून जाणलें आहे.प्रसंगच आला तेव्हां तो झालेला प्रकारच मी आपणाला सांगतेंच. प्रथम ठरविलें होतें कीं तो प्रकार मीं आपणाला सांगू नये; पण आतां प्रसंगच आल्यामुळें तो सांगावा लागत आहे. आपला विश्वासू नोकर मुबारक यावांचून दुसऱ्या कोणालाही ही गोष्ट अद्याप समजलेली नाहीं. मागें आपण मला एकदां सांगून ठेवलें होतें त्याप्रमाणें मी वागण्याचें ठरवून कधींही घराबाहेर पडत नसें; दुर्दैवानें मला एके दिवशीं घराबाहेर पडण्याची बुद्धि झाली. कारण मागें आपण अकस्मिक बेशुद्ध पडत असां; आणि त्यावेळीं उपचार काय करावे तें कांहीं मला समजत नसे. तेव्हां त्या रोगांतून आपणाला बरें वाटावें म्हणून मी एकदां नजीकच्या पीराला नवस करण्याकरतां म्हणुन गेलें. ”

“ अस्सं. मग काय झालें बरें ? ” इब्राहीमनें उत्सुकतेनें विचारिलें.

" मग काय व्हायचं ! रस्त्यांत मला सैतानी उमरशेखनें पाहिलें. एकाद्या हीन कुळांतील स्त्रीप्रमाणें माझी हेटाळणी करून तो दांत विच फिदी फिदी हंसत मला म्हणाला, ' दलिये, तूं फार सुंदर आहेस ! राज श्वरीला शोभण्यासारखें तुझें सौंदर्य आहे. तुला त्या भिकारड्या इब्राही दासी बनविण्यांत खुदानें केवढा बरें मूर्खपणा केला आहे ! मला तर हें अग विचित्र दिसतें. तूं त्या इब्राहीमचा आश्रय सोडून माझ्याकडे ये पाहूं ! तुझा मोबदला म्हणून आत्तांच्या आत्तां तुला दोन हजार मोहोरा दे इब्राहीमची तूं मुळींच भीति बाळगूं नकोस. मी लवकरच काजीकडे त्या वर फिर्याद लावून तो होता कीं नव्हतासें करून टाकतों. माझ्यापुढें त्या किंमत ती काय ? —' माझ्यानें त्याचें हें बोलणें ऐकवेना. रस्त लोकांची जा ये असल्यामुळें मला कांहीं उत्तर देतां आलें नाहीं. नाहीं मीं त्याला असें रोख उत्तर दिलें असतें, कीं, त्यानें नक्षत्रेंच मो राहावीं. "

" पण तूं त्याला कांहीं तरी जबाब दिलास कीं नाहीं ? " इब्राही विचारलें.

" मीं त्याला म्हटलें, ' मला जरी तूं कुबेराचें भांडार आणून दि तरीही मी तुझी दासी होऊन राहायला तयार नाहीं. जो उघड्या रस्त वर एका पडदानशीन स्त्रीस असा असभ्यपणानें वागूं शकतो, तो नीच स्वभावाचा असला पाहिजे आणि त्याचें अंतःकरण किती अवनती पोंचलें असलें पाहिजे याची मला चांगलीच कल्पना होत आहे. आधी इब्राहीमप्रमाणें देवचरित हो, तुझ्यांत मनुष्यत्व येऊं दे. त्यानंतर दान रात करून तूं पुण्य संपादन कर, म्हणजे मग मी तुझ्या या प्रश्नाला उत्तर द्यायचें त्याचा विचार करीन. माझ्या मालकासमोर आज तूं असले कांहीं शब्द बोलशील तर तुला चांगलीच थप्पड खाऊन मागें फि लागेल. तुला कोणी भिणार नाहीं आणि तुझें बोलणेंही कुणी ऐकून णार नाहीं. "

हें तिचें बोलणें ऐकून इब्राहीमला आनंद झाला. तो उल्हासानें णाला, " वाः तूं अगदीं योग्यच उत्तर दिलेंस. त्यानें माझ्या स असला मूर्खपणा केला असता तर मी त्याला योग्य शिक्षा केल्यावांच

कधींच स्वस्थ बसलों नसतों; पण हाय ! दलिये, मी कर्जबाजारी झाल्यामुळें मला तसला तो अपमानही आज सहन करावा लागला. मीं त्याचे शब्द ऐकलें आणि त्याला चांगलें पैजारांनीं झोडपलें; पण त्याचा कोणी असगार नांवाचा मित्र आहे, त्याच्यापुढें मला हार खावी लागली. त्यानें मला बाजूला नेलें. नाहींतर मी त्या बदमाषाची पुरीच गठडी वळणार होतों. तरी पण त्याला माझ्या हातचा चांगलाच मार बसला आहे. तो मला आतां विसरणार नाहीं. ”

“ बरं झालें. त्या उद्धट मनुष्याला असेंच योग्य शासन झालें पाहिजे असे कितीही पैजार मारले तरी त्याचे डोळे उघडणार नाहींत ! तो तसाच निगरगट्ट आहे ” दलिया म्हणाली.

“ हें सगळें झालें खरें; पण मी पडलों रिणको आणि तो पडला सावकार ! मला आतां याबद्दल चांगलाच हात दाखविण्याचें त्यानें ठरविलें आहे. ”

“ म्हणजे ? तो आपलें काय करील ? ” दलियेला भीति वाटली.

“ मी त्याचें किरकोळ चारशें रुपये देणें आहे. तो म्हणाला, ते माझे रुपये जर मला उद्यां मिळाले नाहींत तर मी चार लोकांसमक्ष तुझी बेइज्जत करायला कमी करणार नाहीं. तुला मग बाहेर तोंडही काढायला नको. मग सांग बरें दलिये ! मी आतां काय करूं ? ” इब्राहीम अगदीं हताश होऊन म्हणाला.

दलियेलाही वाईट वाटलें. तरी पण या प्रसंगीं मालकाला धीर देणें हें आपलें कर्तव्य आहे असें ठरवून ती हळूच म्हणाली, “आपण ईश्वरावर विश्वासून राहा ! तो आपलें कधींही अमंगल करणार नाहीं. दुःखाचे दिवस आले तरी आपणासारख्या समंजस माणसांनीं धीर धरलाच पाहिजे जगन्नियंत्यावर विश्वास ठेवल्यानें कधींही आपलें अकल्याण होणार नाहीं. कोणत्याही प्रसंगांतून आपणाला पार पाडायला तो समर्थ आहे. यःकश्चित् मनुष्याचें सामर्थ्य तें किती ? उमरशेखच्या कोणत्याही धमकीला आपण भिऊं नये. आपला आपमान करण्याची त्याच्या बिशाद नाहीं. ”

“ तूं म्हणतेस तें खोटें नव्हे दलिये;पण मी कूळ आणि तो सावकार. तो जें म्हणेल तेंच लोकांना खरें वाटेल कीं नाहीं ? गरिबाच्या बोलांना किंमत

नसतें दलिये ! माझ्या हातांत यावेळीं एक पैसाही नाहीं हें तूं विसरत आहेस ! उद्यांच मला त्याचे चारशें रुपये कसे बरें देतां येतील ? नुसत्या उपदेशानें या ठिकाणीं समाधान होण्यासारखें नाहीं. "

" छे छे. आपण असं बोलूं नये. एवढयाशा संकटांनीं घाबरून जाणं हें आपल्याला शोभत नाहीं. खुदावर विश्वास ठेवायाचा. पूर्वजांच्या पुण्याईनें आपण सगळ्या संकटांतुन मुक्त व्हा'ल. यःकश्चित् कीडामुंगीचेंहि पोषण करणारा व काळजी वाहाणारा परमेश्वर आपणालाच कसा विसरेल का ? नाहीं. त्याच्यावरच विश्वासून राहायचं. नाहीं नाहीं ते विचार मनांत आणून आपण मुळींच दुःख करूं नये. " दलिया अंतःकरणापासून बोलत असल्यामुळें इब्राहीम स्तब्ध राहिला.

---

# प्रकरण ३ रें.

—:०:—

## निष्काम कर्म कां गुप्तदान. ?

दिवस संपला. सूर्यदेवता पश्चिमाकाशांत विलीन झाली. सूर्यकरांनीं उज्वल झालेली सुन्दर श्यामल मेदिनी अंधकारानें झांकून गेली. आकाशस्वरूपी निळी साडी नेसलेल्या देवांगनेच्या आंगावर हळू हळू तारकापुष्पें चमकूं लागलीं व सोन्यारुप्याच्या चमकदार फुलांनीं मढविलेली ती साडी इतकी मोहक दिसूं लागली, कीं, त्या दिवशींचा चंद्रही अगदीं फिक्का पडला. सुगन्धमिश्रित मलयसमीरण, इब्राहीमच्या शयनमंदिरानजीक असलेल्या उद्यानांतील पुष्पपरागांवर विहार करून तेथील सुगंधित फुलांचा सुवास इब्राहीमच्या नाकाजवळ धरीत होता; पण या राजोपचारापासूनही त्याला सुख वाटत नव्हतें.

श्रीमंत मनुष्याला गरिबी आली म्हणजे त्याला जें दुःख होतें तें अवर्णनीय असतें. गतकालांतील नुसत्या आठवणीच त्याच्या अन्तःकरणाला भाजून काढीत असतात. माझें असें होतें, मी असा होतों, आणि शेवट माझा हा असा झाला ! यापेक्षां आणखी भयंकर स्थिति ती काय यायची ?

असले सगळें मेंदूला शीण आणणारे विचार, रक्तशोषण करणारे दीर्घनिःश्वास आणि रक्ताचें पाणी करून सोडणारे प्रसंग हीच काय ती त्या बिचाऱ्याची इष्टेट ! रात्रंदिवस याच काळजींत तो असावयाचा ! इब्राहीमचीही स्थिति अशीच झाली होती. जळणारीं लांकडें ज्याप्रमाणें चितेंतील प्रेताला हळू हळू जाळून त्याची राख बनवीत असतात त्याप्रमाणेंच चिंतेच्या भाषण ज्वालाही, इब्राहीमसारख्या जिवंत मनुष्याच्या अस्थिपंजराला रात्रंदिवस भाजून त्याची राखुंडी बनवित. त्यांत तो पिचुन जात असे. इब्राहीमची अशीच स्थिति झाली. दिवसेंदिवस त्याच्या शरिरांतील रक्त आटूं लागलें.

उमरशेख हा व्याजबट्ट्याचा धंदा करणारा एक प्रसिद्ध सावकार होता; पण त्याची वागणूक अगदींच नीचपणाची असल्यामुळें चारचौघांत त्याला मान नव्हता. तो सापासारखा क्रूर आणि मत्सरी आहे असें लोक म्हणत असत. याचवेळीं अजमीर शहरांतील न्यायाधिशाचें काम एका जबरदस्त काजीच्या हातांत दिलेलें होतें. या काजीचें नांव खुदादाद ! या काजीचा आणि उमरशेखचा चांगला परिचय होता. दोघेहि एकमेकांना ओळखत असल्यामुळें त्यांच्यांत स्नेहाभिवृद्धिही झालेली होती. अर्थात उमरशेख थोड्याशा प्रयत्नांनीं इब्राहीमला काजीसमोर ओढूं शकला असता. फिर्याद करून त्याची सगळी इष्टेट व घर ताब्यांत घ्यायला त्याला मुळींच वेळ लागला नसता. कारण इब्राहीमकडून त्याला चारशेंच रुपये यायचे होते असें नाहीं, तर यानें आपली बहुतेक इष्टेट त्याच्याकडेसच गहाण ठेवलेली होती. ज्या दिवशीं सकाळीं या दोघांचें आपसांत मोठें कडाक्याचें भांडण झालें त्याच दिवशीं उमरशेख अगदीं खवळून गेला. अर्थात या त्याच्या रागाचें फळ आपणाला फारच भयंकर मिळणार हें इब्राहीमला समजून चुकलें. तो त्याच फिकिरींत बिछान्यावर पडून तळमळत होता. झालेल्या प्रकाराची तोंडमिळवणी कशी करावी हें त्याला सुचत नव्हतें. आपला बिछाना म्हणजे खदिरांगाराची शय्या आहे असें त्याला वाटत होतें.

अन्तःकरणाला शल्याप्रमाणें टोंचणाऱ्या काळजीनें इब्राहीम बिछान्यावर पडून तळमळत होता. त्याचें मस्तक तापून गेलें होतें. हृदयांत दुःखाच्या ज्वाला भडकत होत्या. आणि बिछान्यांतून आगीच्या ठिणग्या उसळत आहेत असें वाटत होतें. आपलें अन्तःकरण मोकळें करून मनसोक्त रड-

ण्यालाही जागा नव्हती. कारण त्याला आपलें असें कोणींच नव्हतें म्हटलें तरी चालेल.

झोंप येण्याचा पुष्कळसा प्रयत्न केल्यावर त्याला थोडी तंद्री आली. तरी पण त्यांतही त्याला भयंकर स्वप्नें पडतच होतीं. त्यानें स्वप्न पाहिलें, " उमरशेखानें आपल्यावर फिर्याद केली असून काजीच्या शिपायांनीं आपणाला श्रृंखलाबद्ध करून न्यायासनासमोर उभें केलें आहे इतकेंच. तेवढ्या सामान्य रकमेसाठीं आपल्या पाठीवर वेताच्या छड्याही बसत आहेत. काजीचा हुकूम झाल्यावर तो कोण अमान्य करणार ! काळासारख्या भयंकर अशा त्याच्या दूतांनीं जेव्हां फटके मारायला सुरवात केली तेव्हां त्याला ब्रह्मांड आठवलें; पण तितक्यांत एक बुरखेवाली स्त्री पुढें झाली आणि गंभीरपणानें म्हणाली, शपथ आहे तुह्माला काजीसाहेब ! यांच्या या नाजुक शरिरावर तुह्मी फटके मारूं नका. यांनीं देणें असलेला सगळा पैसा मी देतें,

इब्राहीमला त्या करुणादेवीचें तोंड दिसलें नाहीं. कारण तिच्या तोंडावर बुरखा होता तरी पण तिच्या एकंदर चालचलणुकीवरून ती कोणत्या तरी उच्च कुलांतील असावी असें त्याला वाटल्यावांचून राहिलें नाहीं. तिचें सर्वांग लावण्यानें चमकत होतें.

तिच्या प्रार्थनेनेंही निष्ठुर काजीला इब्राहीमची दया आली नाहीं. त्यानें रुपये तर घेतलेच; पण आणखी फटके मारण्याचीही शिक्षा दिली, त्या मनुष्यरूपी पशूचें अन्तःकरण अगदीं ममताशून्य होतें, इब्राहीम फटक्यांच्या वेदनांनीं अगदीं दीन होऊन ओरडूं लागला. "

इब्राहीम असलें हें निष्ठूर स्वप्न पहात असतां एक रमणी अगदीं हलक्या पावलांनीं आणि मंथर गतीनें त्या खोलींत आली व एका बऱ्याच मोठ्या लांकडी पेटीवर आपल्या हातांतील मोहोरांनीं भरलेली थैली ठेवून निघून गेली, ती आल्याचें व गेल्याचें इब्राहीमला मुळींच समजलें नाहीं, तो आपल्या त्या स्वप्नमय वेदना अनुभविण्यांतच मग्न होऊन गेलेला होता,

वाचकांनीं तरी या अंधकारानें झांकलेल्या सुंदरीला ओळखलें असेल काय ? जर ओळखलें तर आह्मी तिचा परिचय करून देण्यासाठीं आमच्या लेखणीला वृथा श्रम देत नाहीं, कारण तिला आतां ना पुढें केव्हां तरी तुह्मी ओळखालच.

त्या थैलींतील मोहोरा योग्य जागीं ठेवल्यावर ती सुंदर रमणी खोलीच्या बाहेर जाऊन पुन्हां आंत आली, आणि इब्राहीमच्या मस्तकाजवळ बसून त्याला हळू हळू वारा घालूं लागली. पंख्यानें येणाऱ्या त्या स्निग्ध वायूच्या स्पर्शानें त्याचें संतप्त मस्तक आणि उद्विग्न विचार शांत झाले, आणि त्या दुर्दैवी प्राण्याला गाढ झोंप लागली.

अशा प्रकारें बराच वेळ सेवाचाकरी केल्यानंतर त्या तरुणीनें एक दीर्घ सुस्कारा सोडला व ती पाय न वाजू देतां दरवाजाजवळ आली आणि अस्पष्ट स्वरानें म्हणाली, " प्रभू ! आपण देवतेचें उदात्त हृदय देहामध्यें ठेवून या जगतीतलावर अवतरला आहां, अर्थात देवच आपलें संरक्षण करील. देवाच्या आश्रयाला असलेला मनुष्य कधींही कोणत्याच संकटांत सांपडत नाहीं. देवावर आपला विश्वास नाहीं का ? माझ्यानें आपला हा खिन्न चेहेरा पहावत नाहीं, ते दीर्घ सुस्कारे आणि वारंवार कपाळावर हात मारून घेणें हें पाहिलें म्हणजे माझा जीव अगदीं कासावीस होऊं लागतो. देवा ! असल्या सच्छील मनुष्यावर हा प्रसंग यावा म्हणजे तुझ्या विचित्र लीलेचें आश्चर्यच नव्हे काय ? या तळमळणाऱ्या जीवाची तुला कींव तरी कधीं येणार ? इब्राहीम ! आपला तो प्रफुल्ल चेहेरा मला आतां पुन्हां कधीं पहायला मिळेल बरें ? आज तर तो खिन्नतेनें अगदीं झांकून गेला आहे, जें मुख उज्ज्वल पौर्णिमेप्रमाणें आनंदानें परिपूर्ण झालेलें होतें तें आज विषाद रूपी मेघांनीं भरलेल्या आकाशानें झांकून गेलें आहे. आपण आजपर्यंतचे दिवस निष्काळजीपणानें आणि आनंदानें घालविले, असला प्रसंग येईल असें स्वप्नांतही वाटलें नाहीं पण खुदाच्या राज्यांत रात्र आणि दिवस यांचें प्रमाण सारखें असल्यामुळें ज्यानें दिवसाची मजा उडविली त्यानें रात्रीं तळमळतच राहिलें पाहिजे, दिवसभर उद्योग केला असेल तरच रात्रीं सुखाची गाढ झोंप येणार ! आजची वेळ ही तशीच आलेली आहे. रागरंग उडवितांना भावी परिणामाकडे नजर वळली नाहीं. अर्थात् सृष्टिनियमाप्रमाणें त्याची शिक्षा भोगणें भाग आहे. पण आपली मनःस्थिति उदार असल्यामुळें ही दुःखमय रात्र लवकरच संपून प्रभातकालच्या स्निग्ध प्रकाशानें आपल्या चेहेऱ्यावर विजयी हास्य चमकूं लागेल. खुदा आपलें कल्याण करो. त्या सैतानाला आत्मविक्रय करून मी जर आपणाला सुखी करूं

शकलें तर तेवढेंही करायला, मी तयार आहें. आपला चेहेरा प्रफुल्लित पाहिला कीं मला समाधान वाटेल–" थोड्याच वेळांत रमणी निघून गेली. इब्राहीम झोंपेंतच होता.

---

# प्रकरण ४ थें.



## ' धिक्कार असो असल्या श्रीमंतीला !'

दुःखदायक रात्र संपली आणि साफ उजाडलें. सुर्याच्या सोनेरी किरणांनीं वसुंधरा देवीचें सर्वांग चमकूं लागलें. इब्राहीमचे डोळे उघडले व देवाचें नांव घेऊन तो बिछान्यावरून उठला. झोंपेनेंही त्याच्या अन्तःकरणाची खिन्नता नाहींशी झाली नव्हती. गेल्यारात्रीं त्यानें जें भयंकर स्वप्न पाहिलें तें अद्यापही त्याला भिवबीत होतें. त्याच्या अन्तःकरणांतुन ती छाया अद्याप नाहींशी झाली नव्हती.

त्याच्या दृष्टीनें तो दिवस दुर्दैवाचा होता. कारण रक्कम न दिल्यास उमरनें फिर्याद करतो म्हणून सांगितलें होतें तें आजच. इब्राहीम याच काळजीनें अस्वस्थ होऊन अधीरपणानें आपल्या खोलींतच इकडे तिकडे फिरत होता. मधून मधून तो खिडकींतून रस्त्याकडेहि पाही. बराच वेळ वाट पाहिल्यावरही जेव्हां काजीचे शिपाई त्याला दिसेनात तेव्हां त्याचें कांहींसें समाधान झालें व त्यानें मुक्ततेचा एक दीर्घ सुस्कारा सोडला.

याचवेळीं अकस्मात त्याची दृष्टी नजीकच्या पेटीकडे गेली व त्याला, आश्चर्य वाटलें; कारण लाल रंगाची एक थैली पेटीवर असलेली त्याला आढळली. लागलीच त्यानें ती उचलली तों तींत भरपूर पैसा असल्याचें त्याला कळून चुकलें. थैलीचें तोंड उघडतांच त्याची खात्रीच झाली. मात्र हें गुप्त दान देणारा देवमाणूस कोण असावा याचा त्याला उलगडा झाला नाहीं.

त्यानें आश्चर्याच्या भरांतच त्या थैलींतील रक्कम मोजिली; तेव्हां त्याला कळून चुकलें कीं त्या बरोबर साडेचारशें मोहोरा आहेत. याचवेळीं त्याला यांतच एक कागद मिळाला. इब्राहीमनें तो उलगडून पाहिला तों त्यांत

ढीलप्रमाणें मजकूर आढळला. " धार्मिक आणि ईश्वरावर विश्वासून राहाणारे महात्मे परमात्म्याच्या अनुग्रहाला पात्र होतात. जगन्नियन्ता त्यांना कधींही विसरत नाहीं. तेव्हां आपण ही रक्कम ' देवाचें देणें ' म्हणून घ्यायला हरकत नाहीं. "

आश्चर्य ! खरोखरच हें देवाचें देणें कीं कोणा उदार महात्म्याचें दान आहे बरें ! हें असें गुप्तदान देणारा दाता कोण असावा ! हा दयाळू महाजन माझा कोणी गुप्त मित्र असेल का ! या दारुण विपत्तीच्यावेळीं अयाचित मदत करणाऱ्याचें हृदय खरोखरच देवतुल्य असलें पाहिजे. कोणाही मनुष्यानें आपलें खरें मनुष्यत्व प्रकट केलें म्हणजे तो देव होतो.

इब्राहीमचें हृदय या प्रच्छन्न सुहृदाबद्दलच्या कृतज्ञतेनें भरून गेलें. त्यानें त्या मोहोरा एकत्र करून पूर्ववत् थैलींत घालून बंद केल्या; आणि पेटाऱ्यांत ठेवून दिल्या. नंतर कोणत्याही प्रकारची काळजी न राहिल्यामुळें तो निश्चित अन्तःकरणानें आपल्या बैठकीच्या दिवाणखान्यांत येऊन बसला. त्याला एकप्रकारची हुषारी वाटत होती

मुखमार्जनादि विधि आटोपल्यावर इब्राहिमनें भक्तिपूर्ण अन्तःकरणानें व कृतज्ञतेनें त्या जगच्चालकाची उपासना केली व यामुळें त्याच्या अस्वस्थ मनाला विलक्षण शांती वाटूं लागली. तो मनांत ह्मणाला, " हें गुप्त दान देणारा दाता कोण असावा ? माझ्या असल्या या भयंकर संकटाच्या वेळीं अशा प्रकारचा निःस्वार्थ उपकार करणारा मित्र माझ्या सुखाच्या दिवसांत मला मुळींच आढळूं नये, हें आश्चर्यच नव्हे काय ? आणि सुखाच्या दिवसांत खऱ्या मित्राची परीक्षा तरी कुणाला होत असते ? मला वाटतें हें दलियेचेंच काम असावें. त्या शांततामूर्तीचें हृदय देवीतुल्य आहे. ती जशी रूपानें तशीच गुणांनींहि अतुलनीय आहे. खात्रीनें तिनें आपल्या सांठविलेल्या द्रव्यनिधींतून ही दयेची कामगिरी केली असावी. उमरशेखकरतां जितकी रक्कम पाहिजे होती तितकीच तिनें ठेविली आहे असें नाहीं, तर मला खर्चाला लागणारी ज्यास्त रक्कमही तिनें जाणून बुजून ज्यास्त ठेविली आहे. दलिये ! दलिये ! तुझ्या या स्वर्गीय दानाचा मोबदला मी कसा देऊं बरें ? छे. मला देतां येणें शक्य नाहीं. माझ्याजवळ काय आहे? मी निष्कांचन ! मी दरिद्री !! मी तुझे हे उपकार कसे फेडणार !!! "

इब्राहीम अशा प्रकारच्या विचारांत गढून गेला आहे तोंच दलिया गरम काफीचा पेला व थोडेसें फराळाचें साहित्य घेऊन आंत आली, आपल्या खाण्यापिण्याबद्दलची तिची तत्परता पाहून इब्राहिमला अतिशय समाधान वाटलें. तो हंसत हंसतच तिला उद्देशून म्हणाला, " दलिये ! हेंहि देवाचेंच देणें का ? "

एकच वाक्य; पण तें ऐकतांच दलियेचें मृदु अन्तःकरण दचकलें ! तिला मोठेपणा नको होता आणि स्तुतीला तर ती कंटाळत असे. तिचें अन्तःकरण उदात्त भावनांनीं परिपूर्ण झालेलें होतें. तिनें आपल्या मनाची झालेली चलबिचल इब्राहीमच्या लक्षांत येऊं न देतां प्रफुल्ल चेहऱ्यानें स्मित हास्य करीत म्हटलें. " हुजूर, जगांतील प्रत्येक गोष्ट ही देवाची देणगीच होय. ती देणारा एक खुदा! मनुष्याच्या हातांत काय आहे ? त्याच्या दयाळुपणाच्या गोष्टी अगणित असल्यामुळें त्या वर्णन करून कधींही संपणार नाहींत. जीवाचें जीवन म्हणून जो वायू वाहातो तें त्याच्याच करुणेचें एक महादान असून त्यामुळेंच आमचें रक्षण होत आहे. पाणी नसतें तर आम्ही एक क्षणभर तरी जिवंत राहिलों असतों कीं नाहीं याचा संशयच आहे. आणि म्हणून त्या दयाळू देवानें मोठमोठ्या नद्या, गिरीकंदरांतून अमृतासारख्या पाण्याचे झरे, आणि रुक्ष प्रांतांतही खोल विहिरी उत्पन्न करून प्राणीमात्राच्या प्राणधारणेची सोय करून ठेविली आहे. सूर्यचंद्रही त्याच्याच आदेशानें हें अनन्त आणि नित्य नीलाकाश आपल्या दिव्य प्रकाशानें उज्ज्वल करीत चालले आहेत. त्यांचे उदयास्त हे जीवांच्या जीवनांना जितके उपयोगी आहेत तितकेच त्यांना उपदेश देणारे सूत्रमय आदेशस्वरूपही आहेत. जगन्नायकाच्याच कृपेनें ही पृथ्वी हरित तृणांकुरांनीं व वृक्षलतांनीं शोभायमान दिसत असून त्याच्याच त्याच्याच दयाळुपणामुळें तिचें चिरंतन हास्य, जीवमात्राला रंजवीत आहे ! हुजुर ! ह्यांत देवाची देणगी नाहीं असें काय आहे बरें ? मनुष्याचा अहंपणा म्हणजे त्याचें क्षुद्रत्वच नव्हे काय ? "

इब्राहीमनें दलियेच्या तोंडून अशा प्रकारच्या उद्बोधक गोष्टी कधींच ऐकल्या नव्हत्या. शिवाय ती जें सांगत होती तें इतकें सहज आणि स्फूर्तिपूर्ण होतें, कीं, त्यांत त्याला कुठेंच कृत्रिमता आढळली नाहीं. तो मनांत म्हणाला, " मी ईश्वराच्या सामर्थ्याबद्दल अविश्वास दाखवीत असें आणि

अभिमानानें प्रत्येक गोष्ट करीत असें, तो माझा मूर्खपणा होता, हें दाखविण्यासाठीं तर ही असें बोलली नसेल ना ? असेल. माझी दृष्टी व्यापक नव्हती. पैशाच्या जोरावर मीच ईश्वर बनलों होतों. मला कुणाची पर्वा वाटत नव्हती. माझ्यापेक्षां जगांत कोणी श्रेष्ठ असेल अशी मला कल्पनाही झाली नाहीं. मी अहंमन्यतेनें स्वतःच्या सामर्थ्यावरच प्रत्येक गोष्ट करीत गेलों. छे. छे. काय माझा तो भ्रमिष्टपणा ! डोळस असून मी आंधळा बनलों ना !

असा आपल्याशींच विचार करून तो स्मितपूर्वक दलियेला म्हणाला " तू जें म्हणतेस तें अगदीं अक्षरानअक्षर खरें आहे. दलिये ! मीहि तुझ्याप्रमाणेंच ईश्वराच्या निस्सीम दयाळूपणावर विश्वासून राहाणार आहें. करुणामय खुदानें आपल्या विचित्र सृष्टींत नांवाजण्यासारखें जर कोणतें कार्य केलें असेल तर मनुष्याचीं ममतापूर्ण अन्त:करणें आईबापाच्या हृदयांतील अपार अपत्यवात्सल्य, पत्नीच्या अन्त:करणांतील दिव्य पतिप्रेम आणि आप्तस्वकीयांबद्दल विलक्षण सहानुभूती या विविध कारुण्यानें ईश्वराच्या या जगाला भलतेंच स्वरूप प्राप्त झालें आहे. खुदाचें जर कोणतें दुर्लभ दान असेल तर तें हेंच. त्याच्या करुणेचा उच्च आदर्श असेल तर तो हाच. तूच पहा ना ! आज जर तुझ्या हृदयांत तो दयामय ईश्वर, अपार करुणा आणि एकनिष्ठ स्वामीभक्ति उत्पन्न ना करता तर या हतभागी इब्राहीमची अब्रु चव्हाट्यावर येण्याला एका क्षणाचाही विलंब लागला नसता. तसेंच याला या भयंकर दारिद्र्याची आंच सहन झाली असती कीं नाहीं याचा संशयच आहे. "

दलिया हळूच म्हणाली, " हुजूर ! प्रभु ! ! आपण हें काय बोलत आहां याचा मला मुळीं अर्थच समजत नाहीं. आजच आपणाला असें बोलण्याची कां बरें बुद्धि झाली ! "

इब्राहीमनें शांतपणानें उत्तर दिलें, "आपल्या कामाबद्दल बक्षिस मिळविण्याची तुझी इच्छा नाहीं असेंच ना ? निष्काम धर्माचरण हाच तुझ्या जीवनाचा उद्देश असावा असें मला वाटतें. तू अनेकदां अनेक कामें केलींस, हें मी जाणून आहें. मी तुला आणि तुझ्या कृत्यांना विसरलेलों नाहीं. मी अशा या प्रसंगांत सांपडलों असतां व दुःखानें तळमळत असतां तू मला स्वर्गी-

... देवदूतीप्रमाणें उपयोगीं पडलीस व माझें अन्तःकरण शांत केलेंस. ... एकदोन महिने, माझ्या बापानें स्थापन केलेला—सराईखाना तूंच ...ल्या उदारतेनें चालविलास. अतिथीशालेचा दैनिक खर्च चालविण्या- ... तूं आपल्या कष्टार्जित द्रव्याचा उपयोग करून माझ्या बापाचें व ...पल्या धन्याचें नांव राखलेंस, हें तुला केवढें तरी भूषणास्पद आहे ? मला सगळ्या गोष्टी समजत नाहींत असें का तुला वाटतें ? मीं माझ्या वड- ...नीं कमावलेलें नांव घालविलें; पण तूं जिवाभावानें त्याचें संरक्षण केलेंस! ...रशेख चारशें रुपयांसाठीं फिर्याद करून मला काजीपुढें उभें राहाण्याला ...ग पाडील व त्यामुळें माझा व माझ्या घराण्याचा भयंकर अपमान ...ईल असें तुला वाटल्यामुळें तूं काल रात्रींच मला न कळत पैशांची ...वस्था केलीस ! दलिये ! तुझें हें ऋण माझ्या हातून फिटणें अशक्य ...हे. तुझ्या या दयेचा मोबदला माझ्यासारख्या हतभाग्याकडून कसचा ...ळणार आहे ! तूं आपल्या उदारपणानें मला लाजविलेंस ! दलिये माझ्या- ...डून तुला—"

पण याचवेळीं बरीच मंडळी आल्याची चाहूल लागल्यामुळें पुढचे शब्द ...डांतल्या तोंडांतच राहिले. तितक्यांत विश्वासू नोकर मुबारक आंत येऊन ...णाला, " सैतान उमरशेख काजीचे शिपाई घेऊन आला आहे. आपण ...कवार बाहेर येऊन जा. "

इब्राहीमनें फराळ आटोपून कॉफी घेतली आणि तो बाहेरच्या दिवाण- ...न्यांत आला. काजीच्या शिपायांचें नांव ऐकतांच त्याची छाती हादरली. ...याच्या बापाच्यावेळीं असले बरेचसे काजी केवळ दोस्तीसाठीं लांगूल- ...लन करीत तेथें येत असत व हांजी हांजीपणा करून मौजा मारून जात ...सत ! पण हाय ! आज दैवाचा फांसा उलटल्यामुळें त्याच काजीचे ...िपाई त्याला गिरफदार करण्यासाठीं हातकड्या घेऊन दारांत आले ! ...वाची केवढी ही विचित्रलीला !

असो. इब्राहीमला पहातांच उमरशेख त्याची थट्टा करण्याच्या हेतूनें ...णाला, " काल माझ्या घरांत बसून हुजुरना माझा अपमान करण्याची ...हर आली होती; पण आज त्या गोष्टीचा जाब विचारण्यासाठीं व हुजु- ...ना लोखंडी बेड्याचा नजराणा देण्यासाठीं मी आलों आहे. समजलें ना

इब्राहीम ! काजींचा हा हुकूम वाच आणि देणार असलास तर रुपये दे; नाहींतर आपली मिरवणूक काजीसाहेबाच्या कचेरीपर्यंत जाऊं दे. ”

असें म्हणून दुराचारी उमरनें लालरंगाचा एक कागद इब्राहीमच्या हातात दिला. कागदांत असा मजकूर होता, “ मोहल्ला मोकिम पट्टी येथें राहाणारा 'अबूअयूब' याचा मुलगा 'अली इब्राहीम' याला अजमीर शहरचे कीर्तिशाली नामदार व धर्मावतार काजी खुदादाद इसाफुद्दिन साहेब हे हुकूम करतात कीं, व्याजबट्ट्याचा व्यापार करणारे महाजन उमरशेख यानीं तुमच्यावर माझ्याकडे चारशें रुपये येण्याबद्दल फिर्याद केलेली आहे व तुह्मीं त्याना दिलेला रोखाही हजर केला आहे. महापराक्रमी बादशहाचे प्रतिनिधी काजीसाहेब याचा या बाबतीत असा आदेश आहे कीं, हा हुकूम वाचतांच तुह्मीं व्याजासुद्धा उमरशेखचे रुपये चुकते करावे व तसें करता येत नसेल तर पाठविलेल्या शिपायाबरोबर ताबडतोब आमच्या कचेरींत हजर व्हावें. पुढील कामगिरी शिपाई करतीलच. ”

काजीच्या हातचा तो अपमानकारक हुकूम वाचतांच इब्राहीमचा चेहेरा लाल झाला व तो तीव्र दृष्टीनें उमरशेखकडे पाहूं लागला. नेत्रही आरक्त झालेले होते.

नीच वृत्तीच्या उमरशेखला ती मोठी मौज वाटली. तो म्हणाला, “इब्राहीम ! डोळे लाल करून पहाण्याचे दिवस संपले. तुम्हीं आतां पूर्वीच्या दिवसांची नुसती आठवणच करीत राहावें. तुला माझ्या पैशाची फेड करतां येणें शक्यच नाहीं, हें मी जाणून आहें आणि त्यामुळेंच अशी व्यवस्था करणें भाग पडलें. तुझी इतकी दुर्दशा झाली, दोन दोन दिवस उपास पडूं लागले, स्वतःचें राहातें घरही गहाण ठेवण्याची पाळी आली तरी तुझा अभिमान अद्याप कमी झाला नाहीं, याचें मला मोठें आश्चर्य वाटतें ! या कर्जाच्या पायीं हुजूरची स्वारी कांहीं दिवस कारागृहांत जाऊन पडली म्हणजे सध्यांचा हा उद्धटपणा नाहींसा होईल असें मला वाटतें. शक्य असेल तर ताबडतोब माझी रक्कम दे. विलंब नको. ”

याचवेळीं अकस्मात् विद्युलता चमकावी त्याप्रमाणें सौंदर्याची केवळ उज्ज्वल ज्योतच अशी दलीया बाहेर आली आणि गंभीरपणानें बोलूं लागली; “तुला फक्त पैसाच पाहिजेना ? बस्स. तूं पैसाच घेऊन जा; आम-

च्या धनासाहेबांना एकही कमजास्त शब्द बोलण्याचें तुला कारण नाहीं. त्यांच्यावर तूं आपला अधिकार चालवूं शकणार नाहींस. घे हे तुझे रुपये ! घे. तुझ्या त्या अपवित्र निःश्वासांनीं आमची ही पवित्र जागा दूषित होत आहे. तेव्हां शक्य तितक्या लवकर तूं इथुन चालता हो. जर तुझ्या अन्तःकरणांत थोडासा तरी उदारपणा असता अगर तुला ईश्वरानें मनुष्य-रूपी सैतान बनविलें नसतें तर तूं असे शब्द इथें कधींही बोलला नसतास. निदान तुला बोलतांना थोडेंसें तरी वाईट वाटलें असतें. तुझें अन्तःकरण दगडाचें असल्यामुळें तुला माणुसकी कसली ती मुळींच नाहीं. व्यर्थ व्यर्थ ! देवानें तुला श्रीमंती दिली. असल्या तुझ्या श्रीमंतीला धिक्कार असो. ''

या सौंदर्यदेवतेला पहातांच उमरशेख मुग्ध होऊन स्वतःला विसरून गेला होता. दलियेला अनेक दिवसांपूर्वी पाहून तिच्या स्वरूपावर तो मोहित झालेला होता. दलिया आपलीशी व्हावी अशी त्याची फार दिवसांपासुनची इच्छा होती; पण ती अद्याप सफल झाली नव्हती. व अन्तःकरणांत ठसलेली तिची मूर्ति त्याला चैन पडूं देत नव्हती. तिची आठवण मनांतून घालविण्याचा त्यानें फार प्रयत्न केला; पण त्याला त्यांत यश आलें नाहीं. विझणारा अग्नि घृतधारांनीं जसा पुनः प्रज्वलित होतो, त्याप्रमाणें तिच्या आठवणींनीं व दर्शनानें त्याची तिच्या संबंधाची आकांक्षा पुनः ज्यास्त ज्यास्त वाढूं लागली.

तो तिला म्हणाला, " दलिये ! सुंदरी दलिये ! ! तूं माझा कितीही तिरस्कार कर; पण मला तो स्तुतीच वाटेल. तुझा प्रत्येक शब्द मला प्रेमगीतें ऐकवीत आहे. जर तु सांगत असशील तर तुझ्या या मालकाला मी आत्तां कर्जमुक्त करतों. तें माझ्या हातांत आहे. ''

त्याचे ते तिरस्करणीय बोल ऐकून तिला राग आला. ती गंभीरपणानें पण किंचित् कठोरतेनें म्हणाली, " मी जरी दुर्दैवानें दुसऱ्याची दासी झालें असलें तरी हलक्या कुळांत माझा जन्म झालेला नाहीं. तुला जर दुसऱ्याची मानमर्यादा ठेवण्याचें थोडेंसें तरी ज्ञान असतें, तर असल्या निर्लज्जपणाच्या गोष्टी बोलायला तुला खात्रीनें लाज वाटली असती. एकदां रस्त्यांत तूं माझ्याशीं असाच असभ्यपणा केला होतास व आज त्याची पुनरावृत्ति

करीत आहेस ! तुला कदाचित् आपल्या श्रीमंतीचा गर्व झालेला असेल; पण ज्याचें कुलशील उच्च असतें; त्याला तुझ्या या श्रीमंतीचें कांहींच महत्त्व वाटत नाहीं. गरीबही आपल्या घरचा श्रीमंतच असतो. मात्र तो तुझ्यासारखा नीच कधींही बनत नाहीं. प्रसंगांत सांपडलेल्या दीन दुबळ्या माणसांना टोंचून बोलून त्यांचा अपमान करणाऱ्या नीचा, धिक्कार असो तुझ्या श्रीमंतीला ! सांभाळून राहा. पुन्हां तुझ्या तोंडचे अशा प्रकारचे शब्द ऐकले तर मी स्वतः काजीसाहेबांकडे जाऊन कुलस्त्रियांची बेअब्रू केल्याबद्दल तुझ्यावर फिर्याद लावीन. तूं श्रीमंत असलास तर आपल्या घरचा ! दुसऱ्या कुणालाही तुझा काडीभर सुद्धां उपयोग होणार नाहीं. ही तुझी रक्कम उचल आणि इथून चालता हो. कर्जरोख्यावर सही करून परत दे. ''

दलियेचे ते शब्द ऐकून व तिची क्रोधपूर्ण मुद्रा पाहून उमरशेख थोडासा भ्याला. काजीच्या शिपायांनाही तिचें बोलणें योग्य दिसलें. ते त्याला म्हणाले, " उमरसाहेब ! खरोखरच आपण हा अन्याय करीत आहां. फक्त देण्याघेण्याच्या बाबतींत जें कांहीं बोलावयाचें असेल तेंच तुम्हांला बोलतां येईल. या बाईशीं कोणत्याही प्रकारची इतर भाषा वापरण्याचें काय कारण ? जर खरोखरच या बाईनीं काजीसाहेबांकडे फिर्याद केली आणि आमच्या साक्षी दिल्या तर आम्हांला खोटें सांगतां येईल का ? मग तुमची स्थिति काय होईल बरें ? ''

शिपायांचें हें बोलणें ऐकून तो पापी सैतान उमरशेख फारच भ्याला. लागलीच त्यानें कर्जरोख्यावर रक्कम पोंचल्याबद्दल लिहून सही केली आणि तो इब्राहीमच्या हातांत देऊन रक्कम मोजून घेतली. नंतर तो इब्राहीमला म्हणाला " इब्राहीम ! अजूनही तुझी साडेसाती संपली नाहीं. तूं माझ्या घरीं चालून येऊन माझा अपमान केला आहेस त्याचा मीं अद्याप पुरता सूड घेतलेला नाहीं. माझ्याजवळ तुझे जे ऐवज व घरें गहाण आहेत त्यांची एकंदर रक्कम बरीच मोठी होत आहे. तेव्हां ती रक्कम तूं मला कशी काय देतोस व त्या कर्जातून तूं कसा मुक्त होतोस तें मी पहातों. आणि दलिये ! तुझा हा गर्व जर मीं नाहींसा केला नाहीं तर माझें नांव उमरशेख नव्हे असेंच तूं समज. पाहूं आतां कुणाचा विजय होतो तें ! ''

" तुला जें कांहीं शक्य असेल, तें तूं कर; पण या बटकेला मात्र तूं या वाक्यांतून बाहेर हो. नाहीं तर मी या दंडुक्याच्या तडाक्यानें तुझा कपाळ-मोक्षच करीन–" असें म्हणून मुबारकानें हातांत भला लठ्ठ सोटा घेऊन उमरशेखवर चाल केली.

इब्राहीमला आतां स्वस्थ बसणें शक्य नव्हतें. तो पुढें झाला आणि त्यानें आपल्या नोकराला मागें ओढून म्हटलें, " मुबारक! शांत हो. आपला काळ फिरला आहे, आणि त्याला तूर्त काळाची अनुकूलता आहे, तेव्हां त्याला जें कांहीं बोलायचें असेल तें बोलूं दे. आमचे दिवस वाईट आहेत! मर्जी देवाची!! आपण सध्यां सहनच केलें पाहिजे. देवाच्या दयेनें पुन्हां कधीं आपल्याला बरे दिवस आले तर या अपमानाचा आपण चांगलाच मोबदला घेऊं. आज जें चाललें आहे तेंच चालूं दे. त्याचें तेवढ्यानेंच समाधान होत असेल तर होईना कां!"

तो प्रसंग इब्राहीमच्या मध्यस्थीनें निभावला. नाहीं तर मुबारकाच्या अविचारीपणानें भलताच प्रसंग येणार होता. उमरशेखही त्याच वेळीं घरा-बाहेर पडला त्यामुळें हातघाईचा प्रसंग वांचला. कांहीं असो; पण वाई-टांत चांगलें झालें आणि तेवढ्यापुरती तरी त्यांना स्वस्थता मिळाली.

---

# प्रकरण ५ वें.

—:※:—

## उमरशेखचें गृहछिद्र.

अपमानानें संतापलेला उमरशेख सगळ्या रस्ताभर इब्राहीमला शिव्या देतच घरीं येऊन पोहोंचला. आसगर नांवाचा त्याचा एक जिवाचा मित्र होता. जसा उमर तसाच आसगर! या दोघांहि सैतानांना विधात्यानें एकदमच निर्माण केलें होतें असें म्हणायला हरकत नाहीं उमरचा मुख्य व्यवसाय म्हटला म्हणजे सावकारी हा होय. त्यानें मूळ रकमेवर प्रथमच भरपूर व्याज सांगून व नंतर व्याज चक्रवाढ व्याज घेऊन भरपूर पैसा जमविलेला होता. अजमी-रच्या व आसमंतांतील बहुतेक मोठ्या शहरच्या बड्या लोकांनीं याच्याजव-

कूनच भरपूर कर्ज काढलेलें होतें. घरें, बागा अथवा दागिने गहाण ठेवल्यावांचून उमरशेख कुणालाही पैसा देत नसे. यामुळें पुष्कळ लोक त्याचा तिरस्कार करीत हें खरें; पण त्याच्याकडे गेल्यावांचून लोकांचें चालत नसे. दलालीचा व मुदतबंद चिठीचा सुद्धां तो व्यवहार करी; पण क्वचित्. एकंदरींत पैसा जमविण्याचीं त्याचीं हीं तीन साधनें होतीं एवढें खरें. आणि याच साधनांनीं तो श्रीमंत बनला होता.

त्याच्या घरादाराची स्थिति पाहून हा श्रीमंत मनुष्य असावा असें कुणालाही वाटत नसे. अजमीरच्या एका खोलगट आणि गलिच्छ गल्लींत त्याचें हें झोंपडीवजा घर असून तें नेहेमीं अस्वच्छ स्थितींत लोकांच्या पहाण्यांत येई. हें घर जरी दुमजली होतें तरी जुनाट असल्यामुळें विशोभित दिसत असे. कृपण मनुष्याची सर्वत्र जी स्थिति असते तीच याचीही असल्यामुळें विशेष वर्णन करून वाचकांना कंटाळविण्यांत अर्थ नाहीं.

उमरशेखाला कौटुंबिक सुख मुळींच नव्हतें म्हटलें तरी चालेल. 'अप्रियवादिनी आणि कलहप्रिया' भार्येसह तो आपल्या आयुष्याचे दिवस कंठित होता त्याच्या बायकोचें नांव बिबी ताकि तुन्निसा असें असून लोक तिला ताकित बिबी म्हणत असत तिचें जसें नांव तसेंच सौंदर्य व त्याच नमुन्याचे गुणही होते. शास्त्रकार म्हणतात, कलियुगांत पापाचें प्रायश्चित्त ताबडतोब मिळतें. तो आपल्या जिवंतावस्थेंतच स्वतःच्या नकळत तें भोगीत असतो. उमरशेखचें संसारसुख पाहून त्याच्या सारख्या नीच वृत्तीच्या मनुष्याला हेंच योग्य असें म्हटल्यावांचून कुणाच्यानेंहि राहावलें नसतें.

उमर जितका कृपण आणि कवडीचुम्बक होता तितकाच त्याचा परिवार उधळ्या आणि पैशाच्या बाबतींत बेफिकिरपणानें वागणारा होता. ताकित बिबीचें स्वरूप म्हणण्यासारखें चांगलें नव्हतें आणि गुणांतही कलहप्रियतेवांचून स्पष्टपणें दिसणारें असें कांहींच नव्हतें. मात्र तिचें हें भांडण शेजाऱ्यापाजाऱ्यांशीं नव्हतें हें विशेष ! भांडणाचा बराचसा रोख आपल्या गुणवान आणि कृपण प्रियकराकडेच वळलेला असे. उमरनें एकाद्या वतैकल्यांत किंवा घरखर्चांत दोन पैसे खर्च करण्याची तिला परवानगी दिली, तर या बिबीसाहेब, त्या ठिकाणीं दोन आणे खर्च करीत असत. आणि नवराबायकोंत भांडणें होई तें त्यामुळेंच. संचय आणि खर्च हेंच भांडणाचें मूळ होतें.

उमरशेख काजीचे शिपाई घेऊन इब्राहीमच्या घरीं रुपये आणण्यासाठीं गेला आहे, हें ताकित बिबीला पूर्वीच समजून चुकलें होतें. तिच्या माहेरची स्थिति गरिबीची असून बाप म्हातारा होता. त्याच्यानें काम उद्योग कांहींच होत नसे. व ताकित बिबीवांचून त्याला दुसरें मूलही नव्हतें. तेव्हां हिला वाटे आपणच आपल्या बापाची सोय केली पाहिजे. व या आपल्या हेतू-नुरुप योग्य संधि मिळतांच ती, नवऱ्याकडची चावी—तो झोंपला असतां—चोरून घेऊन पेटी उघडी व आंतील रुपये काढून बापाकडे पाठवी. हा एक तिचा नित्याचा व्यवसायच होऊन बसला होता म्हटलें तरी चालेल. कधीं कधीं आपल्या घरखर्चांतून काटकसर करून दोनचार रुपये सांठले म्हणजे तेहि ती आपल्या दरिद्रीबापाकडे पाठवून देई. गेल्या आठवड्यांत अशी कांहींच व्यवस्था तिला करतां आली नव्हती त्यामुळें नाइलाज होऊन तिनें नवऱ्याजवळ दहा रुपये मागितले व त्या बाबतींत ती दररोज तुमणें लावीत होती. उमरशेख मुलखाचा कृपण ! तो तिला दहा रुपयांची एवढी मोठी रक्कम [ ! ] एकदम देणार ! निरनिराळीं कारणें लावून तिची ही मागणी त्यानें रद्दबातिल करण्याचा विचार चालविला होता. ' काय करावें ! हातांत पैसा नाहीं. ' ही त्याची रोजच्या रोज रड चाललेली असे. व ताकित बिबीलाहि अमुक अमुक पैसे आले असें सांगायला तोंड नव्हतें. त्यामुळें आज इब्राहीमच्या वसुलीची बातमी समजतांच तिला मोठा आनंद झाला होता.

उमरशेख इब्राहीमकडून मिळालेली रकम घेऊन आला हें पाहतांच ताकितबिबी सामोरी गेली आणि शक्य तितक्या मंजूळ स्वरानें म्हणाली, " किती रुपये घेऊन यायचं झालं ? "

आपल्या प्रेमळ [ ! ! ] पत्नीचा तो प्रश्न ऐकतांच उमरशेख दचकला. पण तितक्यांतच स्वतःला सांवरून घेऊन दुःखित स्वरानें तो म्हणाला, "मला सांगायला फार वाईट वाटतें ! मी ज्या ठिकाणीं रुपयांच्या वसुलीसाठीं म्हणून गेलों होतों, त्याठिकाणीं एक पैसाही मिळाला नाहीं. एकाला मीं आज रुपये देतों म्हणून कबूल केलें आहे. त्यामुळें दुसऱ्या सावकाराकडून मलाच तीनशें रुपये कर्जाऊ आणावे लागले. काय करावें लोकांकडून पैसाच वसूल होत नाहीं. "

ताकित बिबीला हें त्याचें सांगणें खरें वाटेना. ती क्रुद्ध होऊन म्हणाली, " तुम्हीं अगदीं खोटें सांगतां. तुम्हाला खोटें बोलण्याचीच संवय लागून गेली आहे. मला दहा रुपये द्यावे लागतील म्हणून तुम्हीं हा सगळा लपं-डाव चालविला आहे. अदालतींतून शिपायी बरोबर नेले असतांही पैसे वसूल झाले नाहींत हें तुमचें सांगणें मला मुळींच खरें वाटत नाहीं. तुम्ही दुस-ऱ्याकडून कर्जाऊ पैसे आणा नाहींतर पाहिजे तें करा. तुम्हीं ही रुपयांची थैली बांधून ज्या अर्थी पेटींत ठेवायला आणली आहे त्या अर्थी ते रुपये आपलेच असले पाहिजेत. तेव्हां मला त्यांतून दहा रुपये मिळायला कांहींच हरकत नाहीं. द्यावेच लागतील. तीनशें दहा रुपये दुसऱ्याचे कर्जाऊ आणले असें पाहिजे तर म्हणा. मला त्याची मुळींच खंती वाटत नाहीं. "

ताकित बिबीचा हुकूम अगदींच बिनतोड असल्यामुळें त्यावर काय उत्तर द्यावें हें उमरशेखाला सुचेना. तेव्हां त्याला थोडीशी भीति वाटली. कारण व्याजावांचून एक पैसाही कुणाला देणें त्याला माहीत नव्हतें. त्याच्या जन्मपत्रिकेंतच तसें लिहिलें नव्हते म्हटलें तरी चालेल. अर्थात हे दहा रुपये तो कसे देणार ?

आपणावर हें एक संकटच आलें आहे असें लक्षात आणून तो आर्ज-वानें म्हणाला, " अशा आत्मघातकी गोष्टी बोलूं नये. आपला नफातोटा कशांत आहे, हें मीं तुला शिकविलें पाहिजे का ? असे एकदम असे दहा दहा रुपये आणि ते सुद्धां तुझ्या त्या मरूं घातलेल्या म्हाताऱ्या बापासाठीं देण्यानें आपणास भिक्षा मागण्याची पाळी येणार नाहीं का ? छे, छे, माझा जीव असेपर्यंत तरी माझ्या हातून असली गोष्ट होणार नाहीं. तुझा तो थेरडा आज सत्तर वर्षें पुलाव खाऊन मजेत पडला आहे. आतां तरी त्याची ती चैन थोडीशी कमी होऊं द्या. चांगलें चांगलें खाणेंपिणें मिळू लागलें म्हणजे जगांत जास्त दिवस राहण्याची इच्छा वाढते तेव्हां हे सगळे ढंग कमी होऊं देत म्हणजे तो लवकरच कबरेंत जायला तरी कशाला ? तूंच विचार कर म्हणजे झालें. पत्नीनें आपल्या पतीच्या कल्याणाची इच्छा करावी होय ना ? माझ्या मृत्यूनंतर जें कांहीं राहील तें तुलाच मिळणार नाहीं का ! मग तूं इतका उतावीळपणा कां बरें करावा ? असल्या या उधळ-पट्टीनें पुढें मागें तुलाच भिकारी बनून दुसऱ्याच्या दाराशीं जावें लागणार नाहीं का ? विचार कर. "

आपल्या पतीच्या तोंडची ही अद्‌भुत वाय पावली ऐकून तिला तर प्रथम रडूंच कोसळलें; पण अशा रडण्यानें आपलें काम होणार नाहीं असें ठरवून ती त्याला शिव्या घालूं लागली. ती म्हणाली, "तुमच्या इतका हतभागी आणि कृपण मनुष्य जगांत कोणी असेल कीं नाहीं याचा संशयच आहे. माझ्या बापानें न खातां न पितां लवकर मरावें असें तुमच्यानें म्हणवलें तरी कसें? त्यापेक्षां तुमची वाचाच कां बसली नाहीं? बरें मी कोणत्याप्रकारची बायको आहे हें मी आज तुम्हांला चांगलेंच समजाऊन देतें. उपाशीं राहिलें म्हणजे काय होतें त्याचा आज तुम्हांला अनुभव येऊं दे. मी आज मुळीं स्वयंपाकघरांत जातच नाहीं. मला आज तिकडे जायला कोण हुकूम करतें तें तरी पाहूं."

आणखीहि अशाच प्रकारचे बरेचसे शब्द ती बोलली. इतकेंच नव्हे तर दुर्दैवी उमरखेडला आपल्या द्वाड बायकोच्या हातचा थोडासा प्रसादही मिळाला. या बायकोच्या हातून आपण आतां बरेपणी बाहेर पडतों कीं नाहीं नकळे असें त्याला झालें होतें; पण लवकरच देवानें त्याच्यावर कृपा केली. कारण बाहेरून कुणीशी त्याला हाक मारली "शेखजी, घरांत आहेत का?"

ती हांक ऐकून उमरशेख घाइघाईनें आपल्या पत्नीला म्हणाले, "अग तू इथून जा आतां आसगर मियां बाहेर आला आहे तो आतां आंत येईल. जा. जा. बायका माणसांना कांहीं तरी भीड मर्यादा पाहिजे. इतरासमोर माझी अब्रू घालवूं नको."

नाइलाजानें तांकत बिबीला तेथून आंत जाणें भाग पडलें. नंतर शेखजी मोठ्यानें म्हणाले. "आसगर मियां! ये आंत ये. इथें दुसरें कोणीही नाहीं."

बोलतां बोलतां त्यानें हातांतील रक्कम पेटींत ठेविली आणि चावी लावून तो पुन्हां मोकळा होऊन बसला. या दिवाणखान्यांत पूर्वींच बिछायत घालून ठेविलेली होती. अर्थात आपल्या जिगरजान दोस्तासह शेटजीची स्वारी त्या जाजमावर बसून गोष्टी बोलण्यांत गढून गेली. नुकताच त्यांच्यावर जो प्रसंग गुजरला होता तो ते विसरले म्हटलें तरी चालेल. "हजरत! अकस्मात दोस्ताची आठवण होण्याचें काय बरें कारण! मला

कशाला बोलवायला पाठविलें ? आसगर अलींनें बोलायला सुरवात केली. कारण आपणाला बोलविण्याचें कारण त्याला अद्याप समजलें नव्हतें.

ताकितबीबी आडकोपऱ्यांत राहून आपलें बोलणें ऐकणार अशी उमर-शेखची खात्री असल्यामुळें तो खरें कारण गुप्त ठेवून कपटानें म्हणाला " छे, बुवा या लोकांपुढें इलाज नाहीं. शिपाई घेऊनही बेव्याच्या घराला गेलों; पण तो इतका मगरूर आहे कीं, त्यानें काजीच्या शिपायांना लांच देऊन वश केलें, त्यामुळें माझाच त्याठिकाणीं अपमान झाला. मला शेवटीं त्याच्याकडून रुपये मिळाले नाहींत ते नाहींतच. मात्र पंधरा दिवसांनीं देण्याचा करार केला. पैशाच्या बाबतींत तर माझी ओढाताण झाली आहे कीं, तिनें आज दहा रुपये माझ्याकडे मागितले; पण तेहि मला देतां आले नाहींत. "

ताकित बिबीनें दाराच्या आड राहून हें बोलणें ऐकलें, व उमरशेखलाही तें कळून चुकलें. तो आपल्या दोस्ताला एक प्रकारची खूण करून म्हणाला, " असो. त्या रकमेचें आतां काय ! पुढेंमागें व्यवस्था करूं; पण दोस्त, तुम्हीं मला पंधरा दिवसांच्या मुदतीनें दहा रुपये उसने द्या. घरांत कांहीं कामा-करतां पाहिजे आहेत. आणि त्या बाबतींत मला अगदीं खालीं मान घाल-ण्याचा प्रसंग आला आहे."

आसगरही शेखजींचा दोस्त ! अर्थात एकमेकांचे संकेत एकमेकांना माहीत असायचेच. तो डोळे बारीक करून कांहींसा उदासपणानें म्हणाला, " नशीब अन् दुसरें काय ! तुझ्यासारख्या सावकाराची ही दशा, मग माझें काय विचारतोस ? मी ' उत्तान भक्षी आणि माध्यान्ह दरिद्री ' माझ्याकडून तुझी कसची गरज भागणार ! उगाच माझ्याकडे शब्द टाक-लास ! मीच तुझ्याकडे दहा रुपये मागणार होतों. बरें जाऊं द्या. इथें कशाला या गोष्टी पाहिजेत ? चल आम्हीं बाहेर बसून बोलूं. मलाही एक-दोन महत्त्वाच्या गोष्टी तुला सांगावयाच्या आहेत ! "

उमरालाही तेंच पाहिजे होतें ! ताकित बिबीचें तोंड बंद करण्यासाठींच त्यानें आसगरला आंत बोलविलें. आपल्या अंदर महालांत परक्या पुरुषानें बसावें अशी त्याची मुळींच इच्छा नव्हती. अर्थात आपल्या दोस्ताच्या बोलावण्याला दुजोरा देत तो म्हणाला, " चल तर आपण बाहेरच बसूं.

बाकी तुझ्यांत आणि माझ्यांत आंत बाहेर असें कांहींच नाहीं म्हणा ! कारण तूं आणि मी लंगोटीयार आहों.

बोलतां बोलतां ते दोघेहि सिद्धसाधक बाहेर आले. ओटीवर बैठकी-साठीं म्हणून एक खोली होती. तिच्यांत विशेष डामडौल असा कांहींच नव्हता तरीपण आंतील भागापेक्षां ती जागा बरीच सुशोभित करण्यांत आली होती. कारण मोठमोठ्या दर्जाचे लोक पैसे नेण्यासाठीं त्यांच्याकडे येत. अर्थात बाहेरील जागा कांहींशी सुशोभित करणें त्याला भाग होतें. नाहीं तर असल्या कामांत त्यानें आपला पैसा कधींहि व्यर्थ घालविला नसता.

ही दुक्कल त्या खोलींत जाऊन बसते न बसते तोंच नोकरानें गुडाखू घालून नेचाची नळी पुढें केली. तेव्हां उमरनें ती आपल्या हातांत घेऊन त्याला म्हटलें," जा. तूं आतां घरांत कामाला जा. जरूर लागतांच मी तुला हांक मारीन. निष्कारण इथें उभा राहूं नको."

त्या नोकराला आपल्या मालकाचा स्वभाव चांगलाच माहीत होता. ज्यावेळीं कोणाचा तरी कशाही प्रकारें सर्वस्वी घात करण्याचें कारस्थान चालू करावयाचें असेल तेव्हांच आपला मालक आसगरला बोलवितो हें तो जाणून होता. आणि त्यामुळें त्यांचीं भाषणें आडून ऐकण्याची त्याला संवय झालेली होती. या संवयीमुळें लोकांकडून त्याला रुपया दोन रुपयांचा लाभही होत असे. आपल्या धन्याचे गुप्त बेत ऐकून तो ते त्याच्या कुळांना सांगे आणि म्हणे," सावध रहा माझा धनी तुमच्या घरादारांवरून नांगर फिरविण्याची तजवीज करीत आहे " एवढ्या त्याच्या सूचनेवरच त्याला बरेंचसें बक्षिस मिळे व तेवढ्यावरच समाधान मानून तो आपल्या कृपण धन्याची सेवा चांगली करीत होता. या नोकराचें नांव जुलुसखान असें होतें.

जुलुसखानाची आपल्या धन्याशीं अशी वर्तणूक असण्याचीं कारणें अनेक होतीं. पहिलें कारण म्हणजे त्याला आधीं पोटभर खायला मिळत नसे. मालक मालकिणीकडून रोज रोज मात्र शिव्यांची लाखोली मोजली जाई. ताकित बिबीचा तडाखा तर इतका भयंकर होता कीं, तो सहन करतां करतां त्याला भुकेची आठवणही होत नसे. दुसरें कारण या घरांत त्याला इतर मिळकत अशी कांहींच नव्हती. तो कुठें कांहीं निरोप घेऊन

गेला तर त्याला चारदोन आणे मिळत असत; पण धन्याला तें समजल्यास त्याच्या पगारांतून तो तितके पैसे कापून घेई. तिसरें कारण जुल्स हा अंतःकरणाचा निर्मळ होता. तो मनांत म्हणे, मागील जन्मीं मीं जें पाप केलें होतें तें या कृपण धन्याची नोकरी करून फेडीत आहें. जगांत येऊन चांगलें असें मीं कांहींच केलें नाहीं. मग दुसऱ्यावर उपकार करणें कुठचें ! तेव्हां दुसऱ्याला त्याच्या घातापातांतून वांचवून दोन पैसे मिळतात ते तरी आपण कां सोडावे. दुसऱ्याचें बरें करून दोन पैसे मिळविल्यास त्यांत अधर्म नाहीं.' ही त्याची नीति कशीही असो; पण त्याला फायदेशीर झाली होती, एवढें मात्र खरें.

आसगर अलीला तोच बोलवायला गेला होता. असलें हें निकडीचें बोलावणें कांहींतरी मतलबाशिवाय असणें शक्य नाहीं, हें जुल्स समजून होता. अर्थात् त्याच्या धन्यानें जेव्हां त्याला तेथून जाण्याचा हुकूम केला तेव्हां तो त्याच खोलीला लागून असलेल्या एका दरवाज्यांत लपून बसला. तिथून त्याला त्या दोघांचें सर्व बोलणें ऐकूं येत होतें.

आसगर अली गुडाखूचा एक झुरका मारून म्हणाला, " दोस्त आहे काय हा प्रकार ? खरोखरच तुला इब्राहीमकडचे पैसे वसूल करतां आले नाहींत काय ? "

शेखजी बोलले. " वा: तूंहि वेडाच बनलास म्हणायचा ! मी जर काजीचे शिपाई घेऊन तेथें गेलों तर रक्कम घेतल्यावांचून परत येणार होय ? "

" तर, मग तूं घरांत तसें कां सांगितलें नाहींस ? "

" अरे स्त्रियांकडे कधीं खरें बोलून उपयोग आहे काय ? त्यांना अशाच कांहींतरी थापा मारल्या पाहिजेत. माझी बायको माझ्या घरादाराचें वाटोळें करायला बसली आहे. तिला मी खरी हकीगत सांगून उद्यां भिकारी बनूं होय ? " शेटजी तरारले.

" वा: दोस्त ! चोहोंकडून इतका पैसा येत असतां तुला आपल्या एकुलत्या एका पत्नीच्या हौशी भागवितां येत ना, याचें मला मोठें आश्चर्य वाटतें ! लोक तुला कृपण म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं. तुला तर मुलेंबाळें नाहींत. मग इतका पैसा सांठवितां तरी कशाला ? "

" भाई ! तुझें आणि माझें एक मत होत नाहीं तें याच बाबतींत ! मी माझ्या पत्नीसाठीं खर्च करणार नाहीं, तर दुसरा कोण खर्च करील ? चांगलें

कापडचोपड व आंगावर ठळकसे दोन दागिने असले कीं झालें. शास्त्रकार म्हणतात, बायकामाणसांना रुपयांची रुची कशी असते हें मुळींच कळवितां नये. वाघाला रक्ताचा आस्वाद मिळाला असतां तो जसा मेलेलाही जिवंत होतो, त्याप्रमाणें या बायकांना पैशांची रुची मिळाली कीं त्यांचे स्वाभाविक दुर्गुण आपलें डोकें वर काढूं लागतात. असो. त्या सगळ्या गोष्टी तूर्त बाजूला ठेवूं. व नंतर सवडीनें त्या बाबतींत वादविवाद करूं. या वेळीं त्या रिकाम्या गप्पा नकोत. दुसऱ्या एका फारच महत्त्वाच्या बाबतींत तुझा सल्ला घ्यावा व तुझें सहाय्य मिळवावें असा माझा हेतू आहे. "

" मग त्याची इतकी प्रस्तावना कशाला ! मी तर तुझा अनुयायी आहे हें तूं जाणतच आहेस. तूं मला जो हुकूम करशील तो मी मान्य करीन. " आसगरनें सम्मती दिली.

नंतर उमरशेखनें इब्राहिमच्या घरीं झालेली सर्व हकीगत जशीच्या तशी आपल्या दोस्ताला सांगितली. ती ऐकून आसगर अल्ली म्हणाला, " त्या पोट्टीचें बोलणें तर मोठें तेजस्वी आणि अभिमानाचें दिसतें. मला वाटतें कदाचित् तीच. कोणत्या ना कोणत्या उपायानें पैशाची तजवीज करीत असावी. "

" त्या बाबतींत आतां विचार करण्याचीच आपल्याला जरूरी नाहीं. कारण रक्कम तर आपल्या पेटींत जाऊन बसली. तेव्हां त्या बाबतींतला व्यवहारच संपला म्हणायला हरकत नाहीं. आतां ती गुलामडी आपणाला लाभते कशी तें पहायचें. एकंदर परिस्थिति पाहून असें वाटतें कीं, इब्राहीमचें आणि तिचें कांहीं तरी आंतून सूत असलें पाहिजे. आणि तसें जर असेल, तर इब्राहीम कधींहि तिला सोडायला तयार होणार नाहीं. अर्थात दालिया कांहीं आपल्या हाताला लागत नाहीं. तेव्हां तिला आपल्या वाड्यांत आणायला काय युक्ति योजावी, तें तूं सुचीव. दालिया तर मला पाहिजेच. माझी सगळी इस्टेट खर्च झाली तरी हरकत नाहीं, पण मला तिची जरूरी आहे. "

आसगरनें आपल्या दोस्ताचें हें हृद्गत ऐकून जोरानें जोरानें तंबाखूचे झुरके मारायला सुरवात केली, आणि बरेंचसें धूमपान झाल्यानंतर तो गंभीरपणानें म्हणाला, " इब्राहीमकडे आणखी तुझे किती रुपये येणें आहेत? त्याला अडविल्यावांचून आपलें काम होणार नाहीं. "

" रोख्याचे व ऐवजी मिळून दीड हजार होतील."

" तर मग त्याच्या नांवावर काजीकडे पुन्हां फिर्याद लावावी."

" कायद्यानें तसें करतां येत नाहीं. काजी तर कायद्यावर बोट ठेवणारा माणूस आहे."

" वा, म्हणजे ? येणें असलेल्या रकमेबद्दल फिर्याद करणें हा कायदा नाहीं काय ?"

" इब्राहीमनें ज्या करारानें माझ्याकडून रुपये घेतले आहेत त्या करा-राची मुदत पुरी व्हायला अद्याप दोन महिन्यांचा अवकाश आहे. अर्थात मला त्याच्याकडे कायदेशीर मागणी करतां येणें शक्य नाहीं."

" तसें असलें म्हणून काय झालें ! मला रकमेची फारच जरूर आहे, वगैरे सबबी फिर्यादींत नोंदाव्या. ज्या ठिकाणीं सावकाराचीच पत जाण्या-ची वेळ आली त्या ठिकाणीं कुळाची किंमत कसली ?"

" या सगळ्या गोष्टी काजीच्या मर्जीवर अवलंबून आहेत. त्यानें माझी फिर्याद नामंजूर केली तर ? त्या बाजूनेंहि मुष्कीलच. बरें, दोन महिने वाट पहावी तर कदाचित् दलिया दुसऱ्या कोणासही विकून तो आपली पैशाची गरज भागवील. तसें झालें तरीहि आपला डाव हुकलाच !"

" बरें तर तूं मला आधीं असें सांग, तुला खरोखरच रकमेची जरूर आहे कीं दलिया पाहिजे ?"

" दलिया पाहिजे. रुपये तर पुष्कळच मिळविलेले आहेत. इब्राहीम जर आरडाओरडीवांचून त्या दासीला माझ्या स्वाधीन करील तर मी त्याला नावडतांव कर्जमुक्त करीन. माझा त्याचा कांहीं संबंध राहणार नाहीं आणि मी त्याच्याकडे एक पैही मागणार नाहीं."

" काय हें उमर ! तिच्यासाठीं तूं इतका वेडा झालास ?" आसगरनें आश्चर्यानें विचारलें.

" अरे बाबा तूं तिचें सौंदर्य अद्याप पाहिलें नाहींस, म्हणून असल्या गोष्टी मला विचारीत आहेस. तिला दासी म्हणेल कोण ? ती एखाद्या राज-कन्येपेक्षांहि श्रेष्ठ असावी असें वाटलें."

" तर मग तुला कांहीं रकम अगदीं पाण्यांत टाकावी लागेल कबूल आहे ?"

किती रक्कम ? " उमर शेखनें उतावीळपणानें विचारलें.

" फार नाहीं. एक हजार रुपये तरी उडवावे लागतील. " कारण शहरचा काजी मोठा लांचखाऊ आहे. तो भरपूर लांच खाऊन बनींचशीं कामें करून देतो असें मी ऐकतों. शिवाय त्याचा तो अंतर्गृहांतील हस्तकही माझ्या परिचयाचा आहे.; तेव्हां माझ्याकडून तें काम बिनबोभाट पार पडेल. रक्कम आणि अर्ज एकदमच त्याच्या हातांत जातील असें मी करीन. रुपयांच्या तेजांत कायदेंहि दिसूं लागतात, हा तर सर्वसाधारण नियम तुला माहीतच आहे. अर्थात तुझ्या मनासारखें व्हायला मुळींच विलंब लागणार नाहीं. शिवाय तुझ्याकडून पैसे मिळतात असें समजल्याबरोबर प्रत्येक कामांत तो तुझ्याशीं गुलामाप्रमाणें वागेल यांत संशयच नाहीं. ज्यावेळीं जसा हुकूम तुला पाहिजे असेल तसा तो मिळेल. इतकेंच नव्हे तर इब्राहीमच्या बाबतींत तुला जशी व्यवस्था करावयाची असेल तशी करतां येईल. "

आसगरनें युक्ति तर मोठी चांगली सुचविली; पण रक्कम बरीच मोठी असल्यामुळें उमरला कसेंसेंच वाटलें. तो ह्मणाला, " हजार रुपये ? फारच मोठी रक्कम बुवा ! हजार रुपयांचें एका महिन्याचें व्याजच मला अडीचशें रुपये येईल. चार महिन्यांत हजाराचे पुन्हां हजार होतील. "

" परीसारखी दासी पाहिजे. आणि पैसा तर मुळींच खर्च होतां नये, आणि हें होईल कसें ? दोन्ही कामें एकदम होणें शक्य नाहीं. आणि मलाही याशिवाय दुसरा उपाय सुचत नाहीं. कायदा वगैरे काय असेल कुणाला माहीत ! पण सगळा पैशांचा खेळ आहे एवढें मला समजतें. काजी मोठा खाष्ट मनुष्य आहे. त्याच्या समोर असली गोष्ट काढणें म्हणजे फारच भयंकर; पण तुझ्या हितासाठीं म्हणून मी ती करायला तयार झालों; तर तूं रुपयासाठींच रडूं लागलास ! मी तुझ्यासाठीं प्राणही द्यायला तयार आहें. मग यःकश्चित् रुपयांची गोष्ट ती काय ? " आसगरअलीनें आपला ' परोपकाराय सतां विभूतयः ' हा स्वभाव व्यक्त केला ! ! केवढें मित्रप्रेम. आणि कसला जबरदस्त स्वार्थत्याग हा ! ! ! उमर तर मनांतल्या मनांत थक्कच झाला व असा मित्र मिळाल्याबद्दल तो खुदातालाचे आभार मानूं लागला. याचवेळीं त्याच्या डोळ्यांसमोर दालियेचें दिव्य सौंदर्य प्रकाशित झालें आणि तो अगदीं हिताहितशून्य होऊन गेला. तिचे

ते गुलाबासारखे दिसणारे गाल, आरक्त कपोलांना शोभा आणणारे चमकदार नेत्र, काळाकुट्ट दिसणारा केशकलाप, आणि गुलाबाच्या पाकळीप्रमाणें मधुर सौंदर्य विभूषित असे सस्मित अधर, तसेच मंजूळ आवाज या सगळ्या गोष्टींचा त्याच्या मनावर विलक्षण परिणाम झाला.

उमराच्या अन्तश्चक्षूसमोर दालियेची मूर्ती दिसतांच तो अगदीं वेडावून जाऊन मनांत विचार करूं लागला, " ताकित बिबी तर मला पदोंपदीं त्रास देत आहे. घरांत क्षणभरही सुख लागूं देत नाहीं. रुपये कमावण्याची माझी हौस मिटून गेली; पण दांपत्यजीवनाचा मला मुळींच आस्वाद मिळालेला नाहीं. ही माझी कजाग बायको घरांत येऊन आठवर्षें झालीं; पण तिच्या तोंडून मला अद्याप एकही प्रेमाचा शब्द ऐकायला मिळाला नाहीं. शिवाय ही त्या दालियेच्या दासीची दासीहि शोभणार नाहीं. सूर्यापुढें काजव्याचें महत्त्व कुणाला तरी वाटेल काय? जर कोणत्या ना कोणत्या उपायानें मला दालिया मिळेल तर माझ्या जीवनांतील एक फारच महत्त्वाची गोष्ट तडीला गेली असें मी समजेन. शिवाय या योगानें ताकीत बिबीचाही अभिमान नाहींसा होईल. व माझ्या आयुष्यांतील अपुऱ्या आशाही पूर्ण होतील. "

उमर अशा प्रकारें विचारांत गढून गेलेला पाहून आसगर म्हणाला, " अरे असल्या गोष्टींचा इतका खोल विचार करून चालत नाहीं. अशा प्रसंगीं साहसीच बनलें पाहिजे. एक हजार रुपये म्हणजे तुला कांहीं मोठीशी बाब आहे असें नाहीं. एक दोन बुडल्या कुळाकडचें व्याज आलें नाहीं असें समज. इतका पैसा तुझ्या जवळ आहे; पण तुला सुख आहे का? दालिया तुला मिळाली आणि मनाची हौस फिटली तर जन्माचें सार्थक झालें असें तरी होईल. मग अशा या आत्मसौख्याच्या कामांत तूं कां बरें माघार घेतोस ? तुझ्या मनांत आलेली गोष्ट एकदां तडीला जाऊं दे. तुझ्या या शोचनीय स्थितीबद्दल मला फारच वाईट वाटतें. मी तुझ्यासाठीं काय पाहिजे तें करायला तयार आहें याबद्दल तुझी खात्री असूं दे. मात्र मी गरीब असल्यामुळें पैशांच्या बाबतींत कांहींच तजवीज करूं शकत नाहीं, त्याला नाइलाज आहे. " " तर मग दोस्त, तुझ्या म्हणण्याप्रमाणेंच होऊंदे " उमरनें आपल्या, कृपणतेवर विजय मिळविण्याचें ठरविलें आणि तो बोलू लागला, " कसा तरी मी बुडणारच, मग तळाशीं तरी कां जाऊं नये ? तूं सांगतोस तें मला कबूल आहे आणि तेंच खरेंहि आहे. माझ्या

आयुष्यांतील खरें आणि श्रेष्ठ सुख जर कोणतें असेल तर तें दलियेची प्राप्ति हें होय. तेव्हां पैशांनीं जर हें सुख मिळणें शक्य असेल, तर तें मला अवश्य मिळविलें पाहिजे. मी या बाबतींत आतां मुळींच माघार घेणार नाहीं. या कामासाठीं जितका पैसा खर्चावा लागेल तितका खर्चायला मी तयार आहें, तूं मात्र आतां माघार घेऊं नको म्हणजे झालें. "

" नाहीं मी माघार घेत नाहीं, आतां माझें पहिलें काम म्हणजे काजी-चा हुकूम मिळविणें. तुझ्याकडून माझ्या हातांत ठरलेली रकम येतांच मी तुला नामदार काजीकडून तुझ्या कुळावर कर्ज वसुलीचा हुकूमनामा मिळवून देतों. मुदतीचा अडथळा न आणण्याची जबाबदारी माझ्यावर राहिली. "आसगर म्हणाला. " तर मग रकमेसाठीं तुला पुन्हां येथें येण्याचें कारण नाहीं. उगाच तिची पिरपिर मागें लागावयाची. मी उद्यां रकम घेऊन तुझ्या घरींच येतों. गाजावजा न होतां काम पार पडलें पाहिजे. "

" वा: वा: युक्ति पण युक्ति. मी आतां घरींच जातों" आसगर अली आनंदानें म्हणाला.

" थांब. आणखी एक काम केलें पाहिजे. माझी खात्री आहे कीं, तूं तेवढें काम केलेस कीं, बेट्या इब्राहीमची चांगलीच फजिती उडेल. त्यानें जसा सर्वांसमोर माझा अपमान केला आहे तसाच त्याचाही झाला पाहिजे." " पण त्यासाठीं मीं काय करावें असें तुझें म्हणणें आहे ? " आसगर अली संशयितपणानें त्याच्याकडे पाहात म्हणाला. " बाजारांत त्याचे अनेक किरकोळ सावकार आहेत. त्यांना धमकाऊन सांगावें कीं तुम्हीं सर्वांनीं इब्राहीमला एकदम तगादा करावा. नाहींतर तुम्हांला त्याच्या-कडचे पैसे मिळणार नाहींत. मी काजीचे लोक घेऊन जाऊन त्याच्या दाराशीं धरणें धरतों, तितक्यांत इतरांनीं येऊन आपापल्या कर्जाची मागणी करावी. असें झालें असतां माझ्या मनाप्रमाणें त्याचा सूड उगविला असें होणार आहे. "

" सूडच उगवायचा असेल तर हें कांहीं वाईट काम नाहीं. तो जसा तुमच्या घरीं चालून येऊन तुमचा अपमान करून गेला, तसाच तुम्हींही त्याच्या दारांत जाऊन त्याचा अपमान करावा हें योग्यच आहे. जशास तसें वागलें नाहीं तर शत्रू पुनःपुन्हां उपद्रव देऊं लागतात. तेव्हां तुझ्या

या करण्यांत गैर असें कांहींच नाहीं. जाऊं द्या. हें सगळें पुढचें काम आहे. उद्यां रुपये घेऊन यायचें ठरलेंना ? "

" मीं एकदां वचन दिलें कीं त्यांत बदल मुळींच व्हावयाचा नाहीं. आसगर ! त्या दालियेसाठीं मी हें सगळें करीत आहें ! अरे तिला दासी कोण म्हणेल ? खरोखरच ती दास्यत्वांत राहायला योग्य नाहीं. ती एखाद्या राजाचीच राणी व्हायची. मी तिच्यासाठीं काय पाहिजे तें करीन. ती मला पाहिजेच. तिच्या पायीं मी घरादाराला मुकलों तरी चालेल. पैसा नाहींसा झाला तरी चालेल; पण दालिया पाहिजे. "

इतकें झाल्यानंतर आसगरनें निरोप घेतला. जातां जातां तो मनांत म्हणाला, " आतां माझ्या नशिबाचा उदय झाला खरा. काजीला पांचशें रुपये दिले कीं तो पाहिजे तें काम करील. अर्थात् बाकीचे पांचशे रुपये माझ्या पेटींत जाऊन बसणार यांत संशय नाहीं. तरीपण त्या सैतानाच्या हातांतून ते हजार रुपये जोंपर्यंत माझ्या हातांत आले नाहींत, तोंपर्यंत मनाचे मनोरे उठविण्यांत कांहींच अर्थ नाहीं. पण बेट्या समजून राहा म्हणावें कीं आसगर मियां आहे. माझ्याशीं कपट करतां येणें कुणालाच शक्य नाहीं. "

# प्रकरण ६ वें.

—:※:—

## ' ही तर जगाची रीतच आहे ! '

आम्हीं पूर्वीच्या भागांत प्रथमच ज्या जुल्मखानाची हकीगत सांगितली होती तो काय करीत आहे तें आतां पाहूं. चतुर जुल्मखान नजीकच्या चोर दरवाज्यांत लपून त्या दोघां सैतानांत चाललेल्या कारस्थानाची हकीगत ऐकत होता. त्याला जें पाहिजे होतें तें त्यानें ऐकलें. व त्यानंतर तो तेथून बाहेर पडला. आसगर निघून गेल्यानंतर उमरशेखही घरीं बसून राहिला नाहीं. कारण पत्नीच्या प्रेमालापांत मग्न होण्याइतका तो सुखी नव्हता. त्यामुळें तो फार वेळ कधींच घरीं राहात असे. आणि त्यामुळेंच आजही त्यानें बाहेरच वेळ काढण्याचें ठरविलें.

आपला मालक निघून गेल्याचें पहातांच जुल्सनें इब्राहीमचें घर गांठलें व झालेली सगळी हकीगत दलियेला सांगून तिनें दिलेल्या बक्षिसानें खूष होऊन तो पुन्हां तेथें आला.

सरळ व उदार स्वभावाच्या इब्राहीमसाठीं जें एवढें भयंकर कारस्थान रचलें जात होतें तें त्याच्या गांवींही नसल्यामुळें आलेला प्रसंग निभावला या आनंदांतच तो परमेश्वराचे आभार मानून उद्यां पोटापाण्याची तजवीज काय करावी या विचारांत गढून गेला होता. आपण एका नीच सैतानाच्या ताब्यांत सांपडलों असून त्याच्या हातून आपली सुटका होणें अशक्य आहे हें त्याला माहीतच नव्हतें. मनुष्य स्वभावाची असावी तितकी माहिती त्याला नव्हती असें म्हटलें तरी चालेल. नुकताच तो सावध होत होता व दलियेकडून योग्य ती त्याला मदत मिळत होती. ती नसती तर त्याची काय स्थिति झाली असती कुणाला माहीत ?

इब्राहीमशीं हितगुज करणारी दलिया तो सचिंत आहेसा पाहून जवळ आली. ज्या दिवाणखान्यांत तो बसला होता, तो दिवाणखाना पूर्वीं चांगला शृंगारलेला असे; पण दारिद्र्यामुळें तेथील मौल्यवान जिनसा त्याला विकणें भाग पडलें. ज्या ठिकाणीं असंख्य दिवे तेवत असावयाचे त्या ठिकाणीं आतां काळोखांत बसण्याची पाळी आली, आणि जी जागा सुगंधी पुष्प-मालांनीं विभूषित असावयाची ती कोळिष्टकांनीं व्यापलेली दिसूं लागली. आपल्या अस्तित्वाबद्दल स्वतःलाच संशयित बनविणारा एक लहानसा दिवा मिण मिण जळत होता. अशा प्रकारें चोहोंकडे पूर्ण उदासीनता पसर-लेली पाहून इब्राहीम दलियेला म्हणाला, “ दलिये, तूं कां आलीस ? ”

दलियेनें एक दीर्घ सुस्कारा सोडला आणि ती म्हणाली, “ एक वाईट बातमी ऐकून मन फारच अस्वस्थ झालें आहे. काय करावें, कांहीं सुचत नाहीं. ”

“ कसली बातमी ! कुणीं सांगितली ? ” इब्राहीमनें उत्सुकतेनें विचारलें.

“ ती बातमी आपल्याला समजली तर आपण फारच दुःखी कष्टी व्हाल. ”

“ तर मग मला सांगण्यासाठीं तूं कां आलीस ? ”

" तो वृत्तांत आपणाला समजला नाहीं, तरीही त्या प्रसंगांतून आपल्याला मोकळें होतां येणार नाहीं. "

" पण असें आहे तरी काय ? "

" आपण या दिवसांत घराबाहेर जाण्याचें धाडस करूं नये, ही माझी पहिली सूचना आहे. "

कां बरं दलिये ? मी कोणी खुनी, दरवडेखोर अगर दगलबाज नाहीं, मग मीं कां बरें तोंड लपवून दिवस काढावे ? मी थोडासा भलत्याच मार्गाला गेलों होतों खरा; पण त्याचें आतां काय ? "

" हुजूर ! मला क्षमा करावी. स्वर्गवासी महामान्य अबू अयूबचे आपण वंशज खरे; पण आपला तो पूर्वीचा काल आतां राहिला नाहीं. आणि त्यामुळें त्या महात्म्याच्या मुलाचा चोहोंकडे विलक्षण अपमान होण्याचा संभव आहे. मी जिवंत असतां आपला अपमान झालेला माझ्यानें पहावणार नाहीं. मला तो पूर्वीचा काल आठवतो व अन्तःकरण सद्गदीत होतें. "

" दलिये ! दलिये !! आज तूं हें काय आरंभलं आहेस ? कारण तरी काय झालें ? " दलियेच्या डोळ्यांत अश्रु आलेले पाहून इब्राहीमला फारच वाईट वाटलें.

" मीं चांगल्या विश्वासू मनुष्याच्या तोंडून ऐकलें आहे कीं, सैतानी उमरशेखनें सावकार लोकांना लांच देऊन आपल्या विरुद्ध चिथावून दिलें आहे. ते आपला कुठें व कसा अपमान करतील याचा नेम नाहीं. "

ही सगळी बातमी तुला कुणीं सांगितली ? इब्राहीमनें वाढत्या उत्सुकतेनें प्रश्न केला.

" जुलुसखानानें सांगितली. हा सैतानी उमरशेखचा नोकर असून आपल्या अन्नान्न दशेमुळें हा चुगलखोरीचा व्यापार करीत असतो. धन्याकडून याला पोटभर खायला मिळत नाहीं तें नाहींच, पण उलट थोड्याशा चुकीसाठीं भरपूर मार मात्र खावा लागतो. सुखापेक्षां त्रासच ज्यास्त ! ममतेच्या शब्दापेक्षां शिव्यांचा प्रसादच नेहेमीं त्याच्या वांट्याला येतो. त्यामुळें असल्या गुप्त बातम्या योग्य मनुष्याला सांगून मिळालेल्या पैशांवर तो आपली गुजराण करीत असतो. तो स्वतः च येथें आला होता व त्यानेंच

मला हें सगळें सांगितलें. तो खोटें सांगणार नाहीं असा माझा त्याच्यावर पूर्ण विश्वास आहे."

ही सगळी विलक्षण आणि अनर्थकारक हकीगत ऐकून इब्राहीम मनांतल्या मनांत अगदीं भिऊन गेला. "कोणीही साधारण मनुष्य आपल्या समोर उभें राहून नुसतें बोलण्याचेंहि धाडस करीत नसे तोच आतां माझ्या घरांत शिरून माझा अपमान करूं लागला इतकेंच नव्हे तर भररस्त्यावर ही माझी बेइज्जत करण्याचा त्याचा विचार ठरला. माझी ती पूर्वींची मान मर्यादा मला केवळ पैशामुळेंच मिळाली होती काय ?—"

अशा प्रकारचा विचार करून कांहीं वेळानें तो दलियेला म्हणाला, "खरोखरच तूं नेहमींच माझें कल्याण इच्छिणारी आहेस ! माझा आज खरा मित्र जर कोणी असेल तर ती तूंच होय; पण दलिये ! तुझी आतांची विनंती मला अमान्य करावी लागत आहे याबद्दल वाईट वाटतें. कारण आतांच मला बाहेरच्या एका मित्राकडे कांहीं जरूरीच्या कामासाठीं जावयाचें आहे."

"मुबारकाकडून तें काम होण्यासारखें नाहीं ?"

"नाहीं. कांहीं कामें स्वतःच करावीं लागतात आणि त्यांपैकींच हें एक आहे."

"पैशाच्या व्यवहारासंबंधानें कांहीं बोलावयाचें आहे वाटतें ?" दलियेनें उत्सुकतेनें विचारिलें.

"होय. एका चांगल्या अंतःकरणाच्या सावकारानें हें रहातें घर गहाण ठेवून बिनव्याजी कांहीं रक्कम देतों असें सांगितलें आहे. जर ती रक्कम मला मिळाली तर उमरशेखसारख्या नीच सावकाराच्या जबड्यांतून तरी सुटका होईल. आणि मलाही दुसरीकडे कुठेंतरी जायला मोकळीक मिळेल. अमीर होतों तो फकीर झालों. दुःख करून तरी काय उपयोग ! जगाचा नियम असा आहे कीं, नेहमीं एकच स्थिति टिकणें शक्य नाहीं; पण दलिये ! या सर्व दुःखांत कर्जा इतकी कोणतीही दुःखदायक गोष्ट नसेल. नीच हृदयाचे सावकार कर्जबाजारी मनुष्याचे हाल करतांना काळापेक्षांही निष्ठुर बनतात ! जर या कर्जांतून मुक्त होऊन मला दारोदार भिक्षा मागावी लागली तर मी त्यांत खरोखरच आनंद मानीन. तेव्हां हें घर गहाण ठेवून कांहीं रक्कम मिळाल्यास पहावी असा माझा विचार आहे."

आपल्या विपन्नावस्थेला पोंचलेल्या मालकाचें तें दीनवाणें भाषण ऐकून दालिया सहानुभूतिपूर्वक म्हणाली, " तर मग आतां आपण विलंब करूं नये. आतांच तिकडे जाऊन एकवार प्रयत्न करून पहावा. मात्र त्या सैतानाच्या घराजवळूनही जाऊं नये. कारण त्यादिवशीं इथें त्याचा चांगलाच अपमान झाला आहे, तेव्हां संधि मिळाल्यास त्याचा पुरा सूड उगविण्याला तो कधींच कमी करणार नाहीं. "

इतकें बोलणें झाल्यानंतर तो विषय तितक्यावरच थांबला आणि दालिया दुसऱ्या कामाला निघून गेली.

भर दोन प्रहरची वेळ! सगळी पृथ्वी सूर्याच्या प्रचंड तेजानें अग्नीच्या ज्वालेप्रमाणें लकाकत होती. श्याम सुंदर प्रकृतीच्या हृदयावर त्या समुज्ज्वल सूर्यकिरणाचें तें तांडव नृत्य पाहून सोन्याचा पाऊस पडत आहे कीं काय असा भास होत होता. नीलाकाशांत इतस्तत: फिरणारे मेघ, सूर्यकरांनीं दिलेल्या सोन्याच्या मुलाम्यामुळें दिव्य तेजानें चमकत गंभीरपणानें व खिम्मेपणानें विहार करीत होते. अशाच वेळीं रक्कम मिळविण्याचा प्रयत्न करावा ह्मणून इब्राहीम साहेब आपल्या घरांतून बाहेर पडले.

बरेंच लांब जावें लागणार असल्यामुळें ही स्वारी इतक्या दुपारींच बाहेर पडली होती. इब्राहीमचे दोस्त पुष्कळ होते, आणि कोणाही श्रीमंताचे तसेच असतात. या मित्रमंडळांत इसाक नांवाचा फारच उमद्या स्वभावाचा त्याचा एक बाळमित्र होता. व सध्यां त्याचा जवाहिराचा व्यापार फार जोरांत चाललेला होता. इसाकचें घर फत्तेपुरला असून तें इब्राहीमच्या घरापासून सुमारें सहा कोसांवर होतें. इसाक चांगला अब्रूदार गृहस्थ असून तो चांगल्या अब्रूदार श्रीमंत घराण्यांत मोडत असे. त्यानें पैसा मिळविला तशीच मानमान्यताही संपादन केली होती. बादशहाच्या दरबारांतही त्याला मान होता. इतकेंच नव्हे तर वेळीं अवेळीं तो सम्राटच्याही उपयोगीं पडत असे.

इब्राहीमच्या बापाशीं इसाकच्या बापाचा चांगलाच स्नेह असल्यामुळें इसाक हा नेहमींच इब्राहीमकडे येत असे; पण यानें जेव्हां बापाच्या मरणानंतर उधळपट्टीला सुरवात केली, तेव्हांपासून त्यानें याच्या घरीं येण्याचें सोडून दिलें. पुष्कळवेळां इब्राहीमला त्यानें सावध करण्याचा प्रयत्न केला व

'अशानें तुझीच जगांत नापत होईल' असें विनवून सांगितलें; पण त्यानें तें मुळींच ऐकलें नाहीं, त्यामुळें रागानें तो याची चौकशीही करीनासा झाला. या दोघांचें एकमेकांवर सख्ख्या भावाप्रमाणें प्रेम होतें. आपल्या सांगण्याचा याच्या अंतःकरणांत कांहींच प्रकाश पडत नाहीं असें पाहून तो उद्विग्न अंतःकरणानें म्हणाला, "भाई! तुझ्या आणि माझ्या वडलांचा किती निष्कपट स्नेह होता व ते एकमेकांशीं कसें वागत होते हें तुला माहीतच आहे. तेंच प्रेमबंधन पुढेंहि आमच्यांत दृढ झालें. आपण दोघेंही स्वतःचा फायदा, स्वतःचें कल्याण, आणि स्वतःचा विचार अजूनपर्यंत एकमेकांच्या मतानें करीत आलों. मी तुझ्याशीं अगर तूं माझ्याशीं अद्याप कोणत्याही प्रकारचें कपट केलें नाहींस. तुझे मयत वडील हे या अजमीर शहरला भूषणभूत असे एक महामान्य सावकार होऊन गेले. मी माझ्या वडलांच्या तोंडून ऐकलें आहे कीं, त्यांच्यासारखा नवकोटनारायण, दिल्ली व आग्रा या दोन्ही शहरांत एकही नव्हता. एकाही अमीरउमरावाला तेवढी संपत्ति मिळवितां आली नाहीं. तरी पण ते विशेष थाटामाटानें राहात नसल्यामुळें इतरांना त्यांचें तेज असह्य झालें नाहीं व त्यामुळें त्यांना कोणी शत्रूही उत्पन्न झाला नाहीं. त्यांनीं सचोटीनेंच पैसा सांचविला आणि सचोटीनेंच त्याचा व्ययहि केला; पण भाई इब्राहीम! तूं त्यांचा एकुलता एक मुलगा असून स्वतःच्या चुकीमुळें भिकारी होत आहेस. तूं त्यांच्यापेक्षांहि नांव मिळवावयाचें; पण त्यांचेंच नांव आतां राहातें कीं नाहीं याचीच काळजी वाटूं लागली आहे. तेव्हां झाली इतकी मौजमजा पुरे कर. तुझ्याकडे आतां पैसा राहिला नाहीं व केवळ नांवासाठीं तूं कर्जबाजारी होऊन घराण्याचा मान राखीत आहेस, हें मला समजून चुकलें आहे; पण या चुकीमुळें शेवटीं तुला जगांतही राहण्याचा कंटाळा येऊन तूं देशोधडीला लागशील. तेव्हां तूं माझा भाऊच आहेस असें मानून मी माझ्या संपत्तींतून अर्धी तुला देतों. त्या रकमेनें तूं आपलें कर्ज फेडून टाक आणि माझ्याबरोबर व्यापार व्यवसाय करूं लाग. तूं आणि मी जोडीनें व्यवहार पाहूं लागलों कीं आपली भरभराट व्हायला फार दिवस लागणार नाहींत. तूं अभिमानी आहेस. कदाचित् हें माझें म्हणणें तुला पसंत पडणार नाहीं; पण तशी वेळ आल्यास व तुला कुठेंहि मदत मिळेनाशी झाल्यास

तूं कांहींही मनांत संकोच न धरतां माझ्याकडे ये. मी स्वतः दुसरीकडे गहाण राहूनही तुझी गरज भागवीन—"

इब्राहीम श्रीमंताचा मुलगा. आजन्म सुखसौभाग्यांत वाढलेला. दारिद्र्य म्हणजे काय, हें त्याला माहीतही नव्हतें. शिवाय अभिमान तर रोमारोमांतून खिळलेला—आत्माभिमानामुळें त्याच्या हृदयांत कोणत्याच विकाराला जागा नव्हती—अशा स्थितींत मित्राचें बोलणें त्याला कसें रुचावें ? एकादा कठीण प्रसंग आला आणि त्यांतून निसटून जाण्याचा मार्ग सुचत नसला म्हणजे तो मनांत म्हणे, 'माझ्या सख्ख्या भावासारखा इसाक मला पांचसहाहजार रुपये कर्ज देणार नाहीं काय ? देईल. मी एक शब्द बोलतांच तो माझ्या हातावर रक्कम मोजील; पण इतक्या हीनपणानें दरिद्र्यासारखें त्याच्या दाराशीं जाऊन मीं हात पसरावें हें मला किती लाजिरवाणें आहे बरें ? छे. छे. मनाला इतकें क्षुद्र होऊं देण्यापेक्षां गळफांस घेऊन मेलेलें काय वाईट ? नाहीं. इतक्या हीनपणानें मित्राजवळ जाऊन कर्ज मागावयाचें नाहीं. पैसा हाच या संसारांतील सगळ्या अरिष्टांना कारण आहे. निरनिराळीं संकटें आणि आपत्ती येतात तीं याच्यामुळेंच. या घातकी पैशामुळेंच आम्हां दोघां मित्रांत वैषम्य येऊन एकमेकांत अबोल्याची सीमा कायम होणार काय ? आपली विचित्र सृष्टी विचित्र लीलेनें नाचविण्यासाठींच देवानें पैसा निर्माण केला काय ? "

इब्राहीमचा सर्वस्वी घात झाला तो त्याच्या या आत्माभिमानामुळेंच. असल्या या विलक्षण हट्टानेंच त्यानें उमरशेखसारख्या सैतानाकडचा कर्जाऊ पैसा आणिला आणि आपल्या हातानें आपल्या घराला आग लावून घेतली. इसाकला एका शब्दानें कळविलें असतें अगर एकादी चिठी पाठविली असती तर जें काम झालें असतें तें उमरशेखची प्रार्थना करूनही तडीला गेलें नाहीं. शेवटीं बऱ्याचश्या प्रार्थनांनीं जें झालें त्याचा परिणाम किती शोचनीय होत गेला तें कथानुरोधानें वाचकांना समजणारच आहे.

पण अशाप्रकारचे बरेच टोले बसल्यावर आत्माभिमानाची दुर्भेद्यशिला एकदाची फुटली गेली आणि तिचा चूर झाला. चोहोंकडून दारिद्र्याची आणि अपमानाची आंच मिळतांच इब्राहीमचें कठिण हृदय विरघळलें. तो आपल्या अभिन्नहृदय मित्राची-इसाकची-प्रार्थना करण्यासाठीं फार दूरवर जाण्याचें ठरवून घरांतून बाहेर पडला. तो मनांत म्हणाला , "ज्या

आत्माभिमानानें मला आजपर मित्राकडेही जाण्याला वाट दाखविली नाहीं; ती माझी अहंमन्यता व मानीपणा दारिद्र्याच्या चितेवर जळून गेल्यामुळें मी आपण होऊन इसाकच्या घरीं चालून जात आहें. मी माझ्यासाठीं इतका उतावळा झालों नसतों. कदाचित् मीं गळफांस लावूनही प्राणघात केला असता; पण दलियेला वांचविणें भाग आहे. त्या सैतानाची तिच्या-वर नजर गेली असल्यामुळें तो काय करील याचा भरंवसा नाहीं. कर्जाच्या पायीं मला तुरुंगांत लोटल्यावर दलिया अगदींच निराश्रित होईल. आणि तसें झालें म्हणजे तिचें रक्षण करायला कोणीही समर्थ होणार नाहीं. तो पापी उमर तिच्या बाबतींत कदाचित् अत्याचारीही बनेल! तसें झालें तर त्या सुकुमार फुलाचे किती हाल होतील बरें ? मी भिकारी बनून दारोदार फिरलों तरी चालेल, अथवा कारागृहांतील शिक्षा भोगतांना मरण पावलों तरी चालेल; पण मी दलियेचा केव्हांहि त्याग करणार नाहीं.

दलिया ही खुदानें दिलेलें दान असून तें या सर्व जगांत मला श्रेष्ठ आहे. अर्थात् तिचें संरक्षण करण्यासाठीं आजपर्यंतच्या आयुष्यांत जें केलें नाहीं तें करायला मी तयार आहें. पैशासाठीं मित्राच्या दारांत जावें असा विचार नव्हता; पण दुसरा कांहींच विचार सुचला नसल्यामुळें जावें लागत आहे. इसाक म्हणजे माझा बालमित्र! वास्तवीक यापूर्वींच मीं त्याला माझी सगळी स्थिती सांगून स्वतंत्र रीतीनें प्रयत्न करायला सुरवात करावयाची; पण माझा मानीपणा मला तसें करूं देईना. आंता जर मी अहंमन्यतेनें स्वस्थ बसलों तर माझ्या समोर माझी दलिया दुसऱ्याची दासी बनेल. हे तिच्या बचावाकरितां मला हा प्रयत्न केलाच पाहिजे. मित्राच्या घरीं जायला लाज कसली. कर्जाची फेड करून दलियेसह लवकरच मी हें शहर सोडून जाणार आहे. तेव्हां सगळी लाजलज्जा बाजूला सारून आधीं आपलें कार्य साधलें पाहिजे. दलियेला घेऊन मी जगांत अगदीं एकीकडच्या भागांत लहानशी झोपडी बांधून राहाणार ! मला या पुढें जगाशीं कोणत्याही प्रकारचा संबंध ठेवावयाचा नाहीं. या दिखाऊ जगाची मला मुळींच जरूरी नाहीं.

इब्राहीम चालत होता आणि त्याची विचारमालिकाही सुरू होती. कशालाच अंत नव्हता. रस्ता संपेना आणि विचाराचीही इतीश्री होईना.

पण लांबचा प्रवास करण्याची त्याला संवय नव्हती. आणि पायीं जात असल्यामुळें तर तो ज्यास्तच दमला. यावेळीं त्याच्या खिशांत थोडेसे रुपये होते. असल्या या विपन्नावस्थेंत पैशांचा खर्च बातावेतानें करावा म्हणून त्यानें सहा कोस पायींच चालण्याचें ठरविलें होतें. पण पुढें चालवेना, तेव्हां त्यानें एका गाडीवाल्याला इषारा करून आपल्याकडे बोलविलें. व भाड्याचा ठराव करून तो आतां गाडींत बसणार इतक्यांत त्याचे दोन सावकार तेथेंच रस्त्यावर त्याला अडवून उभे राहिले. आणि त्यांपैकीं एकानें केवळ निंदा करण्याच्या हेतूनें त्याला म्हटलें, वली साहेब! तुम्हाला दोन वेळ अन्न मिळण्याची पंचाईत पडली आहे तरी हे नबाबी ढंग अद्याप सुटत नाहींत वाटतें ? पोटांत नाहीं घांसभर अन्न आणि गाडींत बसायला मात्र पाहिजे ! वारे चैनी गडी ! ”

ज्या मनुष्यानें अशा प्रकारें थट्टेच्या शब्दांनीं गाडीवाल्यासमोर इब्राहीमचा अपमान केला, तो मनुष्य अत्तरें विकून निर्वाह करणारा फेरीवाला होता. इब्राहीमनें कांहीं दिवसांपूर्वी त्याच्याकडून थोडीशी रक्कम कर्जाऊ म्हणून घेतली असून अद्याप त्याची फेड झाली नव्हती. तरी पण त्यानें यापूर्वी या कर्जाची मागणी करतांना इब्राहीमचा अशा रीतीनें कधींही अपमान केला नव्हता. पण आज मात्र त्यानें भीडमुर्वत कांहीं न ठेवतां हृदयाला टोंचणारे शब्द बोलला. इब्राहीमला आश्चर्य वाटलें आणि रागही आला; पण असें अकस्मित परिवर्तन होण्याचें कारण त्याच्या कांहीं लक्षांत येईना.

पण या गोष्टीचा त्याला ज्यास्त वेळ विचार करावा लागला नाहीं. हें असें कां झालें असावें याचा त्याला अंदाज करतां आला. हें सगळें त्या सैतानी अन्तःकरणाच्या उमरशेखचेंच काम असावें हें तो समजून चुकला. आपल्या विरुद्ध सगळ्या सावकारांना चिथावून तो आपला सूड उगवीत आहे हें लक्षांत येण्याला त्याला फारसा विलंब लागला नाहीं.

दुसरा मनुष्य कापडाचा व्यापारी होता. इब्राहीमच्या सुखाच्या दिवसांत तो मान वर करून कधीं त्याच्याकडे पाहूंही शकला नाहीं; पण स्थित्यंतरामुळें सगळें कांहीं संभवनीय ठरूं लागलें. विपत्तीच्या आरशांत जगाचें खरें प्रतिबिंब दिसत असलेलें पाहून आपल्या झालेल्या चुकीच

समजुतीबद्दल इब्राहीमचें अन्तःकरण पश्चात्तापानें जळूं लागलें. आज तो कापडाचा व्यापारी सावकार होता. इब्राहीम कर्जबाजारी कुळ झालें होतें. शिवाय परिस्थिति बदलेलीला आणि उमरशेटची चिथावणी ! मग काय विचारतां ! अविचारी सावकार लोक कुत्र्याप्रमाणें तुटून पडूं लागले यांत आश्चर्य कसचें ? पण भर रस्त्यांत एकाद्या विपत्तींत सांपडलेल्या बड्या मनुष्याचा अपममान करणें हें त्याला मरणापेक्षां दुःखकारक होत असतें हें त्यांना समजत नसेल काय ?

श्रीमंतीची धुंदी चढलेल्या माणसाला हें कसें समजणार ? त्या कापडाच्या व्यापाऱ्याला सुद्धां जखमेवर मिठाचें पाणी शिंपडण्यांत मौज वाटूं लागली. हा प्रसंग योग्य आहे असें त्याला वाटलें व तो इब्राहीमला म्हणाला, " अजी हजरत ! पुढचा मागचा विचार करूनच रागरंग उडवावे समजलें काय ? माझे एकट्याचेच सात आठशें रुपये तुम्हीं देणें आहां. माझ्याकडच्या कपड्यांनींच तुमची एकवार अब्रू रक्षण केली आहे. अद्याप ते रुपये मला तुम्हीं देऊं शकलां नाहीं याबद्दल तुमच्या मनाला थोडी सुद्धां शरम वाटूं नये काय ? मीं दिलेल्या कपड्यांपैकीं एकादें फाटकें तुटकें वस्त्र असल्यास त्यानें गळफांस लावून प्राणत्याग तरी करा ! दुसऱ्याच्या कर्जात लोळत असतां गाडी घोडे उडवून चैन करण्यापेक्षां झाडाच्या फांदीला गळफांस लावून मेलेलें काय वाईट ! सावकार लोकांना फसवून मजा उडविणें हाच आपला धंदा वाटतें. वडलांनीं चांगलेंच शिक्षण दिलें आहे म्हणायचें ! जुगार खेळूनच बापानें संपत्ती मिळविली वाटतें ? श्रीमंत वडलांचे हे दिवटे चिरंजीव जगतात तरी कशाला बुवा ! इब्राहीम आज तूं बराबाहेर बरा सांपडला आहेस. आज आतां आम्हीं तुला मुळीं सोडणार नाहीं. उमरशेखाप्रमाणेंच आम्हीही आज तुला काजीच्या कचेरींत खेंचून नेणार ! "

अपमानावर अपमान ! इब्राहीमचें अन्तःकरण क्रोधाग्नीनें नुसतें पेटूं लागलें. अग्नीच्या ज्वाला असह्य झाल्या. तो थरथर कांपूं लागला. तोंडून शब्द उमटेना. रक्ताच्या चिळकांड्या उडेपर्यंत त्यानें आपले ओंठ चावले. डोळ्यांतून आगीच्या ठिणग्या बाहेर पडत आहेत कीं काय असें वाटूं लागलें. दोन्ही हातांच्या आपोआप मुठी वळल्या गेल्या; पण भिकाऱ्याच्या

रागाला विचारतो कोण ! गरिबाला मान आणि अपमान कसला ? जी गोष्ट या ठिकाणीं तीन चार माणसांनाच समजत आहे ती, विशेष दंगा-धोपा झाल्यास सर्व शहरांत जाहीर होईल आणि लोकांना आपणच आपलें महाच्छिद्र उघडें केल्याचा दोष माथीं बसेल—' इब्राहीमनें अशा प्रकारचा विचार करून आपलें मन मोठ्या प्रयासानें आवरलें. इब्राहीम स्वभावतःच सहनशील होता. झालेला अपमान त्यानें मुकाट्यानें सहन केला. सभोंवार पाहिलें तों कोणीही नसल्याचें त्याला आढळून आलें. सैतान आपलें कार्य करून गेले; पण पेटलेली चिता तशीच धडाडून पेटत राहिली.

झालेल्या प्रकारापासून इब्राहीमच्या अन्तःकरणाला जबरदस्त धक्का बसला. तो ज्या उद्देशानें घरांतून बाहेर पडला होता तो आपला उद्देश त्याच्यानें तडीला नेववेना. उद्वेगानें व स्वतःच्या अनुकंपनीय स्थितीमुळें त्याचे डोळे अश्रूंनीं भरून आले. अर्थात अशा स्थितींत पुढें जाण्यापेक्षां मागें फिरणें चांगलें असें वाटून तो रस्त्याच्या कडेला असलेल्या एका झाडाखालीं जाऊन बसला.

त्यानें विचार करून पाहिलें, आपली गरिबी पाहून लोकांनीं पिटून लाविलेलीं शिवाय कुत्रींही आपल्यावर भुकत आहेत व लाथा हाणीत आहेत !—एका कालीं जे सगळे लोक आपलें दर्शन होतांच हात जोडून उभे राहात असत तेच आज उघड्या रस्त्यावर तोंडाला येतील ते शब्द बोलून अपमान करीत आहेत—हाय रे देवा ! अबूअयूब सारख्या नामदाराचा मुलगा इब्राहीम, दोन्ही हातांनीं लक्षावधी रुपयांची खैरात करणारा इब्राहीम आज इतक्या शोचनीय स्थितीला पोंचावा ना ! चंद्रसूर्यांचा प्रकाशही रुपयांच्या तेजामुळेंच जगभर पसरत नसेलना ?

वारंवार होणाऱ्या अपमानामुळें मनुष्य आपल्या जिवालाही कंटाळतो. इब्राहीमचेंहि तसेंच झालें. त्याचें अन्तःकरण झालेल्या अपमानामुळें तळमळूं लागलें. सगळें, विश्वब्रह्मांड आपल्या नेत्रांसमोर गरगर फिरत असल्याचा त्याला भास झाला. तसेंच सगळे ग्रहगोल आपल्या कक्षेतून सुटून चोहोंकडे विखुरले आहेत आणि आपण त्या वादळांत सांपडून भटकत आहों असेंहि त्याला वाटूं लागलें. त्यामुळें सगळ्या जगांत लवकरच महाप्रलय होईल, असें तो मनांत म्हणूं लागला.

सध्यां चालू असलेल्या आपल्या शोचनीय स्थितीचा विचार करतां करतां तो म्हणाला, " हाय ! हाय ! मीं माझ्या दलियेचें सांगणें कां बरें ऐकलें नाहीं ! आपलाच हट्ट कायम धरून इसाककडे पैशाची याचना करण्याकरितां कशाला बरें बाहेर पडून आलों. आज माझा जो तीव्र अपमान झाला आहे त्याची आठवण मला कधींहि विसरतां येणें शक्य नाहीं– "

या विचारांतच संध्याकाळ झाली, व इसाककडे जाण्याचा बेत रद्द करून इब्राहीम उदास मुद्रेनें व उद्विग्न अन्तःकरणानें घरीं आला. मधून मधून तो दीर्घ सुस्कारे सोडीत होता, व डोळेही लाल झालेले होते. तो एकाद्या आंधळयासारखा घरांत येऊन देहभान विसरलेल्या माणसाप्रमाणें खुर्चीवर पडला. जग हयात आहे कीं त्याचा अंत झाला आहे याची त्याला माहितीच नव्हती.

दालिया आपल्या मालकाची वाट पहात दारांतच उभी होती. चेहऱ्या-वरून अन्तःकरणाची परीक्षा झाली, व ती भ्याली. काय झालें तेंच तिला समजेना. तरी पण आपण यावेळीं कांहीं विचारतां नये असें ठरवून ती त्याच्या मागून खोलींत आली आणि जुनाट असलेल्या एका वाळ्याच्या पंख्यानें हळु हळु त्याला वारा घालूं लागली.

आपली परिचारिका कुशल आणि धोरणी आहे असें इब्राहीमला वाटलें व थोडासा आनंदही झाला. व तो अडखळत अडखळत तिला उद्देशून म्हणाला, " दालिये ! तुझें सांगणें न ऐकतां मी आज घराच्या बाहेर गेलों त्याचें मला चांगलेंच प्रायश्चित्त मिळालें. तूं दिलेली सावधपणाची सूचना अक्षरान् अक्षर खरी आहे. जे नीच लोक माझे पैजार पुसण्याच्याहि लाय-कीचे नाहींत त्यांनीं आज माझा उघड्या रस्त्यावर चार लोकांसमक्ष अप-मान करावा हें मला मरणापेक्षांहि जास्त नाहीं काय ? छे. छे. या अपमा-नाच्या तीव्र ज्वाला माझ्यानें मुळींच सहन करवत नाहींत. दालिये राग, पश्चात्ताप आणि अपमान यांच्या योगानें माझे प्राण जाऊं पहात आहेत. मला या सगळ्या गोष्टींचा सूड उगविल्यावांचून मरतांहि येत नाहीं. काय करूं ! ज्या मित्राच्या घरीं जाण्यासाठीं म्हणून मी बाहेर पडलों; त्याच्या-कडेहि मला जातां आलें नाहीं. मी गेलों तसाच अर्ध्या वाटेंतून माझें

फिरलों. माझ्या हृदयाला लागलेली अपमानाची आग कशानेंच शांत होई नाशी झाली आहे! हाय! दलिये! काय ग मी करूं! या यातनांतून मी कसा बरें मोकळा होईन ? ”

आपल्या प्रभूच्या तोंडचे ते दीनवाणे शब्द ऐकून दलियेच्या नेत्रांतून अश्रू वाहूं लागले. तिनें मनांतल्यामनांत उमरशेखला शेंकडों शाप दिले. नंतर ती त्याचें शांतवन करण्याच्या हेतूनें म्हणाली, “ ही तर जगाची रीतच आहे. तसेंच स्थित्यंतर होत जाणें हा संसाराचा धर्म आहे. रावाचा रंक आणि रंकाचा राव होणें हा या चालत्या दुनियेचा नियम आहे. दिवसा-मागून रात्र येते आणि अंधारानंतर प्रकाशाचा उदय होतो. निसर्गाचे हे सर्वसाधारण कायदेच आहेत म्हटलें तरी चालेल. याच नियमानुसार सुखामागून दु:ख आणि दु:खामागून सुख येत असतें. कुठेंहि कुणाला सन्मान मिळूं लागला कीं केव्हांना केव्हां तरी अपमान सहन करावा लागणार हें ठरलेंच. जो ऊर्जित अवस्थेला आला त्याची कधीं अवनति होणार हा मानवजीवनाचा सिद्धांत आहे. जगांत दर घडीला स्थित्यंतर होतच असतें. त्याबद्दल आश्चर्य, दु:ख अगर आनंद वाटूं देणें ही चूक आहे. आपल्या चालत्या काळांत सहनशीलपणाचें मोठेंसें कारण असतें असें नाहीं; पण जेव्हां पडता काळ येतो तेव्हां त्याचें क्षणोक्षणीं कारण आहेच. आपण समंजस आहां आणि आपण गुलिस्तान वाचलेलें आहे, तेव्हां मी ज्यास्त ते काय सांगणार! शिवाय माझा अधिकार तो केवढासा? मी तर एक सामान्य दासी आहे. आपल्यासारख्या महाज्ञानी मनुष्याला कोणत्याही प्रकारचा उपदेश करणें म्हणजे माझा तो उद्धटपणा आहे. तेव्हां मी विशेष कांहींच बोलत नाहीं. निष्ठापूर्ण अन्तःकरणानें आपण सर्वच खुदाची प्रार्थना करूंया म्हणजे तो या प्रसंगांतून पार पाडील. त्याला आमची कींव आल्यावांचून राहाणार नाहीं. सहनशीलता आणि समाधान या दोन शस्त्रांनीं दु:खाचा नाश करतां येतो. ”

दलियेच्या तोंडचीं सहानुभूतिपूर्ण स्वरानें उच्चारलेलीं व अन्तःकरणाला फोडून आलेलीं ज्ञानपूर्ण वाक्यें ऐकून इब्राहीमचा उदासीनपणा बराचसा कमी झाला. ईश्वरावर विश्वासून राहिल्यास आपणाला केवढ्याही मोठ्या संकटांतून पार पडतां येईल, असें त्यालाही वाटूं लागलें. सगळ्या प्रकारांनीं

आपल्या उपयोगीं पडण्यासाठीं जिवाभावानें झटणारी दालिया ही खात्रीनें कोणी तरी शापभ्रष्ट देवता असली पाहिजे, असें इब्राहीमचें अन्तःकरण त्याला सांगू लागलें; त्या बाबतींत तो तिला कांहीं विचारणार तोंच ती तेथून निघून गेल्याचें त्याला आढळून आलें.

---

# प्रकरण ७ वें.

—:*:—

## दया धरमका मूल है !

दालियेला तिच्यावर कोसळणाऱ्या भावी आपत्तीची बातमी देऊन आपण मोठें पुण्य संपादन केलें अशी स्वतःची प्रौढी मिरवीत जुलुसखान अगदीं आनंदित अन्तःकरणानें घरीं आला त्यानें मनांत म्हटलें " झालेल्या कारस्थानाचें सूत्र धरून आपणाला आतां पुष्कळशा बाहुल्या नाचवितां येतील आणि मग मोठी मौज उडेल. माझ्या धनिणीला जर दालियेसाठीं चाललेला हा तिच्या नवऱ्याचा आटोकाट प्रयत्न सांगितला तर तिच्याकडूनहि इनामा दाखल बरीच मोठी रक्कम मिळाल्यावांचून राहाणार नाहीं. विशेष कांहीं झालें नाहीं तरी दोघांचें कडाक्याचें भांडण तरी सुरू होईल व घराच्या आसपास चिट पांखरूंही फिरकूं शकणार नाहीं. ही तरी एक करमणूकच होईल कीं नाहीं ? माझे आवडते मालक मला लहानसहान कारणांनीं सुद्धां शिव्यागाळी देऊं लागतात, धमकावून मारायला धांवतात व थोड्याशा चुकांसाठीं एक दोन महिन्याचा पगारहि दंडा दाखल कापून घेतात; मग मीं त्यांच्यासाठीं एवढें सुद्धां करूं नये काय ? हा एक प्रकारचा सूडच आहे. शिवाय अशा प्रकारचा सूड उगविल्याबद्दल मला देवाचाहि बोल लागणार नाहीं. कारण यांत परोपकार आहे व नुकसान तर कुणाचेंहि नाहीं. शिवाय माझा फायदा होईल तो निराळाच."

अशा प्रकारच्या आनंदकारक विचारांत गढून गेल्यामुळें आपण घरांत केव्हां आलों हेंच त्याला समजलें नाहीं; पण दरवाजांत पाऊल ठेवतांच मालकिणीची मुलूख मैदान तोफ सामोरी आल्यामुळें त्याचे डोळे उघडले. शांकित बिबी कसल्याशा महत्त्वाच्या कामासाठीं बऱ्याच वेळापासून त्याला

हांका मारीत होती. पण तो घरीं हजर नसल्यामुळें अर्थातच तिच्या हांकेला प्रत्युत्तर मिळालें नाहीं, हें सांगायला नकोच. तोफ समोर आली व बारही पूर्णपणें भरलेला; मग गर्जना व्हायला कितीसा विलंब लागणार! जुलूसखानाची नुसती छाया दरवाजांत पडली न पडली तोंच ताकित बिबीनें आकाश पाताळ एक केलें. ती ओरडून म्हणाली, "कामचुकार तट्टूसारखा कुठें भटकायला गेला होतास? हरामखोर कुठचा! तीनत्रिकाळ खायला मात्र पाहिजे. काम करायला नको. अशी कुचराई करायची असेल तर चालता हो माझ्या घरांतून."

जुलुसखान अगदीं गरीबीनें हात जोडून म्हणाला, आई! रागावतां कां बरें? धनी साहेबांच्याच एका जरूरीच्या कामासाठीं मी गेलों होतोंना? तुम्ही अशा रागावला तर मीं कुणाच्या तोंडाकडे पहावें बरें? ताकीतबिबी पुन्हां गर्जिनल्या, "जसा सैतानी धनी तसाच तू लाळघोट्या चाकर आहेस. धनी साहेबांनीं कुणाच्या तरी घरादारावरून नांगर फिरविण्याची खटपट चालविली असेल!"

अगदीं बरोबर बोलल्यात आईसाहेब! यावेळीं दुसऱ्याबरोबर ते आई साहेबांचाही घात करण्याच्या विचारांत आहेत. बहुतेक तयारी झालीही आहे म्हटलें तरी चालेल. अगदीं सर्वस्वी घात!!"

आपल्या नोकराच्या तोंडचे ते शब्द ऐकून ताकित बिबी चाकित झाली आणि कांहींशी नरमाईच्या स्वरानें म्हणाली, "म्हणतोस तरी काय तूं? आहे काय प्रकार? सांग सांग-उघड करून सांग."

मालकिणीची नरमाई पहातांच जुलूसखानाला आकाश ठेंगणें झालें. तो मुद्दाम नम्रतेची मुद्रा धारण करून म्हणाला, "आईसाहेब, मला क्षमा करा. मीं चहाडखोर नाहीं, आणि धडावर शीर असेपर्यंत मी कधींही धनीसाहेबांचें गुपित फोडणार नाहीं. मी त्यांचें निमक खाल्लें आहे."

"कायरे लबाडा? मी तुझी मालकीण नव्हे वाटतें?" ताकित बिबी गुरगुरत म्हणाली.

कोणता गुलाम आपलें म्हणणें नाकबूल करीत आहे? पण झालेला प्रकार जर तुम्हांला सांगितला तर तुमचें अन्तःकरण अस्वस्थ होऊन जिवाला नसती काळजी लागेल. तरी पण ती सर्व हकीगत तुम्हांला सांगणें योग्य

आहे. कारण त्यामुळें साधल्यास बरीचशी आपत्ती टळण्यासारखी आहे. मालक कसे आहेत हें तुम्हीं जाणतच आहां ! माझ्याकडून या गोष्टीचा परिस्फोट झाला असें जर त्यांना समजलें तर माझ्या पाठीला कांहीं चामडी राहाणार नाहीं. " जुल्लुसखान घाबरल्यासारखें करून म्हणाला. कारण आपल्या हकीगतीला शक्य तितकें महत्त्व आणणें हें त्याचें कर्तव्य होतें.

" तू जर मला इतकें अगत्यपूर्वक सांगत आहेस तर मी त्यांना यांतील एक अक्षरही कळविणार नाहीं. मात्र झालेला सर्व प्रकार मला समजला पाहिजे. कारण तुझ्या या प्रस्तावनेनें मला ज्यास्तच उत्कंठा उत्पन्न झाली आहे. सांग पाहूं आतां ! " ताकित बिबी कांहींशा आर्जवानें म्हणाली.

" होत असलेला प्रकार जितका गुप्त तितकाच भयंकर आहे. आणि त्यांत तुमचा उठावा होणार आहे. त्या गुलामडीला मिळविण्यासाठीं मालकसाहेब फारच उतावीळ झाले आहेत "

" कोणती गुलामडी ? कुणाकडे असते ती ? " ताकित बिबी अत्यंत उत्सुकतेनें विचारती झाली.

इब्राहीमसाहेबांकडे असणारी सौंदर्यवती दासी दलिया. "

" बरोबर. त्या दिवशीं मला हीच कुणकूण समजल्यामुळें मी त्यांना बरीच बोललें व त्यामुळें अशा प्रकारचे धंदे न करण्याबद्दल त्यांनीं प्रतिज्ञाहि केली; पण पुन्हां त्यांची अक्कल चुलींत गेली असावी असें वाटतें. त्या गुलामडीला आणून राजाची राणी बनविणार आणि मला मोलकरणी-सारखी राबायला लावणार होय ? पाहूया तर मग. ती फुटक्या कपाळाची कारटी कशी येथें येते तें मी पाहातें. त्यांना माझ्यापेक्षां ती सैतानजादी ज्यास्त वाटली काय ? बरें जुल्लुस ! सांग पाहूं याबद्दल त्यांचा काय काय बेत झाला आहे तो. कांहीं शिलक ठेवूं नको. "

" सांगणार काय ! इब्राहीमचा सर्वस्वी घात केल्यावांचून दलिया आपणाला मिळणार नाहीं असें त्यांना वाटल्यामुळें त्याच्या उठावाची त्यांनीं तयारी चालविली आहे. आमच्या मालकांचे इब्राहीम साहेबांकडे अदमास चार पांच हजार रुपये येणें आहेत. आज जे त्यांनीं चारशें रुपये आणले

ते किरकोळ देण्यापैकीं ! तेव्हां या देण्याच्या पायीं त्याला त्रासवून व सर्व लोकांकडून अपमानित करवून आत्मघाताला प्रवृत्त करावा असा यांचा विचार दिसतो.

"तर मग आज चारशें रुपये त्याच्याकडून आणलेच म्हणायचे ? वा. वा. माझ्याकडे सगळीच लपवालपवी! मला सांगितलें तीनशें रुपये कर्जाऊ आणले आहेत ! आतां या घरांत मी यांना नकोशीच झालें असें वाटतें. नाहीं तर माझ्याकडे इतकें खोटें बोलण्याचें कारण काय ? मी या घरची कोणीच नव्हे ? मागूं नये; पण निर्लज्ज होऊन मीं दहा रुपये मागितले, तर त्यांनीं खोटें बोलून ते देण्याची टाळाटाळ करावी हें योग्य दिसतें काय ? माझा आतां येथें मुळींच अधिकार राहिला नाहीं तर !" बोलतां बोलतां ताकितबिबीनें लांब सूर काढून रडण्याला सुरवात केली. त्या रडण्यांतही तिचें बोलणें चाललेंच होतें. "बाबा आई ! मला या कृपण मनुष्याला पदरांत बांधतांना तुम्हीं कांहींच विचार केला नाहीं का ? तुम्हीं पैशांना भुललां, पण मी मात्र या पैशांच्या तेजांत जळून मेलें. मला याचा कांहीं उपयोग नाहीं. श्रीमंतांची श्रीमंती यांच्या गृहलक्ष्मींना ठार मारणारी असते."

जुल्फसखानाला हीहि एक मौजच वाटत होती; पण हा क्रंदनाध्याय ज्यास्त वाढल्यास मालकाच्या कानावर जाईल व मग आपला जीवही राहणार नाहीं अशी भीति वाटल्यामुळें तो घाबरून म्हणाला, " आई साहेब ही रडण्याची वेळ नव्हे. नंतर रडण्याला पुष्कळ वेळ मिळेल. आधी झालेला प्रकार आपण ऐका. आसगर अल्लीशीं मालकांचा ठराव झाला आहे कीं कितीही रुपये लागले तरी हरकत नाहीं; पण त्या दासीला आपलीशी करणें हें पहिलें कर्तव्य केलेंच पाहिजे. आई! त्या दासीसाठीं उमरसाहेब अगदीं वेडे बनले आहेत. इब्राहिम तर आपल्या प्याऱ्या दलियेला सोडायला मुळींच तयार नाहीं. अर्थातच त्याला प्रसंगांत पकडून व त्याच्यावर नसत्या विपत्तीचा वर्षाव करून बळजबरीनें त्या बिचारीला आपलीशी करण्याचा या दोघांनीं विचार चालविला आहे. आसगर अल्लीचा कानमंत्र तरी ऐका, इब्राहीमच्या दोन बागा मालकांजवळ पांच हजारांना गहाण आहेत. व या गहाणाची अद्याप मुदत भरलेली नाहीं. त्यासाठीं एक हजार रुपये काजीला लांच देऊन मुदतीच्या आंत फैसला मिळवावयाचा

व इब्राहीमला घरावेगळा करून देशोधडीला लावावयाचा. या व्यवहारांत इब्राहीमची सगळी इष्टेट खलास होऊन शिवाय इतर फेडीसाठीं दलियेची विक्री होणार. व उमरसाहेब ज्यास्त रकमेला तो सौदा ठरवून दलियेचें खरिददार बनणार. अर्थात आपल्या उरावर ती धोंड आणून ठेवायला आतां साहेबांना मुळींच विलंब नाहीं हें मी सांगायला नकोच. तेव्हां आतां असें रडत बसून काय उपयोग? कदाचित् कायमचीच रडण्याची वेळ यायची!"

आपल्या नोकराचें तें भाषण ऐकून ताकितबिबी तर थक्कच होऊन गेली. दलियेसारखी सौंदर्यलतिका घरांत आल्यास आपणाला येथें भीकही मिळणार नाहीं हें तिला कळून चुकलें. उच्च वंशांतील अमीर उमरावही योग्य धार्मिक विधीनें दासीशीं विवाहित होऊं शकतात हें तिला माहीत होतें. तेव्हां इथेंहि जर तसाच प्रकार झाला आणि आपल्या नवऱ्यानें गुप्तपणानें दलियेशीं विवाह करून व तिला दुसऱ्याच एखाद्या एकीकडच्या जागीं ठेवून आपणही तिकडेच राहाण्याचें ठरविलें तर आपली मोठी भयंकर स्थिति होईल हें समजायला तिला वेळ लागला नाहीं. झुलसखानानें सांगितलेलें कठोर सत्य विचार करण्यासारखें आहे अशी तिची खात्री झाली.

विचार करतां करतां ताकितबिबीचा राग पार नाहींसा झाला व तिला एक प्रकारची भीति वाटूं लागली. तिचा चेहरा अगदीं खिन्न झाला. चतुर झुलसखानाला वातावरण बदलल्याचें पूर्णपणें कळून चुकलें. त्याला आनंद झाला; पण तसें बाहेर कांहींच न दाखवितां तो म्हणाला,

"आईसाहेब! आपल्या मनांत काय विचार चालले आहेत तें मला समजलें."

"सांग पाहूं. गुलामा तूं अगदीं तोंडपुजा आहेस, तुला काय समजलें रे?"

"तुमच्या मनांत या वेळीं असा विचार आला आहे, धनी साहेबांनीं जर त्या गुलामडीला घरांत आणलें तर आपणाला इथून निघून जावें लागेल. आणि मग आपणाला कोणी विचारणारही नाहीं. 'असेंच ना?'

"खरेंच रे खरेंच. तूं माझ्या मनांतलें सांगितलेंस." ताकितबिबी किंचित् हसून म्हणाली.

"आईसाहेब! हा देह आपल्या अन्नावर पोसला आहे. मी निमक हराम केव्हांहि होणार नाहीं. मी अन्नाला जागेन आणि योग्य तेंच करीन. धनीसाहेबांचा एकही गोड शब्द मीं कधीं ऐकला नाहीं; पण आपण मधुर शब्दानें माझें सांत्वन केलें आहे. मी एकट्या धनिसाहेबांच्याच हातांत असतों तर कधींच स्वर्गाची वाट धरली असती; पण आपल्यामुळें माझ्यावर तो प्रसंग आला नाहीं. इतकेंच नव्हे तर माझी नोकरीही कायम राहिली. आईसाहेब! आपण अगदीं निश्चित राहा. दलियेला मी चांगलीच ओळखतों. ती दासी नसून शापभ्रष्ट देवी आहे. कालाच्या प्रतिकूलतेमुळें तिला दुसऱ्याची सेवा करण्याची पाळी आली. तिचें सौंदर्य आणि अन्तःकरण राजराजेश्वरीला शोभण्यासारखें आहे. इब्राहीम तिच्यावर भक्तियुक्त प्रेम करतों. त्याच्या बापानें मरतेवेळीं दलियेला तिच्या दासीपणांतून मुक्त केलें आहे असेंहि मी ऐकतों. अर्थात इब्राहीम कोणत्याही प्रकारें तिला विकूं शकणार नाहीं व उमरसाहेबांनाही कर्जाच्या मोबदल्यांत तिचा सौदा ठरविणें अशक्य आहे. तसा कायदा नाहीं. कदाचित् लांचलुचपतीनें कायद्याची ढिलाई करून काजीकडून त्यांनीं तशी मान्यता मिळविली तरीहि दलिया कोणाची कधीं दासी होणार नाहीं. ती स्वतंत्रच राहील. तिचें बोलणें इतकें लीनपणाचें व गोड आहे कीं शत्रुहि तिला त्रास देऊं शकणार नाहीं आणि उमरसाहेबांसारख्या माणसाशीं तर तिचा तो उदात्त स्वभाव कधींच एक होणार नाहीं. आपण अगदीं घाबरूं नये. मी खुदाच्या नांवानें शपथ वाहून सांगतों, ज्या योगानें आपलें अनिष्ट होईल असें कोणतेंही काम मी होऊं देणार नाहीं. आपण माझ्यावर पूर्ण विश्वास ठेवावा. मात्र आपण या विषयावर धनी साहेबांशीं भांडून जर हें सगळें रहस्य त्यांना सांगाल तर भलतेंच होऊन बसेल. आणि मला कांहींच करतां येणार नाहीं. उलट ते मलाच घालवून देतील. आणि तसें झालें म्हणजे त्यांच्या गुप्त कारस्थानाचा तुम्हांला कांहींच सुगावा लागणार नाहीं. यासाठीं थोडे दिवस सर्व कांहीं सहन करा. थोडेंसें जरी मला नवीन कांहीं समजलें तरी मी तावडतोब तें आपणाला कळवीन. मुळींच दिरंगाई करणार नाहीं. तेव्हां या बाबतींत आपण हूं कीं चूं न करतां माझ्या सल्लामसलतीवर विश्वासून राहाल अशाबद्दल अल्लाची शपथ घ्या. आपलें अन्तःकरण एकदा का

शपथेनें बांधले गेले म्हणजे तोंडांतून शब्दच उमटणार नाहीं. उमरसाहेब पुरेपुरे आपल्या हातांत आल्यावांचून जर आपलें कारस्थान फुटल्याचें त्यांना समजलें तर तें एकदम सगळें कांहीं नाकबूल करून बसतील आणि कशाचाच सुगावा लागूं देणार नाहींत. आपल्या सगळ्या प्रयत्नाची ते निराळीच दिशा ठरवितील. आणि माझी मात्र जन्माची भाकर नाहींशी होईल."

ताकितबिबी भांडखोर होती तरी बुद्धीनें कमी नव्हती. तिला आपलें हिताहित समजत होतें. जुल्सखानाच्या सांगण्याचा तिनें थोडा वेळ मनांतल्या मनांत विचार केला आणि गंभीरपणानें म्हटलें, 'जुल्स तूं जें सांगितलेंस तेंच खरें. त्यांचा स्वभाव कसा आहे तें मी जाणतें. तेव्हां आतां यापुढें तुझ्या योजनेप्रमाणेंच चालण्याचें मीं ठरविलें आहे. मीं तुला इतके दिवस पुष्कळ त्रास दिला आहे; पण आतां माझ्या मुलाप्रमाणें मी तुला मानीन. झाल्यागेल्या गोष्टीबद्दल तूं विषाद मानूं नको. तुझ्या मालकासमोर मी तुला पूर्वीप्रमाणेंच टाकून बोलेन, पण त्याबद्दल तूं मनांत कांहीं आणूं नको. कारण तसें मीं केलें नाहीं तर कांहीं तरी भलताच संशय येईल आणि ते तुझ्यावर नजर ठेवतील. आजपासून जेवणखाणासंबंधाचे तुझे अगदीं हाल होणार नाहींत. आज तूं जें हें माझें अगत्यपूर्वक काम केलेंस व आपली सत्यनिष्ठा दाखविलीस त्याबद्दल मी तुला दोन रुपये बक्षीस देतें. थोडा वेळ इथेंच उभा राहा." असें म्हणून ताकितबिबी आपल्या खोलींत निघून गेली.

जुल्सखान मनांत म्हणतो. "आजचा दिवस मला फारच चांगला गेला. आज मी सकाळींच कुणा महात्म्याचें तोंड पाहिलें होतें माहीत नाहीं. जी मालकीण एक दिवसही माझ्याशीं कधीं गोड बोलली नाहीं, तीच आज मला बक्षिस द्यायला तयार झाली, केवढें हें आश्चर्य ! मालकावर कांहीं तरी संकट यावें अगर त्याचें अनिष्ट व्हावें असें कांहीं माझ्या मनांत नाहीं; मात्र ते दुसऱ्याचा जो सर्वस्वी घात करूं पहात आहेत, त्याला अडथळा व्हावा एवढेंच मी इच्छितों. यांत वास्तविक त्याचें कल्याणच आहे. अर्थात असें करण्यांत धर्माच्या दृष्टीनें मी मुळींच अपराधी ठरत नाहीं."

जुल्स अशा प्रकारें आपल्याच विचारांत गुंग होऊन गेला आहे इतक्यांत ताकितबिबी तेथें आली आणि दोन रुपये त्याच्या हातावर ठेवून म्हणाली,

" यापुढें डोळे आणि कान चांगलेच उघडे ठेवून काम करीत जा. माझें कोणत्याही प्रकारें नुकसान होऊं नये इकडे तुझें लक्ष असूं दे. "

जुल्सनें उत्तर दिलें, " आईसाहेब ! त्या बाबतींत आपण अगदीं निश्चिंत राहा. आतांच मला ज्यास्त कांहीं सांगतां येत नाहीं, आणि अशा प्रकारें बोलत उभें राहाणेंहि योग्य नाहीं. कारण धनीसाहेबांची घरीं येण्याची वेळ झाली आहे. मला वाटतें ठरलेली रक्कम घेऊन ते ती आसगर अलीकडे देण्यासाठीं गेले असावेत. तेव्हां ते लवकर येतील. मी माझ्या कामाला जातों. आपणही आपल्या कामांत गढून गेल्यासारखें दाखवावें. मनाला शांत ठेवा, नाहीं तर बोलतां बोलतां बेसावधपणानें खरा प्रकार उघडकीला यायचा. यासाठीं भांडण तंटा वगैरे कांहीं करूं नका. "

" जुल्स ! त्या बाबतींत तूं निश्चिंत राहा. तूं समजतोस तितकी मी भांडखोर नाहीं. पण या राजश्रींनीं मला तशी बनविली त्याला मी काय करूं ? जाऊं द्या. यापुढें मी त्यांच्याशीं मुळींच झगडा करीत नाहीं तूं अगदीं काळजी करूं नको. " ताकित बिबी शांतपणानें म्हणाली.

इतकें झाल्यावर तो इमानी आणि धर्मभीरू नोकर बाहेर आला आणि आपलें झाडलोटीचें व साफसफाईचें काम करण्यांत गढून गेला. थोड्याच वेळांत उमरशेख घरीं आला; पण नोकर कामांत गढून गेलेला पाहून त्यानें त्याच्याकडे कोणत्याही प्रकारची विचारपूस केली नाहीं.

---

# प्रकरण ८ वें.

—:※:—

## पैसा आणि सुख चिरस्थायी मानूं नये.

इतके दिवसांत किती तरी संकटें इब्राहीमवर येऊन गेलीं होतीं, पण तो अजूनपर्यंत थोडा सुद्धां भ्याला नव्हता. आतां मात्र त्याचें अन्तःकरण अस्वस्थ होऊं लागलें. कारण उमरशेख स्वतः आणि दुसऱ्यांकडून त्याचा छळ करण्याची कसून तयारी करूं लागला. विशेषतः दालियेला आपल्या

हातून काढून घेण्याच्या खटपटींत त्याला यश येईल असें दिसूं लागलें. अर्थात इब्राहीमला काळजी वाटूं लागली व त्याचे दैनंदिन व्यापारही बंद पडले.

आज तो निस्तब्ध असलेल्या एका खोलींतील बिछान्यावर पडून मनांतल्या मनांत विचार करीत होता. " ही दालिया कोण असेल बरें ? हिचा वियोग होईल या नुसत्या कल्पनेनेंच मला इतकें विलक्षण दुःख व्हावें आणि मनाचा चंचलपणा वाढावा याचें कारण काय ? माझ्या हृदयाचे बोल जर कुणी ऐकेल तर दालिया हीच माझें जीवनसर्वस्व आहे असें त्याला कळून येईल. कारण तिला पहातांच माझे सगळे श्रम आणि दुःख नाहींशीं होतात. माझ्यावर इतकीं संकटें कोसळलीं आहेत आणि मी भयंकर प्रसंगांत सांपडलों आहें, तरी पण दालिया माझ्याजवळ येऊन उभी राहिली व दोन शब्द बोलली कीं मी सगळें कांहीं विसरून जातों. माझ्या अन्तःकरणाची आराध्य देवता कोणी असेल तर ती दलियाच होय. आणि हिच्यासाठींच, मीं अद्याप लग्नही केलें नाहीं.

मला वाटतें ही दलिया कोणत्या तरी उच्च कुलांत उत्पन्न झाली असली पाहिजे. तिची ती भुवनमोहिनी मूर्ती मला पावलोपावलीं सुचवीत आहे कीं, हिचा वंश जगद्विख्यात असावा. ही कुलकुमारिका असली पाहिजे; पण तिच्या श्रेष्ठ वंशमर्यादेची प्रत्यक्ष निशाणी अशी कांहींच आढळत नाहीं. एका काश्मिरी सौदागराकडून ही विकत घेतली एवढेंच हिच्याबद्दल मला माझ्या वडलांकडून समजलें आहे. त्यावेळीं ही अगदीं लहान होती. तिचा विचार करण्यासारखा असा कांहींच इतिहास नाहीं. पण ती कोणी का असेना, माझें जीवनसर्वस्व तीच आहे एवढें मात्र खरें. माझ्या अंधकारमय आयुष्यांतील खरा प्रकाश, रुग्णावस्थेंतील दिव्य औषध, सेवाचतुर परिचारिका, शोकाचें सांत्वन आणि संकटांतील खरा मित्र जर कोणी असेल तर हीच माझी दलिया होय. जर मला कधीं विवाह करावासा वाटला तर मी हिलाच आपली पत्नी करीन. जर माझ्या हृदयसिंहासनावर विराजमान होण्याला कोणी लायक असेल तर हीच शापभ्रष्ट देवता दलिया होय.

" खुदानें तिला केवळ श्रेष्ठ सौंदर्यलतिका केलें आहे इतकेंच नाहीं,

तर ती आपल्या अन्तःकरणाच्या उदात्त भावनेनें सर्वांचा पराभव करण्याला समर्थ आहे. तिच्या समोर सर्वांनाच पराजित व्हावें लागेल. माझ्या बापानें मरतेवेळीं तिला दोन हजार मोहोरा दिल्या होत्या व मींही अगदीं गुप्त-पणानें म्हणून तिला पांचशें मोहोरा बक्षिस दिल्या होत्या; पण आज पंधरा वर्षें ती अगदीं एकनिष्ठपणानें व निमक हलाल होऊन या घराण्याची सेवा-चाकरी बजावीत आहे. माझ्या वडलांकडून प्रत्येक महिन्याला जो तिला पगार म्हणून मिळे तो तिनें सांठवून ठेवला असला पाहिजे यांत संशय नाहीं. कारण, तसें नसतें तर आज तीन चार महिने माझ्याजवळ एक कव-डीही नसतां रोजचे व्यवहार तिनें कसे चालविले आहेत ? या कित्येक महिन्यांत संसाराच्या खर्चासाठीं माझ्याकडून तिला एक पैही मिळाली नाहीं.

या दुःख संकटांच्या वेळींहि माझ्या जेवणाखाणांत व इतर परिचर्येत तिच्याकडून एवढी सुद्धां चूक होत नाहीं. जें जें कांहीं माझ्या जिभेला गोड लागेल व ज्या योगानें मला समाधान वाटेल तें ती ताबडतोब माझ्या पुढें हजर करते. सुखा समाधानाच्या दिवसांत व चालत्या काळांत मला जें जेवणखाण मिळत होतें तेंच आतांहि मिळत आहे. मी मनांतल्या मनांत सर्व कांहीं समजतों; पण तोंड उघडून तिच्या समोर माझ्यानें कांहींच बोलवत नाहीं. ती जें करते त्याचा निषेध करतां येत नाहीं, कारण तिला त्यापासून वाईट वाटेल. तरी पण मीं माझ्या मनाशीं असें ठरविलें आहे कीं दालियेकडून माझ्यासाठीं खर्च होणारें हें द्रव्य मी दान म्हणून न घेतां कर्ज म्हणून घेणार ! जेव्हां त्याची फेड होईल तेव्हां होईल. माझ्या-कडून या कर्जाची फेड होईल कीं नाहीं कुणाला माहीत ! त्या करुणामय परमेश्वरानें जर मला चांगले दिवस दाखविले तर मी तिचा पैनपैहिशोब चुकता करीन. कारण कठिणतर प्रसंगांतील या दयेच्या ऋणाची फेड करणें भाग आहे.

" त्यानंतर त्या दिवशींच्या त्या अद्भुत प्रकारची गोष्ट. दालियेनें त्या दिवशीं मला जर तसें सहाय्य केलें नसतें तर सैतानी अन्तःकरणाच्या उमरशेखानें त्या काजीच्या शिपायांकडून माझी हवी तितकी मानखंडना करून मला तुरुंगांत नेऊन टाकलें असतें. दालियेनें त्या प्रसंगीं माझ्यावर जे उपकार करून ठेवले आहेत त्यांना तुलना नाहीं.

" पण मीं दलियेची जशी रात्रंदिवस जपमाळ घेतली आहे व तिच्याच चिंतनांत गढून जाऊन तिच्यावर प्राणापेक्षांहि ज्यास्त प्रेम करीत आहे तशी ती माझ्यावर प्रेम करीत असेल काय ? कित्येकदां तरी मीं या बाबतींत तिला अनेक प्रश्न विचारले आहेत; पण तिच्याकडून मला माझ्या मनासारखें असें कांहींच उत्तर मिळालेलें नाहीं. ती फक्त एवढेंच म्हणते, कीं, ' आपली सेवाचाकरी करणें हेंच माझें खरें सुख. आपलें समाधान हाच माझा खरा आनंद, आपला सुन्दर चेहेरा हास्यप्रफुल्ल दिसला कीं मला सुख वाटलें. मला या बाबतींत आपण आतां कांहींहि विचारूं नये. कारण त्यामुळें माझ्या मनाला मोठी लाज वाटते. ' असें जरी मला तिनें उत्तर दिलें तरी तिची एकंदर स्थिती बोलतांना तिचे हावभाव, मनाचें परिवर्तन आणि माझी सेवा करतांना तिची दिसून येणारी तत्परता ही पाहून मला वाटतें कीं माझ्यावर तिचें गाढ प्रेम असलें पाहिजे. प्रेमावाचून असें होणें शक्य नाहीं. जर मला चांगले दिवस आले तर मी तिची जी इच्छा असेल ती पूर्ण करीन. तिला योग्य मोबदला दिल्यावांचून मला मुळींच समाधान वाटणार नाहीं. पण हाय ! खुदाताला मला पुन्हां चांगले दिवस दाखवील काय ?

" पण दलियेनें मला काल ज्या गोष्टी सांगितल्या त्या ऐकून तर माझ्या रक्ताचें पाणीच झालें. माझ्या दोन्ही बागा पांच हजार असर्फींना त्या सैतानाकडे गहाण आहेत; पण तिच्या सांगण्यावरून व मला आलेल्या अनुभवावरून, उमरशेख, काजीला लांच देऊन माझ्या विरुद्ध हुकूमनामा मिळविणार यांत शंका वाटत नाहीं. व तसा त्याला हुकूम मिळतांच मला रस्त्यावरही उभें राहायला जागा मिळणार नाहीं. शिवाय काजीच्या शिपायांकडून सर्वां समक्ष माझा अपमान होईल तो निराळाच. कारण एवढी मोठी रक्कम एकदम काजीसमोर नेऊन मांडणें शक्यच नाहीं. शिवाय या मोठ्या रकमेंत व व्याजांत तो दलियेलाहि आपल्या ताब्यांत घेऊन बसेल. माझ्या बापानें तिला दासीपणांतून मुक्त केलें आहे. पण या गोष्टीला मी व दलिया या दोघांवांचून दुसरा कोणीच साक्षिदार नाहीं. व तसा एकादा लेखहि नाहीं. तेव्हां ही माझ्या इष्टेटींत धरूं नये असें मी कोणत्या तोंडानें सांगूं ? मी झालेली खरी गोष्ट जरी कितीहि अट्टाहास-

पूर्वक सांगितली तरी काजीच्या शिपायांना ती मुळींच खरी वाटणार नाहीं. कारण कागदी पुरावा व साक्षिदार नसले तर खरी गोष्टही खोटी ठरूं शकते.

" रुपयांसाठीं सगळेच सावकार लोक कमालीचा तगादा करतात; पण या निष्ठुर जगाकडून कुणालाही कधीं एका पैशाचें सहाय्य झालें नाहीं. मग मलाच जगाच्या प्रसन्नतेचा लाभ होणार कसा ? मी माझ्या चांगल्या काळांत पाण्यासारखा पैसा उधळला व बऱ्याच लोकांना मिष्टान्नें चारलीं; पण आज त्यापैकीं एकानें तरी मला नुसत्या एका शब्दानें सहानुभूति दाखवायची होती ! हाय ! हें जगच असें हरामखोर आहे काय ? त्या दिवशीं इसाकला मी हें सगळें कळविलें होतें. आणि तो गांवीं असता तर मला भरपूर सहाय्यहि झालें असतें; पण माझ्या दुर्दैवानें तो सध्यां अहमदाबाद येथें गेला असल्यामुळें त्याचा मला कांहींच उपयोग होण्यासारखा नाहीं. मग आतां कुणाकडे बरें पैशाची भिक्षा मागायला जाऊं ? या आपत्तीच्या वेळीं मला कोण सहाय्य करील ?

" अर्धीकर्ज त्यानंतर अपमान बुद्धिमांद्य आणि शेवट कारागार ! मी अबू अयूब सारख्या प्रख्यात सावकाराचा मुलगा ! कांहीं महिन्यांपूर्वी प्रत्येक मनुष्य माझ्या पुढें आपलें मस्तक नमवीत होता. माझी भेट घेण्यासाठीं दारासमोर किती तरी लोक तिष्ठित उभे राहात होते, पण आज मला पाहतांत तिरस्कारानें लोक आपली तोंडें फिरवित. जे सुखाचे पारवे रात्रंदिवस माझ्या सभोंवार मला वेढून बसून ' जनाब, मेहेरबान ' इत्यादि श्रुतिसुखकर स्तुति वाक्यांनीं माझी मर्यादा वाढवीत होते तेच आज माझा काळ फिरतांच मला सोडुन गेले. रंगभूमीवरील उज्ज्वळ प्रकाश नाहींसा झाला. आणि आतां मी भयंकर अंधारांत उभा आहे. आतां मला पश्चात्ताप होत आहे आणि मृत्यू हाच माझा अखेरचा सखा जिवा असल्याचें मला उघड दिसत आहे. त्याच्यावांचून आतां माझा तरणोपाय नाहीं.

" हां. आतां मला आठवण झाली. माझा बाप मला एकेवेळीं म्हणाला होता, ' बाळ, पैसा आणि सुख चिरस्थाई मानूं नये. कारण तें कायमचें असें कुणालाच लाभत नाहीं. मी तुझ्यासाठीं जें हें कुबेराचें भांडार ठेवून जात आहे तें तूं रीतसर खर्च केल्यास व आपली मानमर्यादा ठेवून चाल-

त्यास तें तुला दगा देणार नाहीं. आतां उधळेपणानें खर्च केल्यास काय होईल तें मी सांगायला नकोच. जर कधीं तुला तशी स्थिती आली आणि तूं भिकारी झालास तर माझ्या खिडकीसमोर उद्यानांत जो मोठा आम्रवृक्ष आहे त्याच्या सर्वांत मोठ्या खांद्याला दोरी बांधून गळफास घे; पण दुसऱ्याच्या दाराशीं हात पसरून आपल्या घराण्याची अब्रू घालवूं नको.' तसाच प्रसंग आल्यास वडलांची ही आज्ञा मी बरोबर पाळीन. एका अक्षराचीही त्यांत कसूर करणार नाहीं. अद्याप ती वेळ आली नाहीं; पण तो दिवस उगवेल असें वाटतें. व आत्महत्त्या हीच माझ्या सगळया यातनांचा संहार करणारी स्वर्गीय देवता ठरेल—"

यावेळीं बरीच रात्र झाली होती. कृष्णपक्षांतील काल रात्री असल्यामुळें सगळें जग घोर अंधकारांत बुडून गेलें होतें. चोहोंकडे विलक्षण निस्तब्धता पसरली होती; पण इब्राहीमला मुळींच झोंप येईना. तो निरनिराळ्या प्रकारच्या दु:खद विचारांत गढून जाऊन बिछान्यावर तळमळत पडला होता. अन्त:करणांतील तीव्र वेदना त्याला सहन होत नसून बिछानाही कंटक पूर्ण आहे असें वाटत होतें. आपल्या बिछान्यावर कुणीतरी आगीचे कण पसरले असावेत असेंहि त्याला एकवार वाटलें. तेव्हां आतां झोंपणें योग्य नाहीं असें ठरवून तो एका उघड्या खिडकीजवळ आला. नजीकच असलेल्या एका हिंदु मंदिरांतील पहारेवाल्यानें मध्यरात्र पुरी झाल्याची इषारत दिलेलीही त्याला ऐकूं आली.

प्रकृती देवीचें निशाकालीन सौंदर्य पाहून इब्राहीमला यापूर्वीं किती तरी आनंद होत असे; पण आज त्याला तें सगळें विषवत् वाटूं लागलें. मनाला आनंद व्हायचा बाजूलाच राहून उदासपणा वाटूं लागला. निळसर आकाशाच्या सर्वांगावर असंख्य तारका चमकत होत्या; पण त्या सगळया तारका त्याला निष्प्रभ वाटूं लागल्या. गारेचे खडेच कोणी तरी चिकटविले असावे असें वाटलें, अंधकारानें झाकून गेलेल्या श्यामलक सुंदरेच्या सर्वांगावरून वाहणारा स्निग्ध आणि सुशीतल मन्द समीरणही त्याच्या अन्त:करणाचा दाह शांत करीना त्याला ते सगळे उपभोग असमाधानकारक वाटूं लागले. रुक्ष प्रदेशांतील तप्तज्वाला आपणाला भाजीत आहेत कीं काय असें त्याला वाटलें.

त्या खोलीत दिवा तेवत होता. खिडकींतून येणाऱ्या मृदुमन्द मलयानिलाच्या झुळकी सरशी त्याची ज्योत चंचल होत होती. इब्राहीमनें अतीशय दीन मुद्रेनें व खिन्न नेत्रांनीं आपल्या किंचित् उष्ण असलेल्या सुंदर बिछान्याकडे पाहिलें, पण त्याच्यानें झोंपण्याचें साहस करवेना. मागील सगळ्या आठवणी होऊन त्याला विलक्षण गहिंवर आला.

याच वेळीं त्याचा विश्वासू नोकर मुबारक हळूच आंत येऊन आपल्या मालकाकडे सहानुभूतीच्या स्वरानें पहात हळूच म्हणाला. " हुजूर ! आपणाला अजूनही झोंप आली नाहीं. काय बरें हें असें ! अशानें आपण आजारी नाहीं का पडणार ? "

" मुबारक ! भयंकर चिंतेनें ज्याचें अन्तःकरण तळमळत आहे त्याला झोंप कशी येणार ! संपली माझी झोंप ! " बोलतां बोलतां आपल्या शोचनीय स्थितीच्या कल्पनेनें इब्राहीमच्या नेत्रांत अश्रू आले.

मुबारकालाही वाईट वाटलें. तो सद्‌गदीत होऊन नम्रपणानें म्हणाला, " जनाब ! माझ्या उद्धटपणाची क्षमा असावी. आत्मसंयमन करून काळजीचें निवारण करण्याची खटपट करा. चिंताही भयंकर दावानलाप्रमाणें मनुष्याला जाळून टाकणारी आहे. तिला वाढूं दिल्यास सर्वस्वाचा नाश होईल. "

" पण मुबारक ! आतां माझें काय शिल्लक राहिलें आहे ? जें व्हायचें तें होऊन गेलें. कुणाला कांहीं सुखाचा आधार असतो, आशेला जागा असते; पण माझें कांहीं नाहीं मुबारक ! घर दार, आप्त इष्ट, पैसा अडका सर्व कांहीं नाहींसें झालें आणि आतां भर रस्त्यावर अपमानाच्या चितेंत जळून जाण्याचा प्रसंग आला आहे ! माझें हें दुःख नाहींसें होण्यासारखें नाहीं; पण मुबारक ! तूं यावेळीं माझें एक काम करूं. शकशील ? "

" काय करूं साहेब ! वारा घालूं का ? " मुबारक कळवळून म्हणाला. त्याचेहि नेत्र कोरडे नव्हते.

इब्राहीम निराशापूर्ण अन्तःकरणानें हंसला आणि दीर्घ सुस्कारा सोडून म्हणाला. " नको. तसले कोणतेहि उपचार मला आतां मानवणार नाहींत; पण कुठून तरी चांगलीशी शिराजी जर आणून देशील तर पहा. देतां येईल का ? शिराजीसारखें उग्र मद्यपान केल्यावांचून मला स्वस्थता वाटणार नाहीं.

माझ्या अन्तःकरणाच्या ज्वाला दुसऱ्या कशानेंहि शांत होणार नाहींत. माझी ही तळमळ वाढत जाईल ! निष्ठुरतेनें झोंप मला सोडून गेली आहे, ती उत्कृष्ट शिराजीवांचून माझ्या स्वाधीन होणार नाहीं. हाय ! मुबारक ! यःकश्चित् शिराजीच्या एका पेल्यासाठीं याचना करण्याचा प्रसंग यावाना. ''

" पण जनाब ! या मद्यापानाची दुर्बुद्धि आपणाला कां आठवली बरें ? या शिराजी मद्याच्या राक्षसी लीलेनेंच या अवस्थेला आपण पोंचलां ना ? "

" होय; पण आज मी या बाबतींत हें शेवटचेंच पाप करणार. मी आज शेवटचा एकच पेला तोंडाला लावणार. नाहीं तर चार घटकांनीं येणारें मरण मी आतांच आपल्यावर ओढून घेतल्यासारखें होईल. अन्तःकरणाच्या तीव्र यातना नाहींशा करण्याला मद्यासारखें दुसरें औषध नाहीं. माझी ही शेवटची आज्ञारूपी प्रार्थना तूं अमान्य करूं नको. तूं स्वामिभक्त आहेस. तेव्हां यावेळीं अवज्ञा करून आपल्या मिळविलेल्या कीर्तीला कलंक लावूं नको. तुला पश्चात्ताप होईल पाहिजे तेथें जा. दारोदार भिक्षा झाली तरी माग; पण एक पेलाभर तरी उत्कृष्ट शिराजी मद्य मला आणून दे " इब्राहीम अगदीं दीन स्वरानें बोलत होता.

मुबारकाचेंहि अन्तःकरण द्रवलें. उपदेशाची अथवा मनोनिग्रह करण्याची वेळ टळून गेली आहे हें त्याला कळून चुकलें. तो म्हणाला,"साहेब ! शिवराजीसाठीं भिक्षा मागण्याचें कारण नाहीं. आपण रोजच्या खर्चासाठीं म्हणून जी उत्कृष्ट शिराजी माझ्याजवळ देत होतां त्यांतून मी थोडथोडी रोज शिल्लक ठेवीत असें. वेळीं अवेळीं आपल्यालाच उपयोग होईल असें मला वाटलें होतें. कारण भलत्याच वेळीं बाजारांतही उत्कृष्ट मद्य मिळत नसतें म्हणून मीं ती ठेवून दिली होती. आतां तिचाच आपल्याला उपयोग करतां येईल."

असें म्हणून मुबारक घाईघाईनें जिना उतरूं लागला. तो गेल्यानंतर इब्राहिम मनांत म्हणाला, "पाहूं गेलें असतां अजूनहि मी भाग्यवान आहें. आईबाप पत्नी मुलगा कोणी नाहीं; पण माझ्या सुदैवानें मला परिचारक फारच चांगला मिळाला आहे परिचारिकाही त्याच्याच तोडीची. दोघेही निस्वार्थीपणानें माझी सेवा शुश्रूषा करीत आहेत. यांचें

हें कर्ज मी माझ्या आयुष्यांत कधीं तरी फेडूं शकेन का ? या स्वार्थी जगांत असली हीं निस्वार्थी माणसें मिळणें म्हणजे ईश्वराची दयाच नाहीं काय?"

याच वेळीं मुबारक पूर्ण भरलेलें मद्यपात्र घेऊन आंत आला. इब्राहिमनेंही पुष्कळ दिवसांनीं आलेलें व रक्ताम्बुतुल्य अमृतानें भरलेलें सुरापात्र हातांत घेतलें. त्याला पराकाष्ठेचा आनंद झाला. व तो हर्षामर्षयुक्त होऊन म्हणाला, " जीवनाला संतोष देणाऱ्या मदिरे, तूं आनंदमयी आहेस. तुझ्या सेवकाला तूं केव्हांहि दुःखांत ठेवीत नाहींस. तूं चिंतानिवारिणी देवी आहेस. माझ्या या असह्य यातनांनीं तळमळणाऱ्या हृदयाला तुझ्यावांचून कोणीही शांती देऊं शकणार नाहीं.

आग्रहभरानें व उत्तेजनपूर्ण अन्तःकरणानें त्यानें तें मद्यपात्र एका दमांत खलास केलें. व बराच वेळपर्यंत गंभीर मुद्रेनें त्या खोलींतच इकडे तिकडे फिरण्यांत त्यानें वेळ घालविला. त्याच्या निरुत्साही हृदयांत आतां उत्साहाचा संचार झाला होता. मुबारक तेथें थांबला नाहीं. तो तें रिकामें मद्यपात्र घेऊन खोलीच्या बाहेर पडला व दरवाजा बंद करून माडीच्या खालीं उतरला.

थोड्या वेळानंतर मद्याच्या कार्यशक्तीला आरंभ झाला. खिन्नतेचें आनंदांत पर्यवसान झालें. निरुत्साही देहांत नवजीवनाचा संचार झाला. अंधकारानें झाकून गेलेली सृष्टीची शोभा पूर्वी त्याला भासवीत होती; पण आतां ती त्यालाच मनोरम दिसूं लागली.

पूर्वीचे उद्विग्न विचार नाहींसे होतांच प्रेमाचे चाळे व आनंदाचे काल्पनिक मनोरे सुचावे यांत आश्चर्य कसचें ? दलियेचें सुंदर स्वरूप आपल्या अन्तःकरणांत प्रतिबिंबित झालें आहे असें त्याला वाटूं लागलें. तिच्या सौंदर्याची माधुरी मद्यापेक्षांहि मधुरतर आहे असें त्याचें मन त्याला साक्ष देऊं लागलें. त्याच्या नेत्रांसमोर दलियेची अमूर्त मूर्ति येऊं लागली. मानसिक प्रफुल्लतेमुळें उत्पन्न झालेल्या हुशारीनें तो तिला पाहूं लागला. ती त्याला स्वर्गीय देवीसारखी दिसूं लागली. इतकेंच नव्हे तर तिच्या आकर्णविलंबित नील नेत्रांत करुणेचें दिव्य तेज चमकत असून ते नेत्र 'भिऊं नको. मी तुझें रक्षण करीन.' असें सांगत असल्याचाही त्याला भास झाला.

रक्तोत्फुल्लओष्ठाधर स्मितहास्य मिषानें एकमेकांपासून किंचित् विलग होऊन आपल्याशीं हितगुज करीत आहेत असेंहि त्याला वाटलें. 'भिऊं नये. संकटाच्या वेळीं सहनशीलपणा असावा लागतो. ईश्वरावर श्रद्धा भक्ती-युक्त विश्वास ठेवावा; कारण त्याच्यावर विश्वासून राहिल्यानें आपलें रक्षण होईल.' हे शब्द तर त्याला स्पष्टपणें ऐकूं आले. हे सगळे मदिरामत्त मनाचे खेळ आहेत हें त्याला समजलें नाहीं.

इकडे तिकडे भटकण्यांत व मनाच्या व्यापारांशीं एकतानता करण्यांत बराच वेळ घालविल्यावर इब्राहीम आपल्या बिछान्यावर पडला. कारण आतां त्याला उभें राहातांच येणें इतक्य नव्हतें. पाय लटपटत होते व मद्याचा कैफ चढत चालला होता. ज्या निष्ठुर निद्रेनें त्याला अजूनपर्यंत आपल्या जवळून दूर लोटलें होतें, ती आतां त्याला आपल्या हृदयाशीं धरून गोंजारींत होती. एकंदरींत सर्व प्रकारें श्रांतपणा आला होता. त्यामुळें बिछान्यावर आंग टाकतांच तो झोंपीं गेला आणि स्वप्नसुखाच्या साम्राज्यांत यथेच्छ विहार करूं लागला.

झोंपेंतही त्याला स्वस्थता मिळाली नाहीं. निद्रादेवी इब्राहीमच्या दु:खानें कळवळून आपली प्रियसखी स्वप्न देवी तिची भेट देत होती. त्या वेळची त्याची परिचारिका तीच झाली. व इब्राहीमही तिच्या सेवेनें खूष झाला.

त्याला एक फारच गोड स्वप्न पडलें. आपण जणुं काय धवलचंद्रिका धौत श्यामल दूर्वा क्षेत्रावर बसलों असून चोहोंकडे रजत धारामय ज्योत्स्ना चकाकत आहे. सुगन्धित स्निग्ध समीरणानें आपल्या सभोंवारचा प्रदेश व्यापला आहे. चंद्रिकेची तेजस्विता तर वाढतच चालली होती. असली उज्ज्वल ज्योतिस्वरूप ज्योत्स्ना त्यानें कधींच पाहिली नव्हती म्हटलें तरी चालेल.

त्यानें पाहिलें, आपण त्या प्रांतांतून चालत असून प्रकाशमय क्षेत्रांत बरेंच दूरवर आलों आहों. आणि जवळच एका शुभ्र संगमरवरी दगडाच्या चबुत्र्यावर कोणी तरी झोंपलेली दिसत आहे पण थोडेसें पुढें होतांच ती व्यक्ती कोण हें ओळखतां आलें. ती दालिया होती. तिचा सगळा पोषाख शुभ्रवर्णाचा असून चंद्राच्या शुभ्रप्रकाशानें तिनें स्नान केलें होतें. हें दृश्य

पाहात आहे इतक्यांत एक काळाकुट्ट साप त्या वेदीवर चढला आणि दालियेच्या सुंदर वक्षःस्थलाचा चावा घेण्यासाठीं त्यानें आपलें तोंड पुढें केलें. इब्राहीम तें पाहूं शकला नाहीं. त्याचें सर्वांग थरारलें व तो स्वप्नांतच मोठ्यानें ओरडला ' दालिये, दलिये, ' तो काळ सर्प तुला चावूं पहात आहे. घात झाला. खुदा ! मी माझ्या प्राणाहूनही प्यार असलेल्या दालियेला कशा बरें वाचवूं शकेन ? "

त्याच्या त्या ओरडण्यानेंच तो साप जणुं काय भिऊनच दुसरीकडे पळून गेला. तावडतोब त्यानें आनंदित अन्तःकरणानें दालियेचा हात धरून तिला त्या वेदीवरून खालीं उतरलें. व तो तिच्यासह उत्साहभरांत दुसरीकडे निघून गेला.

हें स्वप्न खरें, पण या स्वप्नांतील दुःख आणि आनंद यांच्या अतिरेकानें त्याची झोंप नाहींशी झाली. खिडकींतून त्यानें बाहेर पाहिलें, पण रात्रीची कृष्णछाया अद्याप नाहींशी झाली नव्हती. आपण आपल्याच बिछान्यावर आहोंत. हेंहि त्याला कळून चुकलें. अर्थात् सगळें कांहीं पाहिलें तें स्वप्नच अशी त्याची खात्री झाली. पांढरी शुभ्र वेदी, दूर्वांचे क्षेत्र, सुधाधवलचांद्रिका आणि दालिया यांपैकीं कांहींच दिसलें नाहीं. अर्थात् तो एक मनाचा व्यापार होता हेंहि समजायला त्याला फारसा वेळ लागला नाहीं. भयंकर कृष्णसर्पही केव्हांच अदृश्य झाला होता हें सांगायला नकोच.

' मना : तूं पाहिलेंस तें स्वप्नच ना ? माझ्या दालियेला कोणा पापी चांडाळाची दृष्ट लागणार नाहीं ना ! देवा ! तूंच आतां तिचें रक्षण कर माझा तर अवतार संपलाच. ' देवाचें नांव घेत इब्राहीम पुन्हां झोंपीं गेला.

---

# प्रकरण ९ वें.

—:०:—

## एका प्रसंगांतूनच सुटलों म्हणायचें ?

" इतक्या रात्रीं तूं जाणार तरी कुठें ? "

" तुला माहीत नाहीं का मुबारक ! आज जुम्मा ना ? आज आमचा

.वित्र दिवस. आज उपासना आणि खैरात करावयाची. मौलवींच्या तोंडून .र उपदेशाच्या गोष्टी ऐकायच्या ! तुला माहीत नाहीं का ? "

" तें मला माहीत आहे; पण इतक्या मोठ्या रात्रीं आणि एकट्यानें ? "

" रात्र असली म्हणून मला कसली भीति आहे मुबारक ? "

" सौंदर्य आणि तारुण्य एके जागीं असलीं कीं त्याला गुप्त शत्रु हे :सावयाचेच. "

" पण मला खुदाचें सहाय्य आहे ना ? "

" मुद्दाम आपण होऊन संकटांत उडी घेणाऱ्याला खुदा काय करील ? .दानें मनुष्याला विचार करण्याची शक्ति दिलेली आहे; मग तिचा त्यानें ां उपयोग करूं नये ? "

" त्या तुझ्या तत्त्वज्ञानाची आतांच जरूरी नाहीं. आणि तुझी ही .तीही निरर्थक आहे. शिवाय शाहासूफीचा अस्ताना फार फारसा दूर .हीं हें तूं जाणतच आहेस.

" तर मग मीच तुझ्याबरोबर येतों. तूं एकट्यानें जाऊं नको. "

" मग धनीसाहेब एकटेच राहातील त्याचें काय ? शिवाय त्यांची मन-.थती किती बिघडलेली आहे हें तर तूं पहातच आहेस. अशावेळीं त्यांना कटे सोडून जाणें योग्य नाहीं. "

दालियेचें हें सांगणें ऐकून मुबारकानें थोडावेळ आपल्या मनाशींच :चार केला आणि नंतर म्हटलें, " तूं जें म्हणालीस तें खरें आहे. बरें तर .च घरांत राहातों; पण तूं शक्य तितक्या लवकर मागें फीर. मध्य रात्र .त आली आहे. कारण नुकताच मी धनीसाहेबांकडून तुझ्याकडे आलों. अजून झोंपले नाहींत. आणखी दोन घटका तूं परत येण्याची मी वाट .ईन; पण तितक्या वेळांत जर तूं आली नाहींस तर असल्या या काळो-.जून मी तुझ्या शोधाला येईन. तेव्हां मला तितके श्रम घ्यायला तूं .वूं नको इतकीच माझी विनंती आहे. "

" नाहीं. ती तुला तितके श्रम पडूं देणार नाहीं. मी दोन घटकांत .गें फिरेन. " असें सांगून दलिया तशा त्या मोठ्या रात्रीं सर्वांगावरून .रखा घेऊन घराबाहेर पडली.

दलिया हर शुक्रवारीं आपल्या धन्याला अकक्ल फिराच्या दर्ग्यात फुलें

चढविण्यासाठीं जात असे. हा पीराचा अस्ताना दौलतगंजांत होता. इब्राहीमचें घर अजमीरच्या मोठ्या वाडींत बड्या लोकांच्या गल्लींत होतें. या घरापासून दौलतगंजमधील अस्तान्याला जायला वीस मिनिटें लागत असत. लवकरच चालल्यास पंधरा मिनिटांचा रस्ता होता.

मुबारकाच्या हरकतीला न मानतां दालिया मोठ्या भक्तियुक्त अन्तःकरणानें घराच्या बाहेर पडली खरी, पण थोडासा रस्ता चालून गेल्यावर तिची छाती धडधडूं लागली. या रस्त्यानें या पूर्वी बरेच वेळां मोठ्या रात्रीं गेली आलेली होती. शहासूफी हा एक फकीर असून त्याला सर्व सिद्धी साध्य झालेल्या होत्या; तो नेहमींच त्या दर्ग्यात असे असें नाहीं. तरी पण तो त्याच्या नांवावरून स्थापन झालेला होता. स्वतः शहासूफी कुठें राहतो व कोणत्या वेळीं त्याचें वास्तव्य कुठें असतें हें कोणीही सांगूं शकत नसे. ज्याचें नशीब चांगलें असे, ज्याचें अन्तःकरण सत्कार्यानें पवित्र झालेलें असे व ज्याला ईश्वरप्राप्तीची तळमळ लागलेली असे त्यालाच त्याची भेट होई. इतरांना त्याचें दर्शन होणें फारच कठीण जात असे.

तरीपण या शहासूफीच्या आश्रमांत आलेल्या भक्तांना अगदींच निराश होऊन मागें परतावें लागत नसे कारण तेथें कोणी एक वृद्ध मौलाना राहात होता. त्याचे सगळे केंस पिकलेले असून वय सुमारें ऐंशीं वर्षांपेक्षांहि जास्त होतें. कोणी तर म्हणत कीं याचें वय किती आहे हें सांगतांच येणार नाहीं. तो त्रिकालज्ञ असल्याची लोकवार्ता होती. ज्याच्यावर त्याची कृपा होत असे त्याला तो त्याचें भूत भविष्य वर्तमान सांगत असे.

असो. त्या अंधारांतून आपला रस्ता काढीत दालिया झपाट्यानें त्या आश्रमाकडे चालली होती. रस्ता तिच्या माहितीचा होता तरी; पण आश्रमाच्या आसपास अगदीं निर्जनता असल्यामुळें विलक्षण निस्तब्धता पसरलेली होती त्यामुळें तिला थोडीशी भीती वाटलीच. आत्मविचारांत गढून गेलेल्या मनुष्याला भयभीतीचें ज्ञान नसतें म्हणतात तें खोटें नसतें. कारण दालियेचें आपल्या मनाशीं निराळ्याच प्रकारचें हितगुज चाललेलें होतें. ती म्हणत होती, " ते माझे कोण ? असें जर मी माझ्या अन्तःकरणाला विचारलें तर तेथूनच बोल उठत कीं स्वतःच्या जिवापेक्षांहि तुला त्यांची ज्यास्त योग्यता मानली पाहिजे. कारण तुझें जीवन सर्वस्व व आयुष्यांतील मुख्य

ध्येय तेंच आहे. ' होय. हे बोल खोटे नव्हत. कारण एक घटकाभरही त्यांच्यापासून दूर व्हावें असें मला वाटत नाहीं. कित्येकदां तरी त्यांनीं मला सुखासमाधानानें नला निरोप दिला; पण त्यांना सोडून जायला माझें मनच तयार होईना. माझे आईबाप कोण, माझें घरदार कुठें, आणि माझा वंश कोणता हें मला काहींच माहित नाहीं. महात्मा अबू अयूबनीं मला एका काश्मिरी सौदागरा-जवळून विकत घेतलें एवढें मला माहीत आहे; पण गुलामाचा व्यापार करणाऱ्या त्या सौदागराला माझ्या बाबतींत विशेष कांहीं माहिती होती असें नाहीं. मग आतां माझे पुढं व्हायचं तरी काय ? मी मोठमोठ्या आशा मनांत धरून मनोराज्य तरीं कां करावें ? मी ज्याप्रमाणें इब्राहीमसाहेबांना सर्वस्व अर्पण करून त्यांच्या पायाची दासी झालें आहे त्याप्रमाणें तेहि माझ्यावर अनुरक्त असतील काय ? माझ्यावर त्यांचें प्रेम जडण्या इतकी मी भाग्यवान आहे ? माझ्या सारख्या हतभागिनीला ते आपली पत्नी करतील काय ? खरोखर मला हें एक गहन गूढच वाटत आहे आशेची मदिरा प्राशन केल्यामुळें मला हा एक प्रकारचा कैफ तर आला नसेल ना ? पण मी हे माझे प्राण त्यांना समर्पण केले आहेत तेव्हां या जगांत माझें सर्वस्व काय तें तेच. मीं तर काळजी कां करावी ? जें व्हायचें असेल तें होईल. त्यांच्या चरणावांचून मला आतां दुसरी जागाच नाहीं. कारण वाहिलेलें फूल परत घेतां येणें अशक्य आहे. त्यांच्यावर प्रेम करण्यांतच मला खरें सुख वाटतें. त्यांची सेवाचाकरी करणें हाच माझा खरा आनंद. आणि त्यांचें साहचर्य हीच माझी मनकामना. मी निष्काम अन्तःकरणानें—मोबदल्याची अपेक्षा न करतां—आमरण त्यांची सेवाच करीत राहीन. त्यांची उपासना करणें हेंच माझें कर्तव्य. हें कर्तव्य करीत असतां जें व्हायचें असेल तें होऊं दे. नशिबांत असेल तें होईल. तूर्त तर त्यांच्या सहवासांत राहातां येत असल्यामुळें मी आनंदांत आहें. माझी खरी तृप्ती मला मिळत आहे. "

प्रवास करतांना मनुष्य विचारांत गढून गेलेला असला म्हणजे लांबचा मार्ग त्याला कंटाळवाणा होत नाहीं व आपण मुक्कामाच्या जागीं किती तरी लवकर आलों असें वाटतें. दालियेचीही तशीच स्थिति झाली ती दर्याचा दूर पणा विसरली म्हटलें तरी चालेल. कारण विचार समाप्ती नंतर पहाते तों आपण आस्तानाच्या दरवाज्यांत उभे असल्याचें तिला आढळलें.

मुख्य दरवाजा ओलांडून दालिया जुम्मापीराच्या कबरेजवळ गेली. हें पीरस्थान कधीं निर्माण झालें तें कुणालाच माहीत नव्हतें. जो तो ' हें फार जुनें आहे ' असें म्हणे.

दालिया आपल्या मनाच्या सर्व वृत्तींचा लय करून पीराची उपासना करीत होती. इतक्यांत तेथें दोन मनुष्य अकस्मात आले. दालिया उपासनेंत गढून गेली असल्यामुळें तिला कांहींच समजलें नाहीं. आलेले माणूस म्हणजे उमरशेख आणि आसगर अली हे होत.

विलक्षण योगायोगानें. उमर शेख त्याच दिवशीं तेथें आला होता. स्वतः-च्या नशिबांत काय काय आहे तें समजाऊन घेण्याचा त्याचा विचार असल्या मुळें आपल्या सोबत्याला घेऊन तो मौलवीकडे आला होता. पण त्यांना तितका वेळ नसल्यामुळें त्याचा तो हेतु तडीला गेला नाहीं. ते दोघेहि निराश होऊन परत चालले होते; पण तेथेंच ध्यान निमग्न दालिया बसलेली आहे असें पाहून उमरच्या मनांत निराळेच विचार येऊं लागले. त्याचें अन्तःकरण चंचल झालें. तो आसगरला म्हणाला, " चल आम्ही त्या बाजूच्या खोलींत जाऊं. तिथून आम्हांला तिच्याकडे चांगलेंच पाहातां येईल.

हा आश्रय म्हणजे एक भली मोठी मशीद होती असें म्हणायला हरकत नाहीं. अर्थात त्या ठिकाणीं खोल्यांचा अभाव नव्हताच. शेखच्या मतलबा-प्रमाणें दोघेहि नजीकच्या एका दालनांत गेले.

उमर म्हणाला, " पाहिलेंस कां त्या ठिकाणीं कोण बसली आहे ती ? "

" पाहिली; पण कोण असावी त्याचा मला अंदाज करतां आला नाहीं " आसगर म्हणाला.

" वा. वा. अरे ती तर माझी हृदय देवता आहे. जिच्यासाठीं मी रात्रंदिवस तळमळत आहें ती सौंदर्य लतिका दालिया तूं कधींच पाहिली नाहींस का ? पहा. पहा. त्या सौंदर्याची चमक तरी पहा. खुदाची आज माझ्यावर मोठीच कृपा झाली म्हणायची; पण आसगर इथून आपण अगदीं बाहेर जाऊन उभे राहूं. तिच्या अगोदर आम्हांला तेथें गेलें पाहिजे. नाहींतर निघून जाईल. असल्या या अंधाऱ्या रात्रीं मिळालेली ही

अपूर्व संधी व्यर्थ दवडतां नये. माझी बागही अवळच आहे. तिचें तोंड बांधलें कीं सर्व कांहीं निमूटपणें होईल. चल. बाहेर जाऊन पुढचा सगळा बेत ठरवूं. आज हिच्याबरोबर कांहीं कोणी आलेलें दिसत नाहीं. चल. लवकर. चल."

असें म्हणून उमरशेखनें आसगरच्या हाताला धरून त्याला बाहेर ओढीत नेलें. आश्रमाच्या बाहेर बरींच मोठमोठीं पिंपळाचीं झाडें होतीं. अर्थात त्यांच्या खालीं गडद काळोख होता हें सांगायला नकोच. सैतानी उमर त्या काळोखांत एका मोठ्या झाडाच्या आश्रयानें लपून राहिला. बरोबर त्याचा दोस्त होताच; पण तो मात्र अगदीं भिऊन गेला होता.

आपल्याला आतां अचानकपणें दालियेला पकडतां येईल अशी उमरशेखची खात्री झाल्यावरून तो आपल्या जिगरजान दोस्ताला म्हणाला, "विलंबानें कार्यहानी होते. आतां आह्मांला जें काम करावयाचें आहे तें कांहीं फारसें धोक्याचें नाहीं. शिवाय माझ्या आंगांत हवें तेवढें सामर्थ्य आहे. मी तिला अगदीं हालचाल करूं देत नाहीं; पण तूं तिचें तोंड मात्र बंद कर."

ते दोघे सैतान अशा प्रकारें आपला गुप्त बेत ठरवीत आहेत तोंच एक उंचच उंच व्यक्ति त्या मशिदीच्या पहिल्या दरवाजावर येऊन उभी राहिली.

सगळ्या रात्रभर मशिदीच्या दरवाजांत एक उज्वळ दीप जळत असे. त्या आलेल्या मनुष्यानें त्या ठिकाणीं उभें राहून एकवार चोहोंकडे पाहिलें आणि तो पुढें झाला.

सैतानी उमरनें त्या मनुष्याला ओळखलें आणि तो अगदीं किंकर्तव्यमूढ होऊन गेला. त्याचें तें साहस, शूरपणा, बदमाषगिरी, सैतानी मतलब वगैरे सर्व कांहीं त्या मनुष्याला पाहतांच पार कुठच्या कुठें नाहींसें झालें. इतकेंच नव्हे तर तो भीतीनें थरथर कांपूं लागला.

आसगरला यांतलें कांहींच रहस्य समजेना. त्यानें विचारलें, "झालें काय मिया?"

"आसगर! काय विचारतोस बाबा! खुदा आज आमच्यावर फारच नाराज झाला."

" कां कां ? कोण तो माणूस ? तूं त्याला इतका भितोस का ? "

" अरे हा तोच मुबारक ! त्याच्या आंगांत दहा हत्तींचें सामर्थ्य एकवटलें आहे, तो एक बडा राक्षस आहे म्हटलें तरी चालेल. या काळोखांत असें लपून छपून आम्हीं आहों असें जर कां त्याच्या नजरेला आलें किंवा नुसता आमचा संशय आला तरीही तो इकडे धांवत येईल आणि आमचीं शिरें धडावेगळीं करील. हाय ! क्या अफसोसकी बात है ' अमोलिक रत्न हातांत सांपडलें असून सोडून द्यावें लागत आहे. "

उमरशेख जिवाच्या भीतीनें त्या अंधारांतच चोरासारखा आपला श्वास कोंडून उभा राहिला. आसगरलाही तसें करणें भाग पडलें. तोहि अगदीं गर्भगळीत होऊन गेला होता. तोंडांतून एक शब्दही उमटेना. तरी पण झालें हें चांगलें झालें असें त्याला वाटूं लागलें. कारण तो जरी बदमाष होता तरी आपल्या हातानें कोणतेंहि नीच कर्म करण्याची त्याची छाती नव्हती. तो धाडसांत उडी घ्यायला केव्हांहि तयार होत नसे.

तो मनांतल्या मनांत म्हणाला, " मुबारक मिया पुष्कळ दिवस वांच बाबा. या सैतानी उमरनें मला एका भयंकर जाळ्यांत अडकविण्याची तयारी चालविली होती. काय भयंकर माणूस आहे ! तूं आलास म्हणून बाबा मी या पापांतून सुटलों.

थोड्या वेळानंतर मुबारक, दलियेला घेऊन त्या मशिदींतून बाहेर गेला. त्याच्या हातांत एक लांबचलांब दांडा असून तो अभेद्य होता. उमरशेखला तर तो कृतांत काळासारखा वाटला. केव्हां एकदां येथून निघून जातों असें त्याला झालें होतें. तो आज यावेळीं तेथें आला नसता तर उमरच्या हातांत दलिया चांगली सांपडलीच असती. आणि मग आमच्या या कथानकालाही निराळें वळण द्यावें लागलें असतें; पण तो प्रसंग टळला.

घडणाऱ्या गोष्टींची अद्‌भुत सादृश्यता आढळून येते ती अशी, अगदीं याच वेळीं इब्राहीम हा गाढ झोंपेंत आपल्या बिछान्यावर दलियेवरील संकटकारक स्वप्न पाहून भ्याला होता. सुंदर चांदण्यासाठीं दूर्वादलश्यामल माळ जमिनीवरील एका वेदीवर झोंपलेल्या दालियेचें हृदय दंशन करण्यासाठीं धांवणारा काळसर्प पाहून इब्राहीमला स्वप्नांतच अत्यंत भीति वाटली होती.

दाळयवर काहा तरी संकट आल्यावांचून राहणार नाहीं असल्या अमंगल आशंकेनें अस्वस्थ होऊन मुबारक घराबाहेर पडला होता. तिची बराच वेळ मार्गप्रतीक्षा करीत राहाणें त्याला योग्य वाटलें नाहीं. दलिया ही परमात्म्याच्या कृपेवर एकनिष्ठेनें विश्वासून राहाणारी तरुणी होती. अर्थात त्या जगन्नायकाच्या प्रेरणेनेंच मुबारक मशिदींत येऊन पोहोंचला. पुढें येणारें संकट मनुष्याला अज्ञात असलें तर परमेश्वराला तें केव्हांच कळून चुकलेलें असतें. उमरशेख दलियेला घेऊन जाण्यासाठीं दरवाजाच्या तोंडाशीं छपून बसला आहे हें मुबारकला माहीत नव्हतें. नाहींतर आपल्या हातांतील दांडग्या सोट्यानें तो उमरशेखाला मोक्षाला पोंचविल्यावांचून राहिला नसता.

असो. मुबारक बराच दूर निघून गेल्यानंतर उमरशेख म्हणाला, "गड्या आतां कशाला आपण इथें उभे राहूं या ? चल घरीं जाऊं. एका प्रसंगांतूनच निभावलों म्हणायचें. त्यानें पाहिलें असतें तर आमचीं मस्तकें कांहीं धडांवर राहिलीं नसतीं."

आपल्याला बोलायला ही वेळ चांगली आहे असें वाटून आसगर म्हणाला, "तूं अगदीं एवढ्या तेवढ्या कारणांनीं भिऊन जातोस हें काय ? आम्हाला जर कार्य साधावयाचेंच आहे मग असें भिऊन काय उपयोग ! तो मुबारक म्हणजे कोण्या झाडाचा पाला ? बोलून चालून नोकर ! त्याला आपल्यासारख्यांनीं भ्यायचें काय ? आतां आज काल मला शक्ती नाहींशी झाली आहे म्हणून, नाहीं तर या गुलामाला भिऊन कधींही मागें सरलों नसतों; पण तसा प्रसंगच आला तर असल्या दोघांना मी पुरून उरेन. तुझ्यासारखा भिऊन कधींच माघार घेणार नाहीं."

आसगर अल्लीच्या त्या निरर्थक बडबडीकडे उमरनें मुळींच लक्ष दिलें नाहीं. कारण तो या वेळीं स्वतःच्याच विचारांत गढून गेला होता. त्याला आतां पुढील विचार करावयाचा होता. आपल्या पुढून दलियेला घेऊन गेल्याबद्दल मुबारकाचा कसा सूड उगवावा व तिला आपल्या हाताखालीं कशी घालावी या गहन विचारांत त्याला आपल्या घराचेंही भान राहिलें नव्हतें.

---

# प्रकरण १० वें.



## ' प्रभु पाठिराखा आहे. '

एवढा मोठा जिवावरचा प्रसंग आपोआप टळला, पण दालिया आणि मुबारक यांना त्यापैकीं कांहींहि समजलें नाहीं. प्रथमपासूनच मुबारक उमरशेखला चांगला नजरेनें पहात नव्हता. विशेषत: स्वामिभक्त मुबारकाला जेव्हां समजून चुकलें कीं, आपल्या मालकावर इतकीं संकटें येण्याला हाच सैतान कारण आहे, तेव्हां तो त्याच्यावर अधिकच दांतओंठ खाऊं लागला. तो मनांत म्हणे जर कधीं तशी संधि मिळाली तर उमरचें मस्तक आकाशांत उडवून दिल्यावांचून राहाणार नाहीं. किंवा त्याचें सर्वांग असें कांहीं ठेचून टाकीन कीं त्याला हालचालच करतां येणार नाहीं. '

उमरशेखचें नशीब चांगलें म्हणून तो त्या रात्रीं मुबारकाच्या नजरेला पडला नाहीं. नाहींतर पुढील कृष्ण कारस्थानें करण्याला तो जिवंत राहिला नसता. आसगरचेंही त्या दिवशीं चंदन उडालें असतें. शिवाय त्या निर्जन अरण्यांत ते दोघेहि मरून गेले असते तरी खऱ्या अपराधाचा मुळींच तपास लागला नसता. वेळ आली होती; पण काळ आला नव्हता हेंच खरें. नाहीं तर मुबारकाच्या तडाक्यांतून इब्राहीमचे शत्रु कधींही जिवंत राहिले नसते.

तशा त्या काळोख्या रात्रीं दालियेला घेऊन मुबारक शक्य तितक्या जलदीनें चालत होता. दालिया अगदीं निर्भय होती. कारण मुबारकाची तिला सोबत असल्यामुळें कोणत्याही प्रकारची भीति मानण्याचें कारण नव्हतें.

चालतां चालतां तिनें हळूच मुबारकाला विचारलें, " मुबारक तूं इतक्या रात्रीं इकडे येण्याचा त्रास कां बरें घेतलास ? वास्तवीक ही तुझी झोंपण्याची वेळ ? "

" दालिये ! मी तुझ्या मागून इकडे कां आलों हें तुला कसें सांगूं ? तरी पण कोणी तरी माझ्या अन्त:करणांतून मला सांगत होतें कीं, तिकडे जा. कदाचित् दालियेवर कांहीं तरी संकट येण्याचा संभव आहे. ईश्वराचीच ही गुप्त प्रेरणा नसेल कशावरून ? "

" हे सगळे तुझ्याच मनाचे तरंग आहेत. माझ्यावर तुझी फारच ममता असल्यामुळें अशा प्रकारच्या बऱ्यावाईट शंका तुझ्या मनांत येतात. आतांच पहा. तूं एवढ्या मोठ्या रात्रीं इतका त्रास सहन करून इथें आलास खरा; पण माझ्यावर तर कोणतेंच संकट आलें नाहीं ! " दलिया स्मित हास्यपूर्वक म्हणाली.

" तूं म्हणतेस तें खरें असेल; पण संकटें केव्हां येतात हें आधींच कांहीं कोणी ठरवूं शकत नाहीं. रात्र बरीच झालेली. जागा निर्जन, आणि तूं एकटी. त्यांतून सौंदर्य आणि तारुण्य या दोन अमोलिक रत्नांची तुझ्यावर जबाबदारी; मग संकटें येणें असंभवनीय आहे असें मला कसें बरें वाटेल ? समज; खरोखरच तुझ्यावर कांहीं तरी प्रसंग आला असता तर अशा एकाकी स्थितींत तुझ्याकडून त्याचा कसा प्रतिकार झाला असता बरें ? शिवाय मी तुझ्या शोधासाठीं इतका लांब आलों नसतों तर घरीं बसून तुझ्याबद्दलची काळजीच करण्यांत रात्र घालविणार होतों कीं नाहीं ? "

हाय ! दुर्दैवी दलियेला जर माहीत असतें कीं, ' क्रूर स्वभावाचा एक राक्षस आपल्यावर अत्याचार करण्यासाठीं मशिदीच्या बाहेर गुप्तपणानें राहिलेला होता, ' तर ती मुबारकाला अशा प्रकाचे प्रश्न न विचारतां तो मदतीला आल्याबद्दल त्याचे आभारच मानती. ईश्वर स्वतः ज्या जीवाचें रक्षण करीत असतो त्याला कोणीही त्रास देऊं शकत नाहीं. प्रत्यक्ष काळही त्याच्या जवळ जायला भितो. मग इतराची कथा काय ? उमरशेखचा मनःकल्पित संकेत जर तडीला गेला असता, तर इब्राहीमचा दलियेशीं कांहींही संबंध राहिला नसता. ती त्याला कायमची अंतरली असती.

असो. मुबारक मागाहून आणि दलिया पुढे अशीं दोघेंहि चाललीं होतीं. घरीं पोंचण्याला अजून त्यांना थोडासा अवकाश होता. मुबारकाचें अन्तःकरण किती उदार आहे याची चांगलीच कल्पना झाल्यामुळें दलिया त्याला म्हणाली, " एक विलक्षण गोष्ट ऐकल्यापासून माझें मन कसें अगदीं अस्वस्थ होऊन गेलें आहे. आणि त्यासाठींच धनीसाहेबांचें कल्याण व्हावें म्हणून पीराची प्रार्थना करायला गेलें होतें. थोडासा नवसही केला, मनांतल्या मनांत ठरविलें होतें कीं, तुला यापैकीं कांहींच सांगूं नये. कारण तुला तरी काळजी नको. दुःख कढ जे कांहीं व्हायचे ते मलाच

व्हावें. असा माझा हेतू होता. पण ऱ्या वाईट काळात खऱ्या कळकळीचा जर कोणी असेल तर तो तूंच अशी माझी पूर्ण खात्री झाली असल्यामुळें मला समजलेली गोष्ट तुला सांगितल्यावांचून माझ्या अन्तःकरणाला समाधान वाटणार नाहीं. "

दालियेचें हें रहस्यमय भाषण ऐकून मुबारकाच्या हृदयांत धडकीच भरली. तो उत्कंठेनें म्हणाला, " तुझ्या मनाला काळजी वाटण्यासारखी अशी कोणती गोष्ट झाली आहे दलिये ? आणि ती मला समजल्यावांचून कशी राहिली ? मला सांगवीशी वाटत असेल तर इथेंच सांग. कारण इथें पूर्ण एकांत असून सगळें जग निद्रासुखांत गढून गेलेलें आहे, तेव्हां इथें झालेलें भाषण कोणीही ऐकूं शकणार नाहीं. मात्र, तूं मला जी गोष्ट सांगणार आहेस ती तुझ्या संबंधानें कीं धनीसाहेबांसंबंधानें तें मला आधीं समजलें पाहिजे. "

दालिया हळुच उत्तरली, " धनीसाहेबांसंबंधानें. इतकी भीतिजनक गोष्ट माझ्या संबंधानें काय असणार ? मला माझ्या बाबतींत मुळींच काळजी वाटत नाहीं. "

" तर मग आतां निष्कारण माझी उत्कंठा वाढवूं नको. काय असेल तें खुलासेवार सांग पाहूं. "

" आम्हां दोघांवर आणि धनीसाहेबांवर एक फारच मोठी विपत्ती कोसळणार आहे. "

" ती कशी ? " मुबारकानें चकित होऊन प्रश्न केला.

" सैतानी उमरशेखची दृष्टी माझ्यावर असून तो मला मिळविण्यासाठीं एका नीच मार्गाचें अवलंबन करणार असून या कामांत त्याला आसगरअलीचें भरपूर सहाय्य आहे. "

" एवढ्यानें मला चांगलेंसें समजलें नाहीं. जें काय असेल तें स्पष्ट सांग. "

" धनी साहेबांच्या दोन बागा पांच हजार रुपयांना उमरशेखजवळ गहाण असल्याचें तुला माहीत असेलच. "

" हो. तें मला माहीत आहे आणि त्या गहाणाची अद्याप दोन तीन महिने मुदत असल्याचें मी जाणतों. "

" तर मग आतां धनीसाहेबांना तेवढी मुदत मिळणार नाहीं. "

" कां ? त्या पैशांवांचून उमरशेखजवळ आतां कांहीं राहिलें नाहीं ? त्या कृपणाजवळ पैशाच्या तर राशी आहेत.

" शहरच्या काजीला लांच देऊन त्या सैतानी उमरनें इब्राहिमसाहेबां-कडून पैसा वसूल करण्याचें फर्मान मिळविलें आहे. ही पैशाची जरूरी नसून खासगी द्वेषाची लढाई आहे. या वेळीं आमच्या धनी साहेबांच्या हातांत तर एक पैसाहि नाहीं. अर्थात या वेळीं पांच हजारांची रक्कम देणें तर अगदींच अशक्य आहे. बरें हा पैसा न द्यावा तर राहायला जागाही राहाणार नाहीं. रस्त्यावर उभें राहण्याचा प्रसंग येईल. इतकेंच नव्हे तर आम्हीं दोघेंहि विकत घेतलेलीं माणसें असल्यामुळें आमचीहि यांच्या इष्टेटीतच जमा होते. तेव्हां राज्यांतील कायद्याला अनुसरून रकमेची भरती होण्यासाठीं आमची दोघांचीही विक्री करण्याचा सावकाराला अधिकार आहे. असें मी ऐकतें. "

" पण तुला तर सध्यां परलोकवासी असलेल्या थोरल्या धनी साहेबांनीं दास्यत्वांतून मुक्त केलें होतें ! "

" त्या संबंधाचा कागदी व्यवहार कांहींच झालेला नसल्यामुळें तें सरकारी रीतीनें खरें मानतां येणार नाहीं. आणि आम्हां तिघांवांचून चौथ्या कोणालाहि ही हकीकत माहीत नाहीं. मीं सांगितलेली तोंडी हकीकत कांहीं खरी ठरत नाहीं. आणि याच मुद्यावर उमरशेखनें हें सर्व कारस्थान रंगविलें आहे. त्याचा मतलब निराळाच आहे. केवळ पैसा वसूल करणें याच हेतूनें हा प्रकार चाललेला नाहीं. "

इतका खुलासा ऐकल्यावर मुबारकाच्या अन्तःकरणांत चक्क प्रकाश पडला, व त्याला एक प्रकारची भीति वाटूं लागली. खरोखरच आपल्या प्रेमळ व विपन्न धनी साहेबांवर हें भयंकर संकटच येत आहे अशी त्याची खात्री झाली. दालिया म्हणाली तें अगदीं खरें आहे, असें त्याचें मन त्याला सांगूं लागलें. या कर्जापायीं इब्राहीम साहेबांना सर्वस्वाला तर मुकावें लागणारच; पण दालियाही त्यांच्या हातून जाणार आपल्या दारिद्र्यामुळें तिलाही त्यांच्यानें ठेवून घेववणार नाहीं, हें मुबारकाला उघड दिसून आलें.

या गोष्टीचा जों जों विचार करूं लागला तों तों मुबारकाला ज्यास्तच संताप येत चालला. हा सगळा अन्याय हात असून खासगी द्वेषाला निष्कारण सरकारचें सहाय्य मिळत आहे. अशी त्याची पक्की समजूत होऊन तो आंतल्या आंत धुसफुस करूं लागला. त्याचे डोळे रक्तासारखे लाल झाले. आपोआप हाताच्या मुठी वळल्या आणि तो मोठ्यानें ओरडला. " या खुदा मेहरबान ! या घातकी कार्याला देवाचेंहि सहाय्य आहे काय ? तर मग सैतानाचें साम्राज्य झालें म्हणायचें ! "

दलिया मुबारकाच्या पाठीवर हात ठेवूनउ द्विग्नतेनें म्हणाली, " मुबारक, गरिबांना राग नसतो आणि विपत्तीनें गांजलेल्या माणसाला मानापमानाचीही खंत वाटत नाहीं. उगाच आपल्या जिवाचा संताप करून घेण्यांत काय अर्थ आहे ? आपल्या या संतापाला कोण विचारतो ? कोणीही मनुष्यानें संकटाच्या वेळीं धैर्य सोडतां नये. संकटांनीं घाबरून गेलें म्हणजे आपल्या बुद्धीचाहि क्षय होतो असें म्हणतात. तेव्हां मोठ्या अक्कलहुषारीनें या संकटांतून पार पडलें पाहिजे. "

मुबारकानें एकवार आकाशाकडे पाहिलें आणि तो मृदुस्वरानें कांहींसें पुटपुटला आणि नंतर गंभीरपणानें दलियेला म्हणाला, " दलिये ! धनीसाहेबांचें संरक्षण करण्याचा एकच उपाय आहे. आणि तो उपाय अमलांत आणावा असें मला वाटतें. '

या त्याच्या गंभीर बोलण्याचा दलियेला कांहींच अर्थ समजेना. ती उत्सुकतेनें ह्मणाली, " कसला उपाय ?

" उमरशेखला गुप्तपणानें ठार मारून या प्रसंगांतून मोकळें व्हायचें. कारण या सगळ्याच्या मुळाशीं तोच आहे. तेव्हां काजीचे शिपाई घेऊन त्याला आमच्या दारांत येण्याची सवडच दिली नाहीं म्हणजे झालें. अगदीं थोड्या वेळांत मी तें काम उरकून टाकीन; पण या संतापाच्या भरांत तुला विचारायला विसरलों होतों, ही सगळी त्यांची गुप्त बातमी तुला मिळाली कशी ? "

" जुल्लखान नांवाच्या त्याच्या नोकरानें मला हें कळविलें. तो संध्याकाळापूर्वीं आमच्या घरीं आला होता. तूं त्यावेळीं घरीं नव्हतास. मीं त्याच्या हातावर दोन रुपये ठेविले आणि महत्त्वाची बातमी विकत घेतली. जुल्ल-

सची बातमी खोटी नसते हें तर तुला माहीतच आहे. मला मनुष्याची पारख आहे त्यावरून तो फसवाफसवी करणारा असावा असें कांहीं मला वाटलें नाहीं. "

" त्याच्या सांगण्यावर माझाही विश्वास आहे. त्यानें जरी पैसे घेतले तरी तो अन्तःकरणाचा नीच नाहीं; पण या प्रसंगांतून आतां हुजूर साहेबांना सोडविण्याला मीं सांगितला त्याशिवाय दुसरा कांहीं कोणता उपाय मला सुचत नाहीं. तूंच विचार करून पहा. त्यांच्या हातांत आज एक पैसाही नाहीं; मग ते या प्रसंगांतून व कर्जांतून कसे बरें मुक्त होतील ? दलिये ! या कर्जाची फेड झाली नाहीं तर इब्राहीम साहेब सर्वस्वाला मुकून रस्त्यावरचे भिकारी बनतील. तो सैतान सदय होऊन हें राहातें घर तरी त्यांना शिल्लक ठेवील असें तूं मुळींच मनांत आणूं नको. कर्जापेक्षां वस्तूची किंमत ज्यास्त असते. हें त्याचें कृष्णकारस्थान पैशासाठीं नसून तुझ्यासाठीं आहे. जादा किंमतीच्या वसुलीनें तो तुला पकडणार ! दलिये ! या नाटकाचा हा परिणाम लक्षांत आणला म्हणजे मी इतका अस्वस्थ होऊन जातों कीं मला कांहींच सुचत नाहीं. ज्यास्त विचार करून मला आतां वेड लागणार आहे. माझ्यासारख्या दुर्दैवी नोकराला विकत घेऊन जर इब्राहीम साहेबांना कुणीं या कर्जांतून मुक्त केलें असतें तर मी तेवढेंहि करायला तयार झालों असतों. नाहीं. दालेये नाहीं. असें स्वस्थ राहून या प्रसंगांतून सुटका होणें शक्य नाहीं. त्या उमरशेखचा बेत मुळींच सिद्धीला जाऊं देतां नये. त्याचा खून झाला असतां जर धनीसाहेब कायमचे सुखी होत असतील तर मी या कामांत जिवापाड मेहनत करायला तयार आहें. त्या नराधमाचें शीर धडावेगळें करण्याला मी मुळींच माघार घेणार नाहीं. कारण तो मेल्यानें पुष्कळसे लोक मला दुवा देतील. आणि त्याच्या खुनाचें पाप साफ धुवून जाईल. सर्पाला दूध पाजण्यापेक्षां ठार मारणें हेंच श्रेयस्कर आहे. "

मुबारकाचे ते हावभाव व चेहेरामोहोरा पाहून दलियेला भीति वाटली. त्याचे ते डोळे एखाद्या मद्यप्या सारखे धुंद दिसत होते. त्यामुळें हा आतां कांहीं तरी अविचारीपणाचें कृत्य केल्यावांचून राहाणार नाहीं अशी तिची खात्री झाली. तेव्हां ती त्याला समजाविण्याच्या हेतूनें म्हणाली, " मुबारक !

असा उतावीळपणा करणें बरें नाहीं. शांत हो. असा अधिरा होऊं नको. उतावळेपणानें कोणत्याही साहसी कृत्याला प्रवृत्त होणें योग्य नाहीं. खुदाची करुणा अनंत आहे. तेव्हां त्याच्यावरच विश्वास ठेव. आमचे धनीसाहेब इतर कोणत्याही बाबतींत उच्छृंखल वृत्तीचे असले तरी ईश्वरावर त्यांची विलक्षण श्रद्धा आहे. मानधनाचा अपमान करणें सोपें नाहीं. त्या दिवशीं एका ल्हानशा प्रसंगांतून अचानक त्यांची सुटका झाली. तेव्हां त्या परमेश्वराची कृपा झाल्यास पुढील संकटांतूनही त्यांची अशाच आकस्मिक सुटका झाल्या-वांचून राहाणार नाहीं. तेव्हां सध्यां आपण हा विषयच सोडून देऊं. आजची रात्र निष्काळजीपणांतच जाऊं दे. उद्यां तो कृपाळू भगवान कोणता ना कोणता मार्ग दाखविल्यावांचून राहाणार नाहीं. घाबरून काय करणार? शिवाय या बाबतींत इब्राहीमसाहेबांजवळही कसलाच उल्लेख करतां नये हेंहि लक्षांत वागविलें पाहिजे. घाबरेपणाचें किंवा अस्वस्थतेचें थोडेसें चिन्ह दिस-ल्यास ते विचारल्यावांचून राहाणार नाहींत. आणि त्यांना जर ही गोष्ट सम-जेल तर ते एकदम धीर सोडतील आणि आम्हांला त्यांचें समाधानही करतां येणार नाहीं. कदाचित् दुःखानें आणि निराशेनें ते आत्म-हत्याही करतील. ''

मुबारक म्हणाला " मी कांहीं तसा मूर्ख नाहीं. दलिये, मीं या सगळ्या गोष्टी त्यांना सांगायला जाईन किंवा समजतील असें करीन असें तुला वाटतें तरी कसें? तुझ्या सांगण्याविरुद्ध कद्धीं तरी वागलों आहे का? धन्याचें कल्याण कसें होईल हा जर तुझा व माझा एकच हेतू तर आमच्यांत मतभेद तरी कसा होणार? मी आतां तुझ्या म्हणण्याप्रमाणेंच वागतों. ईश्वरावर विश्वासून उद्यां काय प्रकार होतो तें पाहून त्यानंतरच मी माझ्या उद्योगाला आरंभ करीन. जर उदईक कोणताही संगतवार विचार मला सुचला नाहीं, अथवा अचानक रीतीनें धनीसाहेबांवरचें संकट नाहींसें झालें नाहीं, तर खात्रीनें समज कीं, माझ्या हातून उमरशेखला मुक्ती मिळणार! मी त्याची केव्हांही कींव कर-णार नाहीं. कारण असला मनुष्य जिवंत राहण्यापेक्षां जहान्नम मध्येंच गेले-ला फार उत्तम!"

बोलतां बोलतां दोघेंहि घरीं येऊन पोहोंचलीं. जाते वेळीं मुबारकनें दरवा-जाला बाहेरून कुलूप घातलें होतें. अर्थात यावेळीं त्या दोघांना सहज आंत

येतां आलें. इब्राहीमला गाढ झोंप लागलेली पाहून त्या इमानी नोकरांना फार समाधान वाटलें व दोघेंहि आपापल्या खोलींत झोंपण्यासाठीं गेलीं. दलियेला बराच वेळ झोंप लागली नाहीं. मुबारक अविचारीपणानें कांहीं तरी अघोर कृत्य करील म्हणून तिनें त्याला समजाविलें होतें; पण स्वतःच्या मनाची तिला समजूत करतां येईना. आपल्या तरुण आणि अननुभवी धन्याला जर उद्यां भिकाऱ्यासारखें रस्त्यावर उभें राहावें लागलें तर तें त्याला मरणाहूनही दुःखद वाटल्यावांचून राहाणार नाही. कदाचित् तशा प्रसंगीं आत्महत्याही करून घेण्याचा संभव आहे. वगैरे विचार तिच्या मनांत येत असल्यामुळें तिला बिछान्यावर पडूनही अलोचन जाग्रण झालें, हें सांगावयास नकोच.

---

# प्रकरण ११ वें.

—:*:—

## सैतानी प्रयत्न.

भेदाभेद मनुष्यांना, पंचमहाभूतांना त्यांचें कांही नाहीं. उगवत्या सूर्याला नमस्कार करणारालाही प्रकाश मिळतो आणि आपल्या बिछान्यांत डोकें खुपसून रात्र करूं पहाणाराला बालसूर्याचे चमकत किरण आंजारून गोंजारून जागें करतात. दलिया तळमळत होती, इब्राहीम स्वप्नसुखांत मग्न झाला होता. आणि मुबारक घोरत होता; पण सूर्यानें आपलें कार्य या तिघांसाठीं तहकूब न करतां तो उदयाचलावर येऊन आपला निर्दिष्ट मार्ग आक्रमूं लागला. रात्रीं किती तरी घडामोडी झाल्या; पण त्यांचा त्यानें क्षणभरही विचार केला नाहीं.

उमरशेखाला झोंप लागली नाहीं. सूर्योदय होतांच तो धडपडून उठला. ताकितबिबीशीं तो एक शब्दही बोलला नाहीं. तो आपल्याच विचारांत गढून गेलेला होता. त्यानें दलियेला पकडण्यासाठीं म्हणून पुढें केलेले हात एकदोनदां ताकितबिबीच्या आंगाला लागले; पण जागृतींत त्याला तो स्वप्नभ्रम कळून येतांच त्यानें आपलेच दांत ओंठ चावले. त्याला आपल्या

पत्नीचा भयंकर राग आला; पण आपला राग व्यक्त करण्याचें त्याला धाडस नसल्यामुळें तो अगदीं न बोलतां आपल्या बैठकीच्या जागीं येऊन एका वेत्रासनावर बसला आणि जोराजोरानें धूम्रपान करूं लागला. दलिया आपल्या हातांत कशी मिळते याच एका विचारांत त्याचें सर्व लक्ष गुंतलें होतें. ' आपण एक हजार रुपये तर आसगरच्या स्वाधीन केले; पण त्याचा कांहीं उपयोग तरी होईल का ? हा एकच विचार त्याला अगदीं सतावून सोडीत होता.

ताकितबिबीला सर्व कांहीं कळत होतें. आणि आपल्या पतीला ती मनांतल्या मनात हंसतही होती; पण तिनें आत्मसंयमन करून एकही शब्द तोंडावाटें काढला नाहीं. मात्र आपल्या नवऱ्याला आतां वेड लागणार आणि कंजुषपणानें सांठविलेला पैसा तो उधळून टाकणार अशी तिची खात्री झाली. मात्र आतां पुढें काय होतें हें पहाण्यासाठीं ती अगदीं उत्सुक झाली होती.

आठ दहा घटका दिवस आला असेल नसेल तोंच काजीचा एक शिपायी त्याच्याकडे आला आणि त्यानें त्याच्या हातांत बंद केलेला एक लखोटा दिला. उमरशेखला आनंद जरी झाला नाहीं तरी त्यानें गुडाखूची नळी फेंकून दिली आणि तो लखोटा फोडून घाईघाईनें त्यानें आंतील कागद वाचण्याला सुरवात केली. त्याचा चेहरा यावेळीं मात्र प्रफुल्लीत झाला होता व तो मधून मधून आपल्या मिशीवर हातही फिरवीत होता. आणलेला कागद वाचून झाल्यानंतर त्या काजीच्या शिपायाला तो म्हणाला, कर्ज वसूल करण्याचा हा काजीनें दिलेला परवाना आहे. याचीच मी वाट पहात होतों. तूं आज माझें फारच मोठें काम केलें आहेस, यासाठीं तुला कांहीं तरी बक्षिस देणें योग्य आहे; पण आधी या कामाची पूर्तता होऊं दे. म्हणजे एकदम तुला मोठेंसें बक्षीस देण्याला व घेण्याला बरें पडेल. तुलाही समाधान वाटेल.

" पुढील तजविजीसाठीं अदालतींतून चार शिपायी येतील असा हुकूम आहे; पण तूं खासगी रीतीनें आणखी दोन शिपायी आपल्या बरोबर घेऊन ये. कारण इब्राहीमच्या घरांत जो मुबारक म्हणून एक दांडगट मनुष्य आहे तो फारच भयंकर असल्यामुळें कांहीं तरी दंगा धोपा होण्याचा

संभव आहे. आणि तसा कांहीं प्रसंग आल्यास दोन माणसें ज्यास्त असलेलीं बरीं."

काजीचा मनुष्य नम्रपणानें सलाम करून म्हणाला, "हुजूर! त्याबद्दल आपण तिळभर सुद्धां काळजी करूं नये. आम्हीं महा पराक्रमी व धर्मावतार काजी साहेबांचे मनुष्य आहों. आमच्या आंगावर हात टाकण्याची कुणाची छाती आहे? जर तसा कोणी दांडगाई करील तर आम्हीं त्याला तावडतोब गिरफदार करूं. बरें तर उद्यां आम्हीं केव्हां येऊं?"

उमरशेख प्रसन्न अन्तःकरणानें उत्तरला, "उद्यां याच वेळीं तुम्हीं येथें आल्यास बरें होईल."

नंतर उमरशेखनें आपल्या पिशवींतून मोठ्या दुःखानें एक अधेली काढली आणि त्या शिपायाच्या हातावर ठेवून ही झालेली उधळपट्टी कशी भरून काढावी या विचारांत तो गुंग झाला. साहेबाकडून आपणाला एक रुपाया तरी बक्षीस मिळेल या आशेनें तो शिपाई अगदीं आनंदून गेला होता; पण आपली ती आशा सफल झाली नाहीं असें पाहून तो खिन्न अन्तःकरणानें तेथून निघून गेला. उमरशेखचा कंजुष स्वभाव त्याला अपरिचित नव्हता; पण हातीं घेतलेल्या कामांत फत्ते मिळविल्यावर आपणाला बरेंच मोठें बक्षिस मिळण्याचा संभव आहे असें मानून त्यानें माघार घेतली. तो कांहीं बोलला नाहीं.

आतां आलेला हुकूम हा इब्राहीमवर बजाविण्याच्या वारंटासारखाच होता. हा हुकूम किंवा परवाना मिळविण्यासाठीं या कवडीचुंबक गृहस्थाला एक हजारांचा तोडा काजीच्या हातावर ठेवावा लागला. तरी पण आपल्या आशेचें हें फल हातांत आल्यामुळें झालेल्या नुकसानीबद्दल त्याला फारसा विषाद वाटला नाहीं.

मध्यें काय तो एक दिवस! रात्र संपली कीं दलिया आपली होणार अशी त्याची खात्री झाली. आपल्या अन्धकारमय जीवनांतील एक उज्ज्वल आकांक्षा पूर्ण होणार असल्यामुळें त्याचा आनंद हृदयांत मावत नव्हता. तो उत्कृष्ट प्रेम वृत्तीनें रंगून जाऊन मनांतल्या मनांत म्हणाला, "खरोखर आसगर अली हाच माझा खरा मित्र होय. त्यानें म्हणूनच हें अवघड काम केलें. याच्यासारख्या बुद्धिमान मनुष्य जगांत फारच थोडे आढळतील

त्यानें मला हा जर मार्ग सुचविला नसता तर कधींच माझी मनकामना पूर्ण झाली नसती. मी मरेपर्यंत तळमळतच राहिलों असतों.- दालेया माझा कसा तिरस्कार करते तें आतां पाहूं. माझा सगळा पैसा आणि सगळी अक्कल मी तिच्या प्राप्तीसाठीं खर्ची घालीन. मग तरी कार्यसिद्धी होईल कीं नाहीं ? "

समान शील आणि समान व्यसन असल्यावांचून मैत्री जुळत नाहीं अशी एक म्हण आहे. आणि ती खोटी नाहीं. उमरशेख इब्राहीमला फसवून आपला स्वार्थ साधूं पहात होता तर आसगर अली उमरला फसवून आपला खिसा गरम करण्याच्या खटपटींत होता आणि यामुळेंच त्या दोघांत गाढ मैत्री जुळली होती म्हणायला हरकत नाहीं; मात्र उमरशेखला आसगर हा आपला खरा मित्र आहे असें वाटत होतें. मनुष्य एकाद्या व्यसनांत बुडून जाऊं लागला म्हणजे ज्यास्त ज्यास्त खोल बुडविणारे तेच ' आपले जीवश्च कंठश्च मित्र वाटूं लागतात. व त्यांचीच जोपासना करण्यांत तो आपलें सर्वस्व खर्चीत असतो.

उमर मनांतल्या मनांत म्हणाला, " या वेळीं आसगर मिया येथें असता तर फार बहार झाली असती. माझ्या या आनंदाचा खरा भागिदार व्हायला तोच लायक आहे—"

अशाप्रकारें उमरशेख अस्पष्ट स्वरानें आणि प्रफुल्लित अन्तःकरणानें आसगर मियाचें गुणगान करीत आहे तोंच विलक्षण योगायोगानें आसगर अलीचीच स्वारी तेथें येऊन पोंहोचली. बिनतारी मानससंदेशानें मित्राच्या हृदयाला उमरच्या भेटीचा चटका लावला असें म्हणायला हरकत नाहीं.

योग्य वेळीं आपला मित्र आलेला पाहून शेखजींना अतिशय आनंद झाला. ते हंसत हंसत म्हणाले." प्यारे दोस्त ! तूं माझी केवढी मोठी कामगिरी केली आहेस याची तुला कल्पनाही नसेल ! तुझे प्रयत्न आणि तुझी हुषारी अलौकिक आहे यांत शंका नाहीं. पहा. काजीसाहेबांकडून परवाना आला आहे."

उमरशेखच्या हातांत काजीचा हुकूम मिळाला असून तो आनंदांत आहे हें वर्तमान या जंबुक श्रेष्ठांना वाटेंतच समजलें होतें. कारण काजीकडून आलेला शिपायी जातेवेळीं त्याला रस्त्यांतच भेटला व त्यानें त्याच्या-

कडून सगळा खुलासा विचारून घेतला; पण ही गोष्ट आपणाला माहीत आहे असें न दाखवितां या बाबतींत थोडासा मोठेपणा मिळविण्याच्या हेतूनें तो म्हणाला, " अरे मिया ! तूं हें बोलत आहेस तरी काय ? इतक्या लवकर हें काम होईल अशी मला कल्पनाही झाली नव्हती. तो काजी फारच खाष्ट आहे. प्रथम तो रक्कम घ्यायलाच तयार होईना; पण बऱ्याच खटपटीनें मध्यें किती तरी वशिले घालून ती रक्कम एकदांची त्याच्या गळीं उतरविली. मला त्यांत इतके श्रम पडले आहेत कीं दुसरा एकादा असता तर तें काम सोडून देऊन तो रें रें करीत मागेंच फिरला असता. पण जाऊं द्या. तुझें काम झालें यांतच मला आनंद होत आहे. रात्रंदिवस तुझ्या कल्याणावांचून माझ्या मनांत दुसरे कसलेच विचार येत नाहींत. "

मुबारक म्हणाला, " भाई ! ईश्वरानें जर मला कधीं चांगले दिवस दाखविले, तर तुझे हे उपकार फेडल्यावांचून मी राहणार नाहीं. खऱ्या सुखाचा मार्ग कोणता हें मला आतां इतक्या दिवसांनीं कळून चुकलें आहे. केवळ पैशाचें भांडार जवळ असून सुख मिळतें असें नाहीं, तर त्याचा उपभोग घेतल्यानेंच खऱ्या सुखाचा लाभ होतो. आतां उपभोग आणि अपव्यय या गोष्टी निराळ्या आहेत. त्याचा मला तरी निदान तूर्त विचार करायला नको. मी अत्यंत सावधपणानें केवळ स्वतःच्या सुखा-साठीं जर थोडासा खर्च केला तर त्यामुळें मी भिकारी होईन असें थोडेंच आहे ? मी हा पैसा पाण्यांत टाकणार नाहीं. शिवाय माझ्या हातून इब्राहीम सारखी उधळपट्टीही होणें अशक्य आहे. मनुष्य, स्वतःच्या सुखासाठींच विवाह करतो ना ? पण आसगर! मी विवाह करून फसलों. या त्राटिकेशीं मीं व्यर्थ विवाह केला असें मला वाटत आहे. ताकित बिबीचें बोलणें आणि कर्कश भाषण हीं ऐकतां ऐकतां मी अगदीं त्रासून गेलों. आतां एकदां ही दालिया माझ्या हातीं येतांच मी तिच्यासह अगदीं स्वतंत्र जागेंत राहणार. आमच्या घरांत हल्लीं अगदीं सामसूम आहे. कदा-चित् या कामाच्या घाईमुळें मी घरांत राहात नाहीं हेंहि एक त्याचें कारण असूं शकेल. तिच्या जवळच राहिलें नाहीं तर ती भांडण तरी कुणाबरोबर करणार ? बरें मी आतां तुला असें विचारतों, स्वर्गीय परीलाहि लाजवि-

णारी ती दलिया मला मिळेल का ? आणि मिळाली तर माझ्याशीं निका लावून ती मला सुखी करील का ? कां बरें ती माझ्यावर आसक्त होणार नाहीं ? माझा प्राण तर तिच्यासाठीं कासावीस होत आहे. "

उमरशेखचीं वाक्सुधा प्राशन करून आसगरला तर मनातल्या मनांत आनंदाच्या गुदगुल्या होत होत्या. बरेच दिवसांनीं आज आपल्या हातांत एक चांगलें कूळ मिळालें अशीहि त्यानें खूणगांठ मारली. या महाकद्रूष शेखनें कधीं धर्मकार्याला व फकिराला एक पैहि दिलेली नाहीं; भिकारी आला तर जो दरवाजा बंद करून आंत बसून राहात असे, तोच उमरशेख आज प्रेमाच्या आणि सौंदर्याच्या तडाक्यांत सांपडून हजारांचीं रकम खर्ची घालायला तयार झाला हें माझ्या सारख्या मनुष्यानें सुदैवच होय पोटभर न खातां पितां जो दरिद्री माणसासारखा दुःखाकष्टांत दिवस घालवून द्रव्याचें संरक्षण करणारा तोच आज दलियेच्या सौंदर्याला भुलून आपल्या सर्वस्वाची रम्य रांगोळी करायला तयार झाला हें दैवाचेंच कर्तृत्व नव्हे काय ? ईश्वराची सृष्टी म्हणतात ती हीच. स्वभाव परिवर्तन केव्हां होईल हें सांगतां येणार नाहीं.

अशा प्रकारचा विचार करून आसगर अली म्हणाला, " उमर ! तू आनंदानें एकदम इतका उल्लू बनूं नको. प्रत्यक्ष कार्य असें अद्याप कांहींच झालेलें नाहीं. मीं चवकशी अंतीं हें शोधून काढलें आहे कीं, दलियेचें इब्राहीमवर प्रेम जडलें असून ती अशी एका झटक्यासरशी त्याला सोडायला तयार होणार नाहीं. प्रेम हें उभयपक्षीं असावें लागतें. जबरदस्तीनें मनुष्याला आपल्या कबजांत आणतां येईल; पण त्याचें अन्तःकरण आपल्याकडे ओढून घेणें कठीण आहे. प्रेम हें आंधळें आहे. श्रीमंती, सौंदर्य, सामर्थ्य यापैकीं त्याला काय पाहिजे आणि काय नको हें निश्चित असें कांहींच सांगतां येणार नाहीं. त्यामुळें तुझ्या या प्रयत्नाबद्दल मला थोडीशी भीती वाटते शेवटीं निराश होण्याचा प्रसंग न येवो म्हणजे झालें. तरीपण तुझी ही उत्कटेच्छा खुदाच्या दरबारीं रुजू असल्यामुळें तो तुझ्यासारख्या आपल्या भक्ताला कधींही निराश करणार नाहीं अशी माझी मनोदेवता मला सांगत आहे. यासाठीं चार पैसे ज्यास्त खर्च करावे लागले तरी तूं माघार न घेतां प्रयत्नांत कसूर करूं नको. "

आसगरचें हें खंडन मंडनपर बोलणें ऐकून उमरला थोडेंसें वाईट वाटलें. यांत काहीं तरी तथ्य आहे, व पुढें मागें आपणाला अडचण उत्पन्न होण्याचा संभव आहे असें वाटून त्याचा उत्साह कमी झाला. तो काहींसा दुःखी स्वरानें म्हणाला. " तूं कां बरें असें म्हणतोस ! मला निरुत्साही बनविण्यांत तुला काय मौज वाटली ? माझा असा तेजोभंग झाल्यानें तुला आनंद वाटतो का ? "

आसगरानें उत्तर दिलें, " त्याला तसेंच कारण आहे. मी हें उगाच नाहीं बोललों. "

" तर मग काय प्रकार आहे तो मला सांग. " उमरशेख त्रासून म्हणाला.

" तुला सांगणारच. तुला सांगितल्यावांचून त्या अडथळ्याचें निवारण होणार कसें ? पण तूं कदाचित् तें ऐकून अगदीं निराश होशील आणि कपाळावर हात घेऊन स्वस्थ बसशील म्हणून भीति वाटते. "

उमरची उत्सुकता व उद्वेग वाढत चालला. तो अगदी उतावळा होऊन म्हणाला, " आधीं सांग पाहूं. "

नुकतेंच एका विश्वासु मनुष्याकडून मला समजलें आहे कीं, अबूअयूबनें आपल्या विकत घेतलेल्या दासीला म्हणजे दलियेला दास्यत्वांतून मुक्त केलेलें आहे. त्यानें आपल्या मरणाच्या वेळीं हें पुण्यकृत्य म्हणून केलें; पण आज तें आमच्या कार्यसिद्धीच्या आड येत आहे. कारण दलियेवर इब्राहीमचा खरेदीचा हक्क राहिलेला नाहीं. अर्थात ती त्याच्या मालकीची इष्टेट नव्हे. तसेंच दलियेला आपल्या ताब्यांत आणण्याचा तुझा गुप्त बेत झालेला आहे तो इब्राहीमला समजल्यावांचून राहिलेला नाहीं. जर त्या दोघांत खरो-खरच प्रेम संबंध असेल व दोघांचेंहि एकमेकांवर निष्काम प्रेम असेल तर तो तिला कुठें तरी लपवून ठेवल्यावांचून राहाणार नाहीं. व त्याबद्दल आम्हीं त्याला कांहींच विचारूं शकणार नाहीं. आता दास्यत्वांतून तिला मुक्त केल्याबद्दल अबूअयूबच्या हातचा जर कोणताही लेख नसेल तर आपले प्रयत्न यशस्वी होण्याचा संभव आहे; पण तसा लेख आहे कीं नाहीं, हें मला अद्याप समजलेलें नसल्यामुळें त्याबद्दल निश्चित असें मला कांहीं सांगता येत नाहीं तरी पण एवढी तरी पळवाट असल्यामुळें आशेला जागा आहे.

आसगर अलीचें हें बोलणें ऐकून उमरशेख बराच वेळपर्यंत कसलासा गूढ विचार करण्यांत मग्न झालेला होता. व त्यामुळें त्याचा चेहरा मेघांनीं झाकून टाकलेल्या आकाशाप्रमाणें उदासीन दिसत होता. यावरून त्याचे विचार उत्तेजक नसावे असें कोणीही अनुमान केलें असतें.

बराच वेळ अशा स्थितींत गेल्यावर उमरशेख एक दीर्घ सुस्कारा सोडून म्हणाला, " आसगर, मला असावी तितकी दैवाची अनुकूलता नाहीं हें दिसतच आहे. या कामांत मला लवकर यश यावें म्हणून तुझ्या मताप्रमाणें वागण्याचें ठरवून एक हजार रुपये तर गमावून बसलों. काजीच्या हातांत गेलेला पैसा पुन्हा माझ्या हातीं येणें शक्य नाहीं. दोन महिनेपर्यंत मला रकमेची कांहीं घाई नव्हती आणि इब्राहीमवर माझा कोणत्याही प्रकारचा रागही नव्हता. शिवाय खरें सांगायचें म्हणजे इब्राहीमनें माझा जो अपमान केला, त्याबद्दल मीही त्याला भरपूर त्रास दिला आहे. अर्थात एक हजार रुपये पाण्यांत टाकून खोटा हुकूम मिळविण्याची मला कांहींच जरुरी नव्हती. लोकांना चिथावून राजरस्त्यांत त्याचा अपमान केला, हें त्याला मरणाहूनही जास्त दुःखद झालें असलें पाहिजे. अबू अयूब असतांना ज्या वाड्यांतही जायला मला छाती होत नसे, त्या वाड्यांत काजीचे शिपाई नेऊन मीं माझा श्रेष्ठपणा त्याला दाखविला; आणि त्यामुळें मला तो पाहिजे तसें बोलला यांत अयोग्य असें कांहींच नाहीं. अशा स्थितींत कोणीहि तसेंच केलें असतें. माझें वर्तन बरेंच अतिरेकाचें झालें आहे. जर इब्राहीम दुष्ट स्वभावाचा असता तर त्यानें माझें हवें तसें नुकसान केलें असतें. आम्हां दोघांत अशा प्रकारचें मनोमालिन्य येण्याला ती दालियाच कारण झाली आहे. ती सौंदर्यशालिनी परी जर माझ्या हातांत येईल तर इब्राहीमशीं माझें कोणत्याहि प्रकारें वैमनस्य राहणार नाहीं. इतकेंच नव्हे तर उद्यां जर त्यानें आपण होऊन दालियेला माझ्याकडे पाठविलें तर मी ही रक्कम मागण्यासाठीं त्याच्याकडे कधींच जाणार नाहीं. त्या तेवढ्या रकमेची सूट देईन. इतकेंच नव्हे, तर कारण पडल्यास त्याला मी पाहिजे तितक्या पैशाची आणखीही मदत करीन. "

हृदयाच्या उत्तेजित मनोवृत्ती अशा प्रकारें व्यक्त करून उमरशेखनें आपल्या मनाला थोडीशी शांतता आणिली. मित्राजवळ मन उघडें केलें.

आसगर मनांत म्हणाला, "हें सावज जर आतां थोड्या गैरसावधपणामुळें हातांतून निसटेल तर आपलें कायमचें नुकसान झाल्यावांचून राहाणार नाहीं. असलें चांगलें कुळ हातचें सोडणें म्हणजे स्वतःच आपल्या घराला आग लावण्यासारखें आहे. या दलियेच्या बाबतींत अशीच कांहीं दिवस चढाओढ कायम ठेविल्यास माझा खजिना चांगलाच वर आल्यावांचून राहाणार नाहीं.

अशा प्रकारचा साधक बाधक विचार करून आसगर अल्ली थोडासा गंभीरपणाचा आव आणून म्हणाला, " छे. छे. उमर एवढ्याशा गोष्टी-साठीं तूं इतका बावरून जाण्याचें मुळींच कारण नाहीं. काजी साहेबांचें जर आम्हाला सहाय्य आहे तर भीति कसली ? ते पाहिजे तें करूं शक-तील. अशाच रीतीनें सुभेदारालाही आपण वश करूं शकूं. दिल्लीच्या राज-सत्ताधाऱ्याचें तर कुठेंच लक्ष नाहींसें झालें आहे. प्रत्येक सुभेदार आपणालाच राजा मानीत आहे; मग न्याय किंवा अन्याय त्याला विचारणार कोण ? 'जो बळी तो कान पिळी' अशी आजची राजपद्धती असल्यामुळें आमच्या सारख्यांना काळजी करण्याचें मुळींच कारण नाहीं. जर दलियेच्या दास्यमुक्तीसंबंधानं खरोखरच एखादा कागद झालेला असेल व तो पुढें येईल तर आपण त्याचीहि व्यवस्था करूं. काजी साहेबांचे हात रौप्यमुद्रांनीं बांधले म्हणजे त्यांच्या तोंडून तो कागद बनावट असल्याचें आपोआप बाहेर येईल. पैसा असला म्हणजे काय पाहिजे तें होणें शक्य आहे. आम्ही आपल्या पैशांची पिशवी मोकळी करावी कीं पहा काय मौज होते ती ! असत्याचें सत्य आणि सत्याचें असत्य व्हायला पैशाचा जोर पाहिजे. पैसा म्हणजे ईश्वर."

# प्रकरण १२ वें.



## 'सचोटीचें धन चोरीला जात नाहीं.'

" मुबारक ! जागा आहेस का ? "

दलियेच्या या हांकेला उत्तर मिळालें नाहीं. चोहोंकडे भीषण निस्तब्धता

पसरली होती त्यामुळें तिच्या हांकेचा प्रतिध्वनि तिलाच ऐकूं आला. तेव्हां तिनें मुबारकाच्या खोलीच्या दरवाजावर हळूच थाप मारली. मृदु स्वरानें विचारलें, " मुबारक ! अद्याप तूं झोंपेंतच आहेस ? "

यावेळीं मात्र मुबारकाची झोंप उडाली आणि तो जागा झाला; पण डोळे चोळीत चोळीत कांहीं वेळ बिछान्यावरच बसून राहिल्यावांचून त्याला कालस्थितीची कल्पना करतां आली नाहीं. नंतर त्यानें दरवाजा उघडला आश्चर्यानें विचारलें, " दलिये ? आहे काय हा प्रकार ? इतक्या रात्रीं तूं कशाला इकडे आलीस ? साहेब आजारी तर नाहींत ना ? "

" नाहीं. तसें कांहीं नाहीं. खुदा त्यांचें कल्याण करो. दुसरें कांहीं नाहीं. तुला माझ्याबरोबर बागेंत आलें पाहिजे. "

" बागेंत ? इतक्या रात्रीं ? असें कोणतें जरूरीचें काम आहे ? "

" तें मला इथें सांगतां येणार नाहीं. तूं कांहीं न बोलतां बागेंत चल. "

" असल्या अंधारांतून ? "

" मीं बाहेर मशाल सुद्धां तयार करून ठेविली आहे. तूं माझ्या बरोबर चल. "

" पण काय आहे तें उघड करून सांगना ? "

" असें काय बरें मुबारक ! तें इथें सांगण्यासारखें नाहीं असें मी तुला पुनः पुन्हां सांगत असतां तूं आग्रह धरावा याचा अर्थ काय ? लहानसें काम आहे आणि तें रात्रींच केलें पाहिजे. तुझ्या मदतीवांचून तें होणार नाहीं.

मुबारकाला दलियेचा स्वभाव पूर्णपणें माहीत होता. अर्थात् ती आतां ज्यास्त कांहींच खुलासा करणार नाहीं असें वाटल्यामुळें तो कांहींहि प्रश्न न करतां तिच्या मागून चालूं लागला.

इब्राहीमची बाग कांहीं लहान नव्हती. दहा बारा बिघे जमीन तिनें व्यापिली होती. व त्यांत आंबा, लिंबू, वगैरे फळ झाडें आणि गुलाब, मोगरा, दवणा, पाच वगैरे फुलझाडें चोहोंकडे व्यवस्थित रीतीनें लावलेलीं असून ठिकठिकाणीं लतामंडपही शोभत होते. तरी पण सध्यां त्या बागेचा मालक काळजींत असल्यामुळें झाडें व फुलें अगदीं मलूल झालेलीं

होऊन म्हणाला, " दालिये ! मघां तुझ्याशीं मी संशयितपणानें वागलों त्याची मला तूं क्षमा कर. तूं मनुष्य नाहीं देवी आहेस. कारण कोणीही मनुष्य आपल्या धन्यासाठीं इतका स्वार्थत्याग आणि संचय त्याग व तोहि अशा प्रसंगीं करणें शक्य नाहीं. तुझें वय जरी लहान आहे तरी तुझें अन्तःकरण दूरदर्शी व देवसुलभ आहे यांत शंका नाहीं. जगांत तुझ्यासारख्या स्त्रिया फारच थोड्या आढळतात—"

मुबारकाचें हृदय उचंबळून आल्यामुळें तो आणखीही बरेंचसें बोलला असता; पण दालियेला त्याचें भाषण ऐकायला वेळ नव्हता. ती त्याला थांबवून मध्येंच म्हणाली, " मुबारक, यावेळीं त्या सगळ्या गोष्टींची जरूरी नाहीं. आधीं आपल्या कामाला सुरवात कर पाहूं. "

दालियेनें दाखविलेली जागा मुबारकानें पाहिली. त्या ठिकाणीं बरींच रानटी झुडपें उगवलीं असून त्यामुळें ती जागा बरीच अवघड झालेली त्याला दिसली. तरी पण तो साहसी असल्यामुळें पुढें झाला आणि तीं जंगली रोपटीं उपटून टाकून आपला मार्ग मोकळा करूं लागला. थोड्याच वेळांत लतामंडपापर्यंतचा रस्ता साफ झाला व तीं दोघेंहि विवक्षित जागीं गेलीं.

दालियेनें आपल्या हातांतील मशाल उंच केली व मुबारक पुढें काय काम करतो तें पाहूं लागली. सुमारें दोन हात जमीन खणल्यानंतर एका धातुपत्रावर कुदळीचें टोंक बसून ' खण्ण ' असा आवाज झाला. आवाज ऐकतांच दालियेला अत्यानंद झाला व ती म्हणाली, " हां. मुबारक हीच ती पितळेची कळशी ! त्यांतच माझी दोन हजारांची रक्कम आहे ! दोस्त फार सावधपणानें ती कळशी वर काढ. तेवढें वजन तुझ्यावांचून दुसरा कोणीही उचलूं शकणार नाहीं. "

आणि तें अगदीं खरें होतें. मुबारकाच्या अंगीं विलक्षण सामर्थ्य असल्यामुळें त्यानें ती कळशी सहज रीतीनें वर काढली. ती वर काढण्यासाठीं त्याला फारसे श्रम करावे लागले नाहींत.

तो त्या कळशीकडे पाहून म्हणाला, " दालिये रक्कम ठेवायला जागा तर फारच चांगली शोधून काढलीस ! या धामधुमीच्या दिवसांत ही रक्कम कोणी तरी घेऊन जाता तर ? "

दालिया पुन्हां स्मित हास्यपूर्वक म्हणाली, " सचोटीनें मिळविलेले

द्रव्य चोरीला जात नाहीं, मुबारक ! लहानपणापासून या घरीं केलेल्या अंग-मेहेनतीचा हा मोबदला आहे. याला भीति नाहीं ! ”

“ होय खरें आहे दलिये. आतां आपण इथें कशाला थांबू या. चल घरांत जाऊं. ” मुबारकानें सुचविलें.

दलिया पुन्हां स्मित हास्यपूर्वक मुबारकाला म्हणाली, “ नाहीं दोस्त ! आणखी तुला थोडेसे श्रम घेतले पाहिजेत. तेवढा खड्डा बुजवून टाक. कुणाला कसलाच संशय यायला नको. ”

दलियेचा आदेश, म्हणजे मुबारकाला खुदाचा हुकूम ! तो कधींच तिची अवज्ञा करूं शकला नाहीं. नुसते तिच्या चेहेऱ्याकडे पाहिलें तरी कुणालाही तिच्यापुढें आपली मान लववावीशीच वाटे. तिच्या नेत्रांतच अशी कांहीं चमक होती कीं तिची अवज्ञा करण्याचें कुणाच्या मनांतही येत नसे. मुबारकानें लागलीच तो खड्डा बुजवून ती जागा पूर्ववत् केली. आणि कळशी खांद्यावर घेऊन तो दलियेच्या मागून निघाला. सभोंवार काळोख असल्यामुळें सगळया जगाचा अंधकारांत लय झाला आहे कीं काय असा भास होत होता. त्यामुळें आपणवर कुणाची नजर असेल असा नुसता त्या दोघांना संशय सुद्धां आला नाहीं. कार्यसिद्धीच्या आनंदांत त्यांना स्वतःचेंहि भान नाहींसें झालें होतें.

घरांत पाऊल ठेवतांच दलिया म्हणाली, “ मुबारक तुझ्या खोलींत रुपये मोजून पाहूं. चल. ”

लागलीच मुबारक आपल्या खोलींत शिरला. दलियाही आंत आली व तिनें दरवाजा बंद केला. नंतर दोघांनीं मिळून रक्कम मोजली. व ती जशीच्या तशीच असल्यामुळें त्यांना आनंद झाला. ती किंचित् हंसून मुबारकाला म्हणाली, “ मुबारक ! तुझ्याजवळ माझें गुपित असें कांहींच नाहीं. हें तुला माहीत आहेच. आजपर्यंतचा झालेला खर्च हा मींच सांठविलेल्या रकमेंतून झाला आहे. माझें वेतन बक्षिस म्हणून मिळालेली रक्कम मीं एकत्र करून माझ्या पुढील तरतुदीसाठीं ठेविली होती; पण धनीसाहेब अशा रीतीनें विपन्नावस्थेंत असतां मीं माझ्याच सुखाकडे लक्ष देणें हें योग्य वाटत नसल्यामुळें मीं अखेरपर्यंत त्यांना सहाय्य करण्याचें ठरविलें आहे. मोठ्या धनीसाहेबांनीं दिलेली ही रक्कम मीं फार वर्षांपूर्वीं

त्या ठिकाणीं ठेविली होती. व कांहीं कारण नसल्यामुळें मीं त्याबद्दल तुला कांहीं सांगितलेंहि नाहीं. आज कारण पडल्यामुळें सगळा खुलासा करणें भाग आहे. इब्राहीम साहेबांच्या एकंदर कर्जाची मोजदाद केली तर ती पांच हजार मोहोरा होत. आणि मीं जमवाजमव करून तयार केलेली रक्कम उणीपुरी दोनहजार मोहोरा होतील. तेव्हां उमरशेखला जर एकदम निम्मे रक्कम मिळाली तर तो दोन महिनेपर्यंत स्वस्थ बसणार नाहीं का ? कारण मिळणाऱ्या दोन माहिन्यांच्या मुदतींत शिल्लक राहिलेल्या कर्जाची फेड करतां येईल. "

दलियेसारख्या अनिंद्य व सौंदर्यशालिनी कुमारिकेला जगाची माहिती मुळींच नसावी याबद्दल मुबारकाला आश्चर्य वाटलें नाहीं; पण तिच्या अज्ञानाबद्दल हंसू आलें. तो तिला कौतुकपूर्ण स्वरानें म्हणाला, " सैतानी अन्तःकरणाचा सावकार उमरशेख आम्हांला इतकी सवलत देईल असें तुला वाटलें तरी कसें ? जर त्याला अन्तःकरण असतें; तर मुदतीच्या आधीं त्यानें गहाण ठेवलेली मिळकत लिलांवाला काढली असती का ? देवतातुल्य माणसांना त्याच्या हृदयांत जागा नाहीं.

दलिया म्हणाली, " मुबारक ! कसें कां असेना. प्रत्येक बाबतींत मी ईश्वरावर विश्वासून राहातें. तो कधींही इब्राहीम साहेबांचें अनहित करणार नाहीं. कारण त्यांचाही त्याच्यावर गाढ विश्वास आहे. अर्थात् या संकटां-तून मुक्त होण्याचा एकादा मार्ग दाखविल्यावांचून तो स्वस्थ बसणार नाहीं.

" त्या अनन्त शक्तिमान विधात्यावर जर तुझा इतका दृढ विश्वास आहे तर तो तुझ्या पुण्याईनें तरी इब्राहीमसाहेबांना चांगले दिवस दाखवो म्हणजे झालें. तुझ्या अलौकिक आत्मयज्ञाचा शेवट सुखकारक झाल्यावांचून राहा-णार नाहीं. ईश्वर दयाळू आहे. जा. आतां बरीच रात्र झाली. शांत अन्तः-करणानें झोंपीं जा. ही रक्कम सध्यां माझ्याजवळच असू दे. उद्यां सकाळीं याची व्यवस्था करूं. "

दलिया म्हणाली, " आतां रात्र संपतच आली मुबारक ! पाहू गेलें असतां माझ्यासाठीं तुला आज फारच त्रास झाला आहे. उद्यां तर आम्हांला दोघांनाही सकाळींच उठलें पाहिजे. तेव्हां तूंहि आतां झोंप घे. असें सांगून दलिया लागलीच त्या खोलींतून बाहेर पडली.

मुबारक तर त्या देवतेकडे पहातच राहिला ! ही कोण आहे आणि इब्राहीमच्या कुटुंबासाठीं त्याचें नांव राखण्यासाठीं इतकी का खटपट करते याचा त्याला उलगडा झाला नाहीं; पण तिच्याबद्दल त्याला विलक्षण पूज्य बुद्धि वाटूं लागली. तो हात जोडून म्हणाला, “ या खुदा मेहेरबान तुझा महिमा अगाध आहे ! ! तुझी श्रेष्ठता कोण वर्णन करूं शकेल ! या देवतेच्या खटपटीनें तरी इब्राहीम साहेबांवर आलेलें संकट नाहींसें होऊं दे. तिची तरी इच्छा पूर्ण कर. त्या देवतेच्या डोळ्यांतील अश्रु कोणाच्यानेंहि पहावणार नाहींत ! मग तुला तरी ते पहावतील का ? ”

---

# प्रकरण १३ वें.

—:※:—

## “ दलिये ! माझ्यावर तूं प्रेम करतेस ? ”

रात्र संपली. काळ तर केव्हांच कुणाची वाट पहात नसतो. अर्थातच इब्राहीमचीही रात्र संपली हें सांगावयास नकोच. इतर रात्रींपेक्षा झोंपेच्या बाबतींत ती रात्र त्याला बरीच सुखाची गेली होती असें म्हणायला हरकत नाहीं. आणि त्यामुळेंच त्याचें मनही बरेंच प्रसन्न दिसत होतें. चेहराही अप्रसन्न नव्हता. पूर्व रात्रीं आपल्या घरांत काय प्रकार झाले हें त्याला मुळींच समजलें नाहीं. समजणें शक्यच नव्हतें.

पूर्व दिवशीं सायंकाळीं दलियेला जुल्फसकडून बातमी समजली होती कीं, आपल्या धन्याला काजीकडून यावयाचा तो हुकूम आला असून एक दोन दिवसांतच त्या हुकुमाप्रमाणें कार्याला सुरुवात होईल, तरी तुम्ही सावध असावें. त्याचा उद्देश काय आहे हें त्याला माहीत आहेच. दलियेला उमरशेखाचा हेतू समजलेला होता. तरी पण आपस्वार्थी मनुष्य किती क्रूर बनतो याची तिला अद्याप चांगलीशी परीक्षा झालेली नव्हती.

तरी पण दालिया काळजींत नव्हती असें नाहीं. पुढें काय होणार हें तिला दिसत होतें आणि ती त्याबद्दल मुबारकाकडे बोललीही होती. बराच विचार करूनही जेव्हां तिला भावी प्रसंगाबद्दल मुळींच आशा वाटेना व यांतून साहेबांची सुटका होणें कठीण आहे असें वाटूं लागलें,

तेव्हांच तिनें बागेंतील द्रव्याचा उपयोग करण्याचें ठरविलें व मुबारकाच्या सहाय्यानें तिनें तो आपला उद्देश तडीलाहि नेला.

सगळ्या रातभर जागरण झालें असतांही कुमारी दालिया सकाळींच बिछान्यावरून उठली आणि घरगुती धंद्याकडे तिनें आपलें मन वळविलें. इब्राहीम रोज सकाळींच उठून ईश्वराची उपासना करी; पण त्यानंतर त्याला थोडासा फराळ करावा लागे. नाहींतर कोणत्याही धंद्याकडे त्याचें लक्ष लागत नसे. मनचें दुःख प्रेमाच्या माणसाशिवाय दुसऱ्या कुणाला समजणार ! आपल्या छोट्या मालकाला सकाळींच भूक लागते हें दालियेला लहानपणापासून माहीत होतें, त्यामुळें त्या बाबतींत ती कधींही हयगय करीत नसे. आजही मोठ्या पहाटेला ती उठली त्याचें कारण तरी हेंच होतें. तिनें तावडतोब कॉफी तयार केली आणि थोड्याशा पुऱ्याहि तळल्या व उपासना संपवून जेव्हां इब्राहीम आपल्या खासगी खोलींत येऊन बसला तेव्हां तिनें कॉफीचा पेला आणि पुऱ्या असलेलें ताट हळूच त्याच्या पुढें नेऊन ठेवलें.

चालत्या काळांत इब्राहीमचा जसा थाट चालला होता, तसाच या पडत्या काळांतही दालियेनें विन हरकत चालविला होता. कोणत्याही प्रकारें त्याच्या दैनिक आहाराविहारांत कमतरता येऊं दिली नाहीं. इब्राहीम हें जाणून होता. आणि त्यामुळें त्यानें तिला या बाबतींत अवास्तव खर्च न करण्याबद्दल सूचनाहि दिली होती; पण त्यापासून इब्राहीमलाच त्रास होईल असें वाटल्यामुळें तिनें त्याच्या खाण्यापिण्याच्या बाबतींत मुळींच दुर्लक्ष करावयाचें नाहीं असें ठरविलें होतें इतकें असूनही त्याच्याकडून तिला फारच हरकत होऊं लागली तर ती विशेष कांहीं न बोलतां आपले अश्रुभारयुक्त नेत्र पुशीत तेथून दुसरीकडे निघून जाई

रोज सूर्योदय होतो खरा; पण कोणाला तो शुभ असतो तर कुणाला अशुभ असतो. मानव जीवनाच्या रंगभूमीवर प्रत्येक दिवशीं होणारा हा खेळ आम्हीं पहातों खरा; पण त्याबद्दल मनाशी विचार करून वागणुकीचें निश्चित धोरण कांहींच ठरवीत नाहीं. जर आमच्या मनावर या गोष्टीचा परिणाम झाला असता तर बऱ्याचशा विपत्ती आपोआप नाहींशा झाल्या असत्या. आजचा सूर्योदय

इब्राहीमला अगदीं अशुभ होता; पण त्याला त्याची कल्पनाही नव्हती. निर्भय अन्तःकरणानें त्याचें काफी पान चाललें होतें. काफीचा स्वाद आणि पुरीची लज्जत याच्यांतच त्याचे सगळे विचार गुंतून राहिले होते म्हटलें तरी चालेल. दलियेचे आभार मानण्याचीही त्याला मधून मधून लहर येत होती.

इब्राहीम प्रसन्न अन्तःकरणानें काफी पीत आहे असें पाहून दलिया कांहींही न बोलतां मागें फिरली. तोंच इब्राहीमनें हाताच्या इषाऱ्यानें तिला न जाण्याबद्दल सुचविलें. अर्थात् तिला पुढचें पाऊल मागें घ्यावें लागलें. व ती निमूटपणें आपल्या मालकाजवळ येऊन उभी राहिली.

दोहों बाजूला दोन तक्के असलेल्या एका कोंचावर इब्राहीम बसलेला होता. दलिया आपल्या हुकुमाप्रमाणें उभी राहिलेली पाहातांच तो स्मित हास्य करून म्हणाला, " दलिये, अशी दूर कां उभी राहिलीस ? ये इथें माझ्याजवळ बैस. "

ती अद्याप आपल्या मालकाजवळ एकासनावर कधींही बसलेली नव्हती. अर्थातच त्याची आज्ञा मान्य करण्याला तिला संकोच वाटूं लागला. ती अधोमुख होऊन हळूच म्हणाली. " आपणाजवळ बसण्या इतका उद्धटपणा माझ्याकडून कसा होईल बरें ? मी म्हटली म्हणजे आपली दासी— "

इब्राहीम मध्येंच म्हणाला, " हां मी तेच म्हणतों. तू माझी दासी आहेस हें मला माहीत असूनही मी तुझी विनंती करतों ना ? दासीनें वास्तवीक मालकाची आज्ञा मानली पाहिजे. तू तर माझी विनंतीही अमान्य करतेस ! दलिये ! हा असा परकेपणा किती दिवस चालायचा ! ये माझ्याजवळ बैस. हा तुझा संकोच काय कामाचा ? इथें आपली दुसरें का कोणी आहे ? दलिये ! माझ्या अन्तःकरणांत एक प्रकारच्या भीतीची छाया पसरत असून सगळें हृदयाकाश व्यापून टाकूं पहात आहे. तू मला सोडून जाणार, माझें हें सुखस्वप्न अदृश्य होणार आणि मला या जगांत एकाकी राहावें लागणार असें माझें मन मला सुचवीत असल्यामुळें तुला माझ्याजवळून मुळींच दूर करूं नये. तू नेहेमी माझ्या जवळच बसून राहावें असें मला वाटत आहे. पदोपदीं होणाऱ्या अपमानाला मी भ्यालों नाहीं;

पण तुझ्या नुसत्या वियोगाच्या आशंकेनें माझें हृदय घाबरून जात आहे. तुझा हा प्रेमळ चेहेरा पाहिला, हंसऱ्या तोंडांतून उच्चारलेले चार गोड शब्द ऐकले आणि तुझ्या गोंडस हातानें आणून दिलेला हा असा काफीचा पेला ओठांना लावला म्हणजे मला अत्यंत समाधान वाटतें. तुझ्या सांत्वन-पर शब्दांनींच मला अद्याप जीवंत ठेविलें आहे. माझें जिवन तूंच आहेस. सुखाच्या आशेला जर कांहीं जागा असेल तर ती तुझ्या मुळेंच. मी जर तुझी योग्यता मानतों तर माझ्या जवळ बसायला तुला कां संकोच वाटावा बरें ?—"

'इब्राहीम पुढें बोलूं शकला नाहीं. त्याला गहिंवर आला. आपल्या उचं-बळून आलेल्या मनोवृत्ति त्याला आवरतां आल्या नाहींत. त्या आवेगा-सरशीं त्यानें दलियेच्या हाताला धरून तिला आपल्या जवळ कोंचावर बस-विलें. तिनेंहि त्याला अडथळा केला नाहीं. मुग्ध होऊन ती त्याच्या जवळ बसली. तिला त्याचा राग आला नाहीं. सहानुभूति वाटली; पण संकोचा-मुळें बोलतां येईना.

ती जवळ बसल्यावर त्यानें तिला विचारलें, " पूर्वी मीं तुला कितीदां तरी विचारलें होतें; पण तुझ्याकडून मला कांहींच उत्तर मिळालें नाहीं ! दलिये, स्वर्गीय देवी ! ! माझ्यावर तूं प्रेम करतेस का ? "

या असल्या प्रश्नाचें कोणती कुलकुमारिका स्पष्ट उत्तर देईल बरें ? अनु-राग व्यक्त करतां येणें तरी शक्य आहे का ? दलियेचा प्रफुल्ल कमलिनी-प्रमाणें स्वभवतःच आरक्त असलेला चेहरा या प्रश्नानें लज्जा राग रंजित होऊन ज्यास्त लाल दिसूं लागला. ती स्मित हास्य पूर्वक, पण अडखळत अडखळत म्हणाली, " माझ्यासारख्या एखाद्या क्षुद्र दासीच्या प्रेम दानानें आपल्यावर कोणता उपकार होणार आहे ? त्या प्रेमापासून कांहीं तरी फायदा होईल का ? मीं लहानपणापासून याच घरीं वाढलें आणि इथ-ल्याच अन्नानें माझा देह पोसला गेला. जगांत माझें असें म्हणायला मला कोणीही नाहीं. तसेंच राहायलाही जागा नाहीं हें आपणाला माहीतच आहे. माझा हा आश्रय आणि आपलें असलें प्रेमळ साहचर्य सोडून जावें असें मला कधीं तरी वाटेल का ? नुसत्या कल्पनेनेंच मला कधीं झालें नाहीं इतकें दुःख होईल. मग प्रत्यक्ष जाण्याची गोष्ट कुठची ?—"

तिच्यानें पुढें बोलवेना. श्वासोच्छ्वास जड होऊं लागला. आवाज कंपित झाला. तोंडून शब्द उमटेना. एखादा शब्द उच्चारला गेला तर वाक्याची रचना होईना. विसंगतपणा येऊं लागला. भाल प्रदेशावर घर्मबिन्दु चमकूं लागले आणि शेवटीं नेत्रांतून अश्रुही वाहूं लागले. कठोर परीक्षेची वेळच ती ! असला प्रसंग तिनें कधींच अनुभविला नव्हता आणि त्याची तिला कल्पनाही नव्हती.

दलियेच्या नेत्रांतून वाहात असलेले अश्रु पाहून व तिची ती अनुकंपनीय स्थिति पाहून अनायास कलिकेला आपण व्यर्थ दुखविलें असें त्याला वाटूं लागलें. त्याच्या मनाला ती गोष्ट लागली. कारण आजपर्यंत आपण जी गोष्ट केली नाहीं ती आपल्या हातून घडली याबद्दल त्याला पश्चात्ताप वाटूं लागला. त्यानें स्वतःच्या रेशमी हातरुमालानें अगदीं जपून तिचे अश्रु पुसले आणि ममतेच्या स्वरानें म्हटलें, " मला क्षमा कर दलिये ? मनाच्या आवेगासरशीं मी कांहीं तरी बोलून गेलों. मी अगदीं वेडा आहें. कुणाशीं कसें बोलावें हें मला मुळींच समजत नाहीं. आणि त्यामुळेंच वेळोवेळीं अशा प्रकारच्या चुका माझ्या हातून होतात. आतां असें पुन्हां बोलणार नाहीं. "

बोलतां बोलतां इब्राहीम स्तब्ध राहिला. तें सौंदर्य पहातच राहावेंसें वाटलें. चमकणाऱ्या अश्रुमौक्तिकांनीं तिचे ते कमलनेत्र, वर्षाकालांतील जलतुषार मंडित पुष्पाप्रमाणें दिसूं लागले. आणि चेहऱ्यावरील विषादामुळें तिचें तोंड मेघांनीं झांकलेल्या चंद्राप्रमाणें शोभूं लागलें.

त्यानें तिचे नेत्र पुसले त्यावेळचा काय तो मृदु स्पर्श ! अगणित सुगंधित फुलांनाच आपला हात लागला कीं काय असा त्याला भास झाला. त्याला अजूनपर्यंत कधींही दलियेचा आंगस्पर्श झालेला नव्हता; पण त्या दिवशींचा तो एकच स्पर्श त्याला इतका कांहीं मोहक आणि अपूर्व वाटला कीं ' आपण मंत्रानें भारलें गेलों कीं काय ' असा त्याला संशय आला. ' विजेचा संचार तर झाला नाहीं ना ' असेंहि तो पुटपुटला. कसल्या तरी विलक्षण चमकेनें आपलें सर्वांग पुलकित झाल्याचें त्याला कळून चुकलें. मदिरा प्राशन केल्यानंतर येणाऱ्या धुंदीप्रमाणें त्याला एक प्रकारची धुंदी आली आणि तो स्तब्ध झाला.

सुंदरीं दलियेच्या हृदयांत या वेळीं कोणत्या विकारांचें तुमुल रणकंदन माजलें असेल हें सांगतां येणें अशक्य आहे. तरी पण तिची ही स्थिति कांहीं तरी विलक्षण झाली होती एवढें खरें.

दलिया मंजूळ स्वरानें म्हणाली, " आजून घरांत मला पुष्कळ कामें करायचीं आहेत ना ! साहेब घरांत जायला मला आतां आज्ञा द्यावी. मीं काम आटोपून येतें. बोलतां बोलतां ती उभी राहिली आणि स्मितहास्य-पूर्वक एकवार त्याच्याकडे पाहून तेथून निघून गेली. इब्राहीम तिला अडवूं शकला नाहीं, तिच्या तोंडाकडेच पहात उभा राहिला.

दलिया विजेसारखी चमकत निघून गेली खरी; पण त्याच क्षणाला इब्राहीमच्या अन्तःकरणाला तिनें चटका लाविला. त्यानें मनांत म्हटलें, " अनेक सुंदर विलासिनींशीं विहार करण्यांत मीं पुष्कळ रात्री आनंदात घालविल्या आहेत. व अतृप्त भोगही उपभोगले आहेत; दलियेच्या नुसत्या दर्शनानें व किंचित् स्पर्शानें जो मला यावेळीं स्वर्गीय आनंद वाटला तसा पूर्वी केव्हांहि वाटला नव्हता. तिचे कमलासारखे नेत्र आणि हास्यानुरंजित प्रेमाचीं गीतेंच गात आहेत कीं काय असें वाटतें. काय तें पावित्र्य ! तिच्या प्रत्येक निश्वासांतील निष्कलंक माधुरी तिच्या सुंदर वदनचंद्रावर प्रतिबिंबित झालेली दिसत होती.. हीं अनाघ्रात कुसुमाप्रमाणें असलेली पवित्रहृदयी दलिया माझी होईल काय ? नाहीं. माझ्यासारख्या अवनत दशेला पोंचलेल्या भ्रष्टाला तिचा लाभ होणें अशक्य आहे. तिची आशा करणेंहि योग्य नाहीं. ती मला पूजनीय आहे. अर्थात् तिचा उपभोग घेतां येणें शक्य नाहीं. मी तिचा उपासक होऊं शकेन. राजे राजेश्वराच्या अन्तः-पुराला शोभा आणणारें हें फूल, या माझ्या विशोभित घराची शोभा वृद्धिंगत करण्यासाठींच ईश्वरानें निर्माण केलें असवें असें मला वाटत नाहीं. माझें सर्वस्व नाहींसें झालें तरी हरकत नाहीं. ऐश्वर्य पुन्हां मिळवितां येईल. माझा प्रत्येक दिवस इतक्या दुःख कष्टांत जात आहे कीं मी तसें दुःख कधींच अनुभविलें नव्हतें; पण तिकडेहि मी पहात नाहीं. कारण सुख आणि दुःख यांत चिरस्थायी असें कांहींच नाहीं हें मला माहीत आहे; मला काळजी वाटत आहे ती ही कीं दलिया माझ्या घरांत कायमची कशी राहूं शकेल ! ती नसेल तर मला कशाचीच जरूरी नाहीं. घरांतील

खरा प्रकाश कोणता असेल तर ती दलियाच होय. या अतृप्त आशेनें मला आजीवन तळमळत राहावें तर लागणार नाहीं ना ? निराशेच्या तीव्र वेदना माझ्यानें कशा बरें सहन करवतील ? या सौंदर्यलतिकेला—दलियेला—हृदयाशीं धरण्याचा शुभ दिवस कधीं तरी उगवेल काय ? "

इब्राहीमच्या या मनोराज्यांतील सुखस्वप्नाचा लवकरच शेवट झाला. कारण याचवेळीं त्याचा एकनिष्ट नोकर मुबारक अगदीं खिन्न चेहऱ्यानें तेथें आला आणि हात जोडून नम्रपणानें म्हणाला, " प्रभू ! आतां आपला सर्वस्वी घात होण्याची वेळ नजीक आली. देवाची मर्जी ! "

मुबारकच्या तोंडचे हे शब्द ऐकतांच इब्राहीम चमकला कांहीं तरी विलक्षण प्रसंग असावा अशी त्याची खात्री झाली. त्यानें क्षीण स्वरानें विचारलें, " काय झालें मुबारक ! "

" तो सैतानी उमरशेख काजीचे शिपायी घेऊन बाहेर आला आहे. त्याची ही दुसरी खेप आमच्या घरादाराचें वाटोळें केल्यावांचून राहणार नाहीं. " मुबारक कळवळून म्हणाला.

" त्यांना बैठकीच्या दिवाणखान्यांत नेऊन बसविलेस ना ? इब्राहीमनें आपला खानदानीपणा व्यक्त केला.

" जी हुजुर ! माझ्या हातून तशी चूक होणार नाहीं. आज त्या शिपायांबरोबर काजीचा मदतनीस दौलतखानही आला आहे. शहरांत काजीच्या बरोबरीनें त्याची योग्यता मानली जाते. "

" पण ही इतकी मंडळी अशी अकस्मात आमच्या येथें कां आली असावी बरें ? " इब्राहीमनें विचारलें

" तें मी आतां आपणांला थोडक्यांत सांगतों, " मुबारक सांगूं लागला. " मला हें सर्व सायंकाळीं दलियेनें सांगितलें. पण त्याचा प्रत्यय इतक्या थोड्या वेळांत आपणाला पहावा लागेल असें मला वाटलें नव्हतें. जुल्फखानानें या बाबतींत तिला काल दुपारींच सावध केलें होतें. तरी पण आपणाला त्यापासून दुःख होईल व कदाचित् रात्रीं झोपही लागणार नाहीं, म्हणून आम्हीं कांहींच बोललों नाहीं या सैतानानें शहरच्या काजीला आपल्या हातांत कसें आणलें हें गूढ कांहीं उकलत नाहीं. आपणाला बागांच्या तारण गहाणावर दिलेली पांचहजार मोहोरांची मोठी रक्कम मागण्याला तो आज

आला असून त्याच्याजवळ काजीसाहेबांचें वारंटही आहे. तयारी मोठी कडेकोट दिसते. ”

हें ऐकून इब्राहीम अगदींच गलितधैर्य झाला. एकदम आकाश कोसळून पडल्यासारखें त्याला वाटलें. त्यामुळें आतां आपण पुढें काय करावें तेंच त्याला सुचेना. तो स्तब्ध झाला. उद्वेगामुळें त्याचा चेहरा प्रेतासारखा निस्तेज दिसूं लागला. कोणत्याही प्रकारचा विचार करायलाही त्याला आवकाश नव्हता. तो क्षीणस्वरानें मुबारकाला म्हणाला, “ मुबारक ! तूं पुढें हो मी आलोंच. ”

आतां पुढें काय होणार हें समजायला त्याला वेळ लागला नाहीं. काजी लांचखाऊ आहे हें त्यानें यापूर्वीं ऐकलें होतें. पण त्याचा हा नीचपणा दुसऱ्याचा सर्वस्वी घात करण्याइतका कमालीचा असेल ही त्याला कल्पनाच झाली नव्हती. आपला भरपूर अपमान करावा आणि निराश्रित होऊन मीं रस्तोरस्तीं भटकावें. ’ असा त्याचा इरादा दिसतो. काजीलाही त्यानें हाताशीं धरला तो या द्वेषामुळेंच. गहाणखताची अद्याप दोन महिन्यांची मुदत शिल्लक आहे आणि त्यामुळेंच कांहीं हरकत येऊं नये म्हणून या राक्षसानें काजीच्या मदतनिसाला बरोबर आणलें असावें. आतां मला कारागृहांत जाण्यावांचून इलाजच नाहीं. अधिकारीच जर शत्रूला मिळाले तर माझा न्याय तरी कोण करणार ? ... ’ अशा प्रकारचा विचार करीत व आपल्या थरारणाऱ्या हृदयाला सांवरीत इब्राहीम बैठकीच्या जागीं आला. तेथें उमरशेख काजीच्या मदतनिसासह शिपायांची सेना घेऊन बसलेला त्याला आढळला.

प्रसंग आला खरा, आतां भिऊन काय उपयोग ! असा तेवढ्या पुरता विचार करूनच इब्राहीमनें आपल्या खुर्चीवर बसतां बसतां काजीचा मदतनीस दौलतखान याला सलाम केला, व म्हटलें, “ आदाब साहेब ! आपल्या सारख्यांचें आमच्या घरीं येणें हें सुदैवच समजायचें ! ”

काजींचे मदतनीस दौलतखान हे इब्राहीमला चांगलेच ओळखून होते. व हा एक खानदानीचा पुरुष आहे हें त्यांना माहीत होतें. उमरशेख प्रमाणें वैयक्तिक द्वेषानें त्यांचें अन्तःकरण गढूळ झालेलें नव्हतें. त्यामुळें इब्राहीमसारख्या योग्यतेच्या तरुणांना केवळ पैशांच्या अडचणीमुळें आलेली ही

वाईट स्थिति पाहून त्यांना वाईट वाटलें; पण ते सरकारी कामगार असल्यामुळें काजीसाहेबांच्या विरुद्ध वागणें त्यांना शक्य नव्हतें. यंत्राप्रमाणें हुकुमाची अंमलबजावणी झाली पाहिजे होती. अर्थात् सहानुभूतीचे एक दोन शब्द बोलणेंहि शक्य नव्हतें.

दौलतखानानें स्वभावसिद्ध सभ्यपणाला न सोडतां सहानुभूतिपूर्ण स्वरानें इब्राहीमला म्हटलें, " आदाबसाहेब ! मी आज अधिकारी या नात्यानें येथें आलों आहें हें आधींच सुचवून ठेवतों म्हणजे बोलतां चालतांना एकमेकांचा गैर समज व्हायला नको. काजीसाहेबांचें एक वारंट बजावण्यासाठीं मी आज बांधला गेलों असल्यामुळें तें बहुतर कर्तव्य बजावणें भाग आहे. आपण या अजमीरचे एक नामांकित सावकार आहां व आपला मातृवंश एका काळीं दिल्लीच्या तक्तावर बसून जगाचे न्याय करीत होता हें मला माहीत आहे; पण वेळ फिरल्यामुळें तरुणपणांतील अविचाराला बळी पडून तुम्ही कर्जबाजारी झाला, हेंहि मला विदित आहे. या उमरशेखच्या पांच हजार मोहोरा आपण कर्जाऊ घेतल्या असून त्याबद्दल कागद करून दिलेला आहे व त्याची अद्याप दोन महिन्यांची मुदत आहे; पण सावकाराला रकमेची जरूरी असल्यामुळें त्याच्या ह्मणण्याप्रमाणें काजी साहेबांनीं त्यांना रक्कम वसूल करण्याचा परवाना दिलेला आहे; तेव्हां त्यांची सर्व रक्कम व्याजसुद्धां माझ्यासमोर येथें त्यांना द्या. आणि तसें होणें शक्य नसल्यास स्पष्ट सांगा म्हणजे तुमची स्थावर जंगम मिळकत विकून त्यांची रक्कम वसूल करण्यांत येईल. त्या बाबतींत तुमचा कोणत्याही प्रकारचा बहाणा मानला जाणार नाहीं. "

अपराध्याला शिक्षेची कल्पना झालेली असते. पण न्यायाधीशाच्या तोंडून ती शिक्षा ऐकेपर्यंत त्याला एक प्रकारची आशा वाटते. व तो त्याच आनंदांत असतो; पण शिक्षा ऐकतांच त्याचा तो काल्पनिक आनंद नाहींसा होऊन त्याला सगळें ब्रह्मांड शून्यांत विलीन झालेलें आहे असें वाटतें. इब्राहिमचीही तशीच स्थिति झाली. दौलतखानाच्या तोंडचे ते शब्द ऐकतांच आपणाला याच ठिकाणीं मरण येईल तर उत्तम असें त्याला वाटूं लागलें व डोळे झांकून कांहीं वेळपर्यंत स्तब्ध राहिला.

---

# प्रकरण १४ वें.



## जग हें कसें आहे !

आतां आपल्याला कांहीं तरी बोललेंच पाहिजे असें वाटल्यावरून इब्राहीम कांपऱ्या आवाजानें म्हणाला, "या व्यवहाराला अद्याप दोन महिन्यांची मुदत असावी असें मला वाटतें."

यावर दौलतखानानें उत्तर दिलें, "तें मलाही माहीत आहे; पण उमर शेखाला सध्यांच रकमेची फार जरूरी असल्यामुळें त्यांनीं काजीसाहेबांचा परवाना मिळवून तुमच्याजवळ ही मागणी केलेली आहे. तेव्हां त्या बाबतींत तुम्हीं आक्षेप करूं नये."

हें ऐकल्यानंतर इब्राहीमनें उमरशेखकडे तिरस्कारपूर्ण नजरेनें पाहून गंभीरपणानें म्हटलें, "शेखजी ! तुम्हीं सावकार आणि मी तुमचें कूळ ही जरी स्थिति खरी, तरी आतां स्पष्ट भाषेनें बोलावयाचें म्हणजे तुम्ही फक्त नांवाचें माणूस आहां या पलीकडे कांहीं नाहीं. तुमच्यांत मनुष्यत्व नाहीं. केवळ मला भिकारी बनवून दारोदार फिरायला लावावें या एकाच उद्देशानें तुम्हीं हें कृष्णकारस्थान रचलेलें आहे. तें कांहीं असो; पण या कर्जाच्या फेडीसाठीं मी तुमच्याकडे फक्त एका आठवड्याची मुदत मागत आहें. तेव्हां माझी ही नम्र विनंति तुम्हीं अमान्य करूं नये. अबूअयूबच्या मुलानें कधींही अशी क्षुद्र याचना केलेली नाहीं, हेंहि या प्रसंगीं तुम्हीं लक्षांत आणा. प्रसंगानुरोधानें सर्व कांहीं करावें लागतें. त्याप्रमाणें याहिवेळीं मी तुमची प्रार्थना करीत आहें. उमर ! माझ्यावर अशा प्रकारची दया करण्याची वेळ या पूर्वी कधीं आली नव्हती आणि पुढेंहि येणार नाहीं. तेव्हां यावेळीं आपल्या अन्तःकरणाचा उदारपणा व्यक्त करून श्रेष्ठ व्हां. खुदा तुमचें कल्याण करील. कर्जाची फेड करण्याच्या बाबतींत माझे प्रयत्न चालू आहेत. दोन महिन्यांची मुदत असल्यामुळें मी स्वस्थ होतों; पण आतां मी शक्य तितकी लवकर तजवीज करतों. फक्त सात दिवसांची मुदत द्या."

ब्राहीमचा निस्तेज चेहरा व कांपरा आवाज यांवरून त्याच्या अन्तः-

करणाला यावेळीं किती यातना होत असाव्यात याची उमरशेखला चां-गली कल्पना झाली; पण त्याबद्दल त्याच्या अन्तःकरणाला दयेचा पाझर तर फुटला नाहींच, उलट तो आनंदानें स्वतःचीच पाठ थोपटूं लागला. एक हजार रुपये गेल्याचें चांगलें सार्थक झालें असें त्याला वाटलें. तो अन्तःकर-णानें पिशाच होता म्हटलें तरी अतिशयोक्ति होणार नाहीं. त्यानें त्या आनंदाच्या भरांत इब्राहीमला उत्तर दिलें, " तुम्हांला एक आठवड्याची फुरसत देण्या इतकी जर मला सवड असती तर मीं इतकी घाई केलीच नसती. मला रकमेची फारच जरूर आहे. शिवाय, तुम्हांला सात दिवसां-तच काय; पण सात वर्षांतच तरी रकमेची जमवाजमव करतां येईल कीं नाहीं, याचा संशयच आहे. नसता मोठेपणा मिरविण्यांत काय अर्थ ! आणि माझा तरी अशा प्रकारें तोटा करण्यांत तुम्हांला काय मौज वाटते ? मनांत आणलांच तुम्हीं माझ्या रकमेची फेड करूं शकाल. तुमची स्थावर जंगम इस्टेट, घरदार, आणि सुंदर दासी यांच्या विक्रींत माझी रक्कम भरून येईल. मग निष्कारण आढेवेढे घेण्यांत काय अर्थ ! सवड देण्याइतका कोणताच अधिकार आतां माझ्या हातांत राहिलेला नाहीं. तुम्हीं काजीसाहेबांकडे चला अथवा हे इथे त्यांचे मदतनीस दौलतखानसाहेब आले आहेत त्यांना सांगा. त्यांनीं ही तुमची अट मान्य केल्यास माझी कोणतीच हरकत नाहीं."

सैतानाची उपासना करण्यापासून कोणताही फायदा होणार नाहीं हें इब्राहीम समजून चुकला. त्यानें एक अर्थपूर्ण दृष्टीनें दौलखानसाहेबांकडे पाहिलें. त्यांना त्या पहाण्याचा अर्थ समजल्यावरून त्यांनीं चटकन जबाब दिला. ते म्हणाले, " साहेब ! अशा प्रकारची कोणतीही सवलत देण्या-संबंधानें काजीनीं मला सांगितलेलें नाहीं. व तो अधिकारही माझ्याकडे नाहीं. तुमचा काळ फिरला आहे हें तुम्हांला अजूनही समजत नाहीं काय ? काजीसाहेबांनीं मला आणखी स्पेशल हुकूम दिलेला आहे, अर या कर्जाची ताबडतोब फेड झाली नाहीं, तर तुम्हांला कारागृहांत न्यावें. मग आतां तुम्हींच पहा; तुम्हांला कोणती तरी सवलत मिळणें शक्य आहे का ? "

खुद्द दौलतखानाच्या तोंडचे हे शब्द ऐकतांच इब्राहीमच्या सगळ्या आशा मातींत मिळाल्या. त्यानें मनांत म्हटलें, " हा सैतानी उमर, जाणून-बुजून मला कैद करूं पहात आहे, याच्यापुढें सामोपचाराची बोलणीं बोलून

काय उपयोग? हा आपल्या मनाप्रमाणें केल्यावांचून स्वस्थ बसणारच नाहीं. माझा यथेच्छ अपमान करून मला नामशेष करावा असाच याचा उद्देश आहे. माझ्या कसल्याही बोलण्याचा इथें कांहींच उपयोग होणार नाहीं."

यानंतर इब्राहीमच्या नेत्रांपुढें भावी कारागृहाचा भिषण देखावा दिसूं लागला. आपण जाडजूड शृंखलांनीं बद्ध झालों असून अंधाऱ्या कोटडींत पडलों आहों. अन्न पाणीही बंद आहे. उपास, अनास्था, आणि काळजी यांमुळें आपलें शरीर अस्थिपंजर बनलें आहे. खुनी, दरवडेखोर, बंडखोर, वाटमारे वगैरे मंडळी आपल्या सभोंवार बसली असून आपणाला निरनिराळ्या प्रकारचे प्रश्न विचारून थट्टा मस्करी करीत आहेत. आपण तोंडांतून एक शब्द काढल्याबरोबर कारागृहाचे शिपायी आपल्या पाठीवर चाबकाचे फटकारे लगावीत आहेत...अशा प्रकारचा तो देखावा कल्पनाचक्षुपुढें दिसतांच त्यांची गाळण उडाली. त्या हालांमुळें अतिशय दुःखित होऊन आपण विंकाळ्या फोडीत आहों असाही त्यांना भास झाला. इतकेंच नव्हे तर सर्वांगाला दरदरून घामही सुटला.

कल्पनेच्या सहाय्यानें दिसणारा हा भयंकर देखावा पाहून व सर्वांगाला फोडून काढणाऱ्या वेदना सहन करूनही इब्राहीम शुद्धीवर आला नाहीं. तो एकाद्या उन्मादवायू झालेल्या माणसाप्रमाणें मोठ्यानें ओरडून ह्मणाला, " उमर! तुझ्या सारख्या सैतानाची उपासना करून कोणताच लाभ होणार नाहीं हें उघड दिसतच आहे. प्रयत्न केल्यानें एखाद्या पाषाणालाही पाझर फुटणें शक्य आहे; पण तुझ्या सारख्याच्या कठोर अन्तःकरणाला थोडासुद्धां द्रव येणें शक्य नाहीं. यापुढें जगांत कोणाही माणसाची मी स्तुति करणार नाहीं, व प्रार्थनाही करणार नाहीं. मनुष्याच्या कृपेची मला जरूरच नाहीं. एका खुदाचेंच मला सहाय्य आहे. त्यानें माझ्या नाशिबांत जसें लिहिलें असेल तसें होईल. मला तें सहन केलेंच पाहिजे. मी कोणत्याही प्रसंगाला तयार आहें. मला माझ्या अशा स्थितींत इतक्या आकस्मिक रीतीनें पांच हजार मोहोरा कर्ज फेडणें अगदीं अशक्य आहे. दौलतखानसाहेब! आपणाला मिळालेल्या हुकुमाप्रमाणें मला आपण कारागृहांत घेऊन चला."

पण, या परीक्षेच्या वेळीं त्याच दिवाणखान्यांत नवाच एक अपूर्व देखावा

दिसण्याला सुरवात झाली. दाराच्या आड राहून सुंदरी दलिया बाहेर चाललेला सगळा प्रकार पहातच होती; पण इब्राहीमचें तें अखेरचें भाषण ऐकतांच ती बुरख्यानें तोंड झांकून घेऊन एकदम पुढें झाली. आणि गंभीर परंतु मृदुस्वरानें म्हणाली, " धर्मावतार काजीसाहेब ! माझे मालक मनाच्या क्षुब्ध मनोवृत्तीमुळें मागचा पुढचा कांहींही विचार केल्यावांचून बोलत असावे असें वाटतें. आकस्मिक संकटामुळें झालेल्या मानसिक क्षोभाचें हें लक्षण असावें असें वाटतें. त्यांनीं पूर्वीं माझ्याजवळ दोनहजार मोहोरा ठेविल्या होत्या त्या मीं येथें आंतल्या बाजूला ठेवलेल्या आहेत. यांना त्या ठेवीची कदाचित् आठवण नसेल; पण मलाही या प्रसंगीं तोंड मिटून बसणें गैर दिसतें. ह्मणून मी पुढें होऊन खरी स्थिति सांगत आहे. मलाही नुकतीच त्या रकमेची आठवण झाली, तेव्हां मीं ती येथें आंतल्या बाजूला आणून ठेविली आहे. तूर्त आपण एवढी रक्कम घ्यावी. आणि बाकीची रक्कम जमविण्यासाठीं त्यांना सात दिवसांची मुदत द्यावी. शिल्लक राहिलेली तीन हजारांची रक्कम ते ठरलेल्या मुदतींत आपणाकडे आणून हजर करतील. "

यावर दौलतखान, तिला समजण्याच्या हेतूनें ह्मणाला, " बिबीसाहेब ! कर्जाच्या बाबतींत जें कांहीं बोलावयाचें असेल तें तुम्हीं आपल्या या सावकाराशीं बोला. कारण त्यांना त्या गोष्टी समजल्या पाहिजेत. तेव्हां तुम्हीं हें उमरशेखाला सांगा. त्यांना जर तुमचें हें सांगणें पटलें तर माझी कोणत्याही प्रकारची हरकत नाहीं. "

दलिया अकस्मात् त्या ठिकाणीं आलेली पाहून उमरशेख अगदींच विस्मयविमुग्ध झालेला होता. त्याच्या हृदयांतील सगळ्या आशा यावेळीं जागृत झाल्यामुळें दलियेशीं दोन गोष्टी केव्हां बोलेन असें त्यालाही झालेलें होतें. तो मनांत म्हणाला, " हीच मला योग्य संधी सांपडली आहे. ही संधी जर मीं घालविली, तर पुढें केव्हांहि मला या सुस्वरूपीचा लाभ होणार नाहीं. तेव्हां जें कांहीं बोलायचें तें याच प्रसंगीं बोललें पाहिजे. "

उमरशेख सारख्या नीच मनुष्याबरोबर बोलावें असें दलियेच्या मनांत नव्हतें; पण काजीनींच हुकूम केल्यामुळें तिचा नाइलाज झाला आणि ती त्याला दीन स्वरानें म्हणाली,

" उमरसाहेब ! तुम्हीं जर यावेळीं दया केलीत तर माझ्या धनीसाहेबांना बाकीचें कर्ज फेडण्याला मुदत मिळणार आहे. तेव्हां तुम्ही एवढी गोष्ट मनावर घ्याच. "

उमरशेखचा चेहेरा खुलला. तो उत्साहपूर्ण स्वरानें म्हणाला, " सुन्दरी तुझी ही विनंती मला मान्य करतां येईल कीं नाहीं याचा थोडासा संशय आहे. कारण इब्राहीम साहेबांच्या मर्जीला आल्यास ते या वटकेलाही सर्व कर्ज फेडूं शकतील. मग त्यांनीं कां बरें विलंब लावावा ? माझा यांत काय दोष ? शिवाय दालिये ! तूं जर खरोखरच या तुझ्या धनीसाहेबांबद्दल आपल्या मनांत कळकळ बाळगीत असलीस, तर आत्मविक्रय करून तुला आपल्या मालकाच्या कर्जाची सहज फेड करतां येईल. "

उमरच्या तोंडचे हे शब्द ऐकतांच इब्राहीमचे नेत्र विजेसारखे चमकले, आणि तो क्रोधविकम्पित स्वरानें ह्मणाला, " उमरसाहेब या बाबतींत दालियेला आत्मविक्रय करतां येणें शक्य नाहीं. माझ्या वडलांनीं मरणाच्या पूर्वीं तिला दास्यत्वांतून मुक्त केलेलें आहे. अर्थात् ती पूर्ण स्वतंत्र आहे. अर्थात् माझ्यासाठीं ती आत्मविक्रय करण्याला बांधलेली नाहीं आणि असली सूचना तुम्हीं करणें हा तुमचा नीचपणा आहे. "

अशाप्रकारचें आपणाला उत्तर मिळेल, हें उमरशेख पूर्वीच जाणून होता. अर्थात् यावर द्यावयाचा जबाबही त्यानें पूर्वीच योजून ठेविलेला होता हें सांगायला नकोच. तो ह्मणाला, " इब्राहीमसाहेब ! तुम्हीं स्वतः तर कर्जाची फेड करीत नाहींच, पण उदारस्वभावाची एक दासी आत्मविक्रय करून तुम्हांला कर्जमुक्त करायला तयार झाली असतां तिलाहि आपण नसते अडथळे आणून त्या सत्कृत्यापासून मागें वळवितां, यावरून कर्जाच्या फेडीसंबंधानें आपणाला किती तळमळ लागलेली आहे, तें दिसतच आहे. तुमचें सगळें बोलणें निरर्थक असून बनावट आहे. हिला दास्यत्वांतून मुक्त केल्याच्या बाबतींत तुमच्याजवळ कांहीं कागदी पुरावा असल्यास तो या काजीसाहेबांसमोर हजर करा म्हणजे माझी व त्यांची खात्री होईल. नुसत्या गप्पा नकोच.

या बिनतोड मुद्द्यापुढें कोणता जबाब द्यावा हें इब्राहीमला सुचेना. घोटाळ्यांत पडला. कारण त्याच्याजवळ कागदी पुरावा असा

कांहींच नव्हतां. मात्र तो मनांत समजला कीं, या राक्षसाला दालिया पाहिजे असल्यामुळें तो शक्य तितके अडथळे आणल्यावांचून राहणार नाहीं. तिला आपल्या ताब्यांत घेण्यासाठीं त्याला जें कांहीं करतां येणें शक्य आहे तितकें तो करणार, हें इब्राहीम समजून चुकला आणि पुढें काय जबाब द्यावा याचा विचार करूं लागला.

तितक्यांत दौलतखान साहेब ह्मणाले, "इब्राहीम ! माझा अमोलिक वेळ या तुमच्या शाब्दिक झगड्यांत निष्कारण खर्च पडत आहे. माझ्यानें हें सहन करवत नाहीं. या दासीची जी किंमत ठरेल त्यांत जर तुम्ही कर्जमुक्त होत असाल, व कारागृहाच्या भयंकर यातनांतून तुमची सुटका होत असेल, तर त्यांत तुम्हीं कां अडथळा आणतां ? दासींचा क्रयविक्रय करणें ही चाल या देशांत चालू आहे. अर्थात् यांत विचित्र असें कांहींच नाहीं. या कर्जाच्या फेडीनंतर देवाच्या दयेनें तुह्माला चांगले दिवस आले तर आणखी एकादी सुंदर दासी खरेदी करावी! कांहीं असो, अमुकच अशा तऱ्हेनें वागा असें माझें सांगणें नाहीं. पण आतां ज्यास्त विलंब लावूं नका; मला तितका वेळ नाहीं."

दौलतखानाचें हें निष्ठुर बोलणें ऐकून इब्राहीमचे नेत्र लाल झाले. त्याच्या सर्वांगांतून तीव्र विद्युत्प्रवाह वाहूं लागला. त्याला आपला क्रोध आवरेना. तो मोठ्यानें ओरडून ह्मणाला, "नाहीं. नाहीं. माझा प्राण असेपर्यंत मी दालियेला सोडणार नाहीं. माझ्या जीवनाचें जीवन तीच आहे. मी खुदाची कसम खाऊन सांगतों कीं, हिला माझ्या वडलांनीं दास्यत्वांतून मुक्त केली आहे. अर्थात् हिला विकण्याचा हक्क मला नाहीं आणि केव्हांहि मी तिला विकूं शकणार नाहीं. दालिया संपूर्ण स्वतंत्र आहे. तिच्यावर माझा कोणताही अधिकार नाहीं. ती मर्जीला येईल त्या वेळीं वाटेल तिकडे जाऊं शकेल. मला माझ्या आयुष्यभर जरी कारागृहांत राहावें लागलें तरी मीं हरकत नाहीं. माझ्या सारख्या एका अकिंचन प्राणासाठीं या स्वर्गीय देवतेची विक्री होणें मला पसंत नाहीं. आणि मी ती केव्हांहि होऊं देणार नाहीं."

इब्राहीमची ही उन्मादावस्था पाहून दौलतखानसाहेबांना फार वाईट वाटलें; पण त्यांना या बाबतींत कांहींच सवलत देतां येण्यासारखी नव्हती.

ते हुकुमाचे ताबेदार होते. त्यामुळें हा प्रसंग शक्य तितक्या लवकर आटो-पून आपण निघून जावें या विचारानें ते सहानुभूतिपूर्ण स्वरानें म्हणाले, " इब्राहीम साहेब, आपण सांगतां तसेंच कां होईना! ही दासी आपल्या दास्यत्वांतून मुक्त झालेली आहे असें जरी असलें तरी तिला स्वतःची विक्री करायला कोणत्याहि प्रकारची हरकत नाहीं. ती स्वतः आपणाला विकून तुमचें कर्ज फेडीत आहे. मग तुम्हीं तिला अडथळा कां करावा? "

दौलतखानाचें हें बोलणें ऐकून दालियेचें सुप्त अन्तःकरण खडबडून जागें झालें. तिच्या हृदयावर नवा प्रकाश पडला. ती मनांत म्हणाली, " या अवाढव्य जगांत मी म्हणजे एक अगदीं क्षुद्र आणि निरुपयोगी जीव आहे! ना कूळ ना गोत्र अशी माझी स्थिति! धनीसाहेब जर कर्जाच्या पायीं कारागृहांत गेले तर मग मला आश्रय कोणता राहिला? मग माझें हें जीवन काय कामाचें? मी कुणासाठीं जगूं? प्राण निघून गेल्यावर निरुपयोगी देहाचा उपयोग काय? मी स्वतंत्र आहें अर्थात् मला माझी विक्री करतां येणें शक्य आहे. मीं दहा हजार मोहोरांना विकून घेऊन धन्याला कां सुखी करूं नये. बस्स ठरला विचार. बाजार तेजीचा आहे. मी यांत कोणतेंहि वाईट कृत्य करीत नाहीं. खुदाचें मला सहाय्य आहे. तो माझ्या मनाविरुद्ध कोणतीहि गोष्ट होऊं देणार नाहीं माझ्या आत्मबलिदानानें जर देवतुल्य इब्राहीम साहेबांना कर्जाची फेड करतां येत असेल व ते ऋण-मुक्त होत असतील तर मी स्वस्थ बसून काय उपयोग! या देहाचा एरव्हीं तरी काय उपयोग आहे? सैतानाच्या भयंकर जाचांतून जर देवाची मुक्ती होत असेल तर मीं कां करूं नये? माझा खरा आनंद यांतच आहे. कर्तव्य पालनाचा असला सुंदर प्रसंग मला आणखी कधीं मिळणार?- "

अशा प्रकारचा विचार करून दालिया आपल्या नैसर्गिक मधुर स्वरानें दौलतखानाला म्हणाली, " जनाब! धर्मावतार! दास्यत्वाच्या मुक्ती संबंधानें मला कांहींच माहिती नाहीं. मी अजूनही यांची-इब्राहीम साहेबांची दासीच आहे. थोरल्या धनीसाहेबांनीं माझ्या मुक्ततेसंबंधानें सहजोद्गार काढले होते खरे; पण त्या बाबतींत कागदपत्र वगैरे कांहींच झालेले नाहींत. तेव्हां माझ्या दास्यत्व मुक्ती संबंधानें कोणतीहि-बाब कायदेशीर नाहीं—"

हृदयाच्या आवेगा सरशी इतकें भाषण केल्यावर तिनें आपल्या तोंडावरचा बुरखा दूर केला; मात्र तसें तिनें कां केलें हें तिचें तिलाच माहीत ! त्या तिच्या सौंदर्याच्या प्रभेनें तो दिवाणखाना प्रकाशित झाला म्हटलें तरी चालेल. उमर, आसगर, काजीचे शिपायी, आणि दौलतखान हीं सगळीं चकित होऊन थिजल्यासारखीं तिच्या तोंडाकडेसच पाहात राहिलीं.

उमर मनांत म्हणाला, " या सौंदर्याच्या मोबदल्यांत जरी मला भिकारी व्हावें लागलें तरी हरकत नाहीं. इतक्या जवळून या भुवनमोहिनीचें स्वरूप मीं कधींच पाहिलें नव्हतें. आजच्या शुभ दिवशीं प्रिय सौंदर्य दर्शनानें मी पुनीत झालों असल्यामुळें मला आतां पैशाची किंमत वाटेनाशी झाली आहे. आहाहा ! काय हें सौंदर्य ! एक पैही न घेतां हिच्या मोबदल्यांत मी इब्राहीमला ऋणमुक्त करायला तयार आहें. मात्र दलिया माझी झाली पाहिजे. "

आपल्या सौंदर्याच्या योग्य तोच परिणाम सर्वांवर झालेला पाहून दलियेला समाधान वाटलें.ती गंभीरपणानें म्हणाली, " माझ्या स्वतंत्र कार्याला कोणत्याही रीतीनें अडथळा करण्याचा अधिकार इब्राहीम साहेबांना नाहीं हें मी स्पष्टपणें सर्वांना सांगत आहें. मी माझ्या मर्जीप्रमाणें मी माझी व्यवस्था करूं शकेन. मला आत्मविक्रय करण्याचा पूर्ण अधिकार आहे. असें तुम्हीं सर्वांनीं गृहीत धरावें. इब्राहीम साहेबांना कर्जमुक्त करण्यासाठीं मी पुन्हां एकवार माझी विक्री करायला तयार आहें. कारण एका दासीपेक्षां अबू अयुबसारख्या नामांकित सावकाराचें नांव राखणें हेंच समंजस मनुष्याचें कर्तव्य आहे.तव्हां उमर साहेब ! मला. विकत घ्यायला आपण तयार असाल तर माझी किंमत काय द्याल तें जाहीर करा पाहूं ! विलंब नको. "

दलियेचा हा प्रश्न ऐकून उमरशेखला अतिशय आनन्द झाला. तो हर्षोत्फुल्ल होऊन म्हणाला, " तूं देत असलेल्या दोन हजार मोहोरा स्वीकारून तुझ्या मोबदल्यांत इब्राहिम साहेबांना ऋणमुक्त करायला मी तयार आहें. म्हणजे मी तुझी तीन हजार मोहोरा किंमत देतों. तूं माझी दासी हो. झालीस कीं, इब्राहीम ऋणमुक्त झाला. "

दालिया कांहीं वेळ विचार करून नंतर म्हणाली, "नाहीं साहेब! थोरल्या धनीसाहेबांनीं माझा मोबदला, दहा हजार मोहोरा ठरविला असल्याचें मला आठवतें. कारण तितकी किंमत आल्यास मला विकण्याचा त्यांचा विचार होता. तेव्हां मला तुमच्याकडून दहा हजार मोहोरा तरी मिळाल्या पाहिजेत. तेवढ्या मिळत नसतील तर मी स्वतःला विकून घ्यायला तयार नाहीं."

एकदम दहा हजार मोहरांचें नांव ऐकतांच उमरशेखच्या हृदयाला धक्काच बसला. एका दासीसाठीं इतकी रक्कम खर्ची घालणें म्हणजे आपलें मरणच होय असें त्याला वाटलें. सौंदर्य असलें म्हणजे एकाद्या दासीची किंमत इतकी वाढू शकते काय?

पण याच वेळीं सैतानानें त्याला कानमंत्र सांगायला सुरवात केली, त्याच्या विकसित शक्तीपुढें उमरचें काय चालणार! सैतान त्याला म्हणाला "तुझ्या सारखा अक्कलशून्य कृपण मनुष्य कुणींच कधीं पाहिला नसेल. पैसा घेऊन काय तूं स्वर्गाला जाणार आहेस? मरते वेळीं तुला एक पैही बरोबर नेतां येणार नाहीं. तूं आजपर्यंत यथेच्छ पैसा मिळविलास! श्रम सहज करणें आणि दुःखाकष्टानें पैसा सांठविणें हें जसें तुला शक्य वाटतें तसेंच त्या पैशाचा उपभोग घेणें तुला योग्य वाटत नाहीं काय? मोठमोठे अमीर उमराव या दालियेसाठीं धडपड करीत आहेत; पण ती त्यांना न मिळतां केवळ दहाहजार मोहोरांच्या मोबदल्यात तुला मिळत आहे मग तूं ही सोन्यासारखी चालून आलेली संधी कां गमावतोस बरें? पैशांच्या दृष्टीनें पाहिलें तर या पुढें तुला कोणतेंही सुख मिळणें अशक्य आहे असें वाटत नाहीं. वाटल्यास तूं या दहा हजार मोहोरांच्या वीस हजार मोहोराही करूं शकशील. तुला पाहिजे तेव्हां हिची विक्री करतां येईल. दिल्लीचा बादशहा हिच्याबद्दल तुला पाहिजे तेवढी रक्कम देईल. कारण असलें रत्न जनानखान्याची शोभा वाढविण्यालाच ज्यास्त उपयोगीं पडतें. तूं एवढ्या मोठमोठ्या उलाढालीची कामें करतोस; आणि या ठिकाणींच तुझी अक्कल चालूं नये. चल या कार्याला विलंब करूं नको. कदाचित् पश्चात्ताप करण्याचीही पाळी यायची!"

हा सैतानी कानमंत्र त्याला चांगलाच मानवला. तो मनांत म्हणाला

'काय होईल तें होवो. हें दहा हजारांतच पुरें व्हावयाचें असेल तर तसेंच का होईना !"

निष्कारण विलंब होत असलेला पाहून दौलतखान हा अस्वस्थ होत चाललेला होता. तो कांहींसा रागानेंच म्हणाला, " उमर साहेब ! मी आहे सरकारी नोकर ! तुम्हाला कांहीं कामें नसतील; पण मला पुष्कळ कामें आहेत ! शिवाय मी तुमचा नोकरही नाहीं. तुम्हां सावकार लोकांना वेळाची किंमत नसते; पण आम्हाला मिळालेल्या वेळांत अनेक कामें करावयाचीं असतात. तेव्हां तुम्ही हें आपलें काम शक्य तितक्या लवकर आटपा. पैशांची घासाघीस व तडजोड करण्यासाठीं मी आलों नाहीं. मला हुकुमाची अंमलबजावणी करावयाची आहे."

दौलतखानाकडून अशा प्रकारें धमकी मिळतांच उमर थोडासा घाबरून म्हणाला " दालिये, माझ्यावर थोडीशी दया कर. मी तुला सहा हजार मोहोरा द्यायाला तयार आहें."

दालिया म्हणाली, " मला जें कांहीं बोलायचें तें मी एकदांच बोलत असतें. तेव्हां जी मीं एकदां किंमत सांगितली त्यांत एक पैही कमी होणार नाहीं. या बाबतींत मीं तडजोड करीन असें तुम्हीं केव्हांही मनांत आणूं नका."

शेवटीं उमरशेख निरुपायानें दालियेच्या म्हणण्याला कबूल झाला. त्यानें येतेवेळीं सोबत रक्कम आणलेली होतीच. कारण दुसऱ्या एका कुळाला त्यानें दहा हजार मोहोरा देऊं केल्यामुळें तेवढी हुंडी लिहून त्यानें आपणाबरोबर घेतली होती. अर्थात विलक्षण योगायोगानें तिचा उपयोग या खरेदींत त्याला करण्याचा प्रसंग आला. आपल्या कांपऱ्या हातांनीं—कृपण मनुष्य केव्हांही समाधानपूर्वक कुणाला पैसा देत नसतो—त्यानें ती हुंडी दौलतखानाच्या स्वाधीन केली आणि म्हटलें, " आपण स्वतः येथें असून काजीसाहेबांइतकीच आपली योग्यता आम्हीं मानतों. ही दहा हजारांची हुंडी आहे. माल ही दासी माझी झाल्याबद्दल योग्य तो लेख इब्राहिमकडून घेण्याला आपण जबाबदार आहां."

दौलतखानानें उत्तर दिलें, "इब्राहीमसाहेबांच्या ऋणमुक्तीसंबंधानें होणारे कागदपत्र याच संबंधानें होणार असल्यामुळें तें उदईक तुम्हांला मिळतील.

कारण ते काजी साहेबांकडे आहेत. त्यांत झालेली विक्री व वसूल झालेली रक्कम नोंदून इब्राहीम साहेबांना ऋणमुक्तीचा दाखला दिला पाहिजे. यांत त्याच वेळीं आपल्याही खरेदी पत्राची व्यवस्था करण्यांत येईल. दालिये नांव नोंदलें जाणारच आहे तेव्हां तुम्हाला स्वतंत्र कागदपत्राची मुळीं जरूरी नाहीं. "

आतां उमरशेखला बोलण्यासारखें कांहींच राहिलें नव्हतें. तेव्हां तो दलिये कडे वळून हुकुमी आवाजांत ह्मणाला, " तर मग दलिये, आतां तुला येथें राहण्याचें कारण नाहीं. चल माझ्याबरोबर आमच्या घरीं ! "

दलियेला हें त्याचें बोलणें दुःखकारक वाटलें; पण ती शहाणी होती. ती तें सहन करून ह्मणाली " धनीसाहेबांचा कर्जरोखा व गहाणखत जें कांहीं तुमच्याकडे असेल तें आधीं माझ्या जवळ द्या. त्यांचें कर्ज किती आहे, आणि कागदांत काय लिहिलें आहे तें आधीं मला पाहिलें पाहिजे. "

उमरशेखनें कागदपत्र बरोबर आणलेच होते. तिनें तसें म्हणतांच त्यानें आपल्या जवळचे कागद तिच्या हातांत दिले. लागलीच तिनें ते फाडून त्याचे तुकडे तुकडे करून दूर भिरकावून दिले आणि सद्गदीत स्वरानें म्हटलें, " खरोखर आज माझे देवतुल्य प्रभू इब्राहीम साहेब तुमच्या सारख्या एका निठुर व्यक्तीच्या तोंडांतून सुटले ! तुमच्या सारख्या व्यक्ति जगांत किती असतील कोण जाणे ! अशल्या या राक्षसांचा भूभार हलका करायला एखादा अवतार तरी होवो म्हणजे झालें ! "

नंतर ती खिन्न चेहऱ्यानें व थरारणाऱ्या अन्तःकरणानें ती दहा हजार रकमेची हुंडी इब्राहीमच्या पायांशीं ठेवून अश्रुपूर्ण नेत्रांनीं ह्मणाली, साहेब ! आपण अन्तःकरणानें देवासारखे आहां आणि तसेंच मी आजवर मानीत आहे. पुढें जिवंत राहिल्यासही तसेंच मानीन; पण आतां मला शेवटचा निरोप द्या. इतके दिवस आपण कृपाळु होऊन माझें पालन पोषण केलें व आपल्याच दयाळु व्यवहारानें मीं सुखाचा उपभोग घेतला. आज आपणच वाढावेळेला हा देह विकून मी माझ्या देवाला संकटमुक्त करीत आहें. माझ्या या आत्मयज्ञानें जर आपण सुखी झालां तर मला सार्थकता वाटेल. आपले हे. दुःखाचे दिवस असेच कांहीं कायमचे राहाणार नाहींत.

याची कृपा झाल्यास कदाचित् पुन्हांही मला या चरणाचा आश्रय मिळे-
कारण देवाचा भक्त कधींही सैतानाची पूजा करूं शकणार नाहीं."
इब्राहीमनें ती हुंडी दूर फेकून म्हटलें, "तूं कुठेंच जाऊं नको दालिये.
ऱ्या हृदयावर जबरदस्त आघात करून तुझ्यानें जाववेल का ? मी माझ्या
राध्य देवतेची विक्री करून सुखी होऊं ! माझ्या सुखाचा ठेवा दुसऱ्या-
। स्वाधीन करून मला आनंद वाटेल असें तुला वाटलें तरी कसें ! तूं
झ्या देहाची संजीवनी शक्ति आहेस ! तुझ्या आत्मयज्ञानें मी संतुष्ट
सें होईच का माझी योग्यता तूं ठरविलीस ? नाहीं. दालिये ! या बाबतींत
ी अंतर्दीच चुकीची समजूत झाली आहे. कर्जाची फेड करूं शकलों
हीं तर मला कारागृहांत जावें लागेल ? पण सहा महिन्यांनीं परत येईन.
ऱ्या विरहयातनांपेक्षां कारागृहांतील दुःख कांहीं ज्यास्त नाहीं. तूं
जीस कीं घरांत अंधार पडेल आणि मलाही हें जीवन नकोसें होईल.
दाचित् मी वांचणार नाहीं."

त्याच्यानें जास्त बोलवेना. त्याचा गळा शुष्क झाला आणि नेत्र आरक्त
दिसूं लागले. हृदयांत भयंकर तुफान माजलें. त्याच्यानें त्या वेदना सहन
रवेनात. तो बोलतां बोलतां बेशुद्ध झाला. दालिया घाबरली. मुबारकही
ांबला. दोघेही त्याची शुश्रूषा करूं लागलीं. त्यांना स्थल कालाचीही
िस्मृति पडली असावी असें वाटलें. कारण त्यांनीं इकडे तिकडे न पहातां
ालो तसाच उचलला आणि आंतील खोलींत असलेल्या बिछान्यावर
ऊन ठेवला. तेथें योग्य उपचार झाल्यानंतर बऱ्याच वेळानें तो कांहींसा
ुद्धीवर आला. तरी त्याचे ओठ कांपत असून डोळे झांकलेलेच होते. चेहे-
ऱ्यावरचाही शोक संताप मुळींच कमी झालेला नव्हता.

हा सगळा शोचनीय प्रकार पाहून उमरखैय्याच्या पाषाण हृदयांत काय विचार
येत होते ते सांगणें कठीण आहे. तरी त्याच्या चेहेऱ्यावरचा भयविव्हळपणा
ाहून तोहि या प्रसंगानें बराच कावऱ्यांत पडला असावा असें म्हणायला
रकत नाहीं.

दौलतखानाला मात्र हा होत असलेला विलंब मुळींच सहन होईना. तो
किंचित् तीव्रस्वरानें म्हणाला, "दालिया बिबी ! माझ्या कामांत तुम्हीं निष्कारण
व्यत्यय आणणार नाहीं अशी मला आशा आहे. तुम्हीं एकदां बाहेर या पाहूं.

दौलतखानाची ती हांक ऐकतांच दलिया दचकली आणि भयभीत झालेल्या हरिणीप्रमाणें इकडे तिकडे पहात मुबारकाला हळूच म्हणाली, " भाई मुबारक ! यांना आतां तूंच सांभाळ. माझें आतां काय होईल मला कांहींच सांगतां येत नाहीं. ही शेवटचीच भेट आहे असें म्हटलें तरी हरकत नाहीं. माझ्यावर तुझे पुष्कळ उपकार झाले आहेत; पण ते फेडण्याचें सामर्थ्य माझ्यांत नाहीं. तुझें उपकाराचें ऋण घेऊनच मला जावें लागत आहे. तरी पण शक्य तितक्या लवकर माझी एकवार तरी भेट घे. जुलसखानाजवळून तुला माझी बातमी समजेल. ही हुंडी तुझ्याजवळ ठेव. काल रात्रीं तुझ्या जवळ दिलेल्या रकमेंतून धनीसाहेबांचें किरकोळ कर्ज फेडून टाक. व हुंडी गुप्तपणानें बटावून यांचा रोजचा खर्च चालीव. यांना थोडेंसें सुद्धां दुःख होईल असें वर्तन करूं नको. सांभाळून राहा. दोघां-च्याही प्रकृतीला जपून उद्योग धंदा कर ! माझा देह इथून जात आहे; पण मनाला कांहीं इथून जावेंसें वाटत नाहीं. पुढें काय होणार कुणाला माहीत! बरें तर येतें मी ! "

इतकें झाल्यावर ती तेथें न थांबतां बाहेर आली आणि काजीजवळ जाऊन म्हणाली, " ही माझी तयारी आहे. चला, पण मला आतां कुठें घेऊन जाणार ? उमर शेख, आजपासून तुम्हीं आतां माझे धनी झालां; पण हुकूम करतांना आपलें हृदय मात्र शाबूत ठेवा ! त्याला कोणत्याही प्रका-रची विकृति होऊं देऊं नका. "

मुबारक यावेळीं आपल्या मालकाच्या शुश्रूषेत गढून गेला होता. नाहीं तर उमरशेखशीं त्याचे दोन हात झाल्यावांचून राहाते ना. त्याला उमराचा राग आला होता; पण धन्याला तशा त्या स्थितींत सोडून त्याच्यानें येववेना त्यामुळें ती वेळ टळली. कदाचित् भलताच प्रसंग ओढवला असता. ईश्वरी नेमानेम ! मनुष्याच्या हातांत काय आहे ?

---

# प्रकरण १५ वें.

## ' दलिया कुठें आहे. '

" माझी दलिया कुठें आहे ? "

" साहेब ! आपण तिची काळजी करूं नये. "

मी किती भयंकर देखावा पहात होतों मुबारक ! खरं सांग दलिया कुठें आहे ? "

" ती या घरांतच आहे. "

" खोटी गोष्ट. मुबारक ! तूं आपल्या आयुष्यांत कधींही खोटें बोलला नाहींस, मग आजच कां बरें खोटें बोलतोस ? जर ती या घरांतच आहे, तर मी इतका आजारी असतांही यावेळीं त्या करुणा देवीनें माझ्या बिछान्याजवळून दूर व्हावें काय ? माझ्या बाबतींत ती इतकी निष्काळजी आहे!"

" प्रभो ! दयाळू अन्तःकरणाच्या प्रभो ! –" मुबारकाच्यानें पुढें बोलवेना. त्याला गहिंवर आला. तो आपले डोळे पुसून म्हणाला, " ती हकीगत सांगूं लागल्यास माझी छाती फाटून जाईल हुजूर ! "

इब्राहीम हृदयभेदक दीर्घ निश्वास सोडून म्हणाला, " तूं कशाला सांगायला पाहिजे मुबारक ! तूं सांगितल्यावांचून मीं सर्व कांहीं जाणलें आहे ! तिच्या त्या शेवटच्या भेटीनेंही माझ्या दगडी अन्तःकरणाचा बांध फुटला नाहीं, मी जिवंत राहिलों. ! यावरून मी कितीही भयंकर दुःख सहन करायला तयार आहें असें नाहीं का तुला वाटत !! हृदयाला दगड बांधून मला आतां सगळें कांहीं दुःख तयार केलें पाहिजे. मला आतां कसलीही आशा राहिली नाहीं. सांग मुबारक ! पुढें काय झालें तें तरी सांग. " इब्राहीमच्या तोंडून शब्द उमटेना. त्याच्या डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले. शुभ्र बिछाना अश्रूंनीं भिजून गेला. त्याचा चेहेरा दुःखाश्रूंनीं चमकूं लागला आसवें पुसण्याची त्याला शुद्ध राहिली नाहीं. दुःखानें त्याच्या रक्ताचें पाणी होऊन तें नेत्रावाटें अश्रूंच्या रूपानें बाहेर पडत होतें.

त्यानें तोंड फिरविलें आणि मोठ्या कष्टानें अश्रू पुसले. पुन्हां त्यानें

एकही प्रश्न मुबारकाला विचारला नाहीं. मुबारकाचेहि नेत्र शुष्क नव्हते. हकीमानें दिलेलें औषध मोठ्या मिनतवारीनें तो इब्राहिमकडून घेववी; पण त्याला सांत्वनाचे दोन शब्द त्याच्यानें सांगवत नसत. कारण त्याच्याही नेत्रांतूनही अश्रू वाहतच होते. तो पथ्याचें करण्यांत आळस करीत नसे; पण क्षणोक्षणीं त्याला दालियेची आठवण होई, व तो भ्रमिष्टासारखा इकडे तिकडे पाही. दिवा जळत असतांही त्याला काळोख आहेसें वाटे. काय करतो बिचारा ! धन्यांसाठीं एकटाच सर्व कांहीं करीत होता.

इब्राहीम स्वस्थपणानें राहिलेला पाहून व पथ्याची वेळ झालेली लक्षांत आणून मुबारक हळूच त्या खोलींतून बाहेर पडला. त्याला पथ्यासाठीं स्वयंपाकघरांत जाणें भाग होतें.

तो गेल्यानंतर इब्राहीमनें डोळे उघडले आणि उदास दृष्टीनें एकवार त्या खोलींत चोहोंकडे नजर फेंकली. प्रत्येक ठिकाणीं दालियेची आठवण करून देणारें कोणतें ना कोणतें स्मृति चिन्ह असल्याचें त्याला दिसून आलें. कारण त्या खोलींतील सर्वच चीजवस्त तिच्या हातानें ठेवण्यांत आलेली होती. खोलीची शोभा वृद्धिंगत करणारा तिचा हात त्याला ज्या त्या ठिकाणीं दिसूं लागला; पण हाय ! ती यावेळीं कुठें असेल बरें ?

तो अस्पष्ट स्वरानें आपल्याशींच बोलूं लागला, " मी आतां कसली म्हणून आठवण करूं ! माझें सर्वस्व ती होती. ती नसल्यामुळें हा देह प्रेतासारखा झाला आहे. माझ्या नेत्रांतील तेज, नाकाचा निःश्वास, हृदयांतील प्राण, आणि धमन्यांतून वाहणारें रक्त सर्व कांहीं माझी दालिया होती. रोगाचें औषध तीच. हृदयाला होणाऱ्या वेदनाचें सान्त्वन करणारी तीच माझ्या आरोग्याची जीवनशक्तीही तिच्यावांचून दुसरी कोणीही नाहीं. माझी आशा, माझा आनंद आणि प्रकाश सर्व कांहीं दालिया ! होय ! एक क्षणभरही तिला मी माझ्या डोळ्यांसमोरून दूर करीत नव्हतों तिला मी कायमची कशी सोडूं बरें ?

" तिनें माझ्यासाठीं काय केलें नाहीं? स्वतःचें सर्वस्व देऊन तिनें माझा जीव बचावला. आत्मविक्रयानें एका सैतानाच्या ताब्यांत जाऊन तिनें मला कारागृहांच्या यातनांतून व यामुळें होणाऱ्या अपमानजनित दुःखांतून वांचविलें. छायेप्रमाणें माझ्याजवळ राहून तिनें आज्ञा पालन करण्यांत आजपर्यंत

तें सर्व आयुष्य घालविलें. मी सुखी व्हावें आणि माझी एकनिष्ठपणानें सेवा करितां यावी म्हणून तिनें मला सर्वस्व अर्पण केलें होतें. तिचें सुख, दुःख, स्वार्थ, महत्वाकांक्षा सगळें कांहीं माझ्यासाठीं होतें. देहावांचून तिचें स्वतंत्र असें कांहीं नव्हतेंच म्हटलें तरी चालेल.

" यामुळें या जगांतील कोणाही मर्त्य व्यक्तीशीं तिची तुलनाही करतां येणार नाहीं. ती रूपानें तशी गुणानींहि अतुलनीय असल्यामुळें तिला रमणीय-कुल-भूषण असें नांव दिलें असतां तें गैर होणार नाहीं. इतके अपूर्ण गुण, असलें अतुलनीय सौंदर्य, देवदुर्लभ असा उदारपणा, आणि विलक्षण आत्मसमर्पण इतक्या लोकोत्तर सद्गुणाची मूर्तिमंत देवता अशी दलिया, खुदा ! माझ्याकडे कशाला बरें पाठविलीस ! आणि मला अभाग्याला ही कधींही न मिळणारी देणगी देऊन ती कां बरें हिरावून घेतलीस ? मी अमीर होतों, पण फकीर बनलों आणि लोकमान्य अशा कीर्तिवंताचा मुलगा असून लोकांच्या उपहासाला पात्र झाल्यामुळें उघड्या रस्त्यावर लोक माझा अपमान करूं लागले; पण प्रभो ! मी हें सर्व दुःख त्या देवतेच्या निरुपमेय चेहेऱ्याकडे पाहून तें सगळें सहन करीत होतों. जगण्याचा कंटाळा येऊन कितीदां तरी आत्महत्त्येचा विचार माझ्या मनात आला; पण तिच्या त्या चेहेऱ्याकडे पहातांच माझे ते विचार कुठच्याकुठें नाहींसे होत असत. तिच्याकडे पहातांच मला जगावेसें वाटे; पण हाय ! जगन्नियंत्या प्रभो ! ती माझी जीवनदेवता मला आतां कायमची अंतरली ! ! माझी आशा नाहींशी झाली. माझा आनंद लयाला गेला आणि जीवनशक्ति लोपली ! ! ! माझी दलिया माझ्याजवळून निघून गेली. माझें सांत्वन आतां कोण करील ? आणि माझें आतां राहिलें आहे तरी काय !

" हाय ! पहातां पहातां हा एक दिवस निघून गेला ! काल याच वेळीं देदीप्यमान अपराण्हीं ती माझ्या नेत्रांना आणि हृदयाला आनंदवीत जवळ उभी होती; पण आज ! आज ती नाहीं. आज मला तरी निदान तिचा अस्त झाला. त्या सैतानाची निष्ठुरता आणि उपेक्षा तिला कशी जाचक होत असेल आणि तिच्या सुंदर नेत्रांतून किती अश्रू गळत असतील कोण जाणे ! देवा ! अशा रीतीनें माझी आणि तिची ताटातूट व्हावी ना ? प्रचंड सूर्याचा तीव्र तापानें फुललेलें फूल कोमेजून जावें त्याप्रमाणें त्या

माझ्या कुसुमकोमल दलियेची स्थिती झाली असेल ! भीतीनें आणि परतंत्रतेनें ती मेल्याहूनही मेली होईल ! तिला मोठ्यानें दीर्घ सुस्कारेंहि सोडतां येणार नाहींत ! ! आणि कधीं न केलेली कामें करण्याचा प्रसंग आल्यास ती धाय मोकलून रडत बसेल ! छे. छे ! मला हें दुःख आतां मुळींच सहन होणार नाहीं. माझें हृदय फुटून जाईल. यापेक्षां माझ्या जाणीव शक्तीचाच लोप होईल तर फार उत्तम ! प्रभो तेवढी तरी माझ्या-वर कृपा करा !

विचारांच्या असह्यतेमुळें इब्राहीमला ग्लानी आली आणि तो डोळे मिटून स्वस्थ पडला. त्याचा श्वासोच्छ्वासही मन्दपणें चालला होता. याच-वेळीं एका कांचेच्या पेल्यांत किंचित असें आटीव दूध घेऊन मुबारक आंत आला आणि शांतपणानें पडलेल्या आपल्या धन्याला हळूच ह्मणाला, " साहेब ! ह्मापला काय ? प्रत्येक घटकेला थोड थोडें गरम दूध घेण्या-बद्दल हकीमानें सांगितलें आहे. हें दूध घ्या. दूध घेतल्यावर पुष्कळ बरं वाटेल. "

इब्राहीमला कांहीं झोंप लागली नव्हती. मुबारकचें बोलणें ऐकतांच त्यानें लागलेच डोळे उघडले आणि क्षीण स्वरानें म्हटलें, " मुबारक ! या जग-ण्यांत कांहीं आतां सुख आहे असें मला वाटत नाहीं. माझें हें सगळें आज-पर्यंतचें जीवनच मुळीं निराशेंत मग्न झालेलें दिसतें. मी पुष्कळ सुखें भोगलीं; पण मुबारक तीं सुखें नव्हतीं. तो भ्रम होता. ती दिशाभूल होती. आज माझे डोळे उघडले. दलियेच्या वियोगानें मी शुद्धीवर आलों. रंगविलासासाठीं जमलेले मित्र आणि मैत्रिणी आपला खजिना भरून व माझा खजिना रिता करून चालत्या झाल्या; पण त्या झगझगीत प्रकाशांत न दिसणारी स्निग्ध ज्योतिरूप जीवन देवता दलिया आपला ती अक्षय्यचा प्रकाश नाहींसा करून चालती होतांच मी अंधारांत पडलों. या देवतेची आराधना केली असती तर मला आजचा हा प्रसंग अनुभवावा लागला नसता; पण जिवाभावाचें पांघरूण घालून मला जपणारी ही देवता मला त्यावेळीं दिसली नाहीं रे मुबारक ! आणि आतां मला पश्चात्ताप होत आहे तो त्या गोष्टीचाच. आतां हें जीवन मला भारभूत वाटत आहे. प्राण तर केव्हांच निघून गेला. हा देह तरी आतां कशाला पाहिजे ? मुबारक, तूं पहात आहेस ही त्या इब्राहीमची छायामूर्ति आहे. तेव्हां मी हा असाच

देह सोडून जातों. मला खाणेंपिणें कांहीं नको. मला आतां जगावेंसें वाटतच नाहीं मुळीं."

आपल्या यालकाचें हें हृदयद्रावक भाषण ऐकून स्वामिनिष्ठ मुबारकाच्या डोळयांत पाणी आलें तो सद्गदीत होऊन म्हणाला, "साहेब शांत व्हा. शांत व्हा. संकटाच्या वेळीं आणि दुःखाच्या वेळीं धैर्यासारखा खरा मित्र नाहीं. हेहि दिवस जातील ! मी आपल्यासाठीं एक फारच चांगली बातमी आणली आहे."

इब्राहीम आशापूर्ण नेत्रांनीं मुबारकाच्या तोंडाकडे पाहात क्षीण स्वरानें म्हणाला, "कसली चांगली बातमी आणणार तूं मुबारक ! आतां जगांत माझा कसला चांगलेपणा राहिला आहे."

"दलियेबद्दलची आपण अगदीं काळजी करूं नये."

"कां बरें ! तुला तिच्याकडून कांहीं निरोप आला होय ?"

"आतांच जुल्फखान आला होता."

"तो फारच चांगला मनुष्य आहे मुबारक ! ईश्वर कुणाच्या तरी तोंडीं उभा राहतो म्हणतात तें खोटें नव्हे. एका सैतानाचा नोकर असला तरी त्याचा चांगुलपणा दुःखी मनुष्याचें शांतवन करण्याला पुरेसा आहे. त्यानें काय सांगितलें बरें ?"

"पण प्रथम तुम्हीं हें दूध घ्या. मग मी दलियेकडून आलेलें पत्र आपल्याजवळ देतों. तिनें आपल्यालाच अगत्यपूर्वक देण्याबद्दल एक पत्र दिलें आहे."

इब्राहीमच्या तोंडांत अमृतच पडलें. मुबारकाच्या तवढ्या शब्दानींच त्याला नवजीवन मिळालें, आणि त्याचा चेहरा प्रफुल्लित होऊन तो उठून बसला. आणि दोन्ही हात पसरून म्हणाला, "मुबारक, मी तें दूध मागाहून पितों. तूं आणशील तितकें दूध पितों; पण आधीं मला तें पत्र दे पाहूं. तें पत्र पाहिल्यावांचून मला समाधान वाटणार नाहीं. दे, आतां विलंब लावूं नका."

मुबारकाला आपल्या धन्याचा उतावळा स्वभाव माहीत होता अर्थात आपल्याजवळचें दालियचें पत्र त्याच्या हातांत दिल्यावांचून तो आपलें कांहीं ऐकणार नाहीं. ही त्याची खात्री झाली, अर्थात नुकतेंच आणून दिलेलें गुप्त पत्र त्या इमानी नोकराला आपल्या शोकसंतप्त धन्याच्या हातांत देणें

भाग पडले. दुधाचा पेला बाजूला ठेवावा लागला हें सांगायला नकोच. इब्राहीमच्या दृष्टीनें तें पत्र हाच अमृताचा पेला होता. त्याला त्या पत्रा-पुढें दुधाची कसली किंमत ?

दरिद्र्याला द्रव्याची रास पाहून जसा आनंद होतो तसाच तें पत्र पाहून इब्राहीमला झाला. भुकेल्याल्या पंचपक्वान्नाचें ताट मिळालें असतां तो जशी त्या ताटाला अधाशीपणानें झडप घालतो तशीच झडप घालून इब्राहीमनें तें पत्र मुबारकाच्या हातून आपल्याकडे घेतलें आणि आकस्मिक रीतीनें जखमेच्या वेदना नाहींशा झालेला रोगी जसा आनंदानें इकडे तिकडे पाहातो तशी तें पत्र पाहून इब्राहीमला हुषारी वाटली व त्यानें ताबडतोब उघडून वाचायला सुरवात केली. आकस्मित सुटलेल्या वादळानें जसें हां हां ह्मणतां आकाश निरभ्र व्हावें त्याप्रमाणें तें पत्र वाचतां वाचतां इब्राहीमच्या चेहे-ऱ्यावरची खिन्नता नाहींशी होऊं लागली.

पत्रांतील मजकूर पुढीलप्रमाणें होता.:—

" मेहेरबान इब्राहीमसाहेब—

दयाळू अन्त:करणाच्या देवाचे पवित्र चरण सोडून आल्यामुळें कीं काय न कळे; पण हा एक दिवस मला युगासारखा वाटला. हे चोवीस तास माझ्या मृतावस्थेंतच गेले कीं काय असाही मला भास झाल्यावाचून राहिला नाहीं. प्रभुराज ! आपल्या वियोगाचा प्रसंग या दासीनें कधींच अनुभवलेला नसल्यामुळें तर हें झालें नसेल ना ? कांहीं असो; पण माझी ही स्थिति वाचून आपण वाईट वाटून घेऊं नये. आमचा बायकांचा जन्म मुळीं दु:खें भोगण्यासाठींच झालेला असतो. त्यामुळें त्यांनीं त्याची खंती वाटून घेऊं नये. सहन केलें पाहिजे. आपणाला माझा वियोग सहन होणार नाहीं असें मला वाटतें; पण हें खरें असेल कां ! खरें असलें तर आनंद वाटतो आणि दु:खही वाटतें ! कां. तें कुणाला माहीत ! पण साहेब ! माझ्यासाठीं आपण दु:ख करूं नये. खुदा करुणामय आहे ! तो माझें कधींच अनहित करणार नाहीं. माझा त्याच्यावर पूर्ण विश्वास आहे आणि आपणही त्याला विसरूं नये. त्याच्या दयाळूपणावर व लोकोत्तर सहानुभूतीवर विश्वासूनच मी स्वस्थ आहें. त्याच्या अतर्क्य लीलेनें आपली व माझी लवकरच भेट होईल असें मला वाटतें. आतां दु:खांत सुख इतकेंच कीं, उमरखे-खच्या जरी मी तूर्त ताब्यांत असलें तरी त्यानें मला आपल्या खुद्द वाड्यांत

नेण्याचें अद्याप साहस केलेलें नाहीं. त्याच्या पत्नीची-ताकितबिबीचीही-माझ्या-वर कृपा असून मी सध्यां तिच्याच एका विश्वासू दासीच्या आश्रयाला देहानें तरी सुसंरक्षित आहें. माझी काळजी करूं नये. एक दिवस होऊन गेला, पण अद्याप त्याची व माझी भेट झाली नाहीं. असाच प्रकार पुढेंहि चालेल असें वाटतें. जेवणाखाणाची व्यवस्था जुलूस मार्फत होत असून ताकितबिबीतें सर्व नियमित मला पाठवित असते. दुसऱ्याच्या दुःखानें दुःखी होणाऱ्या जुलूसखानाच्या तोंडून माझी सगळी शोचनीय हकीगत ऐकल्यामुळें माझ्याबद्दल तिच्या मनांत विलक्षण प्रेम उत्पन्न झालें आहे; शक्य ती खटपट करून मी तुला या दास्यत्वांतून मुक्त करीन असेंहि तिनें मला अभिवचन दिलें आहे तिला माझ्याबद्दल फारच सहानुभुती वाटते. माझ्या मुक्ततेचा शुभ दिवस कधीं उगवेल कुणाला माहीत ! मी त्या दिवसाची वाट पहात घटका पळें मोजीत आहें. ताकतबिबीला जुलूसखानानें काय सांगितलें कुणाला माहीत; पण उमरशेखवर तिनें सक्त नजर ठेविली आहे. त्यामुळें त्याला इकडे येतां आलें नाहीं. ईश्वर माझ्यावर कृपा करील तर आपली व माझी लवकरच भेट होण्याचा संभव आहे.

आपली दासी—दलिया. ”

हें पत्र वाचल्या नंतर इब्राहीमची बरीचशी समजूत झाली व तो मनांत म्हणाला, “ खुदाच्या कृपेनें माझी दलिया या भयंकर परिस्थितून एकदांची उत्तीर्ण होऊन मला भेटू दे तिला मी पाहिल्यावांचून माझें समाधान होणार नाहीं. माझें अंधकारानें व्यापून गेलेलें घर आणि हृदय तिच्या दर्शनानेंच प्रकाशित होणार असल्यामुळें ती येथें येईल तोच माझा आयुष्यांतिल सुदीन होय. अशा प्रकारचें आत्मगत भाषण झाल्यावर तो मुबारकाला उद्देशून म्हणाला, “ या पत्रानें माझी आशा आणि आनंद वाढला असून पुष्कळ बरें वाटत आहे. मुबारक हीं भविष्यकालचीं सुखस्वप्नें आतां खरीं होतील काय ? दलिया मला भेटली कीं माझी या जगांतील इतिकर्तव्यता संपली असें म्हणायला हरकत नाहीं. पण मला ही खोटी आशा तर तिनें लावली नसेल ना ? ”

इब्राहिमची मुद्रा प्रफुल्लित झालेली पाहून मुबारकाला मनांतल्या मनांत बराच आनंद झाला तो त्याची समजूत करण्याचा हेतूनें म्हणाला, “ हुजुर! दलिया कधीं खोटें बोलत नसतें हें तर आपण जाणतच आहां! मग मला

असा प्रश्न कां बरें विचारला ? तिच्या बोलण्याबद्दल संशय तरी कां यावा? ती कधीं खोटें बोलत नसे अर्थात हें सगळें लिहिणें खरें आहे, असें मानावें लागतें. कांहीं इलाज चालत नाहीं. एक दोन दिवसांत मी तिची भेट घेऊन सगळा खुलासा करतोंच. आपण मुळींच काळजी करूं नये. मनाला धीर येण्याकरितां एवढें पत्र पुरे आहे.

तिची भेट घेण्यासंबंधानें मुबारकाचा निश्चय झाला खरा; पण मानवी आशा विरुद्ध देवाची इच्छा या तत्वाप्रमाणें तिची त्याला भेट होणें शक्य आहे का ? देवाला माहीत ! त्याच्या मनांत जसें असेल तसें होईल. त्याच्या सामर्थ्यापुढें मनुष्याचा काय पाड !

---

# प्रकरण १६ वें.



## विषाची मागणी!

आपल्या विक्रीची दहा हजारांची हुंडी दलियेनें मुबारकाजवळ दिलेली होती, हें वाचकांना माहीत आहेच. मुबारकानें आपल्याशींच विचार केला, "एवढ्या मोठ्या रकमेची हुंडी या स्मशानासारख्या घरांत ठेवणें योग्य होणार नाहीं. तेव्हां ती दुसऱ्या एकाद्या योग्य जागीं ठेवावी हें उत्तम; पण ठेवावी कुठें ? इतक्या विश्वासू रकमेचा मनुष्य कोण मिळणार ? "

इसाकच्या घरच्या सगळ्या मंडळींशीं मुबारकाचा परिचय होता. कारण इसाकनेंच हा विश्वासू नोकर म्हणून इब्राहीमला दिलेला होता. त्यामुळें या अडचणींच्या प्रसंगीं मुबारकाला आपलें पहिलें घर आठवलें. तो मनांत म्हणाला, " या हुंडीची गोष्ट इब्राहीमला सांगावी तर त्यांचा मनस्ताप वाढणार. व तिच्या विक्रीच्या पैशाचा अपव्यय होणें हीं इष्ट नाहीं. तेव्हां दुसरी कांहीं तरी व्यवस्था करणें भाग आहे. " त्यानें अनेक विचार केल्यावर ठरविलें कीं ही रक्कम आतां इसाककडेसच घेऊन जावें. तो हिची रक्कम आणील. प्रसिद्धपणें अजमीरच्या कोणत्याही पेढीवर इतकी रक्कम हुजुरच्या नांवानें ठेवणें योग्य होणार नाहीं. कारण ही गोष्ट आज ना उद्यां उघडकीला येईल. व तसें झाल्यास लोक म्हणतील, हातांत पैसा असतांना

म्हणजे लोकांना फसविण्यासाठीं इब्राहीमनें हे सगळे वेडेचार केले ! तेव्हां दिवसा सर्वांसमक्ष इसाकच्या घरीं जाणें योग्य नाहीं. कारण तसें केल्यास ही हकीगत कदाचित् इब्राहीम साहेबांनाही समजेल. रात्रींच जाणें उत्तम. एखादी बैलगाडी करून अथवा जलद चालणाऱ्या एक्क्यांतून जावें म्हणजे जाण्यायेण्याला ठीक पडेल

इब्राहीमला एकटें राहाणें मनापासून आवडत असे. त्याचा एकांतीचा सोबती कोणीही नव्हता. शक्य तितकें एकटें आणि एकांतीं बसणें त्याला आवडे. रात्रीं नऊ वाजण्यापूर्वीं नेहेमीच त्याचें जेवणखाण आटपे. व तो मुबारकानें घातलेल्या बिछान्यावर जाऊन पडे. त्यानंतर उजाडेपर्यंत त्याच्याकडे कोणीही जात नसे. व गेलेलें त्याला आवडत नसे. अर्थात् तो झोंपतांच मुबारकाला विश्रांती मिळे. मुबारकानें आपल्या जाण्याचीही हीच वेळ ठरविली. धनीसाहेब झोंपायला गेल्यानंतर आपण घरांतून बाहेर पडावें व उजाडण्यापूर्वीं घरांत यावें म्हणजे कुणालाच कांहीं समजणार नाहीं. शिवाय तेवढ्या वेळांत फत्तेपुराला सहज जाऊन येतां येईल. लवकर चालणारा एक्का घेतला म्हणजे झालें.

या शिवाय आणखी दालियेनें त्याच्याजवळ दिलेल्या दोन हजार मोहरा होत्या. त्याबद्दलचा विचार ठरवितांना तो म्हणाला, ' आधीं हे दहा हजार रुपये इसाकच्या पेढीवर जमा करून द्यावे. त्यानंतर दालियेच्या सांगण्याप्रमाणे किरकोळ सावकारांच्या मागण्या पुऱ्या करण्याकरितां या मोहरांचा उपयोग करावा. " अशा प्रकारचा त्याचा निश्चित् विचार ठरतांच त्याला बराचसा आनंद झाला व आपल्या प्रभूला लवकरच चांगले दिवस येतील असे त्याला वाटलें. त्याच्या आंगांत नवीन उत्साहाचा संचार झाला व तो घरगुती कामें मन लावून करूं लागला. कारण त्याच्या हृदयावरचें एक मोठें थोरलें दडपण नाहींसें झालें होतें नाहींतर त्याला त्या पैशाच्या काळजीनें मुळींच स्वस्थता वाटली नसती व त्यामुळें धन्याच्या चाकरींत व्यत्यय येण्याचा संभव होता. आतां तशी कांहीं भीति नव्हती त्यामुळेंच तो दुप्पट उत्साहानें आपलें काम करीत होता.

दुपारच्या वेळीं, घरांत पाहिजे असलेलें कांहीं सामानसुमान आणण्यासाठीं मुबारक बाजारांत निघून गेला होता व इब्राहीम आपल्या माडीवरील बैठकीच्या खोलींत गच्चीसमोरच्या दरवाजाजवळ खुर्चीवर बसून एक

पुस्तक वाचीत होता. इतक्यांत कुणीशी बाहेरून हांक मारून विचारलें,
" इब्राहीमसाहेब घरांत आहेत काय ? "

हाक ऐकतांच इब्राहीम पुढें झाला आणि गच्चीवरून वांकून त्यानें पाहिलें तो काजीचा शिपाई दरवाजाशीं उभा असलेला त्याला आढळला. काजीची विखारी नजर पुन्हां आपल्या घराकडे वळलेली पाहून इब्राहीमला काळजी वाटली व तो विचार करीतच खालीं आला हा आणखी नवीन प्रकार काय असावा हें त्याच्या लक्षांत येईना.

पूर्वी उल्लेख केलेल्या किरकोळ सावकारांनीं एकत्र होऊन इब्राहीमच्या विरुद्ध काजीकडे फिर्याद नेलेली होती व त्या फिर्यादीचें समन्स घेऊनच हा शिपायी आलेला होता. इब्राहीमनें खालीं येऊन दरवाजा उघडतांच तें सरकारी समन्स त्यानें त्याच्या हातात दिलें व रसीद घेऊन तो निघून गेला. इब्राहीम मात्र अस्वस्थ होऊन चिंतापूर्ण अन्तःकरणानें तेथेंच उभा राहिला

पण तेथें तरी त्याचें समाधान करायला कोण होतें ! भानावर येतांच तो पूर्वीच्या जागीं येऊन बसला आणि फिर्यादीची नक्कल वाचूं लागला त्यांत सर्व हकीगत खुलासेवार रीतीनें लिहिलेली होती. त्यालाच जोडून काजीनें स्वतःलिहिलेला हुकूम होता तो असा, " कर्जदारानें चोविसतासांत जर या कर्जाची फेड केली नाहींतर त्याला गिरफदार करून तुरुंगांत टाकावें. कारण या इसमावर झालेल्या एकदोन फिर्यादींवरून हा मनुष्य दगलबाज व कर्जाची फेड करण्याला नालायक असल्याचें सिद्ध झालें आहे. "

हे काजीसाहेब म्हणजे आमचे पूर्वपरिचित खुदादाद होत हें सांगावयास नकोच. सावकार लोकांकडून यांच्यावर रजतखंडांचा मारा होत असल्यामुळें हे कर्जबाजारी लोकांवर यथेच्छ अधिकार गाजवूं लागले होते. हे खुदादाद अबूअयूबच्या चालत्या काळांत त्याचे दोस्त असून त्यांचा ' खाना पीना ' सगळें कांहीं इकडेच चालत असे; पण 'सुखाचें सांगती मित्र ' दुःखाच्या दिवसांत टिकत नसतात. फार काय ते ओळखही विसरून जातात. शिवाय या काजीसाहेबांना तर उमरशेखकडून इब्राहीमच्या विरुद्ध पांचशें रुपयांचा घांस मिळालेला होता; मग कायद्यांत उलटा पालट करायला काय हरकत असणार ! रोख रुपयांचा लांच आणि पूर्वीची दोस्ती यांत पुष्कळ अंतर आहे. रूप्याच्या वजनाखालीं दोस्तीचा कापूस दबून जाऊं शकतो. इंक-

सृष्टींत खुदादाद हा एक विचित्र जीव होता म्हटलें तरी चालेल. ण स्वार्थासाठीं तो काय पाहिजे तें करूं शकत असे.

किरकोळ सावकारांनीं आपले कागदपत्र काजीकडे हजर करून जो कया लवकर हुकूमनामा मिळविला होता. त्याचें कारण उमरशेखाचा व द्वेष हें असल्यामुळें त्या बाबतींत विशेष खुलासा केला पाहिजे असें हीं. दलियेला मिळविण्यासाठीं आपणाला किती तरी पैसा खर्ची लावा लागला हें त्याच्या अन्तःकरणांत सलणारें शल्य त्यानें अशा तीनें उपटून काढून आपला सूड उगविण्याचा मार्ग मोकळा केला. आ- ल्या शत्रूच्या हातांत पडलेली ही रक्कम त्याच्यानें पहावत नव्हती, तो ापासारखा चिडून गेला होता. आणि त्यामुळेंच सगळ्या सावकारांना ठवून त्यांना हरएक प्रकारचें सहाय्य करण्याला कंबर बांधली होती. ाकितबिबीचाही कांटा त्याला काढून टाकावयाचा होता; पण त्या ाबतींत त्याला अद्याप बिनतोड मार्ग न सुचल्यामुळें तो स्वस्थ होता.

वर लिहिलेल्या कारणावांचून आणखी एक गुप्त कारण होतें. दलिया आपल्या हातून पुन्हां सुटून जाऊं नये व तिला 'दुसरीकडे आश्रय मिळणें शक्य आहे' असें वाटूं नये. यासाठीं इब्राहीम कारागृहांत जाईल तर बरें व तेथून तो न सुटेल तर त्याहीपेक्षां उत्तम असें उमरशेखानें ठरविलें होतें. असें झाल्यावांचून दलियेसंबंधानें आपणाला निश्चित होतां येणार नाहीं. असें त्याचें मन त्याला सुचवीत होतें; इब्राहीम कारागृ- हांत आहे असें ऐकल्यावर दलियाहि पूर्णपणें आपल्याला अनुकूल होईल. याहि कारणामुळें त्यानें ही खटपट चालविली होती, असें म्हणावयाला हरकत नाहीं. शिवाय इब्राहीम स्वाभिमानी असल्यामुळें दलियेच्या आ- लेल्या रकमेनें तो स्वतःचें कर्ज फेडून सुखी होण्याची खटपट करील हें शक्यच नव्हतें. हेंहि उमरशेख जाणून होता. असो.

किरकोळ देणें अठराशें रुपयांचें आहे हें त्या हुकुमांतील सावकार लोकांच्या यादीवरून इब्राहीमला कळून चुकलें. त्यानें तें मनःपूर्वक वाचून बेरीज करून पाहिलें व इतके रुपये आपल्या हातून फिटणें अशक्य आहे असें वाटून त्याच्या हृदयाला धक्का बसला, तो मनांत म्हणाला ! दलिये, मला तूं पूर्वीं असल्या संकटांतून मुक्त केलेंस पण आतां तूं नसल्यामुळें मी कारागृहांत जाणार का ! "

आपल्यावर वारंवार येणाऱ्या या संकटाच्या मुळाशीं उमरशेखसारखा दुष्ट मनुष्य काजीही त्यांच्या हातांतील खेळणें होऊन बसला आहे तेव्हां आतां यांतून सुटका होणें शक्य नाहीं अशी इब्राहीमची खात्री झाली. आपण कितीहि जपून वागलों तरी देवाच्या प्रतिकूलतेपुढें आपलें कांहीं चालावयाचें नाहीं असें वाटल्यामुळें इब्राहीमला चोहोंकडें अंधार दिसूं लागला यावेळीं दालिया असती तर सांत्वनपर चारशब्द बोलून तरी तिनें आपलें समाधान केलें असतें. असें वाटून त्याच्या डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले व तो शून्य दृष्टीनें आकाशाकडे पाहूं लागला.

कांहीं वेळानें तो मनांत म्हणाला, " माझ्या जवळ तर एक कपर्दिक ही नाहीं, मग मी हे इतके रुपये कसे बरें देऊं ? उमरेशख ! अजूनही तुझे समाधान झालें नाहीं कां ? अबू अयूबच्या एकुलत्या एक मुलाला अशी ही स्थिति यावी ना ! दुर्दैव ! ईश्वरापेक्षांहि सैतानाचें सामर्थ्य अधिक असावें काय ? मनुष्याचा छळ करून मौज पहाणें हेंच तर तुझें ध्येय नसेल ना ? " " परोपकारासाठीं स्वतःच्या सुखाला जलसमाधी देणारी दालिया असती तर तिनें मला दोन वेळ अशाच संकटांतून मुक्त केलें होतें. माझ्यावरील तिची निष्ठा अलौकिक होती यात शंका नाहीं. तिनें माझा अपमान होऊं दिला नाहीं. माझ्यासाठीं तिनें आत्मविक्रय करून सैतानाचें दास्यत्वही स्वीकारलें. मला वांचविण्यासाठीं तिनें शक्य तें सर्व उपाय केले. दालिये ! मी आतां तुझें नुसतें स्मरणच करीत राहूं कां ? या विपन्नावस्थेतून तूं मला मुक्त करणार नाहींस ! "

सततच्या दुःखानें आणि निराशेच्या तीव्र आघातांनीं इब्राहीम भ्रमिष्ट होत चालला अर्थात अशा प्रसंगात सापडलेले मनुष्य शेवटीं जें करतात तेंच यानेंही करावयाचें ठरविलें त्यात आश्चर्य कसचें ? कर्जाच्या पायीं प्रत्येक अब्रुदार मनुष्याला असेंच करावेसें वाटतें.

इब्राहीमनें विचार केला, आतां आत्महत्त्येवांचून दुसरा मार्ग नाहीं. जमांत होणाऱ्या बेअब्रुपेक्षां मरण बरें. अखंड शांतीवांचून या त्रासांतून सुटण्याला दुसरा मार्ग नाहीं. पण मृत्यूचा मार्ग तरी मला कोण दाखवील ? आत्महत्या ! काय भयंकर तो प्रसंग ! आपण आपलाच खून करावयाचा ! छे नुसत्या विचारानेंच अंगावर शहारे येतात !! नदीच्या तीव्र प्रवाहांत उडी घेतली तर ! छे; तें विलक्षणच धाडस. जिवंतपणाची

प्राणीव असेपर्यंत देहाचे हाल सहन करवणार नाहींत ! शिवाय पाण्यांत बुडलेले प्रेत केव्हांना केव्हां तरी माणसाच्या नजरेला यावयाचेंच आणि तें लोकांनीं पाहून ओळखलें म्हणजे ते जें वाटेल तें बोलायचे. त्या बोलण्याला ताळतंत्र ! अबूअयूबच्या मुलानें आत्महत्या करून सावकाराने फसविलें अशी लोकवार्ता प्रसिद्ध होईल. माझ्या घराण्याला माझ्या या अविचारी कृत्याचे फळ भोगावें लागेल ! माझ्या कुलाला लागणारा हा कलंक मी कसा सहन करावा बरें ? छे छे. अशा प्रकारें आत्महत्या करणें योग्य नाहीं.

" विचार करून पाहिलें असतां विषपानानें येणारा मृत्यूच मला योग्य वाटतो. कशानें काय झालें हें कुणाला समजणार नाहीं आणि कुणी कांहीं बोलूंही शकणार नाहीं. आजारी होता, शुश्रूषेला कोणी नाहीं. अनावस्थेनें मरण पावला असेल ! पण मला विष आणून देणार कोण ? या बाबतींत विश्वास ठेवण्याला योग्य असें कोणीच मनुष्य मला दिसत नाहीं. माझा विश्वासू नोकर म्हणजे मुबारक ! पण तो माझ्या मृत्युला कधीं तरी साह्य करील ? नाहीं शक्य नाहीं. "

इब्राहीमच्या घरापासून कांहीं कदमावर त्याच आळींत एका हकीमाचा दवाखाना होता. त्या ठिकाणीं विषारी औषधें आणि चूर्णें मिळत असत. इब्राहीमला वाटलें " आपणच त्याच्याकडे जाऊन औषधासाठीं म्हणून वीष मागावें. माझ्या चालत्या काळांत मी त्याच्यावर अनेक उपकार केले आहेत. मग तो मला या दुःखाच्या वेळीं थोडसें वीष विकत देणार नाहीं काय ? "

इतका विचार ठरला तरी राजरस्त्यानें जाण्यायेण्याचें साहस त्याच्यानें करवेना काजीचा एखादा शिपाई कर्जाच्या पायीं आपणाला कारागृहांत नेऊन बंद करणार नाहीं कशावरून ? निदान माझा अपमान करायला तरी कोणी माघार घेणार नाहीं. " तो मोठ्या काळजीत पडला. काय करावें तें त्याला सुचेना.

मुबारक जेव्हां कोणत्या एकाद्या दूर ठिकाणीं जात असे तेव्हां तो आपल्या मालकाच्या सेवाशुश्रूषेसाठीं म्हणजे जवळचीं किरकोळ कामें करण्यासाठीं हुसेनअली नांवाचा एक छोटा नोकर त्या घरांत ठेवीत असे. त्या दिवशीं दुपारीं तो बाजारांत कांहीं सामानसुमानाच्या खरेदी

साठीं गेल्यामुळें तिकडे आपल्याला दोनतीन तासांचा अवधी लागेल असें वाटल्यावरून त्यानें पूर्वनियोजित हुसेनअल्ली याला तेथें टेविलें होतें.

अर्थात या हुसेनअल्लीला शरण जाण्यावांचून इब्राहीमला दुसरा कोणताच मार्ग सुचला नाहीं. त्यानें त्याला हांक मारली व तो जवळ येतांच म्हटलें, "सदर रस्त्याच्या कोंपऱ्यावर जो हकीम राहातो त्याला हें पत्र देऊन येशील का हुसेन ?"

छोकऱ्यानें कबूल करतांच इब्राहीमनें एका कागदावर चटकन कांहीं ओळी खरडल्या आणि त्याची घडी करून तो हुसेनच्या हातांत दिला. मुबारक घरीं येण्याला अजून दोन तासांचा विलंब होता. त्यानें जातांना सांगितलें होतें, "स्वयंपाकाकरतां कांहीं सामानसुमान आणण्यासाठीं मी बाजारांत जात आहें" इब्राहीमच्या घरापासून हा बाजार एका कोसावर असल्यामुळें इब्राहीमनें निश्चिंतपणानें हुसेनला हकीमाकडे पाठविलें. कारण मुबारक येण्यापूर्वींच आपलें कार्य उरकेल असें त्याला वाटलें होतें.

ज्या हकीमाकडे हुसेन गेला तो हकीम इब्राहीमच्या चालत्या काळांत त्याच घराण्यावर पोसला गेला असल्यामुळें इब्राहीमला तो विसरला नव्हता. खुदादादसारखा त्यानें निमकहरामपणा केला नाहीं. हुसेननें पत्र देतांच त्याला वाटलें "इब्राहीम अकस्मात आजारी पडलें असतील व मी जवळ असल्यामुळें त्यांनीं मला तावडतोब बोलवायला पाठविलें असेल." आणि या आपल्या विचाराप्रमाणें तो तावडतोब आपल्या शफाखान्यांतून बाहेर पडला व इब्राहीमच्या घरीं आला. अबूअयुबसारख्या नामांकित सावकाराच्या मुलाची अशी शोचनीय अवस्था झाल्याबद्दल त्यालाहि मनापासून वाईट वाटत होतें.

इब्राहीमनें त्या हकीमाला मोठ्या आदरसत्कारानें आपल्या जवळ बसवून म्हटलें, "साहेब ! आपला व माझा फार दिवसांचा स्नेहसंबंध म्हणून मी आपणाला बोलवायला पाठविलें. मी आज एका संकटांत सांपडल्यामुळें आपणाला शरण आलों आहें. माझ्यावर आलेला प्रसंग कांहींसा रहस्यमय आहे; पण हा प्रसंग मनुष्यावरचा नव्हे. माझी सध्यांची काय स्थिति आहे हें तुम्हीं जाणतच आहां. एक वेळेंहि अन्न मिळण्याची पंचाईत आहे हें मला सांगायलाही लाज वाटते. अशा माझ्या स्थितींत सेवा-

ऱ्या एका मांजराने माझ्याशीं शत्रुत्व करायला सुरवात केली असून तें खाण्याचा कांहींच पदार्थ घरांत उरूं देत नाहीं. माझ्या खाण्याच्या पदार्थावर रोजच्या रोज नजर चुकवून तें यथेच्छ हात मारीत असतें. त्यामुळें कित्येक वेळ मला अगदीं चांगलेच उपास काढावे लागले. मी त्याला त्याच्या या दुष्टपणाबद्दल चांगलीच शिक्षा देण्याचें ठरविलें असून त्याला आपली मदत पाहिजे. आपल्या दवाखान्यांतील थोडेसें वीष जर मला विकत द्याल तर माझें हें काम बिनबोभाट पार पडणार आहे." कुणाचा भांडण ना तंटा सगळें खामखुम ! "

हा हकीम अनुभविक आणि दूरदर्शी होता. जगांतील निरनिराळे देखावे पहाण्यांत त्याचे काळयाचे पांढरे झाले होते. जगांतील निरनिराळ्या प्रकारच्या लोकांशीं त्याचा सहवास झाल्यामुळें अनेकांच्या स्वभावाचें व गर्भितार्थ पूर्ण भाषणाचें रहस्य त्याला चांगले कळूं लागलें होतें. इब्राहीमचें तें विसंगत बोलणें ऐकून त्याला संशय आला. त्याची सध्यांची बिकट परिस्थिती हकीम जाणून होता. शिवाय आजच्या या भेटीच्या वेळीं इब्राहीमची विलक्षण खिन्नता, चेहेऱ्याचा निस्तेजपणा आणि वारंवार दीर्घ विश्वास सोडणें हे प्रकार पाहून त्यानें मनांतल्या मनांत ठरविलें कीं, "ही विषाची मागणी मांजराकरतां नसून स्वतःकरतां आहे ! '

आपणाला आलेला संशय खोटा नव्हे असें ठरवून तो हकीम इब्राहीमला उद्देशून म्हणाला, " आज काल विषप्रयोगानें बरेच मृत्यू होत असल्यामुळें काजीसाहेबांनीं एक जाहिरनामा काढून असें प्रसिद्ध केलें आहे कीं, ' आपल्या परवानगीवांचून कोणाही औषधी विक्यानें कोणत्याही प्रकारचें वीष विकूं नये. विकल्यास त्या विकणाऱ्याचे कान कापले जातील ' तेव्हां काजीसाहेबांच्या परवानगीवांचून आपण मागतां ती वस्तु मी आपणाला देऊं शकणार नाहीं. तुह्मी या बाबतींत काजीसाहेबांकडे अर्ज करा त्यांच्याकडून लिहून आल्यावर तुम्ही मागाल त्या प्रकारचें वीष मी तुम्हांस देऊं शकेन. "

इब्राहीम् कांहीं अगदींच अकलमंद नव्हता. तो समजून चुकला कीं हकीमनें आपला बेत ओळखला असला पाहिजे. अर्थात या बाबतींत त्याला आतां विशेष आग्रह करणें बरोबर नाहीं. ' तो इतकेंच म्हणाला, " हें मला पूर्वी माहीत नव्हतें. माहीत असतें तर आपणाला इकडे येण्याचे श्रम

णी दिलें नसतें. आदाबसाहेब ! झाला प्रकार हा इथेंच विसरून जा. कुणा-कडेहि बोलण्याचें कारण नाहीं. ''

यानंतर हकीमसाहेबांनीं इब्राहीमचा निरोप घेतला व हकीम निघून गेल्यानंतर इब्राहीम पुन्हां विचारांत गढून गेला. जगण्याचा तर आतां त्याला कंटाळाच आलेला होता. उद्यांक काजीच्या शिपायांसह सावकार लोक आपल्या दरवाजाशीं धरणें धरून बसतील त्यावेळीं काय करावें ? पुन्हां अपमान ! पुन्हां बेअब्रु ! आणि त्यानंतर कारागृह ! हाय ! कोणत्याच प्रकारानें या संकटांतून मुक्तता होणार नाहीं का ! ''

सायंकाळीं सूर्यास्तापूर्वी बाजारांतून मुबारक आला. रात्रीं त्याला पुन्हां गुप्तपणानें इसाकच्या घरीं गेलें पाहिजे होतें. न जाऊन चालण्यासारखें नव्हतें. ती रक्कम संरक्षित जागीं पोंचवल्यावांचुन त्याची काळजी दूर होणार नव्हती. तो उत्सुकतेनें रात्र होण्याची वाट पहात होता. आपले धनीसाहेब गाढ झोंपी गेले कीं आपण बाहेर पडायचें असें त्यानें ठरविलें असल्यामुळें तो त्याच्या झोंपेची वाट पहात होता.

पण इब्राहीमला स्वस्थता कुठें होती ? ता भयंकर चिंताज्वालांनीं जळत होता. मुबारकाला हें कांहींच माहीत नव्हतें. उद्यां आपल्या दाराशीं धरणें धरून बसण्यासाठीं सावकार लोक येणार असल्याबद्दल जर त्याला समजलें असतें तर त्यानें दलियेनें दिलेल्या रकमेचा त्या कामाकडे उपयोग केला असता व पुढें होणारा अनर्थ टळला असता; पण योगायोग विलक्षण ! त्याला कुणाचा काय इलाज चालणार बरें !

आजपर्यंत इब्राहीमनें आपल्या नोकराला न सांगतां कोणतीच गोष्ट गुप्त ठेवलेली नव्हती; पण त्या दिवशीं काळजीच्या अतिरेकामुळें त्याला कसलेंच भान राहिलें नाहीं स्वतःच्या देहाचीही शुद्धि नव्हती. तो आत्म-हत्येच्या विचारांत इतका गढून गेला होता कीं; आपल्या सभोंवार चाल-णारी कोणतीच गोष्ट त्याच्या लक्षांत येत नव्हती. अर्थातच मुबारक या बाबतींत अगदींच निश्चिंत होता. पुढें ओढवणाऱ्या भयंकर प्रसंगाची जर त्याला थोडीशीं वरीं कल्पना झाली असती तर त्यानें ताबडतोब आपल्या प्रभुला काळजींतून मुक्त केलें असतें. पण होणारें टळ-णार कसें ?

सूर्यास्त झाला. काळोख पडूं लागला, आकाशांत हळू हळू तारका

:मकूं लागल्या पण चंद्र नव्हता. वद्य पक्षांतील चतुर्दशीची रात्र ! अंध-ःराचें साम्राज्य वाढत्या प्रमाणावर असून इब्राहीमचें अन्तःकरणही चैतेनें व्याप्त झालेलें होतें. निसर्गाचा उदास चेहेरा चिंतामग्न इब्राहीम-च्या हृदयांत प्रतिबिंबित झाल्यामुळें समोर जळत असलेला दिवाही त्याला देसला नाहीं. मुबारक आपल्या जाण्याच्या विचारांत असल्यामुळें त्यानें आपल्या धन्याकडे दुर्लक्षच केलें ह्मटलें तरी हरकत नाहीं. टरलेल्या वेळीं थोडासा फराळ करून, झोंप येत नव्हती तरी विचारांच्या श्रांतपणामुळें इब्राहीम आपल्या बिछान्यावर लवंडला आणि पुढे काय करावें या कधींही न संपणाऱ्या विचारांत गढून गेला.

रात्रीं जेवणाच्या वेळीं मुबारकानें आपल्या धन्याला आग्रह केला; पण आजारीपणाची सबब सांगून त्यानें जेवणाचें नाकारलें तरी पण मुबारकानें कष्टी होऊं नये म्हणून तो म्हणाला, " माझं जेवण तूं झांकून ठेव. भूक लागलीशी वाटल्यास मी मागाहून सुद्धां जेवीन. तूं आपलें काम आटोपून झोंपी जा. "

आपल्या मालकाची खरोखरच प्रकृति बिघडली असेल तर आग्रहानें भोजन करविणें योग्य नाहीं असा विचार करून मुबारकानें त्याचा खाना त्याच्या खोलींत वरच आणून ठेवला आणि त्यानें घरांतील आपलें काम आटोपलें.

रात्रींचा पहिला प्रहर संपून गेला होता; तरी पण अद्याप मध्यरात्र झाली नव्हती. आपणाला घरांतून बाहेर पडण्याला हीच योग्य वेळ आहे असें ठरवून मुबारक हळूच दार उघडून बाहेर आला. जाण्यापूर्वी एकवार त्यानें इब्राहीमच्या बिछान्याकडे नजर फेंकली; पण तो गाढ झोंपी गेला असल्याबद्दल त्याची खात्री झाल्यामुळें त्यानें विशेष पुढें न जातां मागें पाऊल घेतलें.

यावेळीं इब्राहिम दुसरीकडे तोंड फिरवून झोंपला असल्यामुळें व हाल-चाल बिलकुल होत नसल्यामुळें तो गाढ झोंपी गेला असला पाहिजे अशी मुबारकाची समजूत झाली. शिवाय आज त्यानें आपल्या खोलींतील दि-वाही विझवून टाकिला होता. आणि इब्राहीमची ती एक संवय होती. तो दिवा पेटता ठेवून कधींही झोंपत नसे. कारण तशी त्याला झोंपच पडत नसे.. अर्थात् तो गाढ झोंपी गेला असावा अशी ही मुबारकाची

समजूत झाली ती त्याच्या दृष्टीनें बरोबर होती. व त्यामुळेंच निश्चित अन्तःकरणानें बाहेरच्या दरवाजाला कुलूप लावून तो निघून गेला होता. आपल्या घरीं जागा आहे असा त्याला नुसता संशय सुद्धां आला नाहीं. कारण इब्राहीमची मुळींच हालचाल होत नव्हती. आपलें हें जाणें अखेर-पर्यंत गुप्तच राहणार या आनंदाच्या भरांत मुबारकानें इसाकच्या घरचा रस्ता सुधारला. पण वाचक ! आपण त्याच्या बरोबर न जातां मागें वळूं.

---

# प्रकरण १७ वें.



## वडिलांची विलक्षण आज्ञा.

मुबारक जेव्हां पाय न वाजवितां वरच्या खोलीत गेला होता, त्यावेळीं आपला नोकर घन्याची हालहवाल पहाण्यासाठीं आला आहे हें इब्राहीमला समजलें नाहीं. खरें पाहिलें असतां यावेळीं तो झोंपी गेला नसल्या-मुळें नोकराची हालचाल त्याच्या लक्षांत आली पाहिजे होती; पण तो काळजींत गढून गेला असल्यामुळें जगाचे व्यापार चालू आहेत कीं नाहीं याचेंहि त्याला भान राहिलें नव्हतें. मग आला गेला मनुष्य त्याला समजावा कसा ?

तो यावेळीं मनांत विचार करीत होता, "रात्र संपली आणि उजाडलें कीं माझा अवतार संपला. मी जोंपर्यंत या काळोखांत आहें तोंपर्यंतच मला काय सवड मिळेल ती ! प्रकाश पडला कीं माझ्या सर्वस्वाचा लय झाला असें म्हणायला हरकत नाहीं. अठराशें रुपये मी कुठून देऊं ? खुदा कसली भयंकर वेळ आणलीस ही ? एकेका तासांत मी हजारो रुपये उडविले, त्यावेळीं मला पैशांची पर्वा वाटली नाहीं आणि आतां केवळ या अठराशें रुपयासाठीं मला इतका विचार पडावाना ? हाय ! हाय ! या काळजीमुळें माझ्या हृदयाला किती भयंकर वेदना होत आहेत ! रक्ताचें पाणी होऊन तें झपाट्यानें जळत आहे आणि प्रत्येक निश्वासाबरोबर त्याची वाफ बनून ते हवेंत मिळून जात आहे. याच स्थितींत अशाच रीतीनें माझा अंत होईल तर ! पण व्हावा कसा ! !

" उद्यां सकाळीं जेव्हां ते सैतान, काजीचे शिपायी घेऊन माझ्या दाराशीं येतील आणि निरनिराळ्या प्रकारच्या निंदापूर्ण शब्दसायकानीं मला जर्जर करून सोडतील तेव्हां मी त्यांना काय बरें उत्तर देऊं ? मी त्यावेळीं बहिरा आणि मुका होईन तर फार उत्तम नाहीं का ? छे. नाहीं. तेंहि सुख माझ्या नशिबीं नाहीं. रक्कम दिली नाहीं कीं, ते यमाचे दूत मला कारागृहांत घेऊन जातील. उघड्या राजरस्त्यांतून आणि हजारों लोकांच्या नजरेसमोरून शिपायांच्या पहाऱ्यांत जातांना माझ्या मनाची स्थिती किती शोचनीय होईल ! माझा हा प्राण अमर असावा, नाहीं तर तो अद्याप कसा राहिला असता ! दुःखी माणसाचा जीव लवकर जात नाहीं म्हणतात तें खोटें नव्हे. बापाच्या नांवाला कलंक लावणारा असा मी जन्मलों तरी कशाला ? देवा! हा मनस्ताप आतां माझ्यानें सहन करवत नाहीं. काय करूं !! "

काळजीचा अतिरेक झाला म्हणजे देहालाही स्वस्थपणा नकोसा होतो. उद्दीपित मनोवृत्तींबरोबर देहाचीही चळवळ सुरू होते. इब्राहीमला आतां झोंपून राहवेना. त्यानें अस्वस्थ अन्तःकरणानें बिछाना सोडला. बिछान्यापासून कांहीं अंतरावर त्याची तिजोरी होती. चालत्या काळांत ही तिजोरी मोहोरांनी आणि जवाहिरानें भरलेली असल्यामुळें तिला एक प्रकारचा डौल आला होता; पण आतां तिच्यांत कपर्दिकही नसून कांहीं महत्त्वाच्या कागदपत्रांनी तिच्यांतील मोकळी जागा भरून गेलेली असल्यामुळें पेंढा भरून ठेविलेल्या प्रेताप्रमाणें ती निस्तेज दिसत होती. इब्राहीमनें ती उघडली आणि बराच शोधाशोध करून तींतून एक हस्तिदंती पेटी काढली. नंतर मोठ्या आस्थेनें तिच्यावरचें झांकण बाजूला करून आंतील लाल रंगाच्या बल्हरांत असलेलें एक पत्र काढून तें तो मनःपूर्वक वाचूं लागला.

हें पत्र वाचल्यावर त्याच्या अस्वस्थ अन्तःकरणाला थोडीशीं शांतता मिळाली, त्याचें धडधडणारें हृदय स्थिर झालें. आणि आपल्या भालप्रदेशावरील घर्मबिन्दु पुशीत तो मनांतल्या मनांत म्हणाला, " माझ्या वडलांनीं आपल्या नश्वर देहाचा त्याग करण्यापूर्वी इतर धनसंपत्तीबरोबरच ही हस्तिदंती छोटी पेटीही मला दिली होती. मला इतके दिवस या छोट्या पेटीची अगदींच विस्मृति पडल्यामुळें या पेटींत काय आहे हें मी पाहूं शकलों

नाहीं. आतां मात्र तो प्रसंग आला आणि वडलांच्या दूरदृष्टीची मला आज चांगलीच जाणीव झाली. कारण या पत्रांतील त्यांचा उपदेश समयो-चित आणि जाणतेपणाचें द्योतक आहे. "

त्या पेटींतील पत्र दोन तीन वेळ वाचल्यानंतर इब्राहीम कांहींसा तीव्र स्वरानें स्वतःशींच म्हणाला, " आतां काळजी कसली ? माझ्या प्रेमळ बाबांनींच हें पत्र लिहून ठेवून ऋणमुक्त होण्याची सोपी युक्ति मला सुच-विली आहे ! हाय ! इतके दिवस या पत्राकडे लक्ष न दिल्यामुळें माझ्या अन्तःकरणाला कसल्या भयंकर वेदना सहन कराव्या लागल्या बरें ? कांहीं तरी विशेष उद्देशानेंच वडिलांनीं मला ही विलक्षण आज्ञा केली असली पाहिजे. मी त्यांच्या या उपदेशाप्रमाणें वागणारच. कारण वडलांची आज्ञा मानून तरी काय फळ मिळतें तें पाहूं. "

तो कागद वाचून, निराश आणि भग्न हृदय झालेला इब्राहीम कांहींसा उत्साहित झाला होता. त्या पत्रांत विशेष मजकूर होता असें नाहीं; तरी पण जो मजकूर होता तोच प्रसंगाला योग्य असा असल्यामुळें त्या तेव-ढ्याच शब्दाचा त्याच्या मनावर विलक्षण परिणाम झाला.

त्या कागदांत अबुअयूबनें आपल्या हातानें लिहून ठेवलें होतें, तें असें, " बाळ ! चांगले आणि वाईट दिवस हें नेहेमीं जवळ जवळ असतात ! मी तुझ्यासाठीं पुष्कळ पैसा ठेवला आहे; पण तो जर कधीं संपला आणि तुला अगदीं दारोदार भिक्षा मागण्याची वेळ आली, तर उद्यानाच्या मध्य-भागीं असलेल्या पुष्करणी जवळील आंब्याच्या मोठ्या झाडाला अगदीं खालच्या बाजूला असलेल्या शुष्क शाखेला दोरी बांधून गळफांस घे. म्हणजे आपोआप सर्व दुःखांतून आणि होणाऱ्या अपमानांतून तुझी मुक्तता होईल. इति.

अबुअयूब मनसूरमहंमद"

ही विलक्षण आज्ञापत्रिका वाचून इब्राहीम मनांत म्हणाला, " थोड्या वेळापूर्वीं माझ्या मनांत मरणाचीच कल्पना आली होती, पण वडलांनींच माझ्यासाठीं इच्छित मरणाची तजवीज करून ठेविली असेल असें मात्र वाटलें नव्हतें. मी जन्मादारभ्य वडलांच्या आज्ञेविरुद्ध मुळींच वागलों नाहीं. तेव्हां आतां तरी त्यांच्या इच्छेविरुद्ध कां वागावें, शिवाय त्यांनीं मला

प्रसंगाला योग्य अशीच आज्ञा केलेली आहे. विश्वासू नोकर मुबारक यावेळीं गाढ झोंपी गेला असेल. दालिया तर घरांतच नाहीं. शिवाय काळोख्या रात्रीची ही विलक्षण निस्तब्धता मला सहाय्य करायला तयार आहे ! तेव्हां मी आतां कशाची वाट पहात राहूं ! मृत्यूवांचून मला यातनांतून मुक्त होतां येणार नाहीं हें तर ठरलेंच. मग निष्कारण मिळालेल्या संधीचा उपयोग कां करून घेऊं नये ? बस्स ठरलें. मृत्यु हाच माझा मित्र ! त्याच्यावांचून मला या दुःखांतून सोडविणारा दुसरा कोणीही नाहीं. ”

कल्पना करतांच मित्राच्या रूपानें मृत्यूचें दर्शन झालें. मनाची तयारी झालेलीच होती. वडलांची आज्ञा मिळाली. जागा निश्चित झाली. त्यांत कालाची अनुकूलता ! मग उशीर कसचा ! मूर्तिमंत सावयव मृत्यू आपल्यापुढें उभा आहे अशी इब्राहीमची खात्री झाली. इतकेंच नव्हे तर मृत्यू आपल्यापाशीं बोलत असून पुढीलप्रमाणें त्याचे शब्द स्पष्ट ऐकू आले. “ मनाला होणारा त्रास, अपमान, हरएक गोष्टीची भीक, आणि अन्तःकरणाला लागणारी तळमळ ही सर्व आपत्ती सहन करून तुला अजूनही जगावेंसें वाटतें काय ? कारागृहाचें दुःख, राजरस्त्यावर जमलेल्या लोकसमुदायांत होणारा अपमान, सावकार लोकांच्या तोंडून वारंवार उच्चारलीं जाणारीं कटु वाक्यें, वगैरे संकटांतून सुटून जावें असें वाटत असेल तर तावडतोब माझ्याबरोबर चल. तुझ्या बापानें मृत्यूपूर्वी स्वतःच्या हातानें केवळ तुझ्या कल्याणासाठीं म्हणून जी आज्ञापत्रिका लिहून ठेविली आहे, ती मान्य केल्यास तुझ्यासारख्या दुःखी मनुष्याचें कोठें कल्याण झाल्यावांचून राहाणार नाहीं—”

मृत्यूच्या मुखांतून निघालेलें हे काल्पनिक शब्द ऐकून इब्राहीमला दुप्पट उत्साह आला. त्याला निश्चितपणाची एक प्रकारची धुंदी चढली. त्यानें तें पत्र त्या हस्तिदंती मंजुषेंत जपून ठेविलें. आणि तिजोरी बंद करून तो आपल्या शयनमंदिरांतून हळूच बाहेर आला. दिवा लावण्याचें सर्व साहित्य खालच्या खोलींत असल्यामुळें त्यानें दिवा विझविला आणि खालीं उतरल्यावर दुसरा दिवा पेटवून मुबारकाच्या खोलीकडे पाहिलें तों तें बाहेरून बंद केलेलें असून त्याला कुलूप लावलेलें असल्याचें त्याला आढळलें.

मुबारक आणि दालिया हीं दोघेंहि आपल्या धन्याच्या कल्याणासाठीं रोज नजीकच्या मशिदींत अगर दर्ग्यांत जाऊन प्रार्थना करीत हें इब्राहीमला माहीत होतें. त्यामुळें त्याला या प्रसंगीं विशेष आश्चर्य वाटलें नाहीं. पुढचा दरवाजाही बाहेरूनच बंद होता. ही एकंदर अनुकूल परिस्थिती पाहून इब्राहीमला कांहींसें समाधान वाटलें. तो एक दीर्घ सुस्कारा सोडून म्हणाला, " माझ्या आत्मघाताला हें एक प्रकारचें सहाय्यच आहे असें ह्मणायला हरकत नाहीं. माझा स्वामिनिष्ठ मुबारक मला अडथळा करण्याला पुढें झाला असता, दालियाही स्वस्थ बसली नसती; पण यावेळीं इथें कोणीच नाहीं ! ईश्वरी योजना ह्मणतात ती यालाच. मला ईश्वराचें सहाय आहे असें म्हणायला हरकत नाहीं. आत्महत्त्येला असली सोन्यासारखी संधी पुन्हां केव्हांही मिळणार नाहीं. "

मृत्यूचेंच ज्याला सहाय्य त्याला अडविणार कोण ? इब्राहीम पुन्हां माडीकडे वळला नाहीं. तो मागचे दार उघडून उद्यानाकडे वळला. आणि इकडे तिकडे पहात त्यानें आपल्या निश्चित जागेकडे पाय वळविले. त्याला अन्धकाराची भीति वाटत नव्हती. चोहोंकडे अंधःकाराचें साम्राज्य पसरलें होतें. अर्थात डोळे फाडफाडूनही कांहींच दिसत नव्हतें. तो आपल्या हातांतील छोट्या दिव्यासह आंब्याच्या झाडाखालीं आला. दिव्याची ज्योत वाऱ्यानें थरथर कांपत होती. अस्पष्ट दीपप्रकाशांत त्यानें आपला स्वर्गसोपान पाहिला. जमिनीपासून कांहीं अंतरावर ती फांदी अगदीं शुष्कावस्थेंत आपल्या आयुष्याची घटकापळें मोजीत इब्राहीमच्या सोबतीची वाट पहात असावी असें वाटत होतें. त्या फांदीला इब्राहीमचा सहज हात पोंचला असता. त्यानें एकवार त्या खांदीला हात लावून पाहिलें व त्याच्या चेहेऱ्यावर किंचितकाल सैतानी हास्य चमकलें. 'आपण आतां या *जगाचा निरोप घेणार' अशी त्याची खात्री झाली.*

तो कांपऱ्या आवाजानें आपल्याशींच म्हणाला, " सुखसंपत्तीनें समृद्ध झालेल्या भूमाते, मला आतां कायमचा निरोप दे. भारस्वरूप होऊन तुझ्या अंकावर क्रीडा करण्यांत काय फायदा ! उद्यान देवते ! लहानपणचे खेळ आणि तारुण्यांतील विलास ज्या ठिकाणीं केले त्या ठिकाणींच माझी आशेची घटकाही संपणार, हा विलक्षण योगायोगच नव्हे काय !

मोठ्या हौसेनें तयार केलेल्या या आनंदोद्यानांत माझी कबर बांधावी लागेल अगर त्याचें स्मशान बनेल असें केव्हां तरी वाटलें होतें काय ? मनुष्यानें भलत्याच आशा बाळगून कशाला बरें नसत्या संसाराची उभारणी करावी ? शाश्वत आणि आनंदमय असें कांहीं तरी यांत आहे काय ? पण प्रथमच याचा अंदाज कुणालाच होत नसल्यामुळें जो तो मनुष्य फसत असतो; पण हा मृत्यू किती तरी सुखकारक होय. माझ्यासारख्या हतभाग्यानें यापेक्षां ज्यास्त सुखाची आशाच करूं नये. देवा ! मला माझ्या आनंदकारक जागेंत मरण येत आहे. हाच माझा खरा सौख्यसोपान होय स्वतःच्या पुष्पोद्यानांत आपल्या मृत देहाला समाधी मिळणें हें सुख फारच थोड्या लोकांच्या नशिबांत लिहिलेलें असेल. "

नंतर इब्राहीमनें आपल्या खांद्यावर टाकलेल्या शेल्यावस्त्राचा फांस बनविला आणि त्याचें एक टोंक खांदीला बांधून आत्महत्या करण्याचें ठरविलें. पेटणारा दिवा जवळच ठेवला होता व वाऱ्याच्या झुळकीसरशी त्याची ज्योत थरथर कांपत होती. मरणोन्मुख अन्तःकरणापुढें उभा असणारा मृत्यू जणुं काय आपल्या कानाशीं ओरडत असल्याचा इब्राहीमला भास झाला. आतां विलंब कां ? कदाचित् मागाहून कांहीं तरी अडथळा उत्पन्न होईल. चालू कार्याला विलंब करूं नको. ही सुसंधी पुन्हा मिळणार नाहीं. कोणी पहाणारा नाहीं किंवा कोणी अडविणारा नाहीं. चल. मानेचा फांस गच्च बसूं दे."

इब्राहीमला मृत्यूच्या या आव्हानाची उपेक्षा करतां येईना. त्यानें आपल्या गळ्यांत फांस अडकविला. आणि तो अश्रुपूर्ण नेत्रांनीं म्हणाला, "येतों आतां ! जगाचा निरोप घेतांना मनुष्याला इतकें दुःख कां वाटावें बरें ! चालत्या जगाशीं जागत्या जीवाचा कांहीं निकटचा संबंध तर नसेल ना ? ऋणानुबंधावांचून जन्ममृत्यूचे फेरे फिरावे लागत नसतील ! दलिये ! कोमल अन्तःकरणांच्या देवी ! तुला मिळणाऱ्या उपकारांच्या ऋणांतून मला मुक्त होतां आलें नाहीं याचें फार दुःख होत आहे. माझ्यावर तुझा हक्क होता. मरणाच्या पूर्वी एकवार तुझी भेट झाली पाहिजे होती; पण हाय ! आतां तितका वेळ नाहीं ! मी चाललों ! मुबारक ! विश्वासू प्राण्या ! तूं निमकहलाल झालास; पण मी तुला दगा देऊन चाललों. तुझे कोणतेंच उपकार मला फेडतां आले नाहींत ! माझ्यावर तुझें फारच प्रेम होतें; पण

आ ! त्याचें काय ! मी चाललों ! मी नाहीं असें पाहून तुला काय वाटेल बरें ? नकोच ती कल्पना ! वेळ होत आला. मी आतां ज्या राज्यांत जात आहे तेथें, त्रास, दुःख, अपमान, छळ, सावकाराचा तगादा, कर्जाची भीती वगैरे कांहीं नाहीं. देवा ! दीन दयाळा ! माझ्या मुबारकाला सांभाळ. दलियेची काय स्थिति होईल कुणाला माहीत ? त्या सैतानाच्या आश्रयाला राहून ती सुखी होऊं शकणार नाहीं. तेव्हां तूं तिला आपल्या कृपाछत्राखालीं राख. मला माझ्या अब्रुसंरक्षणाची थोडीशी तरी आशा असती तर मी या अघोर कार्याला कधींही प्रवृत्त झालों नसतो. असो. आतां तो विचारच नको "

असें म्हणून इब्राहीमनें आपल्या प्रक्षुब्ध मनोवृत्ति आवरण्याचा प्रयत्न न करतां तशा त्या अस्वस्थ मनःस्थितींतच त्यानें त्या सुक्या फांदीला जोराचा झोला दिला. लागलीच कर कर असा आवाज झाला आणि बेफाम स्थितींत असलेल्या त्या आत्मघातकी तरुणासह ती शुष्क शाखा जमिनीवर कोसळली.

---

## प्रकरण १८ वें.



### नवजीवन.

मरण्याचा प्रयत्न करूनही इब्राहीम मरूं शकला नाहीं. त्यानें सावध होऊन पाहिलें तों ज्या खांदीला आपण फांस अडकविला होता ती खादी पार मोडली असून नजीकच बऱ्याचशा मोहोरा आणि जवाहीर विखुरले आहे. दिव्याच्या क्षीण प्रकाशांतही तें द्रव्य विजेप्रमाणें चमकूं लागलें. जवळच एक थैली पडली होती; पण तिचें तोंड, शीलबंद असल्यामुळें आंत काय आहे तें समजण्याला मार्ग नव्हता.

इब्राहीम उत्सुकतेनें उठला. जमिनीवर पडल्यामुळें झालेल्या आघातानें जरी त्याला बरेंच दुःख होत होतें तरी आकस्मित द्रव्यदर्शन वाटणाऱ्या विस्मयानें सगळें दुःख बाजूला सारून दिव्याच्या मंद प्रकाशांत तो पु-

झाला. आणि थैलीवरचें शील पेटत्या दिव्याच्या वातीवर जाळून त्यानें ती थैली मोकळी केली, व तींतून बरेंचसें जवाहीर बाहेर काढलें. तो रत्नपारखीच होता. जवाहीर पहातांच त्याची किंमत त्यानें केली. व आपणासारख्या विपन्नावस्थेत पडलेल्या मनुष्याला हा एक ठेवाच सांपडला असेंहि त्याला वाटल्यावांचून राहिलें नाहीं. पण त्या बरोबरच; बापानें तशी ती विलक्षण आज्ञा कां केली याचाही त्याला उलगडा झाला. व वडलांच्या दूरदर्शीपणाचें त्याला कौतुक वाटलें. तो सद्‌गदीत झाला.

नंतर या अपरात्रीं येथें कशाला राहावें ! असा विचार करून तो आपल्या खोलींत आला. उज्वल प्रकाशांत त्यानें त्या जवाहीराची परिक्षा केली, व तें फारच मूल्यवान असल्याबद्दल त्यानें आपली पुन्हां खात्री करून घेतली. त्याचा बाप प्रख्यात जवाहिऱ्या होता व हाहि बापाजवळच तें कसब शिकलेला होता. त्यामुळेंच त्याला जवाहिराची किंमत ताबडतोब करतां येत असे. तेथून एकत्र करून आणलेल्या सर्व रत्नांची किंमत एक लाखापेक्षां ज्यास्त होईल असा त्यानें अंदाज करून त्या बाबतींत आपलें समाधान करून घेतलें.

थैलींत फारच दक्षतापूर्वक तपास केल्यानंतर त्याला एक लहानशी लाल रंगाची चिठी मिळाली आणि ही चिठी आपल्या बापानें लिहिलेली असली पाहिजे अशीही त्याची खात्री झाली.

त्यानें अत्यंत उत्सुकतेनें तें पत्र वाचलें. पत्रांत पुढीलप्रमाणें मजकूर होता. "बाळ ! लहानपणापासून तुझी चालचालणूक पाहून मी समजून चुकलों कीं, अत्यंत श्रमांनीं सांठविलेल्या या संपत्तीचा उधळेपणानें तूं लवकरच नाश करणार. मी हयात असतानांच तूं गुप्तपणानें जे मित्र जमवून द्रव्याचा अपव्यय करीत होतास ते माहितींचे असल्यामुळें मला तुझीं रोजचीं कृत्यें कळत असत. तुझे मित्र अदूरदर्शी असून ते उच्छृंखल व स्वार्थी असल्यामुळें तुला लवकरच कफल्लक बनविणार हें मी समजून होतों. व त्यामुळें मी तुला वारंवार सावधही केलें होतें; पण तूं तिकडे मुळींच लक्ष दिलें नाहींस. एक कवडीही तूं शिल्लक ठेवणार नाहीं हें मी समजून चुकलों. शास्त्रांत लिहिलें आहे, जो अव्यवस्थित अन्तःकरणाचा असून स्वेच्छाचारी मित्रांनीं वेढलेला असतो व आळसामुळें ज्याच्या हातून कांहीं-

ही उद्योग होत नाहीं. त्याच्या हातांत जरी कुबेराचें भांडार दिलें तरी तें त्याला पुरणार नाहीं. आणि यासाठींच मी कांहीं निवडक जवाहीर या शुष्क आंब्याच्या खांदींत लपवून ठेविलें आहे. तूं माझा मुलगा, लहानपणापासून लाडांत वाढलेला, दुःखाची तर छायाहि तुला माहित नाही, अशा स्थितींत गरिबीची तीव्र ज्वाला तुझ्यानें सहन करवणार नाहीं. तसेंच तूं भिकारी होऊन दारोदार फिरावें हेंहि मला पसंत नाहीं. यासाठीं मी ही अशी व्यवस्था करून ठेविली. नाहीं तर आत्महत्त्या करण्याबद्दल कोणी तरी कधीं आज्ञा करील काय ? ही खांदी शुष्क व पोकळ असल्यामुळें अगदीं थोड्याशा भारानेंही मोडून पडावी अशी मी व्यवस्था केलेली होती. अमूक अमूक ठिकाणीं इतकी संपत्ती ठेविली आहे असें नुसतें लिहून आत्महत्येची अट लिहून ठेवावी लागली. पूर्ण निराशा झाल्यावांचून कोणीही आत्मघाताला प्रवृत्त होणार नाहीं. व पश्चात्तापावांचून जिवाचा कंटाळाही येणार नाहीं. मनुष्याची सुधारणा होण्याचा म्हणून एक काळ ठरलेला असतो. आणि तो असा पश्चात्तापाच्या वेळीं येतो. व कांहीं उन्नति झाली तर ती त्याच वेळीं होते; पण आत्मघात केल्यावर उन्नति कशी होणार ! यासाठीं मला ही व्यवस्था करावी लागली. आज आकस्मिक रीतीनें मिळालेल्या या द्रव्याची मोजदाद केल्यास तें एक लाख होईल. तरी एवढ्यांतच काय तें समजून तूं पुढें जर चांगल्या प्रकारानें वागलास तर तुला कधींही संकटांत पडावें लागणार नाहीं. हात राखून खर्च केल्यास तुला व तुझ्या परिवाराला हें द्रव्य जन्मभर पुरेल. याउपर तुझी मर्जी. इति.

तुझा प्रेमळ बाप—अबूअयूब—"

आपल्या स्वर्गवासी वडिलांच्या हातचा तो अपूर्व लेख वांचून इब्राहीमनें आपल्या दूरदर्शी बापाला व ईश्वराला असंख्य धन्यवाद देऊन मनांत म्हटलें, ज्या भीतीनें मी आत्महत्त्या करण्याला तयार झालों होतों ती भीती आतां मला राहिलेली नाहीं. आजच्या या जवाहिरापैकीं थोड्याशा जवाहिराच्या विक्रीनेंहि सावकारांचें कर्ज फेडून दलियेचें देणें देतां येईल. या घरांत राहावें असें मला आतां वाटत नाहीं. ज्या ठिकाणीं राहिल्यानें माझा अपमान झाला, अनेक दुःखें सहन करावीं लागलीं व मित्रांनीं आपला स्वार्थ साधून मला फसविलें, त्या ठिकाणीं राहाणें म्हणजे पुन्हां तस-

लीच आपत्ति ओढवून घेणें होय. शिवाय दालियेसारख्या प्रेमदेवतेचा ज्या ठिकाणीं वियोग झाला तें ठिकाण त्याज्यच नव्हे काय ? ही लक्षांवधी रक्कम घेऊन मी माझा मित्र इसाक याच्याबरोबर व्यापार सुरू केला तर हां हां म्हणतां मी माझ्या वडाण्याचें नांव पुढें आणल्यावांचून राहाणार नाहीं. माझ्या नांवाला लागलेला कलंक धुवून काढण्यालाही मला असेंच कांहीं तरी साहस करणें भाग आहे. जर मला पुन्हां चांगले दिवस आले आणि दलियेला मी तिच्या दास्यत्वांतून मुक्त करूं शकलों तरच पुन्हां या घरांत पाऊल ठेवीन नाहीं तर हें शेवटचेंच प्रयाण होणार ! आज मला मुबारकाची मात्र भेट घेतां नये, कारण तो मला भेटल्यास अशा रीतीनें कधींही गृहत्याग करूं देणार नाहीं. यासाठीं तो येण्यापूर्वींच मला निघून गेले पाहिजे.

अशा प्रकारें मनाचा निश्चय करून इब्राहीमनें एका पत्रांत आपली सगळी हकीकत लिहिली आणि तें पत्र आपल्या बिछान्यावर अशा जागीं ठेवून दिलें कीं तें अगदीं सहज रीतीनें मुबारकाला मिळावें ! झालेली सगळी विचित्र काहिनी त्यानें त्या पत्रांत लिहिली असल्यामुळें मुबारकाला कोणत्याही प्रकारें संशयित होण्याचें कारण राहिलें नव्हतें. आणखी पत्राच्या शेवटीं लिहिलें होतें, माझ्या उशीखालीं असलेल्या एका लहानशा पिशवींत तुला बऱ्याच किंमतीचें जवाहीर मिळेल, त्यांतून थोडेंसें विकून तूं सगळ्या कर्जाची फेड कर. म्हणजे माझ्याविरुद्ध इतरांच्या कानाचे चावे घेणारीं सैतानी सावकारांचीं तोंडें बंद होतील. दलियेनें स्वतःची विक्री करून उमरशेखजवळून जी दहा हजारांची रक्कम घेतली आहे, ती व या जवाहिराच्या विक्रींतून येणारी सर्व रक्कम एकत्र करून दलियेला दास्यत्वांतून मुक्त कर. मी फसवून गेलों असें कोणाही सावकारानें मला म्हणूं नये. या महत्वाच्या गोष्टीचा तुला विसर पडणार नाहीं अशी माझी खात्री आहे. पत्रीं लिहिलेली सर्व कामगिरी संपविल्यावर जो पैसा राहील तो सर्व मी तुला दिलेला आहे. त्याचा तूं स्वतःच्या उन्नतीकडे उपयोग कर. मी कुठें जाणार आणि पुढें काय करणार हें आज कांहींच ठरलेलें नाहीं; पण एकादी चांगली जागा मला सांपडल्यास मी तुला तेथून माझी खुशाली कळवीन. माझ्या संबंधानें तूं मुळींच काळजी करूं नको. ”

अशा प्रकारचें पत्र लिहून इब्राहीमनें ते बिछान्यावर बरोबर मध्यभागीं ठेविलें. व थोडेसें जवाहीर एका लहान पिशवींत भरून ती पिशवी आपल्या उशी खालीं टेवून दिली. आणि त्यानंतर हातांत पेटती मेणबत्ती घेऊन तो खिडकीवांटे बाहेर पडला व मोकळ्या जागेंत आल्यावर त्यानें मुक्ततेचा एक दीर्घ सुस्कारा सोडला.

यावेळीं मध्यरात्र होऊन गेलेली होती. अजूनही मुबारक घरीं आलेला नव्हता. अर्थात इब्राहीमचें हें कृत्य कोणी पाहिलें नाहीं आणि त्याला कोणी अडविलेंहि नाहीं.

दारुण अन्धकारानें चारी दिशा भरून गेल्या होत्या. कुठेंहि रस्ता दिसत नव्हता. तरी पण तो त्या राजरस्त्यावर येतांच इब्राहीमनें मेणबत्ती विझवून खिशांत टाकिली आणि तो त्या अंधारांतच रस्ता चालूं लागला. कुठें जाणार हें त्यानें कांहींच ठरविलें नव्हतें.

* * * * * *

त्या काळीं रस्त्यांत दरवडेखोरांची फारच भीति होती. वाटसरावर केव्हां कुठून कसा हल्ला येईल याचा भरंवसा नव्हता. त्यामुळें रात्रींच काय तर दिवसाढवळ्याही रस्त्यानें जाणें धोक्याचें वाटत असे. त्यामुळें इब्राहीमनें आपल्या जवळच्या जवाहिराचे तीन भाग केले आणि ते डोकीवरच्या फेट्यांत, आंगरख्याच्या खिशांत आणि पायजम्यांत अशा रीतीनें विभागून, प्रवासाला सुरवात केली. आपल्या बचावाचीही त्यानें तयारी केली नव्हती असें नाहीं. तरी पण चोराचा हात पडल्यास सर्वच जवाहीर त्यांच्या हातीं लागूं नये म्हणून त्यानें वरील युक्ति अमलांत आणली होती. प्रसंग पडला म्हणजे युक्ति सुचते ती ही अशी.

इब्राहीमनें मनांत विचार केला, 'ही सगळी तयारी झाली, पण आतां जावें कुठें, हा एक प्रश्नच आहे. बाहेर कोठें जावें तर शहरासभोंवार तट आहे. वेशी बंद झाल्या. दरवाजावरचा जागता पहारा अडथळा करणार! उजाडल्यावांचून कांहीं दरवाजे उघडणार नाहींत. तेव्हां हा तोपर्यंतचा वेळ कुठें आणि कसा संपवावा!' तो मोठ्या काळजींत पडला; पण राजरस्त्यावर गर्द काळोखांत नुसतें उभे राहून तरी काय करणार हा प्रश्न उत्पन्न झाल्यामुळें पाय नेतील तिकडे जावयाचें असें त्यानें ठरविलें आणि

तो चालू लागला. हां हां म्हणता शहरचा मध्यभाग मागें राहिला आणि त्यानें निर्जन रस्त्यानें चालायला सुरवात केली; पण योगायोग किती विलक्षण ! जो मनुष्य मरण चुकवून जगण्याच्या मार्गाला लागला होता तोच अचानकपणें स्मशानभूमींत येऊन पोंहोंचला.

मृत व्यक्तींचीं स्मृतिमंदिरें उभारलेल्या जागेंत आपण एकाकी स्थितींत आहों हें आजूबाजूला पहातांच इब्राहीमच्या लक्षांत आलें. व तो थोडासा चमकला; पण त्याच वेळीं त्याच्या मनांत एक नवीन कल्पना उत्पन्न झाली. तो मनांत म्हणाला, " ज्यानें जिवंत असतां माझ्यासाठीं इतका पैसा जमवून ठेवला व मरणानंतरही दूरदर्शीपणानें माझी पुढील तरतूद केली. त्याच्या उपकाराची माझ्या हातून फेड होणें अशक्य आहे. कारण मी कुलांगार झाल्यामुळें माझ्या अपवित्र मुखानें त्या पवित्र पुण्यात्म्याचें नांवही उच्चारणें योग्य होणार नाहीं; तरी पण मी मला नकळत बापाच्या कबरेजवळ येऊन पोंचलों आहे तेव्हां जन्मभूमी सोडून जातांना मृतात्म्याचा शेवटचा निरोप घेऊन जावा व समाधीचें दर्शन घ्यावें हें उत्तम. पुन्हां मी या शहरांत येईन कीं नाहीं कुणाला माहीत ! जगांतून कायमचा नाहींसा होण्यासाठींच मी जात नसेन कशावरून ! "

पितृभक्त पुत्राला शोभण्यासारखेंच हे विचार होते. शिवाय त्या समाधीक्षेत्रांत उभारलेल्या कबरा जरी पुष्कळ होत्या तरी अबुअयूबची कबर पांढऱ्या संगमरवरी दगडाची असून बरीच उंच असल्यामुळें काळोखांतही ती ओळखतां येण्यासारखी होती; आणि त्यामुळेंच तसल्या अंधारांतही तो आपल्या बापाच्या स्मृतिमंदिराजवळ गेला. ज्या ठिकाणीं त्याच्या प्रेमळ पित्याचें कलेवर मृण्मय होऊन राहिलें होते, त्या ठिकाणीं ती कमान पाहताच त्याला मानवजीवनाची नश्वरता कळून आली व केवढेंहि पराक्रम गाजविलें, अथवा कितीहि नांव मिळविलें तरी शेवटीं मातींतच अदृश्य व्हावयाचें. हें तत्त्व त्याच्या स्मृतिपटलावर नोंदलें गेलें सुखाच्या पाठीमागें धांवण्यांत जो आपण व्यर्थ कालक्षेप करतों व निरानिराळ्या व्यसनांनीं आपल्या अपुरत्या वासनांची तृप्ती करण्याची हांव बाळगतो तिचे पर्यवसान काय होतें हें त्याला चांगलें कळून चुकलें. आत्मा देहातीत झाल्यावर कीर्ति अथवा अपकीर्ति जें काय मिळविलें असेल तें मागें राहतें आणि ज्या

देहाच्या जोपासनेंत आपण तपेच्या तपें घालविलीं तो देह मातींत मिळून जातो. हें प्रकृतीचें तत्त्व शिकण्याकरितां त्याला आतां कोणत्याही गुरुची आदेशवाणी ऐकायला नको होती.

असो. इब्राहीम बापाच्या समाधीजवळ येऊन त्यानें तिला सन्मानपूर्वक तीन वेळां स्पर्श केला. जवळची माती घेऊन कपाळाला लाविली. आणि अधोमूख होऊन हळूच ह्मणाला. " बाबा ! माझी पदोपदीं काळजी वाहातां वाहातां तुह्मांला रात्रीं झोंपही मिळत नसे. बाहेरगांवीं गेलां तर धांवत घरीं येत असा. आणि वारंवार माझा समाचार घेतल्यावांचून तुम्हांस बरें वाटत नसे ! बाबा ! या तुमच्या हतभागी मुलाची आतां भेट घ्यावीशी वाटत नाहीं काय ? या जगांतील नश्वरता तुमच्या अंतः-करणाला पटली नव्हती काय ? शरिराची माती होणार हें तत्त्व जर तुह्मांला समजलें होतें तर मग माझ्यासाठीं इतकी तळमळ कां बरें केलीं? आतां मी इतकी विनवणी करीत आहे. मग तुम्ही मला दर्शनही कां देत नाहीं बरें ? माझ्यावरच्या तुमच्या त्या प्रेमालाही समाधी मिळाली काय ? मला आलिंगन देण्यासाठीं पुढें होणारे ते आपले हात कुठें आहेत बरें ? आनन्दाश्रुंनीं आर्द्र होणारे ते नेत्र मला एकवार दिसतील कां ? प्रेमळ हृदयाच्या आश्रयालाही मी वंचित व्हावें काय ? ज्या अंतःकरणां-तील प्रत्येक रक्तबिन्दु पुत्रवात्सल्यानें थरारत होता त्या अन्तःकरणालाही मातींतच जागा मिळावी ना ? मी 'बाबा' 'बाबा' म्हणून हाक मारावी या आशेनें आपण माझ्याकडे कितीदां तरी सकरुण नेत्रांनीं पाहिलें असेल, पण हाय ! आज ! आज मी आपल्या नांवानें टाहो फोडीत आहे; पण त्याचा कांहींच परिणाम आपल्या हृदयावर होऊं नये ना ? '

इब्राहीमचें अन्तःकरण अशा प्रकारच्या पश्चात्तापानें जळूं लागल्यामुळें त्याच्या नेत्रांतून झरझर अश्रुबिन्दु गळूं लागले. तो त्या निर्जन स्मशानांत बसून ' बाबा बाबा ! तुम्हीं इतके निष्ठूर कसे हो झालां ? ' असें ह्मणून रडूं लागला. जगांत त्याला आतां जवळ ओढील असें कोणीहि राहिलें नसल्यामुळें त्याच्या दुःखाला पारावार राहिला नव्हता. आणि त्यामुळेंच तो बापाच्या नांवानें मोठमोठ्यानें हांका मारीत होता. पण त्याला कोण

ओ देणार! तो रडून आणि भ्रमिष्ट स्थितींत हांका मारून थकला व तेथेंच त्या दगडी चबुतऱ्यावर झोंपी गेला.

* * * * *

त्या मृण्मय समाधीगर्भातून त्याच्या बापानें आपल्या मुलाचा हा दीन-वाणा शब्द ऐकला कीं काय न कळे! अथवा हे विराट जग ज्यानें उत्पन्न केलें त्या दीन दुनिच्या मालकाच्या कानांत हा करुणारव प्रतिध्वनित झाला कीं काय तेंहि माहीत नाहीं; पण आम्ही निश्चयपूर्वक एवढें सांगूं शकतों कीं, त्यांनीं जरी या शोकसंतप्त इब्राहीमचा मर्मभेदक विलाप ऐकला नसेल तरी ही ईश्वरानेंच उत्पन्न केलेल्या एका अत्यंत पवित्र जीवानें ही आवेगमय किंकाळी ऐकली होती. तो महात्मा बाहिरा नव्हता.

कारण त्या अंधकारानें झांकलेल्या समाधिक्षेत्रांत, अगदीं मंद पावलें टाकीत एक उंचच उंच मानवमूर्ति अंधःकाराच्या प्रावर्णांत स्वतःला गुरफटून घेऊन अबुअयूबऱ्या कबरेजवळ येऊन उभा राहिला. त्यानें इब्रा-हीमचें सगळें बोलणें ऐकलें होतें. पण आतां जवळ येऊन पाहातो तों एक दुर्दैवी अनुतप्त जीव पितृवियोगदुःखानें अधिर होऊन मोठमोठ्यानें बापाला हांका मारीत असलेला त्याला आढळला आणि त्यामुळें त्याचें हृदय द्रवलें.

समाधीजवळ येतांच ही अबुअयूबची समाधी आहे हे त्या अपरिचित आणि आगांतुक व्यक्तीला कळून चुकलें. या स्मशानांतील मुख्य मुख्य थडगीं त्याच्या चांगलींच परिचयाचीं झालेलीं होतीं. अबुअयूबच्या समाधीवर डोकीं टेंकून अश्रु गाळणारा व ‘ बाबा बाबा ’ असा आक्रोश करणारा मनुष्य म्हणजे अबुअयूबचा मुलगा इब्राहीमच असला पाहिजे हेंहि त्याला समजायला विलंब लागला नाहीं.

अशा प्रकारच्या दीर्घसूत्री अनुमानानें सिद्धांत ठरवून ती दीर्घकाय व्यक्ति अगदीं नजिक येऊन उभी राहिली. आणि हळूंच इब्राहीमच्या अंगाला स्पर्श करून म्हणाली, “ अली इब्राहीम! काय हा तुझा वेडेपणा! हा असा विलाप करणें तुला शोभतें काय? जो आत्मा देहाचीं हजारों बंधनें तोडून महानिर्वाणाप्रत निघून गेला, तो तुझ्या अशा या विलापानें

येथें येईल काय ? तुझ्या बापाचा—अबूअयुबचा—पवित्र आत्मा त्या शांतिमय खुदाच्या पांयाशीं अखंड विश्रांति घेत आहे. तेथून त्याला ओढून आणण्यांत तुला काय आनंद वाटतो ! तसेंच या समाधींत त्याचें जें कलेवर ठेवण्यांत आलें होतें तेंहि मृत्तिकारूपी बनलें असलें पाहिजे. आतां येथें कांहीं नाहीं. निष्कारण छाती आणि कपाळ पिटून घेण्यांत काय अर्थ ! हा सगळा वेडेचार सोडून दे आणि माझ्याबरोबर चल.

---

# प्रकरण १९ वें.



## स्वामिनिष्ठ सेवक.

आतां एकवार आपण मुबारकाकडे वळूं. त्या मोठ्या रात्रीं मुबारक पुढच्या दरवाज्याला कुलूप लावून इसाकच्या घरीं गेला. त्या ठिकाणीं गेल्यावर त्यानें ऐकलें कीं, इसाकसाहेब दख्खनची सफर करून आले खरे; पण कांहीं जरूरीच्या कामासाठीं दिल्लीला गेले असल्यामुळें त्यांची भेट होणें शक्य नाहीं.

इसाकच्या दिवाणाशीं मुबारकाचा परिचय होता. अर्थात् तेथें जातांच त्यानें झालेला सगळा प्रकार थोडक्यांत त्याला सांगितला. व ती हुंडी त्याच्या हातांत दिली. मुनीमही सुज्ञ असल्यामुळें त्यानें त्या हुंडीचा स्वीकार केला. व म्हटलें, " तुम्हीं सर्व मंडळी संकटांत आहां हें ऐकून मलाही वाईट वाटतें. मी ही हुंडी ठेवून घेतों; पण धनीसाहेब दिल्लीहून आल्यानंतर त्यांच्या मार्फत हा व्यवहार पुरा करतां येईल. त्यांच्या विचारावांचून मला कांहींच करतां येणार नाहीं, कारण कोणतीही महत्त्वाची बाब त्यांना विचारिल्यावांचून मी कधींही करीत नसतों. तेव्हां तूं आणखी एक आठवड्यानें येथें ये. "

मुबारक म्हणाला, " साहेब ! तुमचें सांगणें मला कबूल आहे. मात्र ही गोष्ट दुसऱ्या कोणालाही समजतां नये. माझ्या मालकाच्या नांवानेंच ही हुंडी जमा करून घ्या म्हणजे झालें. माझ्याजवळ सध्यां जी रक्कम आहे,

त्या रकमेतून मला किरकोळ सावकारांचें देणें देतां येईल. इब्राहीमसाहेबांना यावेळीं फारच वाईट दिवस आले आहेत. रुपयांची तर फारच जरूर आहे; पण त्यांना जर समजेल कीं, ' दलियेच्या विक्रीच्या पैशांतून आपला सध्या वक्त गुजारत आहे , तर मेल्याहूनही मेलें वाटेल. इतकेंच नव्हे तर न खातां न पितां ते प्राणत्याग करतील. म्हणून म्हणतों, ही रक्कम तूर्त आपणाजवळच असूं दे. सध्यां पुढें आलेल्या' कर्जाखेरीज आणखी किती कर्ज आहे, हें मला माहीत नाहीं. तेव्हां जर तसें कांहीं असेल, आणि त्यांचा तो हाडवैरी उमरशेख नवीनच कांहीं कारस्थान रचून दाराशीं धरणें धरून बसेल. तर या ठेवलेल्या रकमेचा आम्हांला उपयोग करतां येईल. शिवाय लवकरच ते इसाकसाहेबांची भेट घेतल्यावांचून राहाणार नाहींत. ते आल्यावर सगळा खुलासा होईलच. तरी पण दिवाणसाहेब माझी आपणाला इतकीच विनंति आहे कीं, त्यांना या हुंडीच्या बाबतींत कांहींही समजतां नये. त्यांच्या कोमल हृदयावर आघात बसेल. "

दिवाणजींना हृदय होतें. त्यांनींही जगांत बरेच पावसाळे घालविलेले होते. मनुष्यावर येणारे प्रसंग त्यांना माहीत नव्हते असें नाहीं. शिवाय इब्राहीमलाही ते इसाकप्रमाणेंच मान देत असत. ते मुबारकला म्हणाले, " मुबारक ! या बाबतींत तूं अगदीं भिऊं नको. तूंहि या जगांत बरेच दिवस घालविले आहेस. तुझ्यासारखा स्वामिनिष्ठ सेवक फारच थोडे आढ- ळतात. तुला इब्राहीमसाहेबांकडे पाठविल्याबद्दल अजूनही आमच्या साहे- बांना वाईट वाटत असतें. ते तुझी वारंवार आठवण करतात. तूं आपल्या धन्याच्या हितासाठीं जें जें कांहीं करायला सांगतोस तें मी सर्व करीन. थोडी सुद्धां कसूर करणार नाहीं. इतकेंच नव्हे तर त्यांना न कळत दुसऱ्या एकाद्या पेढीवर जरी मला इतकी रक्कम जमा करतां आली तरी ती मी करीन. ही रक्कम गुप्त ठेवण्याच्या बाबतींत जें जें प्रयत्न करावे लागतील तें तें प्रयत्न करण्यांत मी आळस करणार नाहीं, याबद्दल तुझी खात्री असूं दे. तूं आणखीं एक आठवड्यानें येथें ये म्हणजे तुला सर्व कांहीं समजेल. "

आणखीही बऱ्याच गोष्टी झाल्या त्यामुळें रात्रीनें भान राहिलें नाहीं. तिसरा प्रहरही संपून पहाट होण्याची वेळ झाली होती. मुबारकाला तर केव्हां एकदां आपण घरीं पोंचतों असें होऊन गेलें. तो मनांत म्हणाला, " इथें बराच उशीर झाला, साहेबांना तर आज काल मुळींच झोप नाहीं. जर कदाचित् ते मला पहायला आले आणि मी आढळलों नाहीं किंवा दरवाजा बाहेरून बंद असल्याचें त्यांना आढळून आलें तर काळजी करीत बसतील. त्यांना कांहींच समजणार नाहीं. इतक्या रात्रीं दरवाजाला कुलूप लावून तूं कुठें गेला होतास म्हणून विचारलें तर मी त्याचा जबाब काय देऊं ? "

आतां ज्यास्त विचार करण्यांत फायदा नाहीं असें ठरवून ज्या एक्क्या-तून तो आला होता, त्याच एक्केवाल्याला एक रुपया ज्यास्त देण्याचें ठरवून शक्य तितक्या लवकर मला घरीं नेऊन पोहोंचीव असें म्हणाला.

गाडीवाल्यानेंहि त्याच्या सांगण्याप्रमाणें खूप जोरानें गाडी हांकविली त्यामुळें ठरलेल्या वेळांपक्षां तो बराच लवकर घरीं येऊन पोहोंचला. गाडी-वाल्याला भरपूर भाडें मिळाल्यामुळें तोहि आनंदानें निघून गेला. लागलीच मुबारकानें आपल्या कांपऱ्या हातांनीं कुलपाची चावी काढून दरवाजा उघ-डला. नंतर अवाज न होऊं देतां त्यानें पुढील दरवाजा बंद केला व आप-ल्या खोलींत जाऊन मेणबत्ती पेटविली.

दिवा लावल्यावर त्यानें सभोंवार पाहिलें. चोहोंकडे विलक्षण स्तब्धता पसरलेली असल्यामुळें त्यालाहि त्या एवढ्या मोठ्या घरांत भीति वाटल्या-वांचून राहिली नाहीं. तरी पण आपल्या साहेबांची तब्येत कशी काय आहे हें पहाण्यासाठीं तो वरच्या खोलींत आला; पण तेथें त्याला काय दिसणार ? बिछान्यावर कोणींहि नव्हते. दरवाजा सताड उघडा होता व उघड्या खिडकींतून प्रभातकालीन वारा येत होता.

मुबारकाला आश्चर्य वाटलें, तो आपल्याशींच; पण मोठ्यानें म्हणाला, " कांहीं तरी दगा आहे खास. इतक्या रात्रीं ते जातील कुठे ? मग मला जी इतके दिवस भीती वाटत होती ती तर खरी झाली नाहींना ? "

आपल्या प्रभूनें आत्महत्या करून घेतली असावी अशी भयंकर कल्पना

" उद्यां सकाळीं जेव्हां ते सैतान, काजीचे शिपायी घेऊन माझ्या द्वाराशीं येतील, आणि निरनिराळ्या प्रकारच्या निंदापूर्ण शब्दसायकानीं मला जर्जर करून सोडतील तेव्हां मी त्यांना काय बरें उत्तर देऊं ? मी त्यावेळीं बहिरा आणि मुका होईन तर फार उत्तम नाहीं का ? छे. नाहीं. तेंहि सुख माझ्या नशिबीं नाहीं. रक्कम दिली नाहीं कीं, ते यमाचे दूत मला कारागृहांत घेऊन जातील. उघड्या राजरस्त्यांतून आणि हजारों लोकांच्या नजरेसमरून शिपायांच्या पहाऱ्यांत जातांना माझ्या मनाची स्थिती किती शोचनीय होईल ! माझा हा प्राण अमर असावा, नाहीं तर तो अद्याप कसा राहिला असता ! दुःखी माणसाचा जीव लवकर जात नाहीं म्हणतात तें खोटें नव्हे. बापाच्या नांवाला कलंक लावणारा असा मी जन्मलों तरी कशाला ? देवा! हा मनस्ताप आतां माझ्यानें सहन करवत नाहीं. काय करूं !! "

काळजीचा अतिरेक झाला म्हणजे देहालाही स्वस्थपणा नकोसा होतो. उद्दीपित मनोवृत्तींबरोबर देहाचीही चळवळ सुरू होते. इब्राहिमला आतां झोंपून राहवेना. त्यानें अस्वस्थ अन्तःकरणानें बिछाना सोडला. बिछान्यापासून कांहीं अंतरावर त्याची तिजोरी होती. चालत्या काळांत ही तिजोरी मोहोरांनीं आणि जवाहिरानें भरलेली असल्यामुळें तिला एक प्रकारचा डौल आला होता; पण आतां तिच्यांत कपर्दिकही नसून कांहीं महत्त्वाच्या कागदपत्रांनीं तिच्यांतील मोकळी जागा भरून गेलेली असल्यामुळें पेंढा भरून ठेविलेल्या प्रेताप्रमाणें ती निस्तेज दिसत होती. इब्राहीमनें ती उघडली आणि बराच शोधाशोध करून तींतून एक हस्तिदंती पेटी काढली. नंतर मोठ्या आस्थेनें तिच्यावरचें झांकण बाजूला करून आंतील लाल रंगाच्या वल्हरांत असलेलें एक पत्र काढून तें तो मनःपूर्वक वाचूं लागला.

हें पत्र वाचल्यावर त्याच्या अस्वस्थ अन्तःकरणाला थोडीशी शांतता मिळाली, त्याचें धडधडणारें हृदय स्थिर झालें. आणि आपल्या भालप्रदेशावरील धर्मबिन्दु पुशीत तो मनांतल्या मनांत म्हणाला, " माझ्या वडलांनीं आपल्या नश्वर देहाचा त्याग करण्यापूर्वी इतर धनसंपत्तीबरोबरच ही हस्तिदंती छोटी पेटीही मला दिली होती. मला इतके दिवस या छोट्या पेटीची अगदींच विस्मृति पडल्यामुळें या पेटींत काय आहे हें मी पाहूं शकलो

नाहीं. आतां मात्र तो प्रसंग आला आणि वडलांच्या दूरदृष्टीची मला आज चांगलीच जाणीव झाली. कारण या पत्रांतील त्यांचा उपदेश समयोचित आणि जाणतेपणाचें द्योतक आहे. "

त्या पेटींतील पत्र दोन तीन वेळ वाचल्यानंतर इब्राहीम कांहींसा तीव्र स्वरानें स्वत:शींच म्हणाला, " आतां काळजी कसली ? माझ्या प्रेमळ बाबांनींच हें पत्र लिहून ठेवून ऋणमुक्त होण्याची सोपी युक्ति मला सुचविली आहे ! हाय ! इतके दिवस या पत्राकडे लक्ष न दिल्यामुळें माझ्या अन्त:करणाला कसल्या भयंकर वेदना सहन कराव्या लागल्या बरें ? कांहीं तरी विशेष उद्देशानेंच वडिलांनीं मला ही विलक्षण आज्ञा केली असली पाहिजे. मी त्यांच्या या उद्देशाप्रमाणें वागणारच. कारण वडलांची आज्ञा मानून तरी काय फळ मिळतें तें पाहूं. "

तो कागद वाचून, निराश आणि भग्न हृदय झालेला इब्राहीम कांहींसा उत्साहित झाला होता. त्या पत्रांत विशेष मजकूर होता असें नाहीं; तरी पण जो मजकूर होता तोच प्रसंगाला योग्य असा असल्यामुळें त्या तेवढ्याच शब्दाचा त्याच्या मनावर विलक्षण परिणाम झाला.

त्या कागदांत अबुअयूबनें आपल्या हातानें लिहून ठेवलें होतें, तें असें, " बाळ ! चांगले आणि वाईट दिवस हे नेहेमीं जवळ जवळ असतात ! मी तुझ्यासाठीं पुष्कळ पैसा ठेवला आहे; पण तो जर कधीं संपला आणि तुला अगदीं दारोदार भिक्षा मागण्याची वेळ आली, तर उद्यानाच्या मध्यभागीं असलेल्या पुष्करणी जवळील आंब्याच्या मोठ्या झाडाला अगदीं खालच्या बाजूला असलेल्या शुष्क शाखेला दोरी बांधून गळफांस घे. म्हणजे आपोआप सर्व दु:खांतून आणि होणाऱ्या अपमानांतून तुझी मुक्तता होईल. इति.

अबुअयूब मनमरमहमद"

ही विलक्षण आज्ञापत्रिका वाचून इब्राहीम मनांत म्हणाला, " थोड्या वेळापूर्वीं माझ्या मनांत मरणाचीच कल्पना आली होती, पण वडलांनींच माझ्यासाठीं इच्छित मरणाची तजवीज करून ठेविली असेल असें मात्र वाटलें नव्हतें. मी जन्मादारभ्य वडलांच्या आज्ञेविरुद्ध मुळींच वागलों नाहीं. तेव्हां आतां तरी त्यांच्या इच्छेविरुद्ध कां वागावें ? शिवाय त्यांनीं मला

प्रसंगाला योग्य अशीच आज्ञा केलेली आहे. विश्वासू नोकर मुबारक या-वेळीं गाढ झोंपी गेला असेल. दालिया तर घरांतच नाहीं. शिवाय काळोख्या रात्रीची ही विलक्षण निस्तब्धता मला सहाय्य करायला तयार आहे ! तेव्हां मी आतां कशाची वाट पहात राहूं ! मृत्यूवांचून मला यातनांतून मुक्त होतां येणार नाहीं हें तर ठरलेंच. मग निष्कारण मिळालेल्या संधीचा उपयोग कां करून घेऊं नये ? बस्स ठरलें. मृत्यु हाच माझा मित्र ! त्याच्यावांचून मला या दुःखांतून सोडविणारा दुसरा कोणीही नाहीं. ”

कल्पना करतांच मित्राच्या रूपानें मृत्यूचें दर्शन झालें. मनाची तयारी झालेलीच होती. वडलांची आज्ञा मिळाली. जागा निश्चित झाली. त्यांत कालाची अनुकूलता ! मग उशीर कसचा ! मूर्तिमंत सावयव मृत्यू आपल्यापुढें उभा आहे अशी इब्राहीमची खात्री झाली. इतकेंच नव्हे तर मृत्यू आपल्यापाशीं बोलत असून पुढीलप्रमाणें त्याचे शब्द स्पष्ट ऐकू आले. “ मनाला होणारा त्रास, अपमान, हरएक गोष्टीची भीक, आणि अन्तःकरणाला लागणारी तळमळ ही सर्व आपत्ती सहन करून तुला अजूनही जगावेंसें वाटतें काय ? कारागृहाचें दुःख, राजरस्त्यावर जमलेल्या लोकसमुदायांत होणारा अपमान, सावकार लोकांच्या तोंडून वारंवार उच्चारलीं जाणारीं कटु वाक्यें, वगैरे संकटांतून सुटून जावें असें वाटत असेल तर तावडतोब माझ्याबरोबर चल. तुझ्या बापानें मृत्यूपूर्वी स्वतः-च्या हातानें केवळ तुझ्या कल्याणासाठीं म्हणून जी आज्ञापत्रिका लिहून ठेविली आहे, ती मान्य केल्यास तुझ्यासारख्या दुःखी मनुष्याचें कोटकल्याण झाल्यावांचून राहाणार नाहीं—”

मृत्यूच्या मुखांतून निघालेले हे काल्पनिक शब्द ऐकून इब्राहीमला दुप्पट उत्साह आला. त्याला निश्चितपणाची एक प्रकारची धुंदी चढली. त्यानें तें पत्र त्या हस्तिदंती मंजुषेंत जपून ठेविलें. आणि तिजोरी बंद करून तो आपल्या शयनमंदिरांतून हळूच बाहेर आला. दिवा लावण्याचें सर्व साहित्य खालच्या खोलींत असल्यामुळें त्यानें दिवा विझविला आणि खालीं उतरल्यावर दुसरा दिवा पेटवून मुबारकाच्या खोलीकडे पाहिलें तों तें बाहेरून बंद केलेलें असून त्याला कुलूप लावलेलें असल्याचें त्याला आढळलें.

मुबारक आणि दलिया हीं दोघेंहि आपल्या धन्याच्या कल्याणासाठीं रोज नजीकच्या मशिदींत अगर दर्ग्यांत जाऊन प्रार्थना करीत हें इब्राहीमला माहीत होतें. त्यामुळें त्याला ऱ्या प्रसंगीं विशेष आश्चर्य वाटलें नाहीं. पुढचा दरवाजाही बाहेरूनच बंद होता. ही एकंदर अनुकूल परिस्थिती पाहून इब्राहीमला कांहींसें समाधान वाटलें. तो एक दीर्घ सुस्कारा सोडून म्हणाला, " माझ्या आत्मघाताला हें एक प्रकारचें सहाय्यच आहे असें म्हणायला हरकत नाहीं. माझा स्वामिनिष्ठ मुबारक मला अडथळा करण्याला पुढें झाला असता, दलियाही स्वस्थ बसली नसती; पण यावेळीं इथें कोणीच नाहीं ! ईश्वरी योजना ह्मणतात ती यालाच. मला ईश्वराचें सहाय आहे असें म्हणायला हरकत नाहीं. आत्महत्येला असली सोन्यासारखी संधी पुन्हां केव्हांही मिळणार नाहीं. "

मृत्यूचेंच ज्याला सहाय्य त्याला अडविणार कोण? इब्राहीम पुन्हां माडीकडे वळला नाहीं. तो मागचे दार उघडून उद्यानाकडे वळला. आणि इकडे तिकडे पहात त्यानें आपल्या निश्चित जागेकडे पाय वळविले. त्याला अन्धकाराची भीति वाटत नव्हती. चोहोंकडे अंधःकाराचें साम्राज्य पसरलें होते. अर्थात डोळे फाडफाडूनही कांहींच दिसत नव्हतें. तो आपल्या हातांतील छोट्या दिव्यासह आंब्याच्या झाडाखालीं आला. दिव्याची ज्योत वाऱ्यानें थरथर कांपत होती. अस्पष्ट दीपप्रकाशांत त्यानें आपला स्वर्गसोपान पाहिला. जमिनीपासून कांहीं अंतरावर ती फांदी अगदीं शुष्कावस्थेंत आपल्या आयुष्याची घटकापळें मोजीत इब्राहीमच्या सोबतीची वाट पहात असावी असें वाटत होतें. त्या फांदीला इब्राहीमचा सहज हात पोंचला असता. त्यानें एकवार त्या खांदीला हात लावून पाहिलें व त्याच्या चेहेऱ्यावर किंचितकाल सैतानी हास्य चमकलें. 'आपण आतां या जगाचा निरोप घेणार' अशी त्याची खात्री झाली.

तो कांपऱ्या आवाजानें आपल्याशींच म्हणाला, " सुखसंपत्तीनें समृद्ध झालेल्या भूमाते, मला आतां कायमचा निरोप दे. भारस्वरूप होऊन तुझ्या अंकावर क्रीडा करण्यांत काय फायदा ! उद्यान देवते ! लहानपणचें खेळ आणि तारुण्यांतील विलास ज्या ठिकाणीं केले त्या ठिकाणींच माझी अखेरची घटकाही संपणार, हा विलक्षण योगायोगच नव्हे काय !

मोठ्या हौसेनें तयार केलेल्या या आनंदोद्यानांत माझी कबर बांधावी लागेल अगर त्याचें स्मशान बनेल असें केव्हां तरी वाटलें होतें काय ? मनुष्यानें भलत्याच आशा बाळगून कशाला बरें नसत्या संसाराची उभारणी करावी ? शाश्वत आणि आनंदमय असें कांहीं तरी यांत आहे काय ? पण प्रथमच याचा अंदाज कुणालाच होत नसल्यामुळें जो तो मनुष्य फसत असतो; पण हा मृत्यू किती तरी सुखकारक होय. माझ्यासारख्या हतभाग्यानें यापेक्षां ज्यास्त सुखाची आशाच करूं नये. देवा ! मला माझ्या आनंदकारक जागेंत मरण येत आहे. हाच माझा खरा सौख्यसोपान होय स्वतःच्या पुष्पोद्यानांत आपल्या मृत देहाला समाधी मिळणें हें सुख फारच थोड्या लोकांच्या नशिबांत लिहिलेलें असेल. ''

नंतर इब्राहीमनें आपल्या खांद्यावर टाकलेल्या शेल्यावस्त्राचा फांस बनविला आणि त्याचें एक टोंक खांदीला बांधून आत्महत्या करण्याचें ठरविलें. पेटणारा दिवा जवळच ठेवला होता व वाऱ्याच्या झुळकीसरशी त्याची ज्योत थरथर कांपत होती. मरणोन्मुख अन्तःकरणापुढें उभा असणारा मृत्यू जणु काय आपल्या कानाशीं ओरडत असल्याचा इब्राहीमला भास झाला. आतां विलंब कां ? कदाचित् मागाहून कांहीं तरी अडथळा उत्पन्न होईल. चाल कार्याला विलंब करूं नको. ही सुसंधी पुन्हा मिळणार नाहीं. कोणी पहाणारा नाहीं किंवा कोणी अडविणारा नाहीं. चल. मानेचा फांस गच्च बसूं दे.''

इब्राहीमला मृत्यूच्या या आव्हानाची उपेक्षा करतां येईना. त्यानें आपल्या गळ्यांत फांस अडकविला. आणि तो अश्रुपूर्ण नेत्रांनीं म्हणाला, "येतों आतां ! जगाचा निरोप घेतांना मनुष्याला इतकें दुःख कां वाटावें बरें ! चालत्या जगाशीं जागत्या जीवाचा कांहीं निकटचा संबंध तर नसेल ना ? ऋणानुबंधावांचून जन्ममृत्यूचे फेरे फिरावे लागत नसतील ! दलिये ! कोमल अन्तःकरणाच्या देवी ! तुला मिळणाऱ्या उपकारांच्या ऋणांतून मला मुक्त होतां आलें नाहीं याचें फार दुःख होत आहे. माझ्यावर तुझा हक्क होता. मरणाच्या पूर्वी एकवार तुझी भेट झाली पाहिजे होती; पण हाय ! आतां तितका वेळ नाहीं ! मी चाललों ! मुबारक ! विश्वासू प्राण्या ! तूं निमकहलाल झालास; पण मी तुला दगा देऊन चाललों. तुझे कोणतेच उपकार मला फेडतां आले नाहींत ! माझ्यावर तुझें फारच प्रेम होतें; पण

आतां त्याचें काय ! मी चाललों ! मी नाहीं असें पाहून तुला काय वाटेल बरें ? नकोच ती कल्पना ! वेळ होत आला. मी आतां ज्या राज्यांत जात आहे तेथें, त्रास, दुःख, अपमान, छळ, सावकाराचा तगादा, कर्जाची भीती वगैरे कांहीं नाहीं. देवा ! दीन दयाळा ! माझ्या मुबारकाला सांभाळ. दलियेची काय स्थिति होईल कुणाला माहीत ? त्या सैतानाच्या आश्रयाला राहून ती सुखी होऊं शकणार नाहीं. तेव्हां तूं तिला आपल्या कृपाछत्राखालीं राख. मला माझ्या अब्रुसंरक्षणाची थोडीशी तरी आशा असती तर मी या अघोर कार्याला कधींही प्रवृत्त झालों नसतो. असो. आतां तो विचारच नको "

असें म्हणून इब्राहीमनें आपल्या प्रक्षुब्ध मनोवृत्ति आवरण्याचा प्रयत्न न करतां तशा त्या अस्वस्थ मनस्थितींतच त्यानें त्या सुक्या फांदीला जोराचा झोला दिला. लागलीच कर कर असा आवाज झाला आणि बेफाम स्थितींत असलेल्या त्या आत्मघातकी तरुणासह ती शुष्क शाखा जमिनीवर कोसळली.

---

# प्रकरण १८ वें.



## नवजीवन.

मरण्याचा प्रयत्न करूनही इब्राहीम मरूं शकला नाहीं. त्यानें सावध होऊन पाहिलें तों ज्या खादीला आपण फांस अडकविला होता ती खादी पार मोडली असून नजीकच बऱ्याचशा मोहोरा आणि जवाहीर विखुरले आहे. दिव्याच्या क्षीण प्रकाशांतही तें द्रव्य विजेप्रमाणें चमकूं लागलें. जवळच एक थैली पडली होती; पण तिचें तोंड, शीलबंद असल्यामुळें आंत काय आहे तें समजण्याला मार्ग नव्हता.

इब्राहीम उत्सुकतेनें उठला. जमिनीवर पडल्यामुळें झालेल्या आघातानें जरी त्याला बरेंच दुःख होत होतें तरी आकस्मित द्रव्यदर्शन वाटणाऱ्या विस्मयानें सगळें दुःख बाजूला सारून दिव्याच्या मंद प्रकाशांत तो पुढें

झाला. आणि थैलीवरचें शील पेटत्या दिव्याच्या वातीवर जाळून त्यानें ती थैली मोकळी केली, व तींतून बरेंचसें जवाहीर बाहेर काढलें. तो रत्नपारखीच होता. जवाहीर पहातांच त्याची किंमत त्यानें केली. व आपणासारख्या विपन्नावस्थेत पडलेल्या मनुष्याला हा एक ठेवाच सांपडला असेंहि त्याला वाटल्यावांचून राहिलें नाहीं. पण त्या बरोबरच; बापानें तशी ती विलक्षण आज्ञा कां केली याचाही त्याला उलगडा झाला. व वडलांच्या दूरदर्शीपणाचें त्याला कौतुक वाटलें. तो सद्‌गदीत झाला.

नंतर या अपरात्रीं येथें कशाला राहावें ! असा विचार करून तो आपल्या खोलींत आला. उज्वल प्रकाशांत त्यानें त्या जवाहीराची परिक्षा केली, व तें फारच मूल्यवान असल्याबद्दल त्यानें आपली पुन्हां खात्री करून घेतली. त्याचा बाप प्रख्यात जवाहिऱ्या होता व हाहि बापाजवळच तें कसब शिकलेला होता. त्यामुळेंच त्याला जवाहिराची किंमत ताबडतोब करतां येत असे. तेथून एकत्र करून आणलेल्या सर्व रत्नांची किंमत एक लाखापेक्षां ज्यास्त होईल असा त्यानें अंदाज करून त्या बाबतींत आपलें समाधान करून घेतलें.

थैलींत फारच दक्षतापूर्वक तपास केल्यानंतर त्याला एक लहानशी लाल रंगाची चिठी मिळाली आणि ही चिठी आपल्या बापानें लिहिलेली असली पाहिजे अशीही त्याची खात्री झाली.

त्यानें अत्यंत उत्सुकतेनें तें पत्र वाचलें. पत्रांत पुढीलप्रमाणें मजकूर होता. " बाळ ! लहानपणापासून तुझी चालचालणूक पाहून मी समजून चुकलों कीं, अत्यंत श्रमांनीं सांठविलेल्या या संपत्तीचा उधळेपणानें तूं लवकरच नाश करणार. मी हयात असतानांच तूं गुप्तपणानें जे मित्र जमवून द्रव्याचा अपव्यय करीत होतास ते माहितींचे असल्यामुळें मला तुझीं रोजचीं कृत्यें कळत असत. तुझे मित्र अदूरदर्शी असून ते उच्छृंखल व स्वार्थी असल्यामुळें तुला लवकरच कफल्लक बनविणार हें मी समजून होतों. व त्यामुळें मी तुला वारंवार सावधही केलें होतें; पण तूं तिकडे मुळींच लक्ष दिलें नाहींस. एक कवडीही तूं शिल्लक ठेवणार नाहीं हें मी समजून चुकलों. शास्त्रांत लिहिलें आहे, जो अव्यवस्थित अन्तःकरणाचा असून स्वेच्छाचारी मित्रांनीं वेढलेला असतो व आळसामुळें ज्याच्या हातून कांहीं-

ही उद्योग होत नाहीं. त्याच्या हातांत जरी कुबेराचें भांडार दिलें तरी तें त्याला पुरणार नाहीं. आणि यासाठींच मी कांहीं निवडक जवाहीर या शुष्क आंब्याच्या खोदींत लपवून ठेविलें आहे. तूं माझा मुलगा, लहानपणापासून लाडांत वाढलेला, दुःखाची तर छायाहि तुला माहित नाहीं, अशा स्थितींत गरिबीची तीव्र ज्वाला तुझ्यानें सहन करवणार नाहीं. तसेंच तूं भिकारी होऊन दारोदार फिरावें हेंहि मला पसंत नाहीं. यासाठीं मी ही अशी व्यवस्था करून ठेविली. नाहीं तर आत्महत्त्या करण्याबद्दल कोणी तरी कधीं आज्ञा करील काय ? ही खांदी शुष्क व पोकळ असल्यामुळे अगदीं थोड्याशा भारानेंही मोडून पडावी अशी मी व्यवस्था केलेली होती. अमूक अमूक ठिकाणीं इतकी संपत्ती ठेविली आहे असें नुसतें लिहून आत्महत्त्येची अट लिहून ठेवावी लागली. पूर्ण निराशा झाल्यावांचून कोणीही आत्मघाताला प्रवृत्त होणार नाहीं. व पश्चात्तापावांचून जिवाचा कंटाळाही येणार नाहीं. मनुष्याची सुधारणा होण्याचा म्हणून एक काळ ठरलेला असतो. आणि तो असा पश्चात्तापाच्या वेळीं येतो. व कांहीं उन्नति झाली तर ती त्याच वेळीं होते; पण आत्मघात केल्यावर उन्नति कशी होणार ! यासाठीं मला ही व्यवस्था करावी लागली. आज आकस्मिक रीतीनें मिळालेल्या या द्रव्याची मोजदाद केल्यास तें एक लाख होईल. तरी एवढ्यांतच काय तें समजून तूं पुढें जर चांगल्या प्रकारानें वागलास तर तुला कधींहि संकटांत पडावें लागणार नाहीं. हात राखून खर्च केल्यास तुला व तुझ्या परिवाराला हें द्रव्य जन्मभर पुरेल. याउपर तुझी मर्जी. इति.

तुझा प्रेमळ बाप—अबूअयूब—"

आपल्या स्वर्गवासी वडलांच्या हातचा तो अपूर्व लेख वांचून इब्राहीम मनें आपल्या दूरदर्शी बापाला व ईश्वराला असंख्य धन्यवाद देऊन मनांत म्हटलें, ज्या भीतीनें मी आत्महत्त्या करण्याला तयार झालों होतों ती भीति आतां मला राहिलेली नाहीं. आजच्या या जवाहिरापैकीं थोड्याशा जवाहिराच्या विक्रीनेंहि सावकारांचें कर्ज फेडून दलियेचें देणें देतां येईल. या घरांत राहावें असें मला आतां वाटत नाहीं. ज्या ठिकाणीं राहिल्यानें माझा अपमान झाला, अनेक दुःखें सहन करावीं लागलीं व मित्रांनीं आपला स्वार्थ साधून मला फसविलें, त्या ठिकाणीं राहाणें म्हणजे पुन्हां तस-

लीच आपत्ति ओढवून घेणें होय. शिवाय दलियेसारख्या प्रेमदेवतेचा ज्या ठिकाणीं वियोग झाला तें ठिकाण त्याज्यच नव्हे काय ? ही लक्षांवधी रक्कम घेऊन मी माझा मित्र इसाक याच्याबरोबर व्यापार सुरू केला तर हां हां म्हणतां मी माझ्या घराण्याचें नांव पुढें आणल्यावांचून राहाणार नाहीं. माझ्या नांवाला लागलेला कलंक धुवून काढण्यालाही मला असेंच कांहीं तरी साहस करणें भाग आहे. जर मला पुन्हां चांगले दिवस आले आणि दलियेला मी तिच्या दास्यत्वांतून मुक्त करूं शकलों तरच पुन्हां या घरांत पाऊल ठेवीन नाहीं तर हें शेवटचेंच प्रयाण होणार ! आज मला मुबारकाची मात्र भेट घेतां नये, कारण तो मला भेटल्यास अशा रीतीनें कधींही गृहत्याग करूं देणार नाहीं. यासाठीं तो येण्यापूर्वीच मला निघून गेले पाहिजे.

अशा प्रकारें मनाचा निश्चय करून इब्राहीमनें एका पत्रांत आपली सगळी हकीकत लिहिली आणि तें पत्र आपल्या बिछान्यावर अशा जागीं ठेवून दिलें कीं तें अगदीं सहज रीतीनें मुबारकाला मिळावें ! झालेली सगळी विचित्र कहाणी त्यानें त्या पत्रांत लिहिली असल्यामुळें मुबारकाला कोणत्याही प्रकारें संशयित होण्याचें कारण राहिले नव्हतें. आणखी पत्राच्या शेवटीं लिहिलें होतें, माझ्या उशीखालीं असलेल्या एका लहानशा पिशवींत तुला बऱ्याच किंमतीचें जवाहीर मिळेल, त्यांतून थोडेंसें विकून तूं सगळ्या कर्जाची फेड कर. म्हणजे माझ्याविरुद्ध इतरांच्या कानाचे चावे घेणारीं सैतानी सावकारांचीं तोंडें बंद होतील. दलियेनें स्वतःची विक्री करून उमरशेखजवळून जी दहा हजारांची रक्कम घेतली आहे, ती व या जवाहिराच्या विक्रींतून येणारी सर्व रक्कम एकत्र करून दलियेला दास्यत्वांतून मुक्त कर. मी फसवून गेलों असें कोणाही सावकारानें मला म्हणूं नये. या महत्त्वाच्या गोष्टीचा तुला विसर पडणार नाहीं अशी माझी खात्री आहे. पत्रीं लिहिलेली सर्व कामगिरी संपविल्यावर जो पैसा राहील तो सर्व मी तुला दिलेला आहे. त्याचा तूं स्वतःच्या उन्नतीकडे उपयोग कर. मी कुठें जाणार आणि पुढें काय करणार हें आज कांहींच ठरलेलें नाहीं; पण एकादी चांगली जागा मला सांपडल्यास मी तुला तेथून माझी खुशाली कळवीन. माझ्या संबंधानें तूं मुळींच काळजी करूं नको. ”

अशा प्रकारचें पत्र लिहून इब्राहीमनें ते बिछान्यावर बरोबर मध्यभागीं ठेविलें. व थोडेसे जवाहीर एका लहान पिशवींत भरून ती पिशवी आपल्या उशी खालीं टेवून दिली. आणि त्यानंतर हातांत पेटती मेणबत्ती घेऊन तो खिडकीवाटे बाहेर पडला व मोकळया जागेंत आल्यावर त्यानें मुक्ततेचा एक दीर्घ सुस्कारा सोडला.

यावेळीं मध्यरात्र होऊन गेलेली होती. अजूनही मुबारक घरीं आलेला नव्हता. अर्थात इब्राहीमचें हें कृत्य कोणी पाहिलें नाहीं आणि त्याला कोणी अडविलेंहि नाहीं.

दारुण अन्धकारानें चारी दिशा भरून गेल्या होत्या. कुठेंहि रस्ता दिसत नव्हता. तरी पण तो त्या राजरस्त्यावर येतांच इब्राहीमनें मेणबत्ती विझवून खिशांत टाकिली आणि तो त्या अंधारांतच रस्ता चालूं लागला. कुठें जाणार हें त्यानें कांहींच ठरविलें नव्हतें.

* * * * * *

त्या कालीं रस्त्यांत दरवडेखोरांची फारच भीति होती. वाटसरावर केव्हां कुठून कसा हल्ला येईल याचा भरंवसा नव्हता. त्यामुळें रात्रींच काय तर दिवसाढवळ्याही रस्त्यानें जाणें धोक्याचें वाटत असे. त्यामुळें इब्राहीमनें आपल्या जवळच्या जवाहिराचे तीन भाग केले आणि ते डोकीवरच्या फेट्यांत, आंगरख्याच्या खिशांत आणि पायजम्यांत अशा रीतीनें विभागून, प्रवासाला सुरवात केली. आपल्या बचावाचीही त्यानें तयारी केली नव्हती असें नाहीं. तरी पण चोराचा हात पडल्यास सर्वच जवाहीर त्यांच्या हातीं लागूं नये म्हणून त्यानें वरील युक्ति अमलांत आणली होती. प्रसंग पडला म्हणजे युक्ति सुचते ती ही अशी.

इब्राहीमनें मनांत विचार केला, ' ही सगळी तयारी झाली, पण आतां जावें कुठें, हा एक प्रश्नच आहे. बाहेर कोठें जावें तर शहरासभोंवार तट आहे. वेशी बंद झाल्या. दरवाजावरचा जागता पहारा अडथळा करणार ! उजाडल्यावांचून कांहीं दरवाजे उघडणार नाहींत. तेव्हां हा तोपर्यंतचा वेळ कुठें आणि कसा संपवावा ! ' तो मोठ्या काळजींत पडला; पण राजरस्त्यावर गर्द काळोखांत नुसतें उभे राहून तरी काय करणार हा प्रश्न उत्पन्न झाल्यामुळें पाय नेतील तिकडे जावयाचें असें त्यानें ठरविलें आणि

तो चालू लागला. हां हां म्हणता शहरचा मध्यभाग मागें राहिला आणि त्यानें निर्जन रस्त्यानें चालायला सुरवात केली; पण योगायोग किती विलक्षण ! जो मनुष्य मरण चुकवून जगण्याच्या मार्गाला लागला होता तोच अचानकपणें स्मशानभूमींत येऊन पोहोंचला.

मृत व्यक्तींचीं स्मृतिमंदिरें उभारलेल्या जागेंत आपण एकाकी स्थितींत आहों हें आजूबाजूला पहातांच इब्राहीमच्या लक्षांत आले. व तो थोडासा चमकला; पण त्याच वेळीं त्याच्या मनांत एक नवीन कल्पना उत्पन्न झाली. तो मनांत म्हणाला, " ज्यानें जिवंत असतां माझ्यासाठीं इतका पैसा जमवून ठेवला व मरणानंतरही दूरदर्शीपणानें माझी पुढील तरतूद केली. त्याच्या उपकाराची माझ्या हातून फेड होणें अशक्य आहे. कारण मी कुलांगार झाल्यामुळें माझ्या अपवित्र मुखानें त्या पवित्र पुण्यात्म्याचें नांवही उच्चारणें योग्य होणार नाहीं; तरी पण मी मला नकळत बापाच्या कबरेजवळ येऊन पोंचलों आहे तेव्हां जन्मभूमी सोडून जातांना मृतात्म्याचा शेवटचा निरोप घेऊन जावा व समाधीचें दर्शन घ्यावें हें उत्तम. पुन्हां मी या शहरांत येईन कीं नाहीं कुणाला माहीत ! जगांतून कायमचा नाहींसा होण्यासाठींच मी जात नसेन कशावरून ! "

पितृभक्त पुत्राला शोभण्यासारखेंच हे विचार होते. शिवाय त्या समाधीक्षेत्रांत उभारलेल्या कबरा जरी पुष्कळ होत्या तरी अबुअयूबची कबर पांढऱ्या संगमरवरी दगडाची असून बरीच उंच असल्यामुळें काळोखांतही ती ओळखतां येण्यासारखी होती; आणि त्यामुळेंच तसल्या अंधारांतही तो आपल्या बापाच्या स्मृतिमंदिराजवळ गेला. ज्या ठिकाणीं त्याच्या प्रेमळ पित्याचें कलेवर मृण्मय होऊन राहिलें होते, त्या ठिकाणीं ती कमान पाहताच त्याला मानवजीवनाची नश्वरता कळून आली व केवढेंहि पराक्रम गाजविले, अथवा कितीहि नांव मिळविलें तरी शेवटीं मातींतच अदृश्य व्हावयाचें. हें तत्त्व त्याच्या स्मृतिपटलावर नोंदलें गेलें. सुखाच्या पाठीमागें धांवण्यांत जो आपण व्यर्थ कालक्षेप करतों व निरनिराळ्या व्यसनांनीं आपल्या अपुरत्या वासनांची तृप्ती करण्याची हांव बाळगतो तिचे पर्यवसान काय होतें हें त्याला चांगलें कळून चुकलें. आत्मा देहातीत झाल्यावर कीर्ति अथवा अपकीर्ति जें काय मिळविलें असेल तें मागें राहतें आणि ज्या

देहाच्या जोपासनेंत आपण तपेच्या तपें घालविलीं तो देह मातींत मिळून जातो. हें प्रकृतीचें तत्त्व शिकण्याकरितां त्याला आतां कोणत्याही गुरुची आदेशवाणी ऐकायला नको होती.

असो. इब्राहीम बापाच्या समाधीजवळ येऊन त्यानें तिला सन्मानपूर्वक तीन वेळां स्पर्श केला. जवळची माती घेऊन कपाळाला लाविली. आणि अधोमुख होऊन हळूच ह्मणाला. "बाबा! माझी पदोपदीं काळजी वाहातां वाहातां तुह्मांला रात्रीं झोंपही मिळत नसे. बाहेरगांवीं गेलां तर धांवत घरीं येत असा. आणि वारंवार माझा समाचार घेतल्यावांचून तुम्हांस बरें वाटत नसे! बाबा! या तुमच्या हतभागी मुलाची आतां भेट घ्यावीशीं वाटत नाहीं काय? या जगांतील नश्वरता तुमच्या अंतःकरणाला पटली नव्हती काय? शरिराची माती होणार हें तत्त्व जर तुह्मांला समजलें होतें तर मग माझ्यासाठीं इतकी तळमळ कां बरें केलीं? आतां मी इतकी विनवणी करीत आहे. मग तुम्ही मला दर्शनही कां देत नाहीं बरें? माझ्यावरच्या तुमच्या त्या प्रेमालाही समाधी मिळाली काय? मला आलिंगन देण्यासाठीं पुढें होणारे ते आपले हात कुठें आहेत बरें? आनन्दाश्रुंनीं आर्द्र होणारे ते नेत्र मला एकवार दिसतील कां? प्रेमळ हृदयाच्या आश्रयालाही मी वंचित व्हावें काय? ज्या अंतःकरणांतील प्रत्येक रक्तबिन्दु पुत्रवात्सल्यानें थरारत होता त्या अन्तःकरणालाही मातींतच जागा मिळावी ना? मी 'बाबा' 'बाबा' म्हणून हाक मारावी या आशेनें आपण माझ्याकडे कितीदां तरी सकरुण नेत्रांनीं पाहिले असेल, पण हाय! आज! आज मी आपल्या नांवानें टाहो फोडीत आहे; पण त्याचा कांहींच परिणाम आपल्या हृदयावर होऊं नये ना?

इब्राहीमचें अन्तःकरण अशा प्रकारच्या पश्चात्तापानें जळूं लागल्यामुळे त्याच्या नेत्रांतून झरझर अश्रुबिन्दु गळूं लागले. तो त्या निर्जन स्मशानांत बसून 'बाबा बाबा! तुम्हीं इतके निष्ठुर कसे हो झालां?' असें ह्मणून रडूं लागला. जगांत त्याला आतां जवळ ओढील असें कोणीहि राहिलें नसल्यामुळें त्याच्या दुःखाला पारावार राहिला नव्हता. आणि त्यामुळेच तो बापाच्या नांवानें मोठमोठ्यानें हाका मारीत होता. पण त्याला कोण

ओ देणार ! तो रडून आणि भ्रमिष्ट स्थितींत हांका मारून थकला व तेथेंच त्या दगडी चबुतऱ्यावर झोंपी गेला.

* * * * *

त्या मृण्मय समाधीगर्भातून त्याच्या बापानें आपल्या मुलाचा हा दीन-वाणा शब्द ऐकला कीं काय न कळे ! अथवा हे विराट जग ज्यानें उत्पन्न केलें त्या दीन दुनिच्या मालकाच्या कानांत हा करुणारव प्रतिध्वनित झाला कीं काय तेंहि माहीत नाहीं; पण आम्ही निश्चयपूर्वक एवढें सांगूं शकतों कीं, त्यांनीं जरी या शोकसंतप्त इब्राहीमचा मर्मभेदक विलाप ऐकला नसेल तरी ही ईश्वरानेंच उत्पन्न केलेल्या एका अत्यंत पवित्र जीवानें ही आवेगमय किंकाळी ऐकली होती. तो महात्मा बहिरा नव्हता.

कारण त्या अंधकारानें झांकलेल्या समाधिक्षेत्रांत, अगदीं मंद पावलें टाकीत एक उंचच उंच मानवमूर्ति अंधःकाराच्या प्रावर्णांत स्वतःला गुरफटून घेऊन अबुअयूबच्या कबरेजवळ येऊन उभा राहिला. त्यानें इब्राहीमचें सगळें बोलणें ऐकलें होतें. पण आतां जवळ येऊन पाहातो तों एक दुर्दैवी अनुतप्त जीव पितृवियोगदुःखानें अधिर होऊन मोठमोठ्यानें बापाला हांका मारीत असलेला त्याला आढळला आणि त्यामुळें त्याचें हृदय द्रवलें.

समाधीजवळ येतांच ही अबुअयूबची समाधी आहे हे त्या अपरिचित आणि आगांतुक व्यक्तीला कळून चुकलें. या स्मशानांतील मुख्य मुख्य थडगीं त्याच्या चांगलींच परिचयाचीं झालेलीं होतीं. अबुअयूबच्या समाधीवर डोकीं टेंकून अश्रु गाळणारा व ' बाबा बाबा ' असा आक्रोश करणारा मनुष्य म्हणजे अबुअयूबचा मुलगा इब्राहीमच असला पाहिजे हेंहि त्याला समजायला विलंब लागला नाहीं.

अशा प्रकारच्या दीर्घसूत्री अनुमानानें सिद्धांत ठरवून ती दीर्घकाय व्यक्ती अगदीं नजिक येऊन उभी राहिली. आणि हळूंच इब्राहीमच्या अंगाला स्पर्श करून म्हणाली, " आली इब्राहीम ! काय हा तुझा वेडेपणा ! हा असा विलाप करणें तुला शोभतें काय ? जो आत्मा देहाचीं हजारों बंधनें तोडून महानिर्वाणाप्रत निघून गेला, तो तुझ्या अशा या विलापानें

येथें येईल काय ? तुझ्या बापाचा–अबूअयुबचा–पवित्र आत्मा त्या शांतिमय खुदाच्या पांयाशीं अखंड विश्रांति घेत आहे. तेथून त्याला ओढून आणण्यांत तुला काय आनंद वाटतो ! तसेंच या समाधींत त्याचें जें कलेवर ठेवण्यांत आलें होतें तेंहि मृत्तिकारूपी बनलें असलें पाहिजे. आतां येथें कांहीं नाहीं. निष्कारण छाती आणि कपाळ पिटून घेण्यांत काय अर्थ ! हा सगळा वेडेचार सोडून दे आणि माझ्याबरोबर चल.

---

## प्रकरण १९ वें.



### स्वामिनिष्ठ सेवक.

आतां एकवार आपण मुबारकाकडे वळूं. त्या मोठ्या रात्रीं मुबारक पुढच्या दरवाज्याला कुलूप लावून इसाकच्या घरीं गेला. त्या ठिकाणीं गेल्यावर त्यानें ऐकलें कीं, इसाकसाहेब दखखनची सफर करून आले खरे; पण कांहीं जरूरीच्या कामासाठीं दिल्लीला गेले असल्यामुळें त्यांची भेट होणें शक्य नाहीं.

इसाकच्या दिवाणाशीं मुबारकाचा परिचय होता. अर्थात् तेथें जातांच त्यानें झालेला सगळा प्रकार थोडक्यांत त्याला सांगितला. व ती हुंडी त्याच्या हातांत दिली. मुनीमही सूज्ञ असल्यामुळें त्यानें त्या हुंडीचा स्वीकार केला. व म्हटलें, " तुम्हीं सर्व मंडळी संकटांत आहां हें ऐकून मलाही वाईट वाटतें. मी ही हुंडी ठेवून घेतों; पण धनीसाहेब दिल्लीहून आल्यानंतर त्यांच्या मार्फत हा व्यवहार पुरा करतां येईल. त्यांच्या विचारावांचून मला कांहींच करतां येणार नाहीं, कारण कोणतीही महत्त्वाची बाब त्यांना विचारिल्यावांचून मी कधींही करीत नसतों. तेव्हां तूं आणखी एक आठवड्यानें येथें ये. "

मुबारक म्हणाला, " साहेब ! तुमचें सांगणें मला कबूल आहे. मात्र ही गोष्ट दुसऱ्या कोणालाही समजतां नये. माझ्या मालकाच्या नांवानेंच ही हुंडी जमा करून घ्या म्हणजे झालें. माझ्याजवळ सध्यां जी रक्कम आहे,

त्या रकमेतून मला किरकोळ सावकारांचें देणें देतां येईल. इब्राहीमसाहेबांना यावेळीं फारच वाईट दिवस आले आहेत. रुपयांची तर फारच जरूर आहे; पण त्यांना जर समजेल कीं, ' दालियेच्या विक्रीच्या पैशांतून आपला सध्यां वक्त गुजारत आहे , तर मेल्याहूनही मेलें वाटेल. इतकेंच नव्हे तर न खातां न पितां ते प्राणत्याग करतील. म्हणून म्हणतों, ही रक्कम तूर्त आपणाजवळच असूं दे. सध्यां पुढें आलेल्या कर्जाखेरीज आणखी किती कर्ज आहे, हें मला माहीत नाहीं. तेव्हां जर तसें कांहीं असेल, आणि त्यांचा तो हाडवैरी उमरशेख नवीनच कांहीं कारस्थान रचून दाराशीं धरणें धरून बसेल. तर या ठेवलेल्या रकमेचा आम्हांला उपयोग करतां येईल. शिवाय लवकरच ते इसाकसाहेबांची भेट घेतल्यावांचून राहाणार नाहींत. ते आल्यावर सगळा खुलासा होईलच. तरी पण दिवाणसाहेब माझी आपणाला इतकीच विनंति आहे कीं, त्यांना या हुंडीच्या बाबतींत कांहींही समजतां नये. त्यांच्या कोमल हृदयावर आघात बसेल. "

दिवाणजींना हृदय होतें. त्यांनींही जगांत बरेच पावसाळे घालविलेले होते. मनुष्यावर येणारे प्रसंग त्यांना माहीत नव्हते असें नाहीं. शिवाय इब्राहीमलाही ते इसाकप्रमाणेंच मान देत असत. ते मुबारकला म्हणाले, " मुबारक ! या बाबतींत तूं अगदीं भिऊं नको. तूंहि या जगांत बरेच दिवस घालविले आहेस. तुझ्यासारखा स्वामिनिष्ठ सेवक फारच थोडे आढळतात. तुला इब्राहीमसाहेबांकडे पाठविल्याबद्दल अजूनही आमच्या साहेबांना वाईट वाटत असतें. ते तुझी वारंवार आठवण करतात. तूं आपल्या धन्याच्या हितासाठीं जें जें कांहीं करायला सांगतोस तें मी सर्व करीन. थोडी सुद्धां कसूर करणार नाहीं. इतकेंच नव्हे तर त्यांना न कळत दुसऱ्या एकाद्या पेढीवर जरी मला इतकी रक्कम जमा करतां आली तरी ती मी करीन. ही रक्कम गुप्त ठेवण्याच्या बाबतींत जें जें प्रयत्न करावे लागतील तें तें प्रयत्न करण्यांत मी आळस करणार नाहीं, याबद्दल तुझी खात्री असूं दे. तूं आणखीं एक आठवड्यानें येथें ये म्हणजे तुला सर्व कांहीं समजेल. "

आणखीही बऱ्याच गोष्टी झाल्या त्यामुळें रात्रीनें भान राहिलें नाहीं. तिसरा प्रहरही संपून पहाट होण्याची वेळ झाली होती. मुबारकाला तर केव्हां एकदां आपण घरीं पोंचतों असें होऊन गेलें. तो मनांत म्हणाला, " इथें बराच उशीर झाला, साहेबांना तर आज काल मुळींच झोंप नाहीं. जर कदाचित् ते मला पहायला आले आणि मी आढळलों नाहीं किंवा दरवाजा बाहेरून बंद असल्याचें त्यांना आढळून आलें तर काळजी करीत बसतील. त्यांना कांहींच समजणार नाहीं. इतक्या रात्रीं दरवाजाला कुलूप लावून तूं कुठें गेला होतास म्हणून विचारलें तर मी त्याचा जबाब काय देऊं ? "

आतां ज्यास्त विचार करण्यांत फायदा नाहीं असें ठरवून ज्या एक्क्या-तून तो आला होता, त्याच एक्केवाल्याला एक रुपया ज्यास्त देण्याचें ठरवून शक्य तितक्या लवकर मला घरीं नेऊन पोहोंचीव असें म्हणाला.

गाडीवाल्यानेंहि त्यांच्या सांगण्याप्रमाणें खूप जोरानें गाडी हांकविली त्यामुळें ठरलेल्या वेळांपेक्षां तो बराच लवकर घरीं येऊन पोहोंचला. गाडी-वाल्याला भरपूर भाडें मिळाल्यामुळें तोहि आनंदानें निघून गेला. लागलीच मुबारकानें आपल्या कांपऱ्या हातांनीं कुलपाची चावी काढून दरवाजा उघ-डला. नंतर अवाज न होऊं देतां त्यानें पुढील दरवाजा बंद केला व आप-ल्या खोलींत जाऊन मेणबत्ती पेटविली.

दिवा लावल्यावर त्यानें सभोंवार पाहिलें. चोहोंकडे विलक्षण स्तब्धता पसरलेली असल्यामुळें त्यालाहि त्या एवढ्या मोठ्या घरांत भीति वाटल्या-वांचून राहिली नाहीं. तरी पण आपल्या साहेबांची तब्येत कशी काय आहे हें पहाण्यासाठीं तो वरच्या खोलींत आला; पण तेथें त्याला काय दिसणार ? बिछान्यावर कोणीहि नव्हते. दरवाजा सताड उघडा होता व उघड्या खिडकींतून प्रभातकालीन वारा येत होता.

मुबारकाला आश्चर्य वाटलें, तो आपल्याशींच; पण मोठ्यानें म्हणाला, " कांहीं तरी दगा आहे खास. इतक्या रात्रीं ते जातील कुठे ? मग मला जी इतके दिवस भीती वाटत होती ती तर खरी झाली नसेल ना ? "

आपल्या प्रभूनें आत्महत्या करून घेतली असावी अशी भयंकर कल्पना

मनांत येतांच मुबारक उतावीळपणानें चोहोंकडे धांवपळ करूं लागला, त्यानें तें सर्व घर धुंडाळलें.कोनाकोंपराहि पहावयाचा ठेवला नाहीं; पण कुठेंच त्याचा मालक त्याला भेटला नाहीं. त्यामुळें त्यानें आत्महत्त्या केली असावी असेंच त्याचें मन त्याला सांगूं लागलें.

चुकल्याचें मन चोहोंकडे म्हणतात, त्याप्रमाणें मुबारकाला एका विचारानें समाधान वाटेना. तो मनांत म्हणाला, "घरांत उष्मा होत असल्यामुळें कदाचित् खिडकीवाटे बागेत गेले असतील." हा विचार मनांत येतांच तो पुन्हां खालीं आला; पण तितक्यांत मधल्या दारानें ते आपल्या खोलींत गेले असतील अशा समजुतीनें तो पुन्हां त्यांच्या खोलींत जाऊन उगाच वेड्यासारखा इकडे तिकडे पाहूं लागला. तोंच बिछान्याजवळ पडलेलें लाल रंगाचें एक पत्र त्याला मिळालें लागलीच त्यानें तें वाचायला सुरवात केली. पत्रांत पुढीलप्रमाणें मजकूर होता.

"मुबारक ! मी तुला सांगितलें नाहीं; पण आतां सांगतों. आज सकाळींच काजीचा शिपायी दाराशीं आला होता व त्यानें कळविल्यावरून मला समजलें कीं, माझ्या देण्यापैकीं किरकोळ सावकारांनीं माझ्यावर बजावणी वारंट काढलें असून ते तें उद्यां सकाळीं बजावणार आहेत. तत्पूर्वीं रकमेची व्यवस्था झाली पाहिजे. या देण्याची एकंदर रक्कम बाराशें रुपये आहे आणि माझ्या हातांत तर एक छदामही नाहीं. बरें दालिये-सारखी एखादी दासीहि नाहीं. नाहीं तर आत्मविक्रय करून तिनें मला कर्जातून मोकळें केलें असतें. माझा इलाज नाहीं. मानीपणामुळें अपमान सहन करवत नाहीं. आणि तशांत याचवेळीं पित्राशेचा एक लहानसा लेख आतांच माझ्या हातांत आला त्यांत ते मला आत्महत्त्या करायला सुचवितात. इतकेंच नव्हे तर पुष्करणीजवळील मोठ्या आम्रवृक्षाच्या एका शुष्क शाखेला गळफांस लावावा अशीहि त्यांची स्पष्ट सूचना होती. मला आशेचा किरण दिसला. मी आत्महत्त्येला निघालों. सकाळीं होणाऱ्या अपमानांतून सुटण्याला दुसरा मार्ग नाहीं. शिवाय या कृत्यापासून मागें ओढायला दुसरें कोणींही नाहीं. तूं नाहीं—दालिया तर नाहींच. मी चाललों. तूं कुठेंहि जाण्याला मोकळा आहेस."

आली इब्राहीम.

पत्र वाचतां वाचतां मुबारकाचें हृदय थरथरा कांपत होतें व त्याचा परिणाम सगळ्या अंगावर दिसत होता. त्यानें पत्र फेंकून दिलें आणि तो एकाद्या भ्रमिष्ट मनुष्यासारखा माडीवरून खालीं उतरला आणि त्या आंब्याच्या झाडाखालीं जाऊन त्यानें पाहिलें पण त्या ठिकाणीं इब्राहीम आढळला नाहीं अथवा त्याचें प्रेतही दिसलें नाहीं. मात्र खांदी मोडून पडलेली दिसत होती. ' मग इब्राहीमचें प्रेत एकाद्या हिंस्र पशूच्या भक्ष्यस्थानीं तर पडलें नसेल ना ? मुबारकच्या मनांत शंका आली, पण ती शंकाच होती. ती त्याला खरी वाटेना, त्यानें एक मोठी मशाल पेटविली आणि त्या उद्यानांत चोहोंकडे इब्राहीमचा तपास केला; पण त्याचा इच्छित हेतू पूर्ण झाला नाहीं हें सांगावयास नकोच. कुठेंच जेव्हां त्याला आपल्या प्रेमळ धन्याचा तपास लागेना तेव्हां तो दोन्ही हातांनीं मस्तक दाबून धरून रडूं लागला. त्याला कांहीं सुचेना. आपल्या धन्याचें प्रेत एकाद्या क्रूर श्वापदांच्या भक्ष्यस्थानीं पडावें ही कल्पना त्याला होऊं लागली. तो आपल्या मनाचें निरनिराळ्या प्रकारांनीं समाधान करूं लागला.

पण नुसत्या विचारांनीं तरी त्याचें समाधान कसें होणार ! तो आपल्या अश्रुपूर्ण नेत्रांनीं दीनासारखा चोहोंकडे पहात घरांत आला. दुःखातिरेकानें त्याचें हृदय सारखें धडधडत होतें. आपल्या खोलींत येऊन बसल्यावर तो मनांत म्हणाला, " खरोखरच इब्राहीमसाहेबांनीं आत्महत्या केली असेल काय ? छे. खात्री होत नाहीं. सकाळीं चांगल्या प्रकाशांत चोहोंकडे शोधून पाहिलें पाहिजे. ' दुःखी माणसांना लवकर मरण येत नाहीं. ' असें लोक बोलतात. मग इब्राहीमसाहेबांना तरी कां मरण यावें ? बस्स. त्यांनीं कितीही प्रयत्न केले तरी त्यांना मरतां येणें शक्य नाहीं हेंच खरें. माझ्या अन्तःकरणांतील पडसादही मला हेंच सुचवीत आहे. जी गोष्ट नको असेल तिचा लवकर वियोग होत नाहीं. दुःख आणि दारिद्र्य कुणालाही नको असतें; पण तें कुणालाच सोडीत नाहीं. तेव्हां दुःखाचा तीव्र ताप असह्य होऊन साहेबांनीं कदाचित् देशत्याग केला असेल. प्राणत्याग करणेंच शक्य नाहीं. मी उजाडतांच त्यांचा शोध लावीन. "

मुबारकानें मनाचे बोल खरे करण्याला कसूर केली नाहीं. उजाडतांच

त्यानें आसमंतांतील बराच प्रदेश पांयाखालीं तुडविला, पण त्याची मनकामना पूर्ण झाली नाहीं. त्याला निराश व्हावें लागलें सगळया शहरभर वणवण फिरूनही त्याला कसलाच लाभ झाला नाहीं. तो भग्न अन्तःकरणानें दीनवदन होऊन घरीं आला आणि साहेबांच्या बिछान्याकडे सूक्ष्म नजरेनें पाहूं लागला. आपल्या धन्यानें आपल्याला कांहीं हुकूम केला आहे कीं काय हें पहावें असा त्याचा उद्देश होता. इब्राहीमनें घरांतून बाहेर पडतांना बिछान्यावर ठेवलेलें पत्र खिडकींतून येणाऱ्या वाऱ्यानें उडून जमिनीवर पडलें होतें, त्यामुळें त्याला तें प्रथम आढळलें नाहीं; पण आतां त्यानें बिछान्याकडे सूक्ष्म नजरेनें पाहून त्याची तपासणी करण्याचें काम चालविल्यावर उशीखालीं असलेली जवाहिराची पिशवी त्याला सांपडली. तो चकीत झाला. ती थैली त्या ठिकाणीं कशी आली याचा त्याला अंदाज होईना. इब्राहीमच्या हातांत पैसा नाहीं हें त्याला माहीत होतें. तो ती थैली हातांत घेऊन विचार करूं लागला इतक्यांत खिडकीच्या बाहेर त्याची नजर गेली, तोंच काजीच्या शिपायांसह सावकार लोक आपल्याच घराकडे येत असलेले त्याला आढळले. त्यामुळें याच लोकांच्या जाचामुळें आज इब्राहीमसाहेबांना गृहत्याग करावा लागला असला पाहिजे अशी त्याची समजूत व्हावयाला विलंब लागला नाहीं.

या येणाऱ्या दुष्ट लोकांवर तो मनांतल्या मनांत फारच रागावला; पण तसें बाहेर त्याला कांहींच बोलून दाखवितां येणें शक्य नव्हतें. तरी पण त्यांनीं घरांत पाऊल ठेवण्यापूर्वींच रक्कम त्यांच्या अंगावर टाकून त्यांना येथून घालवून द्यावें असें त्यानें मनाशीं ठरविलें व तो त्या उद्योगाला लागला.

याच वेळीं एक सावकार सदर दरवाजांत पाऊल टाकतांच मुबारकाला ओरडला व तो समोर येतांच त्याला म्हणाला, "कसें काय मुबारक !" तुझे मालक कुठें आहेत ?

"त्यांच्याकडे तुमचें काय काम आहे ?" मुबारकानें तिरस्कारानें प्रश्न केला.

"वा: तूं तरी वेडाच दिसतोस. आम्ही त्याचे सावकार आहों हें तुला माहीत नाहीं वाटतें. पैसे आणतांना राजरोस आणले आणि आतां लपून छपून

दिवस काढायला लाज नाहीं वाटत ! बोलाव इब्राहीमला ! आतां ते पूर्वीचे ढंग बाजूला सारा म्हणावें. काजीचे शिपाई घेऊन आम्हीं आलों आहों. आज त्याच्या घरादाराचें लिलांव केल्याशिवाय राहात नाहीं "

बोलतां बोलतां तो गृहस्थ मोठ्या झोंकानें पुढें सरूं लागला तोंच मुबारकानें त्याला मागें लोटून धमकावून म्हटलें, "इथेंच उभा राहा सैतानबाबा ! तुमच्यासारख्या हजारों धुंधुरटांनां वाळूच्या कणाप्रमाणें उडवून द्यायला मी समर्थ आहे. असल्या क्षुद्र गोष्टी धनीसाहेब पहात नसतात. तुम्हांला जे शब्द बोलायचे असतील ते संभाळून बोला. मी तुमची रक्कम आत्तांच या ठिकाणीं आणून देतों. मात्र आंत पाऊल टाकाल तर खबरदार. रक्कम घ्या आणि चालते व्हा."

सावकारांना वाटत होतें कीं, आज आपणाला चांगलीच शिकार सांपडणार असून आम्हीं इब्राहीमला मर्जीला येईल त्याप्रमाणें नाचवूं, व अपमान करूं, पण दरवाजांतच मुबारकाची ती क्रोधविकंपित भयंकर मूर्ती पहातांच त्यांना पुढें जाण्याला धैर्य होईना. ते जागच्या जागींच पुटपुटत उभे राहिले. जो मनुष्य मुबारकाशीं बोलत होता, तो आपल्या अनुयायांकडे वळून हळूच म्हणाला, "आहे काय हा प्रकार ? हा गुलाम तर फारच चढेल दिसतो. पाहूं तरी आमचे रुपये हा कसे देतो तें !"

पण त्यांचा अंदाज अगदींच चुकला. कारण थोड्याच वेळांत बाराशें रुपयांच्या थैल्या एकट्या मुबारकानें बाहेर आणून ओतल्या. व तो प्रत्येकाचे कर्जरोखे घेऊन त्यांना त्यांची रक्कम देऊं लागला. दुष्टांची निराशा झाली आणि सुष्टांना आनंद झाला; पण कुणालाच कांहीं बोलण्याचें धैर्य झालें नाहीं. मुबारकाला लिहायला वाचायला चांगलेंच येत असल्यामुळें कोणीही सावकार त्याला फसवूं शकला नाहीं. एकंदरींत सर्वांची निराशा झाली आणि निष्कारण वाईटपणा मात्र पदरीं आला. मुबारकानें न बोलतां सर्वांना वाटेला लावलें.

स्वामिनिष्ठ सेवकाला योग्य असें हें काम मुबारकानें केलें खरें, पण ते लोक निघून जातांच त्याच्या अन्तःकरणांत प्रभुवियोगाच्या दुःखद विचारांनीं तुफान करण्याला सुरवात केली. त्याला तें घर स्मशानासारखें दिसूं लागलें. सारी रात्र जागरण झाल्यामुळें त्याचे डोळे लाल झाले होते व चेह

ब्यावरचा तजेला पार नाहींसा झाला होता. पोटांत तर अन्नाचा एक कणही नसल्यामुळें त्याला ग्लानी येत होती; पण वरांत जाऊन क्षुधाशांति करावी असें कांहीं त्याचें मन त्याला सांगेना. तो आपल्या मालकाची मार्गप्रतिक्षा करीत दरवाजांतच बसून राहिला.

पण त्याचा दयाळू मालक घरीं आला नाहीं. सावकारलोकांच्या त्रासानें त्यानें कायमचा देशत्याग केला असेल असेंहि त्याच्यानें म्हणवेना. स्वामिनिष्ठ सेवकाचा प्राण तळमळूं लागला. त्या दुःखी मुबारकाचें कोणी तरी समाधान करील काय !

---

# प्रकरण २० वें.



## महंताचा आदेश.

अंधःकारामुळें अस्पष्ट दिसणाऱ्या त्या अपरिचित व्यक्तीच्या तोंडून अकस्मात आपल्या नांवाचा उच्चार झालेला ऐकून इब्राहीमला अतिशय आश्चर्य वाटलें. तो बसल्या जागेवरून उठला आणि अंधारामुळें अदृश्य दिसणाऱ्या त्या व्यक्तीला उद्देशून म्हणाला, "आदावसाहेब ! आपण मला व माझ्या वडलांना ओळखतां काय ? आमचीं नांवें आपणाला कुणीं सांगितलीं ? माझ्या हालचालीवर व बेसावधपणानें उच्चारल्या जाणाऱ्या शब्दांवर इतका सूक्ष्म पहारा ठेवणारे आपण कोण ? एवढ्या रात्रीं असल्या भयंकर काळोखांत माझ्या मागें येण्याचा आपला उद्देश काय ? "

अंधःकारानें झांकलेला तो पुरुष म्हणाला, "मी कोणी कां असेना; पण तुझा हितचिंतक आहे. स्मशानांत तर मीं नेहमींच येत असतो, तेव्हां त्या बाबतींत तुला आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं. अन्तःकरणावर नश्वरतेचा ठसा उमटविण्यासाठीं मला बहुतेक नेहमींच याठिकाणीं यावेंसे वाटतें. तेव्हां तूं माझ्या बाबतींत विस्मित न होतां मागून ये. तुझें अकल्याण होणार नाहीं. "

" मला आपला परिचय करून घेतां येईल कां ? आपला हा गंभीर

स्वर आणि बोलण्याची गोड पद्धत यावरून मला वाटतें कीं, आपण परदुः-खानें दुःखित होणारें महात्मे आहां. ”

यावर तो आगंतुक गृहस्थ म्हणाला; “ या जगांत महात्मा एकच आहे. आणि त्यानेंच इच्छामात्रेंकरून हें जग उत्पन्न केलें. त्याच्याशीं तुलना केल्यास मनुष्याला कीटानुकीटक म्हटलें तरीहि तें जास्तच होईल ! त्याच्या मनुष्य माझ्यासारख्या मनुष्याची कसली योग्यता ! मी तर एक संसारविरागी संन्यासी आहे.. या जगांत मला बंधन असें कांहींहि राहिलेलें नाहीं. तरी पण या जगाचा नियमच असा आहे कीं, मेदमांस-मय देह धारण करणाऱ्या जिवाला निश्चयपूर्वक मायेच्या आधीन व्हावेंच लागतें. कारण तो देहच मायेचा आधीर व मायेच्या बंधनानीं परिस्फुट झालेला असतो. जो मायेचा अत्यंत तीव्र प्रवाह शरीराच्या प्रत्येक नसांन-सोतून वाहात असतो तो सहजासहजीं दूर करणें शक्य तरी आहे काय ? माझ्यावरूनच पहा. मला संसार नाहीं, आणि आप्त इष्टंही नाहींत; पण जगासाठीं माझा जीव तळमळत आहे. मी मनावर जय मिळविला आहे असें लोक म्हणतात, मला मायापाश नाहीं अशीहि लोकांची समजूत आहे; पण ती त्यांची ती समजूत चुकीची आहे. मी जगाच्या बंधनांनीं जखड-लेला आहे. जगाच्या दुःखानें माझें अन्तःकरण तळमळत आहे आणि मी जगासाठीं माझ्या जिवाचें रान करीत आहे. मला बाजूला जातां येत नाहीं. मुला आतां रात्र संपली. तूं माझ्याबरोबर चल मी तुला आश्रय देतों.”

त्या संसारविरागी महंताच्या बोलण्यानें इब्राहीमचें शोकतापदग्ध अन्तःकरण संजीवित झालें. तो कल्पनातीत प्रसन्न हृदयानें म्हणाला, “आपण जर माझ्यावर इतका अनुग्रह करीत आहां तर या दानुदासाला आपल्या अल्प परिचयानें कां बरें ऋणी करीत नाहीं ? ”

तो फकीर म्हणाला, “ माझ्या बाबतींत मी तरी तुला अपरिचित कां ठेवूं ? माझें नांव शहासूफी फकीर, आणि जग हा माझा संसार !”

इब्राहीम चकित झाला, इतक्या सहजासहजीं आपणाला हा अपूर्व लाभ झाल्याबद्दल त्याला धन्यता वाटली. तो नम्र होऊन मृदु स्वरानें म्हणाला, “ हा इब्राहीम आपला गुलाम आहे. या पातकी जीवाचा प्रणाम आपण स्वीकाराल काय ? वडलांच्या तोंडून मी आपलें नांव अनेक वेळां

ऐकलें आहे इतकेंच नव्हे, तर माझ्या लहानपणीं मला आपलें एकदोनदां दर्शनही झालेलें आठवतें. हाय ! तो सुखाचा शैशयकाल मला कायमचा अन्तरला ! ! "

" शोक करणें हें समंजस मनुष्याचें काम नव्हे. तूं मला लहानपणीं पाहिलेंस हें खरें आहे. तुझा बाप माझा शिष्य होता. बाळपणचा निष्काळजीपणा पुढें कायमचा टिकतो असें नाहीं. ते एक प्रकारचें अज्ञान असतें. " मागील आठवणीनें शहासूफीचेहि नेत्र आर्द्र झाले.

" इथें नजीकच आपला दर्गा असल्याचें मला माहीत आहे. कारण पर्वणीच्या दिवशीं आम्ही सर्व मंडळीं तेथें उपासना करण्याला जात असूं ! तरी पण तेथें आपलें प्रत्यक्ष दर्शन असें कधींच झालेलें नाहीं. आजचा हा सुयोग म्हणजे "अनेक जन्मींची पुण्याई असेंच म्हटलें पाहिजे. " इब्राहीम सद्गदीत होऊन म्हणाला.

" मी केव्हांच एकेजागीं नसतों. सगळें हिंदुस्थान हें माझें घर आहे; मग असा एकेजागीं बसून मी काय करूं बरें ? मी खुदाचा गुलाम आहें ! अर्थात मला त्याच्या आज्ञेनुसार वर्तन करावें लागतें. सर्वस्वीं त्याच्याच चरणीं अर्पण केलेलें असल्यामुळें मला ममत्व राहिलेलें नाहीं. तो ज्या ठिकाणीं मला घेऊन जातो त्या ठिकाणीं मी जातों. मला स्वतंत्र गती नाहीं. आणि विचारही नाहीं. " आतां माझा तुला परिचय झाला. आतां तरी माझ्या बरोबर यायला कांहीं हरकत नाहीं ना ?

' अशा सत्पुरुषाबद्दल आपण शंका घेतली हें योग्य केलें नाहीं ' असें इब्राहीमला वाटलें व अनुताप झाला. तो हात जोडून नम्रपणानें म्हणाला, " मी आपला आज्ञाधारक गुलाम आहें. मला आपण जिकडे न्याल तिकडे मी येईन. "

आपल्या नव्या शिष्याची बिन हरकत अनुमती मिळतांच तो फकीर पुढें चालूं लागला. इब्राहीमही कांहीं न बोलतां त्याच्या मागून निघाला. तरी पण त्याच्या अन्तःकरणांत विचाराचें काहूर माजलेंच होतें. पुढें काय करावें आणि कुठें जावें हा प्रश्न त्याला अद्याप सुटला नव्हता. तो मनांत म्हणाला, " मी बाबांच्या तोंडून ऐकलें आहे कीं, जेव्हां कोणाही महापा-

ज्याचा पापक्षय होतो तेव्हांच त्याला साधुसंगती घडते. याच शहासूफीची भेट घेण्यासाठीं किती तरी मुमुक्षु चोहोंकडे भटकत आहेत; पण मला अचानक रीतीनें या असल्या काळोख्या रात्रीं स्मशानांत त्यांची भेट झाली ! काय हा विलक्षण योगायोग ! केवळ ते मला भेटले असेंच नाहीं तर आपल्या बरोबर घेऊन जायलाही तयार झाले. मला तर माझा आतां पुनर्जन्मच झालासा वाटतो ! मनाला एक प्रकारचा उत्साह वाटत आहे ! साधुसंगतींत लोकोत्तरपणा आहे म्हणतात तें खोटें नाहीं. "

मनांत विचार चालू असले म्हणजे लांबच लांब असलेला मार्ग जवळ होतो. चाललेंसें वाटत नाहीं. आणि कंटाळाहि येत नाहीं. इब्राहीमलाही तसेंच झालें. शहासूफी आपल्या या नव्या अनुयायांसह लवकरच दर्ग्यांत येऊन पोहोंचले. इब्राहीमला आनंद वाटला.

दर्ग्याचें पुढचें दार नुकतेंच उघडण्यांत आलेलें होतें. चोहोंकडे उषःकालचा धूसरवर्ण प्रभातकालीन रम्यतेला विशेष मनोरम करीत होता. वृक्षकोटरांत झोंपी गेलेले पक्षी जागृत होऊन भुपाळ्या म्हणत परमेश्वराला जागवीत होते. सूर्योदयालाहि फारसा विलंब नव्हता.

शहासूफी, त्या दर्ग्यांतील बऱ्याच मोकळ्या खोल्या मागें टाकून एका साधारणपणें सुशोभित केलेल्या खोलींत आला. आणि इब्राहीमला उद्देशून प्रेमळपणानें म्हणाला, " बाळ, माझ्याकडे कोणी सन्माननीय अतिथी आला तर मी त्याला खोलींत राहायला जागा देतों. तेव्हां तूंही इथेंच राहा. माझी सकाळच्या उपासनेची वेळ झालेली आहे. नोकरांना मी सांगून जातों. ते तुझ्या सांगण्याप्रमाणें सगळी सोय लावून देतील. काल सर्व रात्र तुला जागरण झालेलें आहे. तेव्हां तुला झोंपेची फारच आवश्यकता आहे. या ठिकाणीं कोणत्याही प्रकारचा परकेपणा मानावयाचा नाहीं. स्वतःच्या राहात्या घरांत आहे असेंच समज आणि विश्रांति घे. मी पुन्हां दोन प्रहरीं तुला भेटेन; पण तुला मुख्य सांगावयाचें म्हणजे इतकेंच कीं मला विचारल्यावांचून तूं इथून जाऊं नको. आणि जर माझी अवज्ञा करून तूं मला न सांगतां गेलास तर मी समजेन कीं माझा सच्छिष्य अबुअयूब याचा तूं योग्य वारस नाहींस ! "

इतकें बोलल्यानंतर इब्राहीमला कोणत्याही प्रकारचें उत्तर देण्याचा अव-

काश न देतां तो फकीर एका अंधाऱ्या . खोलींत अदृश्य झाला. इब्राहीम तर हा सगळा प्रकार पाहून मुग्धच झाला होता. जणुं काय आपण एखादें अद्भुत स्वप्नच पहात आहों असेंच त्याला वाटलें. तो स्तब्ध राहिला. त्याला कांहींच बोलण्याचें सुचलें नाहीं.

थोड्या वेळानें तो कांहींसा शुद्धीवर आला आणि त्यानें आपले कपडे बदलले. जवळच थंडगार पाण्यानें भरलेली एक सुरई होती. त्यांतील पाणी घेऊन त्यानें मुखप्रक्षालन वगैरे करून झोंप नसल्यामुळें आलेला मलूलपणा घालविण्याचा प्रयत्न केला. आपल्या आंगरख्याच्या खिशांतून जवाहिरांची थैली काढून ती हातरुमालांत गुंडाळून ठेविली.. रात्रभर झोंप नसल्यामुळें त्याला फारच त्रास होत होता. त्यामुळें इतर विचारांच्या भानगडींत न पडतां तो बिछान्यावर पडून स्वस्थ झोंपी गेला. मानसिक किंवा शारिरीक कोणतेहि कां श्रम असत ना; पण अतिश्रमानंतर गाढ झोंप लागते एवढें मात्र खरें आणि त्यामुळेंच इब्राहीम बिछान्यावर पडतांच गाढ झोंपी गेला.

इब्राहीम या नव्या व पवित्र जागेंत येऊन झोंपल्यानंतर तीन चार तास होऊन गेले. या वेळीं प्रखर सूर्यप्रकाशानें सगळी वसुंधरा संतप्त होऊन उष्ण सुस्कारे टाकीत होती. शयनमंदिरांतील काळोख नाहींसा होऊन त्या ठिकाणीं सूर्याचा चक्क प्रकाश पडला होता. गाढ झोंप लागल्यामुळें जागृत होतांच इब्राहीमला विलक्षण हुशारी वाटली. सगळी खोली सूर्यकिरणांनीं प्रकाशित झालेली पाहून तो पश्चात्तापानें आपल्याशींच उद्गारला, " दुपार झाली तरी मी आळशासारखा अद्याप झोंपून आहे, याबद्दल फकीर-साहेब मला काय म्हणतील बरें ! मी इतका मूर्ख कसा झालों ! शाहाबु-फींना हें समजलें तर ते काय म्हणतील बरें ? "

" आतां बिछान्यावर बसणेंहि योग्य नाहीं " असें ठरवून इब्राहीम ताब-डतोब बाजूला झाला. बाहेर येऊन पहातो तों दोन नोकर आपलीच वाट पहात उभे असल्याचें त्याला आढळलें. ते त्याला तेथें आलेला पहातांच सन्मानपूर्वक सलाम करून नम्रपणानें म्हणाले. " हुजूरच्या तैनातीकडे आमची नेमणूक झालेली आहे. सेवेचा हुकूम व्हावा. आपलें कोणतेंहि काम करण्यांत आमच्याकडून थोडी सुद्धां कसूर होणार नाहीं. "

पुढें आलेल्या नोकरानां इब्राहीमनें आपली स्नान करण्याची इच्छा दर्शविली व तें त्याला बाजूला असलेल्या स्नानगृहांत घेऊन गेले. त्या ठिकाणीं स्वच्छ पाण्याचा एक मोठा रांजण भरलेला असून स्नानाचें इतर साहित्यही असल्याचें त्याला दिसून आलें. नोकरांनीं आंग रगडून स्नान घालण्याची आपली तयारी असल्याचें सांगितलें तेव्हां इब्राहीमनें तसें न करण्याबद्दल सांगून म्हटलें, " तुम्हीं बाहेर उभे राहा. मी ते सगळे राजोपचार आतां वर्ज केले आहेत. मी कोणी अमीरउमराव नाहीं अगर राजाही नाहीं. "

नोकरानां बाहेर जाणें भाग पडलें. इब्राहीमही लवकरच आपलें स्नान आटोपून बाहेर आला. लागलीच एका नोकरानें नेसण्याकरितां वस्त्र पुढें केलें. ही अनपेक्षित तैनात इब्राहीमला असह्य होत होती; पण आवश्यक गोष्टींचा इनकार करणें त्याला कठीण वाटत असेल. असो. स्वच्छ वस्त्रें परिधान करून तो लवकरच आपल्या पूर्वींच्या खोलींत आला.

पण तेथें येऊन पहातो तों उत्तमोत्तम खाद्यपेयानें भरलेलें ताट एका चौरंगावर ठेविलेलें असून जवळ एक नोकर हातांत पंखा घेऊन उभा असल्याचें त्याला दिसलें. संसारविरागी फकिराकडे मिळत असलेले हे राजभोग भोगण्याला त्याला संकोच वाटूं लागला; पण बोलण्याची सोय नव्हती. होणारा पाहूणचार स्वीकारणें त्याला भाग होतें. मुख रोचक पदार्थांच्या त्या जेवणाचें त्याला फार समाधान वाटलें. त्यानें जेवण आटोपल्यावर हात धुतलें व तांबुल भक्षण करून खुदातालाच्या विचित्र लीलेबद्दल आश्चर्य करीत बिछान्यावर बसला, तोंच एका नोकरानें पुढें येऊन सलाम करून म्हटलें, " फकीरसाहेबांनीं हुजुरानां बोलविलें आहे. "

इब्राहीम कांहीं न बोलतां उठला आणि त्या नोकराच्या मागून निघाला. खोलीच्या बाहेर पडल्यावर दोन तीन दालनें ओलांडल्यानंतर त्याला एका दादरानें माडीवर जावें लागलें. दादर चढून जातांच समोरच्या एका निवांत खोलीकडे नोकरानें बोट दाखविलें. व आपण बाजूला झाला. इब्राहीम पुढें झाला, तों खोलीच्या मध्यभागीं एका व्याघ्रचर्मासनावर शहासूफी बसले असून नेत्र झांकून माळ फिरवीत असल्याचें त्याच्या नजरेस पडलें.

आंत जातांच त्यानें फकिराला साष्टांग नमस्कार घातला आणि अत्यंत लीनपणानें म्हटलें, " भगवन् ! आपल्या दयापूर्ण आदरसत्कारानें माझें दुःखी अन्तःकरण कल्पनांतीत शांत झालें आहे. माझ्यावरच्या आपल्या ममतेनें मला वडिलांची आठवण झाली; पण माझ्यासाठीं आपण इतके श्रम घेण्याचें कारण नव्हतें. आपल्या ममतेच्या चार शब्दांनींही माझें समाधान झालें असतें. आपल्या या अतिरिक्त आदरानें मला फार संकोच वाटतो. "

यावर शाहासाहेब गंभीरपणानें म्हणाले, " हें असले औपचारिक भाषण ऐकण्याचा मला विशेषसा प्रसंग नाहीं. तरी पण संसारी लोकांच्या शिष्टाचाराला अनुसरून अतिथींचा सत्कार करण्यांत येत असतो. त्यांत विशेष असें कांहींच नाहीं. बरें आत तुला कसें काय वाटतें ? "

" आपल्या आशिर्वादानें आणि सत्कारानें माझें रात्रींचें जागरण नाहींसें होण्याइतकी भरपूर झोंप मला मिळाली आहे. तेव्हां मी आतां ताजा तवाना झालों आहें, असें मानायाला मुळींच हरकत नाहीं. "

" वडलार्जित सगळी संपत्ती तूं उधळून टाकलीस असें मी ऐकलें आहें!"

" होय. आपण ऐकलेली गोष्ट खोटी नाहीं. मी त्या बाबतींत दुर्दैवी ठरलों. पैसा खर्च करतांना मला पुढचा पोंच राहिला नाहीं आणि त्या माझ्या अविचाराचा योग्य तोच परिणाम झाला. "

अशा प्रकारची प्रस्तावना करून इब्राहीमनें आपल्या दैन्यावस्थेची सगळी कहाणी, सावकार लोकांनीं केलेला छळ, नंतरची आत्महत्या वगैरे सगळे कांहीं सांगितलें.

सूफीसाहेबांनीं तें सगळें ऐकून आश्चर्यानें म्हटलें, " झालेल्या प्रकाराबद्दल तूं ईश्वराचें आभार मान. जगाचें दाखविण्याचें दांत आणि खाण्याचें दांत निराळे असतात हें शिकविण्यासाठींच खुदानें तुला या दिव्यांत लोटलें. तुझें ज्ञाननेत्र आतां उघडलें आहेत. जगांतील खांचखळगे तुला आतां दाखविण्याचें कारण नाहीं. तूं आतां पुढें काय करणार ? "

" पुन्हां एकवार प्रयत्न करून दैवाची परीक्षा पहावी असा विचार आहे. "

" वडिलांचा धंदा करूनच जगांत पुढें यावें असें तुला वाटतें काय ? "

" होय. आपलें अनुमान खरें आहे. " इब्राहीम गंभीरपणें हात जोडून म्हणाला.

" अजून तुझा अज्ञानीपणा आणि भ्रमिष्टपणा पूर्णपणें नाहींसा झालेला नाहीं. कुटील लोकांच्या कृष्णकारस्थानापुढें तुझ्यानें टिकाव धरवेल अशी अजून माझी खात्री होत नाहीं. तुझ्या हातांत पैसा खेळूं लागला कीं, तुझी विचारशक्ति लोपेल असा मला संशय येतो. तेव्हां जर तुला आपल्या दैवाची परीक्षाच पहावयाची असेल तर मला वाटतें तूं एकट्यानेंच कोणताही धंदा न करतां कोणा एकाद्या चांगल्या व्यापाऱ्याच्या मदतीनें कारभार कर. तुझ्यावर दुसऱ्या कोणाची तरी नजर पाहिजे. "

" आपलें म्हणणें खरें आहे. आणि त्या बाबतींतही थोडासा विचार मी ठरविला आहे. मी आपणाला न सांगता कांहींच करणार नाहीं. अजमीर शहरापासून चार कोसांवर इसाक नांवाचा माझा एक चांगला नामांकित मित्र आहे. बादशहांकडेहि त्याची चांगली पत आहे. सध्यां माझ्याजवळ असलेलें सर्व जवाहीर मी त्याच्या पेढीवर जमा करणार आणि तो जशी सल्ला देईल तसा मी यापुढें वागणार ! " इब्राहीमनें अगदीं मोकळेपणानें आपल्या मनांतील हेतू उघड करून सांगितला.

" तुझा हा विचार कांहीं अगदींच गैर नाहीं. इब्राहीम ! मी कर्मवादी आहे ! यासाठीं दैवावर विश्वासून राहण्याची मला झाली आहे संवय ! मनुष्य हा दैवानुक्रमानें सुखदुःखाचा उपभोग घेत असतो. दुर्दैवदुर्विलासानेंच आजपर्यंत तुला दुःख भोगावें लागलें आणि दैवाच्या प्रसन्नतेमुळेंच आतां तुझें पुढील आयुष्य सुखांत जाणार आहे. तूं स्वतःला अद्याप ओळखलें नाहींस. तुला मिळालेल्या या नव्या ऐश्वर्याचा तूं दुरुपयोग न करतां आतां तरी आपली उन्नति करण्याकरितां खर्च कर. तारुण्यांतील अविचाराला पार झुगारून देऊन आपली वर्तणूक सुधारून गेलेलें नांव पुन्हां मिळीव आणि वडिलांची किर्ती वाढीव. तुझा बाप, धार्मिक, दानशूर, सच्चरित आणि नम्र स्वभावाचा होता. तूं तसा हो. तुझा मित्र इसाक आपला लौकिक वाढवून कर्तव्यकर्म बजावीत आहे. तूंहि त्याच्या संगतींत राहून त्याच्या सारखा हो. "

शहासूफीसाहेबांचा हा आदेश इब्राहीमनें मान्य केला हें सांगायला नकोच आपल्या वडलांच्या मरणानंतर असे अधिकारी शब्दानीं दुसऱ्या कोणीही मनुष्यानें आपल्याला कांहीं सांगितलें नाहीं. असें वाटून या उपदेशाबद्दल त्यानें सूफीचे आभार मानले व त्याप्रमाणें वागण्याची त्यानें प्रतिज्ञा केली. दालियेसाठीं अजमीरला राहावें असें त्याला वाटे; पण तिचें दर्शनहि होणें दुर्मीळ, असें असल्यामुळें त्याला तिकडे जावेंसें वाटेना. मुबारक इमानी आहे. तो चांगल्या प्रकारें घरदार सांभाळील. पूर्वीसारखी स्थिती होई-पर्यंत घरीं जावयाचें नाहीं. असा त्यानीं निश्चयच केला असल्यामुळें आतां त्या बाबतींत काळजी करावयाची नाहीं; असें त्यानें ठरविलें. शिवाय तो मनांत म्हणाला, "कांहीं दिवस या फकीरसाहेबाबरोबरच देशोदेशीं फिरावें आणि उद्विग्न मनाला शांति मिळते का पहावी. महात्म्यांच्या साह-चर्यानें मनाचा मळ निघून गेल्यावांचून राहणार नाहीं. नवे नवे देखावे पहातां पहातां पूर्वीच्या आठवणी विसरून जाणें सोपें जाईल, आणि ति-तकी मनाचीही तयारी होईल. तसेंच मी कितीहि दूर गेलों, तरी मुबार-काला पत्र पाठवितां येईलच. तेव्हां त्याच्याकडून दालियेची बातमी मिळ-विण्याला अवघड जाणार नाहीं."

आपल्या मनांतील हा देशपर्यटणाचा हेतू त्यानें शहासूफींना सांगितला. त्यांनाही या उच्छृंखल तरुणाची ही बदललेली वृत्ती पाहून समाधान वा-टलें. त्याच्यानें त्याला अडथळा करवेना. त्याच्याबद्दल त्याच्या अन्तःकर-णांत अत्यन्त प्रेम उत्पन्न झालें असल्यामुळें कोणत्याही प्रकारानें याला दुःख होऊं नये असें त्यानां वाटत होतें. ते जरी संसारीविरागी फकीर होते, तरी या नव्या मायेंत ते गुंतून गेल्यामुळें स्वतःला विसरून इब्राही-मचें कल्याण कसें होईल याच विचारांत गढून गेले.

कांहीं वेळ विचार करून झाल्यानंतर ते त्याला उद्देशून ह्मणाले," बाळा! तूं माझ्या शिष्याचा मुलगा आहेस तेव्हां मला तूं वडलाप्रमाणें मान. आणि माझाच तूं मुलगा आहेस असें मी मानतों. माझ्याकडे तुला को-णत्याही प्रकारचा संकोच बाळगण्याचें कारण नाहीं. ज्या योगानें तुझी अध्यात्मीक उन्नति होईल अशी कांहीं तरी निश्चित योजना करणें हें माझें कर्तव्य आहे. आतां मी माळव्यांत जाण्याचें ठरविलें असल्यामुळें तूंहि

माझ्याबरोबर तिकडे चल. पर्वतांनीं वेष्टिलेला आणि नर्मदेच्या निर्मळ प्रवाहानें पवित्र झालेला तो उंचवट्याचा प्रांत तूं पाहिलास म्हणजे तुला विलक्षण समाधान वाटेल. नर्मदातटाकींच एका उंचवट्यावर माझा आश्रम आहे. तेथील निसर्ग रमणीयता नितांतरमणीय असून ती शोभा पहात राहिल्यानें मनुष्याला स्वतःच्या देहाची विसर पडतें. तुझ्या दुःखी-कष्टी जीवाला ती सुंदर निसर्गरमणीयता खरोखर शांति होईल. तूं तेथें पावन होशील. तूं शक्य तितक्या लवकर आपल्या जवळच्या मालाची इबा-कच्या मदतीनें योग्य ती व्यवस्था करून ये. तुला आतां जायला रहकत नाहीं; मात्र आळसानें कालाचा अपव्यय न करतां तूं शक्य तितक्या लवकर आपली कामें आटोपून ये."

इब्राहीमला हें सर्व मान्य झालें आणि तो त्यांना भक्तिपूर्ण अन्तःकरणानें नमस्कार करून खालीं आपल्या खोलींत येऊन विचारांत मग्न झाला.

लोखंडाला परिसाचा स्पर्श झाला म्हणजे सोनें होतें असें ह्मणतात. मनुष्याच्या असंस्कृत मनावरही साधुसंगतीनें असाच प्रयोग होत असावा असें म्हणायला हरकत नाहीं. अनुभवाच्या आणि अनुतापाच्या भट्टींतून तापून सुलाखून निघालेलें मन साधुसंगतीनें संस्कृत बनलेंच पाहिजे. इब्राहीमचीहि तशीच स्थिती झाली. जिवंत सृष्टीची ही किमया त्याला आपल्या अनुभवानें पटली. त्याच्या हृदयावरचा जडभार हलका झाला. धडाडणाऱ्या अग्नीला तिलांजली मिळाली. ज्वाला थंडावल्या आणि रड-ण्याचें हास्यांत परिवर्तन झालें. असह्य वेदनांनी तळमळत असलेला रोगी ज्याप्रमाणें एखाद्या दिव्य वनस्पतीनें आकस्मिक बरा व्हावा त्याप्रमाणें इब्राहीमचें झालें आणि तो कल्पनातीत आनंदित झाल्यामुळें आपण एका निराळ्याच जगांत आलों आहों असें मानूं लागला. मनाचें इतर विकार या आनंदावस्थेत विरून गेले ह्मटलें तरी चालेल.

तो मनांत म्हणाला, "ज्यानें माझ्यासारख्या एका दुर्दैव्याला आसन्न मृत्यूच्या तोंडांतून अद्‌भुत उपायांनीं वांचवून त्यांचे दारिद्य घालविलें, एका महात्म्याची असंभवनीय भेट आणि तीहि आकस्मिक रीतीनें योग्य वेळीं करून दिली, जो या विशाल विश्वांतील सामान्य जीवजंतूचीही

मनुष्याइतकीच काळजी घेतो, आणि सर्वांना हिताचा मार्ग दाखवून देतो, तो सर्व शक्तिमान प्रभू, पवित्र, उदारचरित्, आणि भक्तिमान् दलियेचें रक्षण करणार नाहीं काय? छे छे, मनांत असा संशय आणणेंहि पाप आहे. तो तिची काळजी वाहाणारच. खुदा! मी आतां अथांग महासागरांत कायमचीच उडी घेत आहे, दलियेला सांभाळ आणि मुबारकाचा प्रतिपाळ कर."

---

# प्रकरण २१ वें.



## नवी योजना!

"जुलूस! काय काय प्रकार झाला तो आधीं मला सांग पाहूं!"

"व्हायचें काय! जें व्हायचें तें होऊन गेलें."

"तसें नव्हे. तुझा मालक आज सकाळपासून कुठें गेला आहे? अजून आला नाहीं कां?"

"मला वाटतें चालू बाबतींत कांहीं तरी सल्लामसलत करण्यासाठीं ते सैतानी आसगरकडे गेले असतील!"

"कसली सल्लामसलत? सध्यां काय चाललें आहे?"

तुमच्या जाचांतून सुटून दलियेकडे रागरंग उडविण्याला जाण्याची सल्लामसलत! दुसरी कसली?"

"खरंच; पण का रे, याबद्दल तुझ्या कानांवर कांहीं गोष्टी आल्या आहेत कां?"

"कां नाहीं आल्या? मी पुष्कळ कांहीं ऐकलें आहे. तरी पण त्यांचा मतलब अद्याप समजलेला नाहीं."

"तूं काय काय ऐकलेंस तेंच आधीं मला सांग पाहूं."

"या आपल्या कडक नजरेतूनच एकदां कधींसे हुजूरसाहेब दलियेची भेट घेण्यासाठीं गेले होते. पण त्या दलियेचें मन फारच उदात्त! ती फक्त आपल्या धन्याला ऋणमुक्त करण्यासाठींच एवढा विलक्षण आत्मत्याग

करून स्वतःला विकून घेऊन इकडे आली. तिचें हृदय किती उदार आणि कनवाळू आहे याची आपणच परिक्षा पहा. आमच्या हुजूरच्या पापकर्मांमुळें ती स्वतःला कधीं भ्रष्ट होऊं देणार नाहीं अशी माझी खात्री आहे. कारण साध्या उपायानीं ती वश होत नाहीं असें पाहून यानीं एका भव्याच दासीची तिकडे योजना केलेली आहे."

"कां बरें? असें करण्याचें कारण?"

"ही नवी लवंगलता मोठी चतुर असल्यामुळें दालियेला आपलीशी करण्याला हिच्या बीलभेवडेपणा व हुषारी बरीचशी उपयोगी पडेल असें वाटल्यावरून ही नवी योजना झालेली दिसते. ही नवी लवंडी माझ्या ओळखीची आहे. हिला मी असगरच्या घरीं एक दोनदां पाहिल्याचें आठवतें."

"तसें असेल तर सर्वस्वी घातच झाला म्हणावयाचा! जुलूस! यांत एका पतिव्रतेचा नाश होणार आहे; पण मी तो तसा होऊं देणार नाहीं. मला खात्रीपूर्वक वाटते कीं, दालिया ही कोणातरी थोरा मोठ्याची मुलगी असावी. अर्थात् तिच्यावर कोणत्याही प्रकारचें संकट न येईल अशी व्यवस्था करणें भाग आहे. माझ्या स्वतःच्या स्वार्थासाठीं नव्हे; पण तिच्याच कल्याणासाठीं हा उद्योग केला पाहिजे."

"तर मग धनीसाहेबांनीं तिच्या खरेदीसाठीं खर्च केलेले दहा हजार रुपये देऊन तिला आपण दास्यत्वांतूनच मुक्त कराना. तसें झाल्यावर मी तिला कुठें तरी दुसऱ्या प्रांतांत नेऊन पोहोंचवीन. नाहींतर रुपये भरल्याशिवांचूनही कांहीं तरी युक्तीनें तिला बाहेर काढल्यास आपलें कार्य होईल मात्र यांत धनीसाहेबांचें विशेष नुकसान होणार आहे."

"काय दहा हजारांचेंच नुकसान ना! एका पवित्र आणि कुलीन कुमारिकेचा छळ होण्यापेक्षां इतकें नुकसान झालेलें पुरवलें. इतकेंच नव्हे तर सर्वस्व नाहींसें झालें तरी हरकत नाहीं; कारण एकाद्या सतीचा छळ होणें हें सर्वस्व नाशापेक्षांहि जास्त आहे. त्या पापानें माझा हा संसार जळून खाक होईल. यासाठीं ज्याला हें भविष्य समजत आहे त्यानें तरी असलें पाप होऊं न देण्याविषयीं जपलें पाहिजे."

"तूं एक काम करशील कां?"

" कोणतें काम ! आपण सांगितलेलें कोणतेंही काम मी कधीं करीत नाहीं असें म्हटलें कां ? "

तसें नसलें तरी महत्त्वाच्या कामाबद्दल आगाऊ तयारी असलेली बरी. मी दलियेला सोडून देण्याची खटपट करतें; पण तूं तिला इब्राहीमच्या घरीं नेऊन पोहोंचविशील तर बरें होईल. "

" बाईसाहेब ! इब्राहीमसाहेबांची आठवण कशाला करतां ! तसे मनुष्य पुन्हां आपणाला आढळणार नाहींत ! ते आतां घरीं नाहींत आणि पुढें कधीं येतील तेंहि सांगतां येत नाहीं. त्यांचा विश्वासू नोकर मुबारक दुःखा-कष्टानें कसातरी एकेक दिवस घालवीत आहे. त्याच्या डोळ्याचें पाणी अद्याप सुकलें नाहीं. आणि इब्राहीमची भेट झाल्यावांचून तें सुकणारही नाहीं ! "

" मुबारकाला तूं वारंवार भेटत असशील नाहीं का ? "

" होय बाईसाहेब ! दलियेची बातमी मिळविण्यासाठीं तो कालच इकडे आला होता. "

खरंच जुलस ! तुझ्या धन्याच्या निष्ठुर अत्याचारीमुळेंच आज या कुटुंबाचे असे हाल होत आहेत. दलियेची ती तशी दशा. इब्राहीमनें तर अज्ञातवासच स्वीकारला आणि इब्राहीम धाय मोकलून रडत आहे. या हलकल्लोळापासून आमचें कधीं तरी कल्याण होईल कां ? बरें, जुलस, त्या बागेंत येऊन राहिल्यापासून दलियेला तूं कधींतरी आनंदांत पाहि-लेंस का ? "

" नाहीं मुळींच नाहीं. उलट ती दिवसें दिवस सुकत चाललेली आहे. तिचा तो सुंदर चेहेरा दुःखानें आणि शोकानें इतका मलूल होऊन गेला आहे कीं, नेहमींचा परिचित मनुष्यहि तिला ओळखूं शकणार नाहीं. नुकत्याच फुललेल्या फुलाला अग्नीची ज्वाला लागल्यानें त्याची जशी स्थिती होते तशी दलियेची झाली आहे. बिचारीला क्षणभरही समाधान वाटत नाहीं.

" तुझ्या धन्याशीं ती मिळून मिसळून वागत असेल नाहीं ! "

" छे, छे, कधींच नाहीं. तसें होणें अगदींच असंभवनीय ! शिवाय आपण आजकाल धनीसाहेबांवर इतका कडक पहारा ठेवला आहे कीं,

त्यांना घरांतून बाहेरच पडतां येत नाहीं. इतकें असूनही कधीं फुरसत मिळालीच तर इतर कामामुळें त्यांना बागेंत जाण्याचा सुयोग सांपडत नाहीं. आणि तेथें जाऊन तरी काय करणार ! दालिया तर पूर्वीपासूनच त्यांचा तिरस्कार करीत आहे. मग तिच्याकडे जाण्यांत त्यांना आनंद कसला वाटणार ? ”

एकंदरींत दलिया नाराज आहे आणि तिला ही स्थिति आवडत नाहीं असें गृहीत धरून पुढील योजना करायला हरकत नाहीं, असाच तुझ्या म्हणण्याचा अर्थ दिसतो. चांगलें आहे. कोणा साध्वीचा छळ व्हावा हें मलाही इष्ट नाहीं. खुदालाही असला मार्ग कधींच पसंत नसतो. जुल्स ! तूं मला माझ्या मुलासारखा आहेस. तुझ्याशीं मन मोकळें करून बोलायला मला कांहींच संकोच वाटत नाहीं. मी इथचा हा संसार किती संकटें सोसून चालविला आहे हें तुला नव्यानें सांगायला नकोच. त्यांच्या सुखासाठीं मी जपत असतें; पण तें त्यांच्या गांवींही नाहीं त्याला मी तरी काय करूं बरें ? खरें सांगायचें म्हणजे मी थोडीशी तोंडाळ आहे खरी; माझ्यानें सहन करवत नाहीं. पण त्यांचें थोडेंसुद्धां वाईट व्हावें असें माझ्या मनांतही कधीं येत नाहीं. कंजूषपणा म्हणजे किती करायचा ! मला तो सहन होत नाहीं. त्यामुळें मी ही अशी भांडखोर बनलें. मी करतें हें बरें नाहीं हें मलाही समजतें; पण प्रसंग आला म्हणजे दोन शब्द बोलावें लागतात. मात्र मनांत त्यांच्याबद्दल फारच काळजी वाटते. आपल्या जिवाकडेही न पहातां पैसा सांठवावयाचा आणि तो अशा एकाद्या बदकर्मांत खर्च करावयाचा हें कुणाला तरी सहन होईल का जुल्स ! दलिया साध्वी स्त्री आहे, तिचे कुल उच्च असून ती मनाची कोमल आणि उदार आहे हें मला आतां कळून चुकलें. अर्थात् तिच्यावर कोणत्याही प्रकारचा अत्याचार न होईल अशी मला तजवीज करणें भाग आहे. सतींचा शाप फारच भयंकर असतो. अपराधावांचून कुणालाही शासन करतां येत नाहीं हें तुला माहीत आहेच. तेव्हां तूं आतां निश्चित राहा. मला ज्यावेळीं स्पष्टपणें कळून येईल कीं माझ्या नवऱ्याकडून अथवा तुझ्या धन्याकडून त्या पतिव्रतेचा आज छळ होणार आहे, त्याच वेळीं मी त्या अत्याचारी मनुष्यासमक्ष तिला या बंदिवासांतून मुक्त करीन. मला त्यावेळीं कुणाचीही भीती वाट-

णार नाहीं. तूं फक्त तेवढी सूचना दे त्यांच्यावर गुप्त पहारा ठेवणें हें तुझें काम आहे तेवढें तूं बजाव. मला त्यांचें कृष्णकारस्थान समजतांच मी जर दलियेला त्या प्रसंगांतून सोडविली नाहीं तर मी नांवाची ताकित–उन्–निसाच नव्हे. ''

जुल्फशखानालाही हें तिचें बोलणें खरें वाटलें आणि तो अगदीं निश्चिंत-पणानें आपल्या धन्यावर गुप्त पहारा ठेवण्याचें काम करण्यासाठीं निघून गेला.

---

# प्रकरण २२ वें.



## दुर्दैवी दलिया.

उमरशेखनें दलियेला ज्या बागेंत ठेविलें होतें, ती बाग जरी लहान होती तरी, तिच्या चोंहों बाजूंला उंच भिंत असल्यामुळें चांगली सुरक्षित होती. शिवाय दरवाजावर दोन काफ्री खोजे खडा पहारा करीत असल्या-मुळें परवानगीवांचून कुणालाच आंत जातां येत नसे. दलिया आपल्याला वश होणें अशक्य आहे आणि मुबारकाला थोडीशी संधी मिळतांच तो तिची भेट घेतल्यावांचून राहाणार नाहीं, हें उमराव जाणून होता. जागता पहारा ठेवण्याचें कारण हेंच. आणि हें सगळें सुचविणारा आसगरअली. त्यामुळें त्याची विशेष खात्री झालेली होती.

दलियेला त्या बागेंत आणून ठेवल्यापासून उमरनें तिला अद्याप कोण-त्याही प्रकारचा त्रास दिला नव्हता याचीं कारणें दोन होती. पहिलें कारण दलियेला त्यानें दासी म्हणून घरांत ठेविलें असतें व तिच्यापासून घरगुती कामेंहि करून घेतलीं; पण त्याला ताकिद बिबीची भिती वाटत होती. दुसरें कारण आसगर अलीनें त्याला सुचविलें होतें कीं, दलियेचें इब्राहीमवर अन्तःकरणपूर्वक प्रेम असुन तिनें त्या प्रेमामुळेंच स्वतःला विकून घतलें आहे. यासाठीं तिच्याशीं प्रेमळ व्यवहार ठेवूनच तिला वश केलें पाहिजे. पाशवी सामर्थ्यानें तिला आपल्या ताब्यांत आणण्याचा प्रयत्न केल्यास ती आत्महत्या करील किंवा पळूनही जाईल. तेव्हां तिला मतलबानेंच आपलीशीं केली पाहिजे. नाहींतर केलेलें प्रयत्न आणि खर्ची-

केला पैसा व्यर्थ गेल्यावांचून राहणार नाहींत. या दोन कारणामुळें दलियेला प्रत्यक्ष छळ होत नव्हता. तरी पण संधी मिळाल्यास तो आपल्या त्या उद्यानगृहांत जाऊन दलियेच्या दर्शनाची लालसा तृप्त केल्यावांचून राहात नसे आणि त्या तिच्या दर्शनानेंच त्याची अभिलाष वृत्ति वाढत चालली होती. तिला आपल्या हृदयाशीं धरून तिचें अधरामृत पान करण्यासाठीं तो अगदीं उत्सुक झाला होता; पण अद्याप त्याच्यानें तितकें साहस करवत नव्हतें. त्यानें तसें केलें असतें तर दलिया काय करणार होती ? तिला कुणाचा आधार होता ? त्या कोमलांगीला त्याचा प्रतिकार करतां आला नसता, हाय ! हाय ! ! दलिये, दुर्दैवी दलिये, प्रसंगांतून तूं मुक्त होऊन आपल्या हृदमेश्वराला जाऊन भेटशील कां ? पण ईश्वराची इच्छा निराळीच असली तर !

असो. एके दिवशीं उमरशेख भर दुपारीं आपल्या वसुलीच्या कामावरून घरीं येत असतां अकस्मात् त्याला दलियेची भेट घ्यावीशीं वाटली आणि तो आपल्या उद्यानगृहांत आला. दलिया या वेळीं तळमजल्यावरील एका खोलींत दुःखाचे सुस्कारे सोडीत काळजींत निमग्न होऊन बसली होती. तिचें सुंदर नेत्र अश्रूंनीं डबडबलेले असल्यामुळें स्फटिक मण्याप्रमाणें चमकत होते आणि तिचा चेहराहि अगदीं म्लान दिसत होता. इब्राहीमच्या घरीं जरी ती दासीपणा करीत होती तरी तिला एखाद्या राजाच्या मुलीप्रमाणें पाळण्यांत येत असे. अबूअयूबनें तर तिला आपली मुलगीच मानलें होतें. नंतर ती मालकीणिच झाली. तरी ती आपला दासीपणा विसरली नव्हती. मात्र तिला दुसऱ्याच्या ताब्यांत राहून काम करण्याची संवय नसल्यामुळें उमरशेखच्या उद्यान गृहांत राहूनहीं आपण दुसऱ्याच्या ताब्यांत आहों ही जाणीव असल्यामुळें ती सुखी नव्हती. शिवाय उमरशेखची नीच वासना तिला माहीत असल्यामुळें तिची प्रत्येक घटका भयंकर काळजींत जात होती.

उमरनें तिची ती दुःखी मुद्रा पहातांच त्यालाही वाईट वाटलें. त्याचें निष्ठुर अन्तःकरण द्रवलें. तरी पण अभिलाष वृत्ति मंदावली नव्हती. तो सहानुभूति पूर्ण स्वरानें तिला म्हणाला, " दलिये, तुझी प्रकृती चांगली आहे ना ? "

" ज्या स्थितींत मला ठेवण्यांत आलें; त्यांत जितका चांगुलपणा असण्याचा संभव आहे तितकीच माझी प्रकृती चांगली आहे. तुम्हांलाहीं याचा अंदाज करणें अशक्य नाहीं. "

" तूं कित्येक वेळ जेवितही नाहींस असें मला नोकर सांगत होता. उपासानें आणि दुःखानें तळमळण्यांतच कित्येक रात्री घालविल्यास असेंही मी ऐकलें आहे. असें केल्यानें तूं लवकरच आजारी पडणार नाहींस का ? " तिच्या स्वर्गीय सौंदर्याकडे टक लावून पहात उमर ह्मणाला. " मी विकत घेतलेली दासी. मला कसलें सुखदुःख आणि कसली काळजी ! आणि माझें अगत्य तरी कुणाला आहे ? विकत घेतलेल्या मनुष्याला स्वातंत्र्य नाहीं. आणि ज्याला स्वातंत्र्य नाहीं त्याला सुख तरी कसलें ? इतकेंच नव्हे तर तें मनुष्य मेलें काय आणि जगलें काय सारखेंच. या स्थितींतच मला जर मृत्यू येईल तर जगांत कुणालाही कांहीं वाटणार नाहीं ! "

दलियेचें हें उदासवाणें भाषण ऐकून उमर मनांत ह्मणाला, " दुसऱ्या कुणालाच कांहीं वाटणार नाहीं व कुणाचा तोटाही होणार नाहीं; पण माझा मात्र फारच मोठा तोटा होणार आहे. कारण मी नसत्या हट्टानें दहा हजार रुपये घालवून बसलों आहें. अर्थात तूं मेलीस तर माझे हे दहा हजार रुपये पाण्यांत जातील. या साठीं मी तुला मरूं देणार नाहीं. तुझ्या मनाप्रमाणेंच वागून शेवटीं काय लाभ होतो तें पहाणार."

मनांतल्या मनांत अशा प्रकारें बोलून तो उघडपणें तिला उद्देशून ह्मणाला, " तर मग काय हें फूल असेंच सुकून जाणार ! तुला तुझ्या जीवनाची किंमत नसली तरी इतरांना आहेना ? " " निर्जन अरण्यांत फुललेलें फूल लोकांनां दिसत नाहीं; पण तें आपलें गंधदानाचें कर्तव्य बजाऊन आपोआप जमिनीवर पडतें. त्याची कुणाला किंमत वाटत नाहीं. आणि कुणि काळजीही करीत नाहीं वनवासी फूल ! त्याच्याकडे कोण कशाला पाहतें ! " दलिया दीर्घ सुस्कारा सोडून ह्मणाली, ' मी तुला दहा हजार रुपये देऊन विकत आणली आहे. अर्थात आतां मी तुझा मालक आहे, हें तुलाही कबूल करावें लागेल. माझ्या इच्छेवर तुझें भावी सुख दुःख अवलंबून आहे हें मी सांगितलें पाहिजे असें नाहीं. तेव्हां मी आतां तुला एक प्रश्न विचारतो त्याचें तूं मला उत्तर देशील काय ?

तुझ्या उत्तरावरच तुझें सौभाग्य अवलंबून आहे हें मात्र विसरूं नको. "

" तुह्मीं मला काय विचारणार आहां तें विचारा पाहूं ! " दालिया कांहीं-शी एकेरीवर येऊन ह्मणाली. तूं इब्राहीमवर प्रेम करतेस ? तुझें त्याच्यावर प्रेम जडलें आहे का ? "

" तुह्मी आज जसे माझे मालक झाला आहां तसेंच तेही पुष्कळ दिवसांपासून माझे मालक होते. मी ह्मणजे एक विकत घेतलेली दासी ! त्यांच्यावर प्रेम करण्याचा मला काय अधिकार ! सेव्यसेवकसंबंधांत श्रद्धा-भक्ति असूं शकते, तशी मात्र असण्याचा संभव आहे. या जगांत ईश्वराच्या खालोखाल जर माझी कोणावर एकनिष्ठ भक्ति असेल तर ती त्यांच्यावरच आहे. माझें मूर्तिमंत दैवत तेंच आहे. " दालिया उत्साहपूर्ण स्वरानें म्हणाली.

हें बोलणें उमरच्या अन्तःकरणाला बरेंचसें झोंबलें. तो कांहीं वेळ थांबून म्हणाला, " मीहि तुझ्यासाठीं कमी प्रयत्न केलेला नाहीं. हजारानीं पैसा खर्चिला, मनाला कोणत्याही प्रकारचा त्रास होऊं नयें ह्मणून राहण्या-चांगली व्यवस्था केली, तुला वाईट वाटेल ह्मणून मी कित्येक दिवस तुझी भेटही घेतली नाहीं, आणि तुला माझ्या परिचर्येचें कोणतेंही काम सांगितलेलें नाहीं. याबद्दल माझे तूं मुळींच उपकार मानूं नये काय ? माझ्या तळमळणाऱ्या अन्तःकरणाची तुला मुळींच कींव येऊं नये ? सहानुभूतीचा एक शब्दही तूं बोलूं नये ? तुझ्या तोंडचे दोन गोड शब्द ऐकण्याचाही मला अधिकार नाहीं? "

" साहेब ! तुम्हीं काय बोलत आहां हें ! मी एका आकस्मिक अद्‌भुत प्रकारानें तुमची आश्रित बनलें आहे. हा खुशीचा सौदा नव्हे. तरी पण तुमची माझ्याशी असणारी कोणत्याही प्रकारची वागणूक मला सहन करणें भाग आहे. इब्राहीमसाहेबांप्रमाणें तुम्हींही आपलें हृदय उदात्त बनवा. क्षुद्रवासनामय वृत्तींनां दाबून टाका. त्यांचा निषेध करा, माझे आश्रितवत्सल प्रभू माझ्याशीं जसे वागत असत, त्यांचीं, स्त्रियांचा मानमरातब ठेवण्याचीं जी पद्धत होती ती जर तुह्मीं अमलांत आणाल, माझ्या सारख्या असहाय कुलकुमारिकेची अमर्यादा करण्याचें जर तुमच्या मनांतही येणार नाहीं, तर

तुह्मांला देवासारखा मान देऊन पूजा करीन; पण असें आपल्याला करवेल कां ? "

दलियेच्या तोंडचे हे शब्द ऐकून उमरशेख तर अगदीं गारच झाला. तो मनांत ह्मणाला, "सर्व प्रकारें माझ्या स्वाधीन असलेली ही निराश्रीत दलिया माझ्याशीं अशा रीतीनें बोलेल अशी मला कल्पनाही नव्हती. माझ्या मनांतलि हेतू जाणून निरुपायानें ही मला आत्मसमर्पण करील असें मला वाटत होतें; पण ती माझी आशा व्यर्थच गेली म्हणायची !! "

मनोवृत्तींच्या प्रक्षुब्धतेमुळे दलियेचा तो उठावदार दिसणारा सुंदर चेहेरा उमरशेखला पहावासाच वाटूं लागला. तिचे नेत्र जरी खवळलेल्या नागिणीप्रमाणें लाल दिसत होते तरी तिच्या सौंदर्यांत त्यामुळें कमीपणा येत नसल्यामुळें त्याला तिची भीती न वाटतां त्याच्या सुप्त मनोवृत्ती जागृत होऊं लागल्या. मात्र या तिच्या भाषणामुळें आपले इच्छित मनोरथ साध्या उपायांनीं तडीला जाणार नाहींत अशी त्याची खात्री झाली. तरी पण अखेरचा उपाय म्हणून तो तिला म्हणाला, " दलिये ! तूं इतकी निष्ठुर होऊं नको. माझ्यावर कृपा कर. माझ्याजवळ जें कांहीं आहे तें सगळें मी तुला देतों. न्यायानें अथवा अन्यायानें कसेंहि कां होईना, इतके दिवस मी जी कमाई केली आहे, जो कांहीं मी संग्रह केला आहे, तो मी सर्व तुला अर्पण करतों. माझें द्रव्यभांडार लहानसान नाहीं. ती एका कुबेराची संपत्ती होईल. तूं जर एकनिष्ठेनें मला आत्मसमर्पण करशील, तर मी तुला राजराजेश्वरीप्रमाणें चैनीत ठेवीन. तूं माझ्या या प्रेमपूर्ण हृदयाची स्वामिनी होऊन अतुल ऐश्वर्याची मालकिणही होशील. दरिद्री इब्राहीमच्या उपासनेंत व्यर्थ कालक्षेप करून तूं आपलें भयंकर नुकसान करून घेत आहेस. दलिये मी निश्चयपूर्वक सांगतों कीं, तूं सम्मति देतांच मी धर्मविधीनें तुला आपली पत्नी करावयाला तयार आहे. तुला सगळें कांहीं समजत आहे. तूं वेडी नाहींस. त्यामुळें मी तुला ज्यास्त सांगितलें पाहिजे असें नाहीं. इतका पैसा खर्च करून तुला मी खरेदी केली आहे ती साध्या सिध्या रस्त्यानें मोकळीक देण्यासाठीं नव्हे हें मी सांगायला पाहिजे असें नाहीं. मी खुदाची कसम खाऊन सांगतों कीं, तुला माझीशीं करण्यासाठीं जरी मला भिकारी व्हावें लागलें तरीही मागें सरणार

नाहीं. शक्य ते सर्व प्रयत्न करायला मी तयार आहे. आणखी पंधरा दिवसाची मुदत देतों त्यांत तूं आपला निश्चित विचार काय तो ठरीव. अविचारानें आत्मघात करून आपल्या या दिव्य सौंदर्याचा नाश करूं नको. या पंधरा दिवसांत जर मला तुझ्याकडून योग्य उत्तर मिळालें नाहीं, तर मी स्वतःचा स्वार्थ साधण्यासाठीं चोहोंकडे प्रलय करून सोडीन आणि दुःखातिरेकानें आपोआप तुला माझ्या पायाशीं आणीन. कुठेंहि तुझा इलाज चालेनासा झाला म्हणजे आपोआप माझ्या पायाशीं येशील. तेव्हां विचार कर."

उमरशेखला पुढें बोलतां आलें नाहीं. कारण त्याचवेळीं जुल्लसखान दालियेसाठीं जेवणाचें साहित्य घेऊन आंत आला. आपला नोकर अशाप्रकारें आकस्मिकपणें त्या ठिकाणीं आलेला पाहून उमरचा जळफळाट झाला. त्यानें त्याला मनांतल्या मनांत हजारों शाप दिले दालिया समोर होती म्हणूनच त्या दिवशीं तो बचावला नाहीं तर त्याला आपल्या धन्याच्या हातचा भरपूर मार खावा लागला असता.

उमरशेख मनांत म्हणाला, " जुल्लसखांवर सध्यांच हात टाकून उपयोग नाहीं. सध्यां त्याच्याच मर्जीप्रमाणें वागून आपलें कार्य साधलें पाहिजे. कारण याला जर आतां मी रंगविला तर हा झालेली सगळी हकीगत ताकीनाविबीला सांगेल आणि तसें झाल्यास कार्याला अडथळा होण्याचा संभव. तेव्हां शक्य तितका त्याला संभाळूनच आपलें कार्य साधलें पाहिजे."

असा विचार करून तो जुल्लसला म्हणाला, " कां रे जेवण आणण्याला विलंब कां ? "

आपल्या मालकाला सन्मानपूर्वक सलाम करून जुल्लस म्हणाला, "हुजूर ! आज कांहीं उशीर झालेला नाहीं. मी ठरलेल्या वेळींच रोज येतो. बाईसाहेबांनीं परवानगी दिल्यावांचून तर येतां येत नाहीं.

उमरशेख प्रसन्नतेनें म्हणाला. " तूं माझ्याशीं विश्वासूपणानें वागून माझें कल्याण इच्छितोस हें मला माहीत आहे. तुझ्यासारखा निमकहलाल नोकर मला मिळणार नाहीं. तूं या दालियेचा वारंवार समाचार घे. तिला जेवणाखाण्याचे त्रास पडूं देऊं नकोस. इतकेंच नव्हे तर तूं जवळ

बसून तिला खाऊं घाल. तिचे हाल होता नये. हिच्या बाबतींत मी तुझ्या वर विश्वासून राहातों. कारण तूं निकमहलाल आहेस. हे घे तुला दोन आणे बक्षीस ! "

'प्रथम दर्शनीच आपणाला पाहून धनीसाहेबांचा चेहरा क्रूर झाला होता, तेव्हां आज चाबकाचा मार खावा लागणार' असा जुल्म खानानें आपल्या मनाशीं विचार चालविला होता; पण तसें कांहीं न होतां उलट दोन आणे बक्षिस मिळालेले पाहून तो अगदीं खूश होऊन म्हणाला, "हुजूर ! आपणच माझे मायबाप आहां. आपल्याच अन्नानें मी आजवर जगलों. मग तेवढ्या कामासाठीं बक्षिस कशाला पाहिजे सरकार ! "

" तुझ्या इतका उत्तम नोकर मला मिळणारच नाहीं. उगाच नाहीं मी तुझी प्रशंसा करीत ! पण सांभाळ हां ! मी येथें आलों होतों हें घरीं समजतां नये. लक्षांत ठेव. "

" छे. छे. सरकार ! इतका मी वेडा नाहीं. आपण त्या बाबतींत अगदींच निश्चिंत असा. "

जुल्सनें तावडतोब जबाब दिला; पण उमरशेखनें घरीं जाण्यासाठीं तोंड फिरविलेलें पाहून त्याला हंसूं आल्यावांचून राहिलें नाहीं. कारण रोजची सगळी हकीकत ताकिदबिबीला जशीच्या तशी समजत होती. उमरशेखला मात्र त्याचा मागमूसही नव्हता. आपण जें करतों तें कुणाला समजत नाहीं याच नसत्या घमेंडींत गढून जाऊन तो निश्चिंतपणानें आपलें काम बजावीत होता. जुल्सखान इमानी होता; पण एका साध्वीचा होणारा छळ त्याला आवडत नसल्यामुळें आपल्या धन्याशीं त्याला निमकहराम व्हावें लागलें. ताकिदबिबीही त्याला अनुकूल होती; पण दलियेला मात्र ही गोष्ट अद्याप समजलेली नव्हती.

---

# प्रकरण २३ वें

## दोन जीवांची तळमळ !

उमरखान निघून गेल्यास जुल्स कांहींसें बोलणार होता; पण तितक्यांत दालिया दीर्घ निश्वास सोडून म्हणाली, " जुलूस ! तूं माझ्यासाठीं जे-

वण तयार करण्याचा आणि तें वेळच्यावेळीं आणण्याचा त्रास घेतोस; पण मला त्याचा कांहीं उपयोग नाहीं. माझें अन्तःकरण कसल्या दारुण चिंतेनें जळत आहे, याची तुला कल्पनाही नसेल! मला भूक नाहीं आणि तहानही नाहीं."

"बिबिसाहेब, आपण फारच भिऊन गेलेल्या दिसतां!" सहानुभूति पूर्ण स्वरानें जुल्दस बोलूं लागला, "मला कांहीं समजत नाहीं, मी अगदीं मूर्ख आहे, मालकाचें चित्तरंजन करून पोट भरावें हाच आजन्म माझा उद्योग; पण खुदाच सर्व शक्तिमान आहे. हें तत्व मी विसरलों नाहीं. तो सर्वांचें रक्षण करीत असतो. आतांचें धनीसाहेबांचें भाषण मी ऐकलें. तुह्मांला भीती वाटणें साहजिक आहे; पण माझ्या शरिरांत प्राण असें-पर्यंत व मला हालचाल करण्याची शक्ति असेंपर्यंत कोणी तुमच्या केंसानाही हात लावूं शकणार नाहीं. सज्जनाच्या आणि सद्हेतूंचा वाली परमेश्वर अन्तःकरणाचा प्रेरक तोच आहे. मी ही सगळी हकीगत माझ्या मालकिणीला—ताकितबिबिला—सांगणारच आहे. तिच्याकडून आपणाला पूर्ण साहाय्य मिळेल. कोणत्याही प्रकारची काळजी करूं नये. कारण ही एक प्रकारची खुदाचीच कृपा आहे असें तुम्हीं माना. ताकितबिबिच्याच सहाय्यानें तुह्माला स्वातंत्र मिळेल, आणि तें शक्य तितक्या लवकर. आपल्या सारख्या कुलकुमारिकेचा छळ होणें तिलाही पसंत नाहीं. तेव्हां आपण निश्चिंत राहा."

जुल्दसच्या तोंडचे हे शब्द ऐकून दालियेचा खिन्न चेहरा कांहींसा प्रफुल्लित झाला. तिचे नेत्र आनंदानें चमकले. ती स्मितहास्यपूर्वक म्हणाली, "जुल्दस! तूं मला नवजीवन दिलेंस. मी तुला अपरिचित नाहीं. मी मुक्त झाल्यास तुझी गरिबी संपली असेंच तूं समज. तसेंच तूं आपल्या मालकिणीला सांग, 'दालिया तुझ्या मुलीप्रमाणें आहे. तिचा सांभाळ करून या संकटांतून तूं तिला सोडविलीस तर तुझा संसार सोन्याचा होईल.' हें तुझें सांगणें ऐकून तिला माझ्याबद्दल फार सहानुभूती वाटेल. आणि जुल्दस! मला कोणी नाहीं. आई ना बाप भाऊ ना बहीण! त्यांतही स्त्रियांचें जीवन पराधीन असतें हें तुला सांगायला नकोच. मग सांग बरें, मला जगावेंसें तरी कां वाटावें? माझा आधार सुटला त्याचवेळीं मला

-गांतून नाहींसें झालें पाहिजे होतें; पण या दुर्दैवी दलियेला मरण सुद्धां नाहीं मरणालाही मी स्वतंत्र नाहीं. जुल्स! मला माझ्या अब्रूसह येथून निसटून जायला मदत कर. खुदा तुझें कल्याण करील—" बोलतां बोलतां दलिया मध्येंच थांबली आणि कांहींशा उत्सुकतेनें तिनें त्याला विचारलें, "मुबारक तुला भेटला होता का?"

दलियेच्या मनांतील विचार जुल्सनें ओळखले. तो चट्कन म्हणाला, "होय. मुबारक मला भेटला होता आणि तुम्हांलाही भेटावें असें त्याच्या मनांत फार आहे; पण इथें कडेकोट पहारा असल्यामुळें त्याला संधी सांपडत नाहीं. तरी पण कधीं ना कधीं वेषांतर करून येथें येण्याचा त्याचा विचार आहे. मला वाटतें, त्यालाही तुमच्या भेटीची उत्कंठा लागलेली असावी."

जुल्सला आपल्या प्रश्नाचा उद्देश समजला नाहीं असें वाटून ती किंचित लाजली; पण हृदयाची खळबळ तिला स्वस्थ बसूं देईना. तेव्हां उघडपणानें तिनें त्याला प्रश्न केला, "इब्राहीमसाहेब कसें आहेत हें तुला माहित आहे काय! त्यांच्या संबंधाची तूं कांहींच बातमी सांगितली नाहीं.!"

इब्राहीमची खरी माहिती जुल्स जाणून होता; पण दलियेला वाईट वाटूं नये या उद्देशानें तो म्हणाला, "बाईसाहेब! ते आनंदांत आहेत! कारण आतां त्यांना एक पैचेंही कर्ज राहिलें नसून तुमच्या पैशांनीं ते ऋण मुक्त झाले आहेत. आतां, त्यानां घरींच राहून समाधान वाटत नसल्यामुळें ते कुठें तरी बाहेर फेरफटका करायला जातात हें खरें आहे; पण त्यांत विशेष तें काय आहे!"

आपला मालक,-आपला प्रभू, आणि आपला धनी ऋणमुक्त होऊ आनंदांत आहे हें ऐकून दलियेला समाधान वाटलें. ती प्रफुल्लित होऊन मनांतल्या मनांत म्हणाली, "जनाब! इब्राहीमसाहेब, आपण कुठेंहि असा; पण सुखी राहा म्हणजे झालें. आपल्या पायांच्या आश्रयानें राहून नहेमीं आपलेंच चिंतन करून सुखी होणारी ही दलिया, आणखी कशाचीही इच्छा करीत नाहीं. मी माझें हृदय आपल्या चरणीं ठेविलें. कदाचित् हें माझें करणें आपल्या दृष्टीनें योग्य नसेल, मुलानें चंद्राला धरण्यासाठीं

हात पसरावे असेंहि वाटण्याचा संभव आहे, पण हृदयसमर्पण झाल्यावर आपण काय म्हणाल, हा तरी विचार कसा सुचावा ! जगांतील हजारों सुंदर स्त्रिया आपल्या चरणावर लोटांगणें घालतील; पण मला मात्र आपल्यावांचून कोणीही नाहीं आपण सुखी आहां हें ऐकून सुखी होणारी मी दुसरे विचार कशाला करूं ! खुदा आपली भरभराट करो, हीच माझी रात्रंदिवस त्याच्या चरणाशीं प्रार्थना चाललेली असते. आपलें कुशलवृत्त ऐकणारे माझे कान शाबूत राहिले म्हणजे झालें. मी कुठच्याही दऱ्याखोऱ्यांत पडून राहीन. मला त्याचें कांहींच वाटणार नाहीं. माझी जीवनज्योत विझूं लागली म्हणजे, आपला हास्यप्रफुल्लित चेहेरा माझ्या नजरेसमोर आला असतां तेवढा पहातां यावा एवढीच माझी इच्छा आहे. मला दुसऱ्या कशाचीही अपेक्षा नाहीं."

दलिया बराच वेळपर्यंत कांहीं बोलली नाहीं असें पाहून जुल्हसला काळजी वाटूं लागली. तो म्हणाला, " आपण भितां कशाला बाईसाहेब, आतां झालेली सगळी हकीगत मी माझ्या मालकिणीला जाऊन सांगतों. तुमची सुटका झालीच समजा. अगदीं काळजी करूं नका. मुबारकाला कांहीं सांगायचें आहे का? मी आज सायंकाळीं त्याच्याकडे जाणार आहे."

दलिया सद्गदीत झाली. तिला पूर्वींचे दिवस आठवूं लागले. इब्राहीमची दैन्यावस्था तिच्या अन्तःचक्षूपुढें उभी राहिली. त्यांना वेळेवर अन्नपाणी मिळत नसेल, बिछाना स्वतःच पसरावा लागत असेल, ठरलेल्या वेळीं उपहाराचें साहित्य पुढें येत नसेल वगैरे किती तरी गोष्टी आठवून तिच्या नेत्रांतून अश्रू वाहूं लागले. तरी पण ती आत्मसंयमन करून म्हणाली, " जुल्हस ! मी काय सांगणार मुबारकाला ! त्याला सगळें कांहीं समजत आहे; पण माझा जीव राहात नाहीं म्हणून म्हणतें, मुबारकाला म्हणावें, मी तेथें नाहीं असें धनीसाहेबांना वाटूं देऊं नको मी तुझ्यावर विश्वासून आहे. त्यांची काळजी वे. प्रभू ऋणमुक्त झाले; पण एवढ्यानेंच त्यांना आनंद वाटणार नाहीं. माझ्या विक्रीचा आलेला पैसा तूं नकळत त्यांच्या सुखोपभोगासाठीं खर्च कर. त्यांना सांचल्यास ते सर्वस्वाचा त्याग करून उपासांनीं तळमळत राहातील. तुझं ऐकणार नाहींत. तशा प्रसंगीं माझ्यावांचून त्यांची कुणालाच समजून घालतां यायची नाहीं. जुल्हस ! हाय !!

ग !!! माझ्याच्यानें आतां कांहींच सांगवत नाहीं. त्यांची ती केविलवाणी ्ा माझ्या डोळ्यांसमोर उभी राहाते बघ. मला तेथपर्यंत जातां येईल का ! अस नको असं तोंड फिरवूं. तुझ्या हातांत काय आहे ! तूं का उगाच ईट काढून घेतोस ! जा मुबारकाला सांग. तूं जें पाहिलेंस तें सांग. माझे अश्रु आवरत नाहीं. गहिंवर आल्यामुळें शब्दोच्चार होत नाहीं; पण माझे ालक, माझ्या हृदयाचे स्वामी. माझा जीवनाधार इब्राहीमसाहेब तुला भेटले ्हो तुला भेटलें तर ' मी तुमच्यासाठीं तळमळत आहे. ' असा माझा ोप त्यांना सांगूं नको ! बरं कां ते मला काय म्हणतील. मी रडत होतें णूनही सांगूं नको. कारण त्यामुळेंहि दुःख व्हावयाचें ! नको तूं त्यांना ढूंच नको. मुबारकला भेट, आणि त्यांनां जपायला सांग. "

जुलुस आपले डोळे पुशीतच तेथून बाहेर पडला. त्या सुकुमार फुलाचे ालेले ते हाल त्याच्यानें पहावत ना. याप्रसंगीं, इब्राहीम नाहींसे झाले ी बातमी तिला कळविल्यास फारच भयंकर प्रसंग ओढवेल हें त्याला कळून ुकलें. व शोकावेगांत आपल्या तोंडून भलतेंच कांहीं तरी सांगितलें जाईल ा भीतीनें तो त्या बागेतून निघून गेला. शिवाय घरचीं कामें आटोपून याला मुबारकाच्या भेटीला जायचें होतें. त्यामुळें तेथें थांबतां येईना.

* * * * *

आपल्या मित्राची भेट घेवून त्याला आपलें सगळें हृद्गत सांगावें ्हणून इब्राहीमसाहेब शहासूफीचा निरोप घेऊन फत्तेपूर येथें आला खरा; ण इसाकची आणि त्याची भेट झाली नाहीं. तेव्हां त्यानें दिवाणजीकडे आपल्या जवळचें जवाहीर देऊन त्याला मोचक्या शब्दांत आपल्या मित्राचा नेरोप सांगायला विनंती केली आणि आपण मागें फिरला.

त्याचें अन्तःकरण स्थिर नसल्यामुळें त्याला एका जागीं बसून राहाणेंहि योग्य वाटेना शिवाय आपण असें एकट्यानें भटकत राहिल्यास आत्महत्तेचाही विचार मनांत येण्याचा संभव आहे, तेव्हां आपण शक्य तितक्या लवकर सूफीसाहेबांना भेटावें असा विचार करून दीनवाण्या चेहेऱ्यानें व अडखळणाऱ्या पायांनीं तो आपल्या विवक्षित जागेकडे जाऊं लागला. तो मधून मधून दीर्घ उसासे सोडीत होता आणि वारंवार आकाशाकडे पाहून हातही जोडीत होता. तशा त्या स्थितींत कोणी त्याला पाहिलें असतें तर हा एक वेडा

मनुष्य आहे असेंच कुणालाही वाटलें असतें; पण ते निर्जन अरण्य असून वेळ संध्याकाळची असल्यामुळें कोणा वाटसरूनें त्याला पहाणें शक्य नव्हतें शिवाय तो एका अस्पष्ट पाऊल वाटेनें चालला असल्यामुळें हिंस्त्र श्वापदा-वाचून त्याला कोणी पहाणाराही नव्हता. दुःखानें गांजलेला मनुष्य कशा-लाच भीत नसतो. मग इब्राहीमला भीति कशी वाटणार!

काळोख पडला. दालियेच्या चिंतनानें उद्विग्न झालेला इब्राहीम कसें बसें एक एक पाऊल टाकीत चालला होता. ठरलेल्या जागीं आणि ठर-लेल्या वेळीं शहासूफींना भेटण्याचा त्याचा करार होता. आणि त्यामुळेंच विश्रांती न घेतां त्याला चालावें लागत होतें. काळोखामुळें झाडांझुडपां-च्या छाया भयानक होऊं लागल्या. हातांत सज्ज असलेली तरवार पहाडां-तील दगडाधोंड्यावर आदळून आपलें भीषणत्व निनादित करूं लागली आणि वारंवार खांचखळग्यांत पाय पडूं लागल्यामुळें इब्राहीम धडपडूं लागला. कांहीं वेळानें तर आपण चाललों आहों कुठें तेंच त्याला सम-जेना. तो मनांतल्या मनांत म्हणाला, "दालिया तर मला अंतरलीच; पण शहासुफी सारख्या फकिराच्या संगतींत आनंदानें तीर्थयात्रा करीत फिरावें म्हणून मनांत आणलें तर तेंहि आतां साधत नाहीं. मी ठरलेल्या वेळीं त्या झोंपडींत गेलों नाहीं तर सूफी निघुनसुद्धां जातील! मी या वेळीं कसा बसा चालत आहे; पण हा योग्य मार्ग आहे कीं अयोग्य मार्ग आहे कुणाला माहीत! आडवाटेला लागून एखाद्या भयंकर दरीच्या तोंडांशीं तर जाणार नाहीं ना! हिंस्त्र श्वापदाच्या भक्ष्यस्थानींही पडण्याचा संभव आहे. इसाक लवकर भेटला असता तर मला इतकी रात्र झाली नसती; पण चोंहोंकडून माझें दुर्दैव अथवा माझ्या पूर्व चरित्रांतील पाप मला छ-ळीत असल्यामुळें तें सुखाच्या मार्गांत कांटे पसरविणारच-

पण त्याचे हे अन्तर्गत विचार जागच्या जागींच थांबले. कारण ज्या पहाडाच्या खोऱ्यांतून तो चालला होता, त्याच पहाडावर त्याला शस्त्रांचा खणखणाट आणि वेदनापूर्ण किंकाळ्या ऐकूं आल्या. अर्थात हा काय प्रकार आहे हें त्याला समजाऊन घेणें भाग होतें. तो दुःखानें गांजलेला होता तरी त्याचें शूरपण त्याला सोडून गेलें नव्हतें. आर्तस्वर कानांत पडतांच त्याचें शौर्य जागृत झालें. त्याची उद्विग्नता नाहींशी होऊन नसां-

नसांतून रक्त उसळूं लागलें. तो त्या ऐकूं येणाऱ्या किंकाळ्यांच्या अनु-रोधानें धांवत चालला. आपण कुठें आहों आणि काय करीत आहों याचें त्याला भानही राहिलें नाहीं. तो धडाडीनें पुढें सरला.

पण तेथें जाऊन पहातो तों त्याला फारच भेसूर देखावा दिसला. प्रेत-रूप होत चाललेल्या जीवांचे निर्जीव स्वर अधिकाधिक मंद होत चालले होते. मधुन मधुन ज्योतिरूपानें उदय पावणारा मशालींचा उजेड त्या अस्तप्राय जीवांप्रमाणेंच महाप्रयाणाच्या तयारीला लागला होता. शुष्क कंठांतून पाणी पाणी असा खोल आवाज निघत होता; पण आसपास कुठेंच पाणी मिळण्यासारखें नसल्यामुळें इब्राहीम अगदीं वेड्यासारखा होऊन तो भीषण देखावा पहातच राहिला.

थोड्या वेळानें इब्राहीम भानावर आला आणि सर्व मशाली एकत्र जमवून त्यानें मोठा जाळ केला. हेतू हा कीं कोणी कांहीं बोलतें का पहावें; पण त्या प्रकाशांत त्याला प्रेतांवांचून कांहींच दिसलें नाहीं. एकदोन स्त्रिया पांचसहा पुरुष आणि आठदहा घोडे अस्ताव्यस्त रीतीनें व छिन्नविछिन्न होऊन पडलेले त्याला आढळले. अशा रीतीनें तो इकडे तिकडे पहात आहे तोंच समोरच्या झुडपांतून अगदीं क्षीण स्वरानें कोणी तरी बोलत असल्याचें त्याला ऐकूं आलें. लागलींच तो तिकडे वळला. जवळ जाऊन पहातो तों आपले गुरुजी शहासूफीच तेथें असल्याचें त्याला कळून आलें व आश्चर्य वाटलें. तो सद्गदीत होऊन म्हणाला, " शहासाहेब ! काय ही आपली स्थिति ! माझ्या हातून आपल्यासाठीं आतां काय बरें होण्यासारखें आहे ! आपणाला जखम झाली आहे कां ? सांगा सांगा असें माझ्याकडे पहात राहूं नका. "

" इब्राहीम ! " ते शहासूफीच होते. इब्राहीमचा आवाज ओळखतांच त्यांनां कांहींसें अवसान आलें, आणि ते बोलूं लागले, " इब्राहीम ! सर्व शक्तिमान खुदा काय करूं शकणार नाहीं. तू अगदीं वेळेवर आलास. माझ्या मांडीला जखम झाली आहे, ती आधीं बांध आणि त्या समोर दिसणाऱ्या उंच झाडाखालीं एक झरा आहे त्याच्यांतून थोडें पाणी आण. "

इब्राहीमनें आपलीं शस्त्रें खालीं ठेविलें आणि त्यांच्या आज्ञेप्रमाणें जखम बांधून तो पाणी आणण्यासाठीं म्हणून गुरुजींनीं सांगितलेल्या जागेकडे

गेला. तेथें एक लहानसा झरा त्याला आढळला. त्या निर्मळ पाण्यांत आपल्या अंगावरील वस्त्र भिजवून तो आतां मागें फिरणार तोंच त्याचा पाय कसल्याशा एका मऊ पदार्थाला अडखळून तो खालीं पडला. हात जमिनीला टेंकले; पण डोकें मात्र एका प्रेताच्या छातीवर टेकलें गेलें. इब्राहीम शूर होता; पण त्या काळोखांत त्या प्रेताची त्याला भीती वाटली; तरी प्रेताची छाती गरम लागल्यामुळें त्यांत प्राण असावा असें त्याला वाटल्यांवाचून राहिलें नाहीं इतकेंच नव्हे तर तो देह कोणातरी स्त्रीचा असला पाहिजे असेंहि त्याला कळून चुकलें. मन शहासाहेबांकडे ओढ घेऊं लागलें; पण या मरणाच्या दाराशीं पडलेल्या स्त्रीला सोडून त्याच्यानें पुढें पाऊल टाकवेना. त्यानें ठरविलें कीं, या स्त्रीला उचलून घेऊन सुफीसाहेबांजवळ जावें आणि तेथेंच दोघांचीही शुश्रुषा करावी. ' लागलीच त्यानें त्या स्त्रीला उचलली आणि भिजवून घेतलेल्या वस्त्रासह तो सुफीसाहेबाजवळ आला व त्या बेशुद्ध स्त्रीला खालीं ठेवून त्यानें फकीरसाहेबांच्या तोंडांत पाणी घातलें आणि नंतर तो तिच्याकडे वळला.

शहासुफीनें डोळे उघडून पाहिलें. त्यांना यावेळीं बरीच हुषारी आलेली होती. विझत्या मशालींच्या अंधुक उजेडांत त्यांनीं इब्राहीमकडे आपलें लक्ष पुरविलें. बेशुद्धावस्थेंत असलेल्या स्त्रीचा चेहेरा त्यांना दिसला. तितक्यांत इब्राहीमनें आश्चर्यानें म्हटलें, " ही तर माझी दालिया ! पण ही येथें कशी आली ? माझे डोळे तर मला फसवीत नाहींत ना ? कारण तिच्यासाठीं माझें अंतःकरण तलमळत आहे, तेव्हां बाह्य सृष्टींतही मला त्याच स्वरूपाचा भास व्हावा यांत आश्चर्य कसचें ! "

इब्राहीमचे ते शब्द ऐकून शहासूफीहि चकित झाले. तरी पण आपलें आश्चर्य बाहेर न दाखवितां ते क्षीण आवाजानें म्हणाले, " या स्त्रीला पाहून तूं चकित झालेला दिसतोस. पण ही वेळ स्वस्थ बसण्याची नव्हे. आतां तूं तिला आपली दालिया मानतोस हें एक गूढच आहे, तरी पण आधीं तूं तिला शुद्धीवर आणण्याचा प्रयत्न करावास हें चांगलें."

आपल्या अस्वस्थ मनःस्थितीबद्दल इब्राहीमला लाज वाटली व तो तिच्या मस्तकावर पाणी शिंपडून तिला शुद्धीवर आणण्याचा प्रयत्न करूं लागला.

---

# प्रकरण २४ वें.



## मनाची ओढाताण.

दलियेचा प्रत्येक दिवस दुःखाकष्टानें चालला होता, इब्राहीम हेंच जिला आपलें सर्वस्व वाटे आणि त्याच्यासाठींच आपलें अस्तित्व आहे असें जी मानीत होती ती दुःखी आणि निराधार दलिया उमरशेखच्या सक्तीच्या विलासांत कधीं तरी आनंद मानील काय ! सूर्यविकासी नलिनी सूर्या-स्तानंतर प्रफुल्लित राहणें अशक्य आहे दलियेचा प्राण इब्राहीमच्या हृद-याशीं एकजीव झालेला होता, अर्थात त्याच्या वियोगानें तिला अस्वस्थता वाटणें साहजिक होतें.

ती कधीं कधीं एकादें सुखस्वप्न पाहून जागी झाल्यानंतर मनांत म्हणे, " मी पुन्हां इब्राहीमसाहेबांच्या पायांशीं उभी आहें आणि ते माझ्याकडे स्मित हास्यपूर्वक पहात आहेत, असा कधीं एकादा दिवस उगवेल कां ? माझ्यासाठीं जरी कदाचित् त्यांचा आत्मा तळमळला नाहीं तरी वेळच्या-वेळीं तब्येत सांभाळून त्याप्रमाणें वर्तन करणारी एकादी दासी जवळ नस-ल्यामुळें त्यांना अगदीं कसेंसेंच वाटत असेल. त्यांच्या हृदयांतील सगळेच विचार मुबारकाला ओळखतां यायचे नाहींत. हो नाहींच यायचे. मी ते त्यांच्या चेहेऱ्यावरून जाणत असे. मग माझी त्यांना आठवण येत असेल असें मानायला मला काय हरकत आहे ! माझी आठवण काढून दीर्घ सुस्कारे सोडीत असतां एकदम त्यांच्यापुढें जाऊन उभें राहण्याची संधी जर मला मिळेल तर त्यांचा हसरा चेहरा...—अहाहा ती कल्पना मनांत आली कीं केव्हां एकदां मी तिकडे जाईन असें वाटूं लागतें. इसाकचं आणि त्यांची भेट होऊन जर एकाद्या व्यवसायांत त्यांनीं मन घातलें त त्यांची पुन्हां भरभराट व्हायला फार दिवस लागणार नाहींत.मला त्यांचं दर्श घेतां आलं नाहीं तरी ते सुखी आहेत असं नुसतं समजलं तरी मला आनं वाटेल. त्यांचा आनंद तोच माझा आनंद ! त्याचं तें स्मशानासारखें झाले घर पुन्हां एकदां माणसांनीं गजबजून गेलेलं मला दिसलं किंवा ऐकूं आ तरीहि माझ्या डोळ्यांतून वाहाणारे हे अश्रु मी आपल्याच हातांनीं पुसु टाकीन. वास्तविक त्यांच्या हातांनीं ते पुसले गेले पाहिजे होते; पण तित

माझे भाग्य असेल कीं नाहीं कुणाला माहीत ! कदाचित् याच कारागृहांत माझा अंत होणार नाहीं— . . . ''

याच वेळीं जुल्सखान आंत आल्यामुळे तिचे पुढचे विचार मनांतल्या मनांतच राहिले. तो तिला सलाम करून म्हणाला, '' दलियाबिबी ! एक फळवाला या रस्त्यानें जात आहे मी त्याला आपल्यासाठीं बोलवूं का ? आपल्याला फळें फारच आवडतात म्हणून विचारतों. ''

शेवटचे शब्द संपतात तों तो फळावालाहि दरवाजांतून डोकावत असलेला तिला दिसला. तेव्हां तिनें आपली ओढणी सांवरली आणि किंचित् तिरस्कारानें म्हटलें, '' जुल्स ! तुला अगदींच कसं रे समजत नाहीं ? एकदम त्याला इकडेच घेऊन आलास वाटतं ! जा मला कांहीं नको. आल्यावाटेनें त्याला घेऊन जा. ''

फेरीवाले मोठे चेंगट असतात हें खोटें नव्हे. कारण तिचें बोलणें संपलें न संपतें तोंच तो फळवाला म्हणाला, '' असें काय बरें बाईसाहेब बोलतां ! इतक्या आशेनें मी आलों तो उगीच का ? मी चांगलीं फळें आणलीं आहेत. एकवार पहा तरी गरिबाकडे ! ''

फळवाल्याचा स्वर तिला ओळखीचा वाटला. लागलीच तिनें त्याच्याकडे निरखून पाहिलें व अतिशय आनंदानें पुढें सरून म्हटलें, '' मुबारक ! मुबारक !! तूं इथें येण्याचं धाडस केलंस ! या खुदा ! तुझे मी किती उपकार मानूं बरें ! '' बोलतां बोलतां दलियेला गहिंवर आला व तिनें डोळेहि पुसले.

तिचे ते अश्रू पाहून, ' आपल्या हृदयाला कोणी तरी भाल्यानें टोंचीत आहे ' असेंच मुबारकाला वाटलें. तो कळवळून म्हणाला, '' दलिये ! माझ्याकडे पाहून नको असे अश्रू गाळू ! कारण मला येथें ज्यास्त वेळ उभेसुद्धां राहातां येणार नाहीं. पहारेकऱ्यांची नजर माझ्यावर आहे हें तुला सांगायला नकोच. तुला पहावी आणि दोन शब्द बोलावे म्हणून मी आलों. आणि या बाबतींत जुल्सचे माझ्यावर फार उपकार झाले आहेत. ''

दलियेला पुष्कळ बोलावेंसें वाटत होतें; पण तिच्या तोंडून शब्दच उमटेना.

ती अडखळत अडखळत म्हणाली, " मुबारक, तूं आलास, बरं झालं. तीकडची काय खबर आहे सांगशील का ? "

मुबारकावर हें एक संकटच येऊन पडलें. इब्राहीमच्या बाबतींत खरें बोलावें तर अकस्मात काय प्रसंग ओढवेल कुणाला माहीत ! अशी त्याला भीती वाटली. इब्राहीमसाहेबांनीं आत्महत्येचा प्रयत्न केला होता; पण त्यांत यश न आल्यामुळें ते कुठें नाहींसे झाले आहेत असें ऐकतांच ही जागच्या जागींच बेशुद्ध व्हायची ! यामुळें मनांतले विचार मनांतच ठेऊन मुबारक कांहींशा प्रसन्न चेहेऱ्यानें म्हणाला, " साहेबांबद्दल तुम्हीं कोणत्याही प्रकारची काळजी करण्याचें कारण नाहीं ते खुशाल आहेत. ते आतां अगदीं कर्जमुक्त झाल्यामुळें स्वतंत्र आहेत; पण तुम्हांला या कसाबाच्या हातून कसें सोडवावें हीच एक काळजी त्यांनां रात्रंदिवस चैन पडूं देत नाहीं. इसाकच्या मदतीनें त्यांनीं पुन्हां व्यापारधंदा करण्याला सुरवात केली असल्यामुळें लवकरच त्यांचे नशीब उदयाला येईल यांत शंका नाहीं. माझ्या देहांत प्राण असेपर्यंत मी त्यांनां सुखी ठेवण्याची खटपट करीनच. "

मुबारक आपल्या गतायुष्यांत कधींहि खोटें बोलला नव्हता; पण आज नाइलाजानें त्याला अगदीं खोटें बोलण्याचा प्रसंग आला व दलियेला आनंदित करण्यासाठीं त्यानें तो प्रसंग साजराही केला.

दलियेला समाधान वाटलें. इब्राहीमचें अन्तःकरण आपल्यासाठीं तळमळत आहे हें ऐकतांच तिचें हृदय आनंदानें नाचूं लागलें. मात्र या आनंदांत आपली व त्यांची केव्हां भेट होईल अशी तिला उत्कंठा उत्पन्न झाली हें सांगायला नकोच. मुबारक कधींच कांहीं खोटें बोलणार नाहीं ही दलियेची खात्री होती. ती कांहींशीं लाजवटपणानें मुबारकाला म्हणाली, " इब्राहीमसाहेब, माझ्यासंबंधानें कधीं कांहीं बोलत होते का ? "

" बाईसाहेब ! रात्रंदिवस आपल्यावांचून त्यांनां दुसरें कांहींच सुचत नाहीं. ते नेहेमीं त्याच त्याच गोष्टी मला विचारतात. व मीही मला सुचतील तशी त्यांनां उत्तरें देतों. " एकदां खोटें बोललें कीं हजारदां खोटें बोलावें लागतें म्हणतात तें खोटें नाहीं.

या उत्तरामुळेंहि दलियेला समाधान वाटलें व उत्कंठा उत्पन्न झाली.

तिनें पुन्हां विचारिलें, " मुबारक ! या सैतानाच्या हातून माझी कधीं काळीं तरी सुटका होईल का ? "

" वा: कां नाहीं होणार ! ज्यांच्यासाठीं तुम्ही स्वतःला विकून घेतलें तेच तुमची सुटका करतील. आतां या गोष्टीला थोडासा विलंब लागेल तोंपर्यंत दुःख सहन केलें पाहिजे."

" मुबारक ! मला आतां भेटावसं वाटतं रे; पण काय करूं ! माझे त्यांना सलाम सांग. माझ्या आठवणीनं त्यांना दुःख होत असेल तर तूं माझी आठवण न येईल असं वर्तन ठेव. ते आनंदांत आहेत असं ऐकलं म्हणजे मी सुखी होईन. " " आपण त्यांच्याबद्दल कांहींच काळजी करूं नये. मला आतां ज्यास्त वेळ थांबतां येत नाहीं. हीं फळें खरोखरच मी तुमच्यासाठीं आणलीं आहेत. साहेबांनींच दिलीं तेव्हां त्यांच्या हातची भेट म्हणून तुम्हांला घेतलींच पाहिजेत. शिवाय या बुट्टीच्या तळाशीं एक सुरा आहे तोहि तुम्हीं आपल्याजवळ ठेवून द्या. कारण त्या सैतानाशीं दोन हात करण्याचा प्रसंग आल्यास आत्मरक्षणासाठीं कांहीं तरी हातांत असणें जरूर आहे. वेळ आल्यावांचून याचा उपयोग करावयाचा नाहीं हें मात्र लक्षांत असूं द्या. सुरा पाहतांच उमरशेखला अत्याचार करण्याचें धाडस होणार नाहीं. आतां मी ज्यास्त तें काय सांगूं ! स्वतःच्या जिवाला सांभाळा. मी असाच पुन्हां केव्हां तरी येईन. गुलुसखानाचे या बाबतींत फार उपकार आहेत. "

असें म्हणून मुबारकानें दोन फळें आपल्या बुट्टींत राहूं दिलीं आणि बाकीचीं सर्व तेथें ठेवून तो निघाला. तितक्यांत दरवाजावर एका खोजानें हटकलेंच. " कां ! तुला इतका वेळ कां झाला ? "

" काय सांगूं सरदारजी ! तुमच्या या बाईसाहेब फारच हिशेबी सौदा लवकर ठरेनाच. शेवटीं एकदांचा ठरला आणि सगळीं फळं ओपून आलों. मात्र त्यांतलीं दोन चांगलीं फळं तुमच्यासाठीं आणण्याला विसरलों नाहीं, हें तुम्हांला दिसतच आहे. " असें म्हणून मुबारकानें दोघांच्या हातांत दोन फळें ठेवलीं आणि एक दिनार बक्षिसीदाखल देऊन पुन्हां म्हटलें. " सरदारजी ! दुसऱ्या कोणा फळवाल्याला हा सौदा ठरवायला देऊं नका बरें का ? माझ्यासाठीं एवढें गिऱ्हाइक राखून ठेवा. मी एक

दोन दिवसांनीं येत जाईन." सरदारजी खूष झाले आणि जुल्फखानाकडे त्याचा चांगुलपणा वर्णन करूं लागले. मुबारकाला, आपलें काम कल्पनातीत सिद्धीला गेल्याचें पाहून मुबारकाला आनंद झाला व तो घरीं निघाला.

इकडे दालिया मनांत म्हणाली, "त्यांच्यासाठीं माझा जीव कां बरं इतका तळमळतो! त्यांनां थोडंसं दुःख झालं कीं मला सगळं जग अंधकारमय दिसूं लागतं याचं तरी कारण काय असावं! ते माझे कोण? मुबारक म्हणतो, ते रात्रंदिवस माझ्यासाठीं तळमळत असतात; मग माझ्याबद्दल तरी त्यांनां इतकी उत्कंठा कां लागावी? मी त्यांची कोण? एवढ्या या एका प्रश्नानेंच मला अननुभूत आनंद होतो. तो आनंद माझ्यानं सहन करवत नाहीं. मी निराधार, जगांत माझं कोणी नाहीं; पण ते माझे सर्वस्व आहेत, असं मला आतां वाटूं लागलं आहे. माझ्या नेत्रांतील तेज, देहांतील जीवनशक्ति, शरीरांतील रक्तप्रवाह आणि जागृति, सुषुप्तींतील देखावे सर्व कांहीं तेच आहेत. कोणत्याही स्थितींत व कुठेंहि ते असोत; खुदातालाजवळ माझी इतकीच प्रार्थना आहे कीं, त्यांनीं नेहमी सुखी आणि आनंदी असावें कधींच कोणत्याही प्रकारचें त्यांना दुःख होऊं नये."

"एका पूज्य देवतेचा आश्रय सोडून मी सैतानाच्या रंगमहालांत येऊन पडलें आहें! मला यानें भरपूर रक्कम देऊन विकत घेतलें आहे; पण सैतानाच्या दुष्ट कृतींचा मला अद्याप अनुभव आला नाहीं हें आश्चर्य नव्हे काय? जर त्यानें भलताच प्रसंग आणला तर मी काय बरें करणार! जुल्फ म्हणतो 'तुमचा कोणत्या तरी मोठ्या घराण्यांत जन्म झाला असला पाहिजे.' असेल; पण त्याचा मला काय उपयोग! त्यामुळें दुष्टांचीं मनें सुष्ट करण्याचें सामर्थ्य माझ्यांत येईल काय? सध्यांचें हें अनिश्चित स्वास्थ्य म्हणजे पुढें होणाऱ्या भयंकर तुफानाचें पूर्व लक्षण आहे असें मी कां समजूं नये? उमरशेखचा हेतु मला समजलेला आहे; पण माझ्या देहांत प्राण असे तोंपर्यंत मी त्याच्या हेतूंनां नुसती सहानुभूतिही दाखविणार नाहीं. स्वर्गांतील दिव्यानुभवावर लाथ मारून नरकांत पडण्याची कोण इच्छा करील बरें! श्रीमंत आणि विलास हेंच मनुष्याचें खरें लक्षण काय? केवळ सुखोपभोग हीच मनुष्याची इतिकर्तव्यता असूं

शकेल! दैवी गुणांच्या विकासाला मनुष्याच्या हृदयांत जागाच नाहीं! —"

पण तितक्यांत जुलूस आंत आला आणि म्हणाला, "बाईसाहेब! आपण आतां निश्चिंत राहा, ताकितबिबीनें तुमची सर्व जबाबदारी आपल्यावर घेतली आहे. त्यांनीं तुम्हांला आपली मुलगी मानली असून तुमच्या प्रत्येक सुखदुःखाचा त्या दृष्टीनें त्यांनीं विचार चालविला आहे. तसाच कांहीं बिकट प्रसंग आल्यास मी ताबडतोब त्यांनां कळविण्याला तयार आहेच. तुम्हांला कोणत्याही प्रकारची काळजी करण्याचें कारण नाहीं. माझ्या धनीसाहेबांचा रोजचा कार्यक्रम माझ्या नजरेखालून जात आहे, तेव्हां मला आगाऊ व्यवस्था करतां येईल."

दालियेला समाधान वाटलें. तिनें मनांतल्या मनांत जगन्नियंत्याचे आभार मानले. खुदावर विश्वासून सच्चरितीनें · सद्विचारांत वेळ घालविणाराचें तो पदोपदीं कसें रक्षण करीत असतो याचा तिला सारखा अनुभव येत असल्यामुळें व तशा त्या बंदिवासांतहि आपल्याला अनोळखी माणसांचें मिळणारें अमोलिक साहाय्य तिच्या नजरेसमोर असल्यामुळें ईश्वरीसामर्थ्याचें तिला कौतुक वाटलें, व ती हर्षोत्फुल्ल अन्तःकरणानें जुलूसकडे पहात हळूच म्हणाली, "जुलूस! तुझ्यासारख्या चांगल्या माणसाला दैन्यावस्थेंत लोटून व दुसऱ्याचा गुलाम बनवून तो परमदयाळू भगवान तुझी कसोटी तर पहात नसेल ना! तुला नोकर कोण म्हणेल! तुझें हृदय म्हणजे एक अजबखाना आहे. तुझ्या शतांशानेंहि जरी तुझ्या धन्याचें अन्तःकरण उदात्त असतें तरी मला व इब्राहीमसाहेबांनां असले हे दुःखाचे दिवस पहावे लागले नसते. असो. मर्जी त्याची! तुझे हे उपकार माझ्याकडून फिटतील कीं नाहीं कुणाला माहीत; पण तुझ्या मालकिणीला मात्र माझे सलाम सांग आणि या आपल्या मुलीला या बंदिवासांतून लवकर मुक्त करण्याची विनंति कर. मी यांतून जिवंतपणीं सुटलें तर तुझे हे उपकार विसरणार नाहीं जुलूस!"

"बाईसाहेब! माझे यांत उपकार कसले! जें मला योग्य दिसलें तें मी केलें. तुमचा जन्म उच्च कुलांत झाला असला पाहिजे. तुमच्या नशिबांत दासीपणा लिहिलेला नाहीं. तुमच्या मनाला ज्या योगानें सुख होईल तेंच करावें असें मला वाटतें. मग ती त्या जगन्नियंत्याची काय

योजना असेल कुणाला माहीत ! पण तुमचे हे दुःखाचे दिवस कांहीं असेच राहणार नाहींत— "

---

# प्रकरण २५ वें.



## शहाजादी

इब्राहीमचें मन स्वस्थ नव्हतें त्याला चोहोंकडे दलिया दिसत होती. दलियेशिवाय जगांत आनंदकारक असें कांहीं नाहीं अशी त्याची समजूत झालेली होती. तो त्या बेशुद्ध स्त्रीकडे पहातच राहिला. शहासुफिंनाहि आश्चर्य वाटलें. इब्राहीम काय बोलत आहे याचा त्यांनां उलगडा होईना. ते आपल्या जखमेची वेदना विसरले. कारण ती स्त्री कोण आहे हे त्यांनां माहीत होतें. आपल्या शिष्यांची दिशाभूल होत आहे अशी त्यांची खात्री झाली. ते त्याला म्हणाले, " इब्राहीम चांगलासा प्रकाश नसल्यामुळें तुझे डोळे तुला फसवीत असावेत असें मला वाटतें. आधीं ती स्त्री शुद्धीवर येऊं दे; मग तुझी चूक कुठें होत आहे ती पाहूं. मग शुद्धीवर आल्यानंतर कांहीं तरी उतावीळपणानें बोलूं नको. "

इब्राहीमलाही आपल्या बोलण्याचा थोडासा संकोच वाटला. दलिया साठीं आपलें तळमळणारें हृदय एका पूज्य व्यक्तीसमोर आकास्मिक रीतीनें व भलत्याच प्रसंगीं उघडें करणें योग्य नाहीं असें त्यालाहि आतां वाटूं लागलें. तो त्या स्त्रीच्या हातापायांनां व मस्तकाला ऊब आणून तिला शुद्धीवर आणण्याचा प्रयत्न करूं लागला, व थोड्यांच वेळांत आपल्या प्रयत्नाला यश येईल असेंहि त्याला वाटूं लागलें. शहासूफीहि थोड्याच वेळांत कसेबसे उठून बसले व म्हणाले, " इब्राहीम ! माझी झोंपडी जवळच आहे. तूं हिला आपल्या खांद्यावर घेऊन माझ्या मागून येशील का ? "

" होय साहेब ! हिला घेऊन येणें मला फारसें कठीण वाटणार नाहीं; पण हा असा येथें काय प्रकार झाला हें मला समजेल का ? "

" होय बाळ. तूं हिला घेऊन माझ्या मागून ये. मी तुला सगळें

कांहीं सांगतो. " असें म्हणून तो फकीर चालूं लागला. इब्राहीम त्या स्त्रीला आपल्या खांद्यावर घेऊन निघाला. तिच्या मृदुस्पर्शानें आणि सूक्ष्म-प्रमाणांत येणाऱ्या सुगंधी निश्वासांनीं त्याला एक प्रकारचा अननुभूत आनंद झाला व त्यामुळें त्या स्त्रीच्या परिचयाबद्दलची जिज्ञासा विशेष वाढली. ही कोण आहे तें त्याला समजून घ्यायचें होतें. कारण ' ही दलियाच असली पाहिजे. ' असें तो आपल्या मनाशीं म्हणत होता.

" तुम्हां तरुणांच्या अविचारी प्रेमलीला तुम्हांला वारंवार संकटांत लोटीत असतात. " फकीर शहासूफी बोलूं लागले. " शहाबशहा शिकंदर लोदी म्हणजे केवढा पराक्रमी आणि न्यायी बादशहा; पण जनानखान्यांत कांहीं त्याचा हुकूम चालत नाहीं. निदान आपल्या हुकमाची होत असलेली अमान्यता तरी त्याच्या नजरेस येत नसली पाहिजे. बादशहाचें अन्तःपूर, पण तिथें सगळा अंधेर. किती भुयारें किती तळघरें आणि किती गुप्तवाटा असतील याचा मागमूसही कुणाला लागावयाचा नाहीं. कालचाच प्रसंग पहा. ही स्त्री ह्मणजे अन्तःपूरची अधिष्टात्री, सौंदर्याची देवता आणि बादशहाची आवडती मुलगी. हिचें नांव गुलबहार– "

" अं ? शहाजादी गुलबहार कीं काय ? " इब्राहीम दचकला.

" होय. तूं दचकलास कां ? तुला तिची माहिती आहे असें वाटतें ? "

हं. कांहीं असो आपण पुढें सांगा. " इब्राहीम असें ह्मणाला खरा; पण त्याचें मन अस्वस्थ झालें आपली दालिया या गुलबहारसारखी कां दिसावी याचा विचार पडला. तरी पण आपली ही मनस्थिती सूफीसाहेबांना समजूं नये म्हणून त्यानें पुन्हां ह्मटलें, " हिच्यावर हा भयंकर प्रसंग कसा आला ! आणि आपण त्यांत कसें सांपडलां ? "

" हिच्या पाळतीवर हिचा कोणी तरी कट्टा दुष्मन असला पाहिजे असा मला संशय येतो. कारण मघांच्या त्या चकमकींत ती कार्टी ठार झाली कीं नाहीं तें पहा असें कोणी बुरखेवाला गृहस्थ ओरडत होता. त्या वेळीं आकस्मिक मदत आली नसती तर शहाजादीची पुरीं शंभर वर्षें भरलींच होतीं. "

" आकस्मिक मदतीला येणारा गृहस्थ कोण ? " इब्राहीमनें उत्सुकतेनें विचारलें.

" शिरस्त्राणानें तोंड झाकलेला कोणी चिलखतवाला वीर तरीसारखा आला आणि त्यानें लांडगेतोड करून सर्वांना उधळून लावलें. शहाजादीला त्यानेंच वांचविलें व त्यानेंच तिला त्या झऱ्याजवळ नेलें; पण नंतर कुठें कसा निघून गेला कुणाला माहीत ! "

" मग या सगळ्या प्रेमलीला आहेत हें तुम्हीं कशावरून ताडलेंत ? "

"या चकमकींत मला एक पत्र सांपडलें आहे आणि त्यांत सांकेतिक भाषेंत भेटीचें ठिकाण निश्चित केलें असून कोणा धाडशी प्रियकराचा तो साहसी संदेश असावा असें मला वाटतें. "

" साहेब, शहाजादी सावध झाली असावी असें वाटतें. " असें ह्मणून इब्राहीम खालीं बसला आणि त्यानें त्या स्त्रीला-शहाजादीला बसविलें. शहासूफीहि नजीक आणि म्हणाले, " शहाजादीसाहेब ! तुम्हीं कुठें आहां बरें ! तुम्हालां आतां बरें वाटतें कां ? "

" होय; पण या काळोखामुळें मला कांहींच दिसत नाहीं. मी आहे कुठें आणि तुम्हीं कोण ? माझ्या समोर कोण बसलें आहे ? तुम्हीं माझे शत्रू आहां कीं मित्र ? " शहाजादी संशयितपणानें; पण क्षीण स्वरानें अडखळत अडखळत ह्मणाली. अद्याप आपण धोक्यांत आहे असें तिला वाटत होतें.

" मला ओळखलें नाहीं का ? मी शहासूफी आहे आणि हा समोरचा माझा एक शिष्य आहे. तुम्हांला आतां कोणत्याहि प्रकारची भीती नाहीं. तुमचे शत्रू उधळून गेले. "

" या खुदा ! शहासाहेब ! मी त्या प्रसंगांतून निभावलें खरी; पण मला सहाय्य करणारा तो वीर पुरुष कुठें आहे ? त्याचें तर कांहीं बरें वाईट झालें नाहीं ना ! "

" नाहीं. त्याला कांहीं धोका नाहीं. तो सुखरूप असावा असें मला वाटतें. तूं बेशुद्ध झाल्यावर तो तुला घेऊन त्या झऱ्यावर गेला; मग पुढें त्याचें काय झालें असावें माहीत नाहीं. कारण मला जखम झाल्यामुळें मी तेथेंच पडलो होतों. हा माझा शिष्य आल्यावर मला व तुम्हांला दोघांनाही त्यानें सावध केलें. तुम्हांला त्या दुष्टांच्या हातून सोडविणारा महाभाग कुठें गेला असेल बरें ? "

" सूफीसाहेब ! मलाहि त्याच्या संबधानें फार काळजी वाटते ! " हे शब्द उच्चारतांनां शहाजादीचा स्वर कांपत होता. इब्राहीमचें अन्त:करण शहाजादीच्या प्रत्येक शब्दाबरोबर थरारत होतें. मी सुफीसाहेबांचा शिष्य म्हणूनच माझ्यासंबंधानें ही कांहीं बोलत नसेल कां ? असेंहि त्याला वाटल्या-वाचून राहिलें नाहीं. शहाजादीच्या आवाजांत दालियेच्या शब्दांत प्रतिध्वनी उमटत होता. त्याच्यानें बोलल्यावांचून राहावेना. तो हळूच ह्मणाला, " एकाद्या विजयी वीराची शहाजादीनें काळजी करावी इतका तो वीर या प्रदेशाला अपरिचित आहे काय ? असल्या सुकुमार फुलाला भलत्याच जागीं फेकून तो कसा बरें निघून गेला. ? "

शहाजादीच्या नेत्रांत एकवार अहंमन्यतेचें तेज चमकलें. तिनें तीव्रतेनें इब्राहीमकडे पाहिलें; पण काळोखामुळें तिला तो दिसूं शकला नाहीं. सूफी-साहेबांसारख्या फकिरांचा शिष्य इतका बोलका असेल अशी तिची कल्पना नव्हती. ती कांहींशी तीव्रतेनें ह्मणाली, " सूफीसाहेब ! तुमच्या शिष्याला अन्त:पुरांतील विलासी रमणींशीं बोलण्याची संवय असावी असें वाटतें. "

सूफीसाहेबांनां हे पोरखेळ नको होते. तरी पण या बाबतीत त्यांना नि-ष्ठुरपणानें असें कांहींच बोलता येईना. ते सौम्यपणानें म्हणाले, " माझा हा शिष्य अद्याप फकीर बनलेला नाहीं. तो नुकताच त्या मार्गाकडे वळलेला आहे त्याला या बाबतींत तुम्हीं क्षमा कराल अशी मीं अशा करतों. त्याचेहि तुमच्यावर थोडे फार उपकार झालेले आहेत. तो नसता आला तर आम्हीं दोघेहि एकाद्या हिंस्र जनावराच्या भक्ष्यस्थानीं पडलों असतों. खरें बोलायचें म्हणजे त्या विरानें तरी तुला सोडून कां जावें बरें ? "

" कदाचित् माझा शत्रू पुन्हां त्याच्याशी लढण्याला आला नसेल कशावरून ? "

"आला असता तर आसपास त्या दोघांची लढाई झाली असती ! मला तर तसें कांहींच ऐकूं आलें नाहीं ! असल्या निर्जन आणि निस्तब्ध जागीं शस्त्राचा खणखणाट तेव्हांच ऐकूं आला पाहिजे होता. " इब्राहीम बोलला कां तें कुणाला ठावूक; पण मधून मधून आपण उत्तर द्यावें असें इब्राहीमला वाटत होतें. शहाजादीलाहि त्याचें तें बोलणें खोडून काढतां येईना.

ती शहासूफींना उद्देशून म्हणाली, " मला इकडे असल्या या अरण्यांत पाहून तुह्मांला आश्चर्य वाटलें असेल नाहीं ? "

" नाहीं. मी तरुण होतों, त्या वेळीं, दिल्लीच्या अन्तःपुरांतील खेळ दिल्लीच्या दरबारालाहि खालीं पहावयास लावणारे असतात हें मी अनुभविलें होतें. जनानखान्यांतील भुयारें आणि चोरवाटा मुंग्यांच्या वारुळाप्रमाणें चोहोंकडे पसरलेल्या असल्याचें मी पाहिलें आहे. त्यामुळें मला आतां कसलेंच आश्चर्य वाटत नाहीं. "

शहाजादी चमकली. आपण कांहीं तरी बोलून गेलो असें शहासूफींनाहीं वाटलें. ते उभे राहून म्हणाले, " आतां आपण झोपडींत जाऊं. इथें असें किती वेळ बसून राहाणार ! चंद्रोदय व्हावयाला अद्याप बराच अवकाश आहे. "

याच वेळीं ज्याचें शिरस्त्राण व चिलखत अस्पष्ट चमकत आहे असा एक योद्धा अंधारांतून पुढें मोकळ्या जागेंत आला; व आपली तरवार एका विशाल फत्तरावर आदळून गंभीर स्वरानें म्हणाला, " या शांततेच्या काळांत तरवारीची शोणित तृष्णा भागविण्याला कोणी तयार आहे काय ? "

शहासूफी चमकले. शहाजादीच्या नेत्रांत विलक्षण तेज चमकूं लागलें आणि इब्राहीमचें रक्त उसळलें. त्यानें आपली तरवार तितक्याच जोरानें त्याच फत्तरावर आदळली आणि गंभिरस्वरानें उत्तर दिलें. " सर्वांच्याच तरवारी तहानेलेल्या आहेत; पण मृगजळाच्या मागें धांवण्यांत काय अर्थ ! "

" तें मागाहून पाहूं; पण शहाजादी सध्यां कुणाच्या ताब्यांत आहे ? " अगान्तुकानें विचारलें " आपल्या मित्रांच्या आश्रयाला आहे. तिला कोणाची भिती नाहीं. " शहाजादीनेंच चटकन उत्तर दिलें. मागाहून शहासूफीही बोलले, " चिटीचपाटीच्या गुप्त पेंचांत अडकवून एकाद्या कुलकुमारिकेला तिच्या घराबाहेर काढणें आणि तिला आपत्तींत फेंकून तिच्या सहाय्यकांवर तरवार उचलणें हें खऱ्या शूराचें कर्तव्य नव्हे. "

" शहासूफी. हा आवाज शहासूफींचा आहे. माझ्यावर होणारा वार स्वतःच्या मांडीवर घेऊन ज्यांनीं मला शत्रूच्या पराभवासाठीं जिवंत ठेवलें तेच देवावतार शहासूफी आपणच आहां. आणखीं तिसरे कोण बरें ! आवाज परिचयाचा वाटतो. "

" इसाक् ! इसाक् !! दुसरा कोण असणार ! मित्राला आणि बरादाराला पारखा झालेला हा तुझा इब्राहीम. मी तुला ओळखलें. ये, ये, मला भेट." इब्राहीनें आपल्या मित्राला ओळखलें. अपरिचित योद्धा इसाकच होता. दोघेहि एकमेकांना कडकडून भेटलें. शहाजादी नुसती पहातच राहिली; पण तिला त्या काळोखांत काय दिसणार ! शहासूफींना आनंद झाला. ते सद्गदीत होऊन म्हणाले, " माझ्या लाडक्यानों चला आतां माझ्या आश्रमांत. तुम्हीं तिघेंहि माझींच आहां; पण तुमचा शत्रू कोण बरें ! आणि इसाक, तुझ्याशीं त्याचें शत्रुत्व कां ? "

" बादशहाच्या भावाचा मुलगा जमालखान बादशच्या सिंहासनाच्या त्याला अपहार करावयाचा आहे; आणि तो बादशहाच्या हयातींत; पण बादशहानें मला त्याच्यावर नजर ठेवायला सांगितल्यामुळें तो मला जगांतून नाहींसा करायला पहात आहे. शिवाय शहाजादीलाही आपलीशी करण्याचा त्याचा प्रयत्न आहे; पण माझी त्याच्यावर नजर असल्यामुळें त्याचा कोण-ताही डाव सिद्धीला जात नाहीं. अजमीरचा काजी खुदादाद याचेंहि त्याला आंतून सहाय्य असल्याचें मला समजलें आहे. लवकरच सगळ्या गोष्टी उघडकीला येतील; पण गुलबहार ! तूं या वेळीं जनानखान्यांत नसल्यामुळें केवढा बोभाटा उडेल याची तुला कल्पना तरी आहे कां ? शहासाहेब आणि दोस्त इब्राहीम मला आतां इथें ज्यास्त वेळ थांबता येत नाहीं याबद्दल वाईट वाटतें. पुन्हां भेट होईलच. या हट्टाग्रही शहाजादीला तिच्या महालांत पोंचविली पाहिजे. चल गुलबाहार घोडा तयार आहे. आतां विलंब करूं नको. "

शहाजादी आणि इसाक दोघेहि काळोखांत दिसेनाशीं झालीं. हीं पिशा-चें आहेत कीं माणसें आहेत याचाच इब्राहीमला उलगडा होईना. त्याला दिल्लीचें राजकारण माहीत नव्हतें आणि इसाकचा बादशहाशीं काय संबंध आहे हेंहि तो जाणत नव्हता. इसाक हा एक व्यापारी असून केवळ व्यापा-रासाठींच तो वारंवार दिल्लीला आणि दख्खनला जात असतो असें त्याला वाटत होतें; पण इसाक म्हणजे एक निराळाच माणूस आहे असें त्याला आतां कळून चुकलें. ' त्याची आणखी किती गुप्तरहस्यें असतील कुणाला माहीत असें तो मनांत म्हणाल्यावांचून राहिला नाहीं. तसेंच खुदादादसा-

रख्या नीच [illegible] आपल्या अन्नदात्या बाहशहाविरुद्ध कारस्थानें करण्याला मुळींच दिक्कत वाटणार नाहीं अशी त्याची स्वानुभवावरून खात्री झाली; पण दलिया गुलबहार या दोघींच्या आवाजांत आणि स्वरूपांत इतकें साम्य कसें ? याचा त्याला उलगडा झाला नाहीं. मात्र स्वभावांत साम्य नसावें असें त्याची मनोदेवता त्याला सांगू लागली. तरी पण रहस्य हें कायम राहिलेंच. शिवाय दिल्लीच्या अन्तःपुरांत रात्रीच्या वेळीं इसाक्सारखा परका गृहस्थ तिला कसें पोंचविणार ! इब्राहीमनें पुष्कळ विचार केला; पण याचा त्याला उलगडा झाला नाहीं.

---

# प्रकरण २६ वें

## वाघाच्या तावडींत सांपडलेली हरिणी

आज दलियेच्या मोठ्या परिक्षेचा दिवस होता ह्मटलें तरी चालेल. उजाडतांच तिनें रोजच्या प्रमाणें देवाचें नांव घेऊन बिछाना सोडला. उमरनें तिला विचार करण्याला दिलेल्या मुदतीचा तो शेवटचा दिवस होता त्यामुळें उज्ज्वल प्रभातकालींच अमंगल आशंकेनें अस्वस्थ करून सोडलें. ती जमिनीवर पसरलेल्या गालिच्यावर बसून जगन्नियंन्त्याची करुणा भांकूं लागली. तिनें हात जोडले होते व तिची नजर उर्ध्वगामी झाली होती. तिची ती कळवळ्याची प्रार्थना देव ऐकणार नाहीं कां ! कांहीं कां असेना; पण तिला मात्र त्या प्रार्थनेमुळें बरेंचसें समाधान वाटूं लागलें होतें.

उमरशेख तर एक एक दिवस मोजीतच बसला होता अर्थात त्याला आजच्या या शुभ दिवसाचा कसा बरें विसर पडेल ! तरी त्या दिवशीं त्याला आनंद वाटत नव्हता, कारण दलिया उदासपणानें खुदातालची करुणा भाकित बसली आहे व दीर्घ निश्वास सोडीत आहे असें त्याला जुल्दस कडून समजलें होतें. अर्थात आपणाला तिचा प्रसन्न चेहरा पहायला मिळणार नाहीं अशी त्याची समजूत होणें साहजीकच होतें. आपल्या भेटीला ती अगदीं उत्सुक होऊन राहील असें त्याला वाटत होतें तें फोल ठरलें. ऐषआराम आणि विलास यांपैकीं कशाचीही जरूरी नाहीं, अशी ही तरुणी आहे तरी कोण ? असाही प्रश्न उमरशेखच्या अन्तःकरणांत उत्पन्न

झाल्यावांचून राहिला नाहीं. तरी पण विषयलोभानें धुंद झालेल्या मनाला तो परावृत्त करूं शकला नाहीं. तो मनांत म्हणाला, " या चालू खटपटीची आज एकदांची अखेर लावलीच पाहिजे. इतके दिवस मी तिच्याशीं फारच सलोख्यानें वागलों, तिला कोणत्याही प्रकारचा त्रास दिला नाहीं आणि हलके सलके कामही सांगितलें नाहीं. पण आतां मात्र जर ती माझी व्हावयाला तयार झाली नाहीं तर तिचे हाल कुत्राही विचारणार नाहीं. मी तिला भरपूर रक्कम देऊन विकत घेतलें आहे अर्थात तिच्यावर माझा सर्व प्रकारानें हक्क आहे; पण हे सगळें काम साध्या सीधेपणानें तडीला नेतां यायचें नाहीं, असलीं कामें शिराजीच्या धुंदीतच झालीं पाहिजेत. आसगरही मला म्हणाला आहे कीं, एकवार शिराजीचा बार उडवून देऊं. बस तर मग. आतां त्याच उद्योगाला जातों. शिराजीच्या सहाय्यानें आज दलियेला आपलीशी करणार. मात्र इथें कांहींच करण्याची सोय नाहीं कारण आमच्या बिबीसाहेबांचा तडाखा मोठा भयंकर आहे. "

अशा प्रकारचा विचार करून उमरशेखनें आपल्या पोषाखांत योग्य तो फेरबदल केला आणि तो घराच्या बाहेर पडला. कृपणपणामुळें त्यानें आपला पोशाख साधाच ठेविला होता. पोशाखासारखा क्षुल्लक बाबींत ज्यास्त पैसा खर्च करणें त्याला योग्य वाटलें नाहीं. तरी पण आजच्या प्रसंगीं दलियेसारख्या सौंदर्यलतिकेशीं प्रसंग येणार असल्यामुळें त्याच्या पोषाखांत बराच नटवेपणा दिसत होता. त्याची ती छानछोकी पाहून जुलूसच्या मनांत संशय आल्यावांचून राहिला नाहीं. तो त्याच्या पाळतीवर होताच. मात्र उमरशेखच्या अन्तःकरणाला या संशयाची बाधा झाली नव्हती. तो निश्चितपणानें चालला होता.

* * * * * * * *

उमरशेखनें त्या दिवशीं आकंठ शिराजीपान केलें होतें. त्याच्या हृदयांतून दयामाया आणि सारासार विचार पार नाहींसे झाले होते. तो अगदीं पशू बनला होता. सद्गुणांचा आणि सद्विचारांचा लोप झाला होता. त्याचे नेत्र आरक्त झाले असून तो मधून मधून दलियेला उद्देशून कांहीं तरी बोलत होता. हिंस्र श्वापदांच्या अन्तःकरणांतील तीव्र कामलालसा अगर अन्नावर भक्ष्यलालसा त्याच्या हृदयांत ठाणें धरून बसली

होती. आपल्या बरोबर आसगरनें यावें म्हणून त्यानें आपणाकडून शिकस्त केली; पण आसगरचें हृदय याच्याइतकें वेडावलें नसल्यामुळें तो येऊं शकला नाहीं त्यामुळें त्याला एकट्यानेंच दलियेची भेट घेण्यासाठीं यावें लागलें.

रात्रींचा पहिला प्रहर होऊन गेला होता. ती कृष्णपक्षांतील रात्र असल्यामुळें चोंहोंकडे अंधकाराचें साम्राज्य पसरलें होतें. आकाशांत असंख्य तारे चमकत होते; पण तमहारक चंद्रमा यांच्या मध्यभागीं विराजमान झालेला नसल्यामुळें चोंहोंकडे विलक्षण उदासीनता पसरलेली दिसत होती.

पण उमरशेखचें हृदय उल्हासानें नाचत असल्यामुळें त्याला सगळीच रमणीयता वाटत होती. त्याच्या आंगांत विलक्षण उत्साहानें संचार केल्यामुळें अंधाराची त्याला मुळींच भीती वाटत नव्हती. आज आपण अनेक दिवसांची आपली अतृप्त महत्वाकांक्षा तडीला नेऊन सुखी होणार, या एकाच कल्पनेनें त्याचे नेत्र चमकत होते. इतका पैसा खर्च केल्याचें आज चीज होणार या विचारानें त्याचे ओठ फुरफुरत होते व हातांच्या मुठी वळल्या गेल्या होत्या. दलियेसारख्या सौंदर्यलतिकेच्या आलिंगनानें आपण आज धन्य होणार या सुखमय विचारानें तो मधुन मधुन भुंवया चढवून स्मितहास्य करीत होता. आपला कोणी प्रतिस्पर्धी राहिला नाहीं आणि या एकांताचाही कोणी भंग करणार नाहीं असें वाटून तो निश्चिंत झाला होता.

उमरशेखनें शिराजीच्या एकदोन बाटल्या आपल्याबरोबर आणिल्या होत्या. बागेतील विलासमंदिरांत येतांच त्यानें प्रथम त्यांतील एक बाटली आपल्या घशांत ओतली व दलियेच्या खोलीशीं गेल्यावर दुसऱ्या बाटलींतील बरीचशी शिराजी खलास करून तो त्या देवतेच्या खोलींत दाखल झाला. तो यावेळीं पूर्ण सैतान बनला होता हें सांगायला नकोच. चेहेरा तारवटून गेला होता, डोळ्यांवर धुंदी चढली होती ओठांवर पैशाचिक हास्य खेळत होतें. पारिजातकाचीं फुलें हुंगण्यासाठीं काळाकुट्ट सर्प ज्याप्रमाणें बेहोष होऊन त्याच्या आसपास फिरत्या वालीत असतो त्याप्रमाणें हा मानवी सर्प दलियेच्या आलिंगनासाठीं अधिर होऊन पुढें चालला होता.

दालिया आपल्या शुभ्र बिछान्यावर पडली होती आणि तिनें डोळेहि मिटले होते; पण तिला झोंप लागली नव्हती. तिचा निस्तेज झालेला देह, पीतवर्णाला पारखा झाल्यामुळें पांढऱ्या शुभ्र फुलांचा ढीग कोणी दुष्टानें विखरून टाकला असावा अशी कल्पना होत होती.

ती आपल्याच विचारांत गढून गेली असल्यामुळें उमरशेखची चाहूल तिला समजली नाहीं. पण त्या सैतानाला कुठचा शांतपणा असणार ! तो घोगऱ्या स्वरानें म्हणाला, " दालिये, तूं झोंपली आहेस का ? "

दालिया दचकली आणि तिनें भीतभीत डोळे उघडले. तोंच हा राक्षस समोर उभा असलेला तिला दिसला. लागलीच तिला एकंदर प्रकार कळून चुकला व ती धडपडत बाजूला उभी राहिली. उमरशेखची ती उच्छृंखल स्थिती पाहून तिला अतीशय भीती वाटली. आपलें संरक्षण करण्याला इथें तिसरें कोणी नाहीं. तसेंच दुर्दैवानें आज आपल्या सर्वस्वाची मालकी या पशूकडे आहे. तिसरा कोणीही मनुष्य एथें येऊन तो मला याच्या हातून सोडवूं शकणार नाहीं. हा विचार मनांत येतांच तिचें उरलें सुरलें धैर्यही पार नाहींसें झालें. तरी पण पवित्रपणा आणि पुण्याई यांचा स्वयंभू-प्रकाश तिच्या सुंदर शरिरांत खेळत असल्यामुळें त्या तेजाला कवटाळ-ण्याचें धै , सैतानीवृत्तीच्या उमरशेखच्या आंगीं नव्हतें. तिच्या तेजस्वी नेत्राकडे पाहातांच त्याला थोडीशी शुद्धी आली व तो दोन पावलें मागें सरला. त्यामुळें दालियेलाहि थोडासा आत्मविश्वास उत्पन्न झाला व ती शांतपणानें म्हणाली, " साहेब ! आपण अशावेळीं आणि अशा बेफाम स्थितींत इथें कां आलां ? "

" कां आलों ! दालिये, तूं मला असा प्रश्न विचारावा काय ? आंगांत खेळत असलेलें रक्त कल्पनेनें जाणतां येत नाहीं ? कातडी सोलून काढून रक्ताचे पाट वाहूं लागले म्हणजेच खात्री होते असें आहे काय ? मी तुला पूर्वीं दिलेली पंधरा दिवसांची मुदत आज संपली आहे, हें मीच सांगायला पाहिजे ? तुझा विचार काय ठरला ? "

" साहेब ! ही पंधरा दिवसांची मुदत मी मागितलेली नव्हती. मला मुदतीची जरूरी नाहीं. माझा विचार पूर्वींच ठरलेला आहे आणि तो मी पूर्वींच आपणाला सांगितला आहे. माझा देह आपण विकत

तला असेल, पण मन स्वतंत्र आहे. अर्थात् निर्जीव स्थितींत त्या देहाचें आपण पाहिजे तें करूं शकाल. माझी सजीवता आपल्या हेतूला आड येत आहे तुमची पत्नी ही माझी मालकीण असून तिला मी आई म्हणतें. तेव्हां मी तुमची एकुलती एक मुलगी आहें. हां, असे दचकूं नका—हें ठरलेंच. मग अशा स्थितींत तुम्ही माझ्याशीं कोणती भाषा वापरली पाहिजे, हें लक्षांत आणा. एखाद्या दारुड्याला आपली मुलगी ओळखतां येत नसेल तर त्यानें थोडा वेळ—दारूची धुंदी उतरेपर्यंत—स्वस्थ बसावें. धर्म आणि नीति यांना अगदींच जाळून टाकूं नये.

" या धर्माच्या आणि नीतीच्या बाबतींत जें कांहीं सांगावयाचें असेल तें तूं मौलवींना सांग; श्रीमंतांशीं आईबापाचें नातें जुळवायला गरिबांना फारसा वेळ लागत नसतो. दालिये, हीं नातीं आणि धर्मकर्म मला मुळींच समजत नाहींत किंवा मी हीं जाणत नाहीं असें ह्मणालीस तरी हरकत नाहीं; फक्त तूं मला माझ्या प्रश्नाचें उत्तर दे. स्वच्छ आणि शीतल जलानें भरलेल्या नदीच्या तीरीं राहून तहानेनें तळमळून मरणार नाहीं. माझ्या उत्कट वासना मला आतां आवरून धरतां येणें अशक्य आहे, तूं आपल्या कठोरतेनें मलाही कठोर बनविलेंस. मी आतां माझा हेतु पूर्ण केल्यावांचून मागें फिरणार नाहीं. सात जन्मांत कधीं पैसा खर्च केला नसेल इतका मी तुझ्यासाठीं खर्च केला आहे मी तुझ्याशीं आतां शादी लावणारच. " उमरशेख अगदीं त्रासून म्हणाला.

दालियेला भीति वाटत होती, पण तिनें धैर्यानें पुन्हां बोलायला सुरवात केली. ती शांतपणानें म्हणाली, " साहेब ! माझ्यासारख्या लहान मुलीसमोर असें कांहीं तरी बोलायला तुह्मांला लाज नाहीं का वाटत ! तुह्मी काय म्हणत आहां याचा मला मुळीं चांगलासा अर्थसुद्धां समजत नाहीं. तुमचं ताकीदबिबीशीं लग्न झालं आहे ना ? मग आणखी लग्न कशाला ? "

" ताकितबीबी गेली नरकांत. इथें आली तर तिला कुत्रीप्रमाणें तंगडीला धरून फेकून देईन ! दालिये, तुला सगळें कांहीं समजत असतां तूं अशी वेडी कां बरं होतेस ? तूं माझी हो आणि मला सुखी कर. मनाप्रमाणें ऐषआराम भोग आणि विलास कर. तुला कोणींहि अडथळा करणार नाहीं. "

" जिला धार्मिक विधीनें तुम्ही आपली पत्नी म्हटलें तिला नरकांत पाठवायला तयार झाला आं ? तिनें तुमचा काय अपराध केला बरें ? मग तुह्मीं मलाही एकादे दिवशीं ठार मारण्याला कमी करणार नाहीं ! तुमच्या मनाला वाटतं तरी काय ? ऐषआराम आणि विलास कुणासाठीं ? माझें मन ऐषआरामासाठीं आतुर झालेलें नाहीं. मला जें तुम्ही सांगत आहां तें आपल्या पत्नीला सांगा. तिला त्यापासून आनंद वाटेल. कारण तुमच्या तोंडून असले बोल ऐकावे असें तिला वाटत आहे. एकाद्या वठलेल्या झाडासमोर अगर एकाद्या दगडी पुतळ्यासमोर असलें भाषण करावयाला तुह्मांला आनंद वाटेल कां ? "

" दलिये ! तूं मला अविचारी बनवीत आहेस. तुझा हा उपदेश ऐकायला मी येथें आलों नाहीं. ये, आधीं मला तूं आलिंगन दे आणि मग आपल्या मंजूळ वाणीनें प्रेमालाप कर. " असें ह्मणून उमरशेख पुढें झाला. दलिया मागें सरली; पण ती जाऊन जाणार कुठें ? उमरशेख आणखी पुढें सरला आणि हात पसरून म्हणाला, " आतां मुळीं मी तुला विचार करायलाच वेळ देत नाहीं. तुझ्या या सौंदर्यानें मला वेडें केलें आहे. आणि शिराजीच्या सहाय्यामुळें तर माझ्या प्रेमलहरी अगदीं उचंबळून येत आहेत. मला आतां तुझा उपदेश मुळींच रुचणार नाहीं. मी आधीं माझें उतावीळ झालेलें मन शांत करीन आणि त्यानंतर तुझा उपदेश ऐकेन. तुला आज तरी निदान माझ्या मनाप्रमाणें वागलें पाहिजे. तूं कितीही ओरडलीस तरी तुझ्या सहाय्याला कोणींहि धांवून येणार नाहीं. " उमरशेखचें पाऊल पुढें पडूं लागलें.

दलियेला काय करावें तें सुचेना; ती विनवणीच्या स्वरानें म्हणाली, " शेखसाहेब ! थांबा, उभे रहा, मी कुठं पळून का जात आहे ? इतके अधीर होऊं नका. तुह्मी मनुष्य आहां हें विसरलां का ? खरं सांगायचं म्हणजे इथं कोणीं नाहीं आणि माझ्या सहाय्याला धांवून येईल असा माझा कोणीं मदतगारही नाहीं. मी बोलून चालून विकत घेतलेली दासी ! पारतंत्र्यांत नीति कसली, न्याय कसला, आणि अत्याचाराचा प्रतिकार तरी होणार कसा ? पण उमरशेख ! ईश्वर सर्वव्यापी आहे. आजपर्यंत माझें संरक्षण त्यानेंच केलें. तो काय करणार नाहीं ? त्याचीं कृत्यें कल्पनातीत असतात. त्याचे मार्ग मनुष्याला कसे कळणार ? जर

खरोखर मी पवित्र असेन, आणि त्या जगन्नियंत्यावर माझा पूर्ण भरंवसा असेल तर माझ्या अंगाला हात लावण्याची कोणाचीही छाती होणार नाहीं. देवदानवांनाही जें साध्य झालें नाहीं तें तुमच्यासारख्या एका मनुष्याच्या हातून कसें होणार. जा. तुमच्या घाणेरड्या निश्वासांनीं ही जागा अपवित्र होत आहे. माझें हें सामोपचाराचें आणि नम्रपणाच सांगणें ऐका. "

" अजूनपर्यंत मी तुला बोलूं दिलें हीच माझी चूक झाली. तुला आतां जबरदस्तीनेंच मी आलिंगन देणार. कारण त्यांतच खरं सुख असतें." सैतानी अमरशेख दलियेच्या जवळ आला.

तितक्यांत ती दूर सरून म्हणाली, " हां साहेब ! हा अविचार होत आहे. तुम्ही आतां माझ्याजवळ आलां तर भयंकर संकटांत पडाल. ' धनीसाहेब ' म्हणून मी तुम्हांला क्षमा करणार नाहीं. कारण पतिव्रता स्त्रिया स्वतःच्या पातिव्रत्य रक्षणासाठीं तुमच्यासारख्या सैतानी लोकांना ठार मारायला माघार घेत नसतात. तो खून नव्हे, तें आत्मसंरक्षण आहे. मला हा शेवटचा उपाय अमलांत आणावा लागेल. म्हणून म्हणतें, मागें फिरा आणि ताकितबिबीचें सौभाग्य कायम राखा. "

बोलतां बोलतां तिनें आपल्या कमरेला चाचपून पाहिलें. ' तो मुबारकानें दिलेला सुरा आपण कमरेला लावायला विसरल्याचें ' तिला कळून चुकलें ' हाय ! आत्मसंरक्षणाचा शेवटचा उपाय म्हणून ज्याच्यावर मी विश्वासून होतें त्यानें शेवटीं असा दगा द्यावा ना ! ' असें ती मनांत म्हणाली. तिचा चेहेरा सुकून गेला. पण ईश्वराला ती विसरली नाहीं. आतां त्याच्या लोकोत्तर सामर्थ्यावर विश्वासून राहण्यावांचून दुसरी गति नाहीं हें तिला कळून चुकलें. दारुण निराशेनंतर ती बेफिकीर बनली. तिच्या अंगांत नवजीवन आलें. तिचा कोमेजून गेलेला चेहेरा पुन्हां टवटवीत झाला. ती उमरशेखाला पुन्हां गंभीरपणानें म्हणाली, " साहेब ! मी आपणाला पुनः पुन्हां सांगत आहे, तुम्ही पुढें येऊं नका. माझ्याजवळ येतांच तुमच्यावर भयंकर संकट कोसळेल."

उमरशेख समजला कीं, दलियेची ही तोंडची भीति व्यर्थ आहे. तिच्याजवळ स्वसंरक्षणाचें कांहीं साधन नाहीं. तो आधीं तिच्या स्वरूपानें

बेफाम होऊन गेलाच होता; त्यांत ती असहाय्य.व आत्मसंरक्षण करण्या-लाहि असमर्थ असल्याचें समजल्यावर मग काय विचारतां ? तो धांवतच तिच्याजवळ गेला आणि तिचे हात धरून म्हणाला, "दलिये, दलिये, आतां माझ्यानें हा आवेग सहन करवत नाहीं. तूं कांहीं म्हण. माझा पाहिजे तर खून कर; पण एकवार—एकवार तुझ्या गाढ आलिंगनानें मला माझा अंतरात्मा तृप्त करूं दे. तूं कितीही धडपड केलीस तरी माझ्या हातून तूं सुटत नाहींस. मी आज सैतानाचा दास बनलों आहें. आणि तोच मला प्रोत्साहन देत आहे. तुझें माझ्यापुढें कांहीं चालणार नाहीं."

दलिया वाघाच्या तावडींत सांपडलेल्या हरिणीप्रमाणें आश्रयाची जागा पहात इकडे तिकडे धावूं लागली; पण त्या दीन दुबळ्या मुलीला कोण जवळ घेणार! उमरशेख तर एकाद्या पिशाचाप्रमाणें अगदीं चवताळून तिच्यामागून धांवत होता. दलिया वर पाहून दीनवाणीनें म्हणाली, "प्रभो, मी या वाघाच्या भक्ष्यस्थानीं पडावें अशी का तुझी इच्छा आहे! धांव आतां अंत पाहूं नकोस..."

तितक्यांत दलिया ज्या भिंतीशीं लपण्यासाठीं जागा पहात होती त्याच भिंतींत गुप्त असलेला दरवाजा खाडदिशीं उघडला गेला व ताकितबिबी उभी असलेली दिसली. तिनें ताबडतोब दलियाला आपल्याजवळ ओढून म्हटलें, "दलिये, तूं आतां भिऊं नको. मी तुझी आई आहें. कोण कसं तुला हांत लावतें तें मी पहातें." असें म्हणून तिनें आपल्या आगी-सारख्या लाल डोळ्यांनीं उमरशेखकडे पाहिलें. उमरशेख जागच्या जागींच गार झाला. त्याच्यानें आपल्या खवळलेल्या पत्नीकडे पहावलेंहि नाहीं. आणि तितक्यांत दरवाजाही बंद झाला.

---

## प्रकरण २७ वें.

—※※※—

### नवी माहिती

दिल्लीपासून पांचसहा कोसांवर सरिफ्पूर नांवाचा एक लहानसा गांव आहे. आज जरी या गांवाचें स्वरूप कांहींच राहिलेलें नाहीं तरी या

कथानकाच्याहि पुष्कळ पूर्वी ही एक समृद्धिशालि नगरी होती असें सांगतात. कारण तेथें चोहोंकडे वाढलेल्या जंगलांत पाहिल्यास मोठमोठ्या इमारतींचा अवशेष आढळतो.

हा गांव एका उंच पहाडाच्या चढणीवर वसलेला होता. सध्यां हें अगदीं ओसाड स्थल म्हणून ओळखलें जात असे. वस्तीहि अगदीं थोडी होती. आणि जे लोक होते ते सर्व शेतकरी असल्यामुळें जिकडे तिकडे साधेपणा पसरलेला दिसत असे. यमुनानदीचा एक फांटा त्या गांवांत आला असून त्याला चौखालचा धबधबा म्हणत असत या धाडधाड उड्या घेणाऱ्या नदीच्या किनाऱ्यावर एक कबर असून तिला ' पीर सरीफची कबर ' असें नांव दिलेलें होतें.

फकीर शहासुफी हा या पीरसरीफचा शिष्य असल्यामुळें त्याचें बहुतेक वास्तव्य याच गांवीं होत असे. शहासरीफची वागणूक एकाद्या हिंदु तपस्व्याप्रमाणें होती. राम आणि रहीम या दोहोंत त्याला फरक वाटत नसे व मांशासन करणें हें तो निषिद्ध मानीत असे.

पुष्कळ दिवसांपूर्वीच शहासरीफचा आत्मा देहमुक्त होऊन ईश्वरचरणकमलीं लीन झाला होता. पण अजूनही लोक त्याला व त्याच्या कीर्तीला विसरले नव्हते. त्याच्या दोन शिष्यांपैकीं शहासुफीच आमच्या कथानकाच्या काळीं जिवंत होते आणि इब्राहीमला त्यांचाच आश्रय मिळालेला होता.

नदीतीरावर असलेल्या या कबरमंदिरांत बऱ्याच खोल्या असून त्या शहासरीफच्या वेळीं नेहमीं साधुसंतांच्या झुंडींनीं गजबजलेल्या असत; पण आज त्या अगदीं शून्य पडल्या असल्यामुळें चोहोंकडे उदासीनता दिसत होती. इब्राहीमसाहेब गुरुजींच्या आदेशाप्रमाणें त्यांचा उपदेश श्रवण करीत याच समाधिमंदिरांत पडून असत. मागील एका प्रसंगीं वर्णन केलेल्या हकीगतीनंतर आपण फारसें जनस्थानांत जावयाचें नाहीं, स्त्रियांकडे ढुंकूनहि पहावयाचें नाहीं, असें इब्राहीमनें ठरविलें होतें. कारण आपण 'जिच्याकडे पाहूं ती आपणाला आपल्या दालियेसारखी दिसते, व त्यामुळें आपलें मन अस्वस्थ होतें.' इब्राहीमचा विचार कांहीं अयोग्य नव्हता आणि भीतिही अस्थानीं नव्हती. पण ज्याच्या भीतीनें दूर सरावें तेंच पाठीला लागतें. या म्हणीची सत्यता जर त्याला अनुभवावी लागणार असेल तर ?

इब्राहीम आणि सुफीसाहेब निरनिराळ्या पण एकाला एक लागून असलेल्या खोल्यांत रहात. त्यामुळें त्यांना एकांत मिळे आणि एकमेकांना सोबतही होई. शहासुफी फकीर होते. फकिराचे बोल उद्‌बोधक असावयाचे हें सांगावयाला नकोच. मागें एका प्रसंगीं रात्रींच्या वेळीं घडलेल्या एका विलक्षण प्रसंगानंतर इब्राहीमचें अन्तःकरण ज्यास्तच अस्वस्थ झाल्यामुळें त्याच्यासह ते या निसर्गरमणीय जागीं येऊन राहिले होते. तसेंच त्याचें अस्वस्थ मन शांत करण्याचीहि त्यांची खटपट चालू होती. ते नेहमीं त्याला उपदेश करतांना म्हणत, " लोक ज्याप्रमाणें मेलेल्याची आठवण हळु हळू नाहींशी करतात, त्याप्रमाणें जें होऊन गेलें त्याबद्दलचा विचारही आपण सोडून द्यावा. मृताप्रमाणें गतगोष्टी त्याज्य समजाव्या. विस्मृतीसारखें सुख नाहीं. होऊन गेलें तें विसरून जाण्याची खटपट कर. मनुष्याचा भविष्य काल भयंकर अंधारांत अदृश्य झालेला असतो. कितीहि ज्ञानी झाला तरी त्याला भविष्यकाळ जाणतां येत नाहीं तेव्हां चालू स्थितीकडे पाहूनच समाधान मानणें यांतच सुख आहे; नाहीं काय ? नेहमीं तळमळत राहून तरी काय फायदा !—"

अशा प्रकारचा सतत उपदेश ऐकल्यानें इब्राहीमलाहि वाटत असे कीं, " आपण झाल्या गेल्या गोष्टींचा विचारच सोडून द्यावा; ' पण तें त्याला शक्य नव्हतें. तो जसजसा गतगोष्टी विसरण्याचा प्रयत्न करी तसतशा त्या त्याच्या मनाला ज्यास्त अस्वस्थ करून सोडीत. आपलें सर्वस्व नाहींसें झालें, आपण भिकारी बनलों याबद्दल त्याला मुळींच वाईट वाटत नसे; पण दालिया आणि मुबारक यांना तो विसरूं शकत नव्हता, घटकोघटकीं त्या दोघांचीहि त्याला आठवण होत होती.

शेवटीं शहासुफींनीं, इब्राहीमची करमणूक व्हावी म्हणून त्याला हाफीजचें एक अमूल्य काव्य वाचायला दिलें. पुस्तक बरेंच मोठें होतें आणि त्यांतील काव्यसौंदर्यहि अद्वितीय होतें. या पुस्तकाशिवाय आणखीहि बरेच ग्रंथ त्यांनीं इब्राहीमच्या स्वाधीन केले होते. उपदेशवाचन सारखें चालू होतें. निसर्गाचें निष्काम कार्य अहर्निश त्याच्या नेत्रांना रंजवीत होतें; पण कशानेंच त्याची समजूत पडत नव्हती. दिवसें दिवस तो ज्यास्तच कृश होत चालला आणि दीर्घ सुस्कारे

सोडण्यांत काल घालवूं लागला. कितीहि प्रयत्न केले तरी मनाला मुळीं उत्साहच वाटेना !

एके दिवशीं इब्राहीम आपल्या खोलींत बसून हाफीज वाचीत होता. वाचतां वाचतां त्याला एक अत्यंत सुंदर कविता आढळली आणि तो ती पुन: पुन्हां वाचूं लागला. ज्या कवितेनें त्याचें मन अगदीं वेधून टाकलें होतें ती कविता अशी होती— .

" जो सर्वस्व अर्पण करून प्रेम करूं शकतो व प्रेमाचा मोबदला मिळण्याची इच्छा करीत नाहीं, ज्याच्यावर अथवा जिच्यावर प्रेम करतो त्याच्या अथवा तिच्या सुखानें जो सुखी होतो, स्वतःच्या सुखाची थोडी-सुद्धां इच्छा करीत नाहीं तोच खरा प्रेमी होय."

या कवितेच्या कांहीं ओळी वाचतांच इब्राहीमला आपल्या दलियेची आठवण झाली. तो अस्पष्ट स्वरानें आपल्याशींच म्हणाला, " परमेश्वराचा खरा उपासक कवि हाफेज हा प्रेमी होता. तो प्रेमानें वेडा झाला होता आणि त्यानें समाजाचें सूक्ष्मावलोकन केलें होतें यांत शंका नाहीं. त्याची विलक्षण निरीक्षणशक्ति या काव्यांतील प्रत्येक शब्द व्यक्त करीत आहे ! हाय ! केवढा मी दुर्दैवी ! ! माझ्यावर निःस्वार्थी प्रेम करणारी प्रेयसी ईश्वराच्या कृपेनें मला लाभली होती. ती माझ्या सुखानें सुखी आणि माझ्या आनंदानें आनंदी होणारी असून तिला कशाचीच अपेक्षा नव्हती. हाय हाय ! माझ्या जीवनाचेंहि जीवन असणारी ती दालिया आतां मला मिळेल का ! पण मी तिला अयोग्य आहें. तिच्या गंभीर प्रेमाचा थोडासा मोबदला न देतां मी तिला सोडून आलों. माझ्यासाठीं तिनें स्वतःला विकून घेतलें; पण मी दुष्टानें तिची विचारपूसही न करतां इथें येऊन बसलों आहें. माझ्यासाठीं तिनें त्या पिशाचाचें दास्यत्व पत्करलें ! तो नराधम तिचे कसकसे हाल करीत असेल कुणाला माहीत ! खुदा ! मला क्षमा कर. मी फारच निष्टुर आहें ! "

इब्राहीमच्या नेत्रांतून अश्रु वाहूं लागले. पश्चात्तापानें त्याचें अन्तःकरण जळूं लागलें. तरी पण तो पुस्तकाचीं पानें चाळीत होताच. हें पुस्तक किती दिवस तरी त्याच्याजवळ पडून होतें; पण त्यानें तें कधीं उघडूनही पाहिलें नव्हतें. आज उघडून वाचायला घेतलें तर ही स्थिती !

पुस्तकाचीं पानें उलगतां उलटतां त्याला अकस्मात् एक लिफाफा मिळाला. तो कुणी तरी अगदीं जपून ठेवलेला असावा असें त्याच्या ठेवणीवरून दिसत होतें. इब्राहीमला आश्चर्य वाटलें.त्यानें उत्सुकतेनें तो लिफाफा उघडला आणि आंतील जाड कागद काढून पाहिला तों तें एका सौंदर्यसंपन्न मुग्ध तरुणीचें चित्र असल्याचें त्याला कळून चुकलें. तें चित्र निरनिराळ्या रंगांनीं इतकें सजविलें होतें कीं, ही एकादी जिवंत प्रतिमाच आपण पाहात आहों कीं काय असें इब्राहीमला वाटलें. त्या चित्रांत चितान्यानें आपलें बुद्धिसर्वस्व खर्च केलें होतें यांत शंका नाहीं, अशीही त्याची खात्री झाली.

तें चित्र पाहतांच इब्राहीमचें सर्वांग रोमांचित झालें. ती तसबीर दोन तीन वेळ लक्ष्यपूर्वक पाहिल्यावर तो आपल्या मनाशींच म्हणाला, " काय हें सौंदर्य ! विधात्यानें उत्पन्न केलेल्या या सृष्टींत असली सुंदर स्त्री कुठेंही आढळणार नाहीं. कोणा तरी कल्पक चित्रकारानें केवळ आपल्या कल्पनेचा खेळ म्हणून हें चित्र रंगविलें असावें. काय हे आकर्ण नेत्र ! भुवयांचा खोंचदारपणा अवर्णनीय आहे ! धन्य धन्य त्याची कल्पना ! खरोखर विधात्याच्या खालोखाल चित्रकाराचें आसन असलें पाहिजे म्हणतात तें खोटें नाहीं. "

एकदां दोनदां नव्हे तर इब्राहीमनें तें चित्र अनेकदां निरखून पाहिलें. कितीदां पाहिलें तरी त्याचें समाधानच होईना. जसजसा तो त्या चित्रांतल्या सुंदरीकडे ज्यास्त ज्यास्त पाही तसतसा त्याला तें पाहण्याचा अनावर मोह उत्पन्न होई. त्या निर्जीव रमणीनें त्याला बेफाम करून सोडलें म्हणायला हरकत नाहीं. हाय ! इब्राहीम ! तूं खरोखरच वेडा झालास काय ? तूं थोड्या वेळापूर्वींच ना दालियेसाठीं आंसवें गाळीत होतास ! गुलबहारला पाहूनही तूं ज्या दालियेला विसरूं शकला नाहींस तिला हें चित्र पाहतांच दूर केलीस काय ? केवळ चित्रानें तुला वश केलें ? वेडा रे वेडा!

इब्राहीमनें त्या चित्राकडे कितीदां तरी पाहिलें; पण त्याचें समाधान होईना. तो मनांत म्हणाला, " एका रमणीच्या मोहांतून सुटण्याची खटपट करीत असतांना ही दुसरी रमणी मला आपल्या जाळ्यांत अडकवून बसली ! माझें हृदय इतकें दुर्बल बनलें आहे का ? मनावर विजय मिळविण्याच्या प्रयत्नांत असतांना मला असा हा मोह कां बरें पडत आहे ?

शहासुफींनीं मला जें शिकविलें आणि समजाविलें तें सर्व व्यर्थच गेलें काय ? कल्पनेनें काढलेल्या चित्राला पाहून असली सजीव मूर्ती पाहण्यासाठीं मी वेडावून जावें म्हणजे माझा किती मूर्खपणा ! जिला जीव नाहीं, वाक्शक्ति नाहीं, चलनवलन करण्याचें सामर्थ्य नाहीं, तिच्यासाठीं मी इतका पागल झालों; पण ती प्रत्यक्ष पाहिल्यास माझी अवस्था काय होईल ! पण हिची सजीव मूर्ती पहाण्याचें माझ्या नशिबांत आहे काय ? "

इब्राहीम आज कोणत्या खलग्रहाच्या ताब्यांत सांपडून इतका विव्हल झाला होता हें कांहीं सांगतां येत नाहीं. तें चित्र होतें त्या जागीं ठेवायला त्याला फारच दुःख वाटूं लागलें. त्यानें तें पुस्तक झांकून ठेविलें आणि चित्र हातांत घेऊन तो अस्वस्थ अन्तःकरणानें खोलींतल्या खोलींत येर-झारा घालूं लागला.

पण देवाच्या मनांत तेवढेंही एकांताचें सुख त्याला अनुभवायला द्यायचें नव्हतें. कारण त्याच वेळीं शहासुफी तेथें आले व आपला शिष्य अगदीं टक लावून कसल्याशा एका कागदाकडे पहात असल्याचें त्यांना आढळलें. लागलीच मोठ्या उत्कंठेनें त्यांनीं त्याला प्रश्न केला, " इब्राहीम ! तुझ्या हातांत काय आहे तें ? "

शहासाहेबांनीं अकस्मात् तेथें येऊन विचारलेला तो प्रश्न ऐकून इब्राहीम अगदीं चकित झाला आणि त्यानें त्यांना सलाम केला. नंतर हळूच म्हटलें, " ही एक तसवीर आहे."

" तुला कुठें मिळाली ही ?" शहासुफीनें आश्चर्यानें विचारलें.

या पुस्तकांत सांपडली. मला वाटतें कोणा अलौकिक सौंदर्यलतिकेची ही तसबीर असावी."

तावडतोब शहासुफींना कसली तरी गतकालच्या एका विशिष्ट प्रसंगाची आठवण झाली आणि ते कांहींसे रागानें म्हणाले, " ठेवलेल्या जागचें तें चित्र तूं हालविल्यामुळें तुझ्या हातून एक मोठा अपराध घडला आहे. त्या भयंकर चित्राचे तावडतोब तुकडे तुकडे करून फेकून दे. क्षणभरही तें हातांत ठेवूं नको."

शहासुफींच्या या कठोर आज्ञेचें इब्राहीमला आश्चर्य वाटून तो त्यांच्या तोंडाकडे पहातच राहिला. फकीरसाहेबांचा चेहरा, वर्षाकालच्या मेघांनीं झांकलेल्या आकाशाप्रमाणें गहनगंभीर असलेला त्याला दिसला. तेव्हां

तो भीत भीत त्यांना उद्देशून म्हणाला, " नको. नको. प्रभुराज ! असलें निष्ठुर कृत्य माझ्या हातून होऊं देऊं नको. आपण असा हुकूम करूं नये. हें चित्र कुणाचें आहे हें मला माहीत नाहीं; पण मी एवढें सांगूं शकेन कीं, ही चित्रांतील रमणी जर खरोखर या पृथ्वीच्या पाठीवर राहात असेल अगर कोणा कुशल चित्रकाराची कल्पनासृष्टी नसेल तर या चित्रांत अंकित झालेली स्त्री खुदाच्या सृष्टींतील त्रैलोक्याच्या मोलाचें एक रत्न आहे असें मानायला हरकत नाहीं. स्वामिराज! मला क्षमा करा. आपणाजवळ हें चित्र कसें आलें तें मला समजेल का ! माझें हें साहस अस्थानीं आहे; तरी पण विचारितों. या प्रश्नाचें उत्तर मिळाल्यास कदाचित् माझी तळमळ शांत होण्याचा संभव आहे. "

" जर ती गोष्ट तुला ऐकायचीच असेल तर मी सांगतों. तेवढ्यासाठीं मी तुझी निराशा करीत नाहीं;पण याचा परिणाम काय होईल कोण जाणे ! हें चित्र दिलबहार शहाजादीचें असून ती बादशहाची वडील मुलगी आहे; पण दैवदुर्विलासानें ही अकस्मात् नाहींशी झाली असून तिचा अद्याप कुणालाच थांग पत्ता लागलेला नाहीं. तिच्या बालपणींच्या सौंदर्यावरून व आकृतीवरून पुढें तिचा विकास कसा होईल ही कल्पना मनांत आणून दिल्लीदरबारांतील एका कुशल चित्रकारानें हें चित्र रेखाटलें आहे. दिल-बहार आज आपल्या ऐन तारुण्यांत असल्यामुळें जर ती येथें दिल्लींत असती तर ती अशीच दिसली असती ! पण ती नाहींशी झाल्यामुळें बादशहाला आज तिच्यासाठीं धाय मोकलून रडावें लागत आहे. "

" तर मग हें चित्र आपणाजवळ कां ? इब्राहीमनें उत्सुकतेनें प्रश्न केला.

" सम्राटची माझ्यावर भक्ति असून माझा पुरस्कर्ता आणि आश्रय-दाता तोच आहे. माझें चोहोंकडे फिरणें असतें त्यामुळें 'आपली मुलगी कुठें आढळल्यास या तसबिरीवरून ओळखतां येईल' असें त्यानें मला म्हटलें. तेव्हां मी ही तसबीर माझ्याजवळ ठेवून दिली."

" या दिलबहारचें नांव मीहि पुष्कळ दिवसांपूर्वी ऐकलें आहे; पण ती फार वर्षांपूर्वींची गोष्ट. एकदां बादशहानें कबुतराच्या अंड्याएवढें एक रत्न आणण्याबद्दलचा माझ्या वडलांना हुकूम केला होता आणि माझ्या वडलांनींही पुष्कळ खटपटीनें तो कोहिनूर नांवाचा हिरा मिळवून दिला होता. त्याची किंमत किती तरी लक्ष मोहोरा असावी. तो कोहिनूर

सम्राटनें आपल्या दिलबहारला नजर केल्याचें माझे वडील मला सांगत. शिवाय तिला नावेंत बसण्याचा शोक असून कधीं एकदां ती नावेसह यमुनानदींत बुडाल्याचेंहि ते सांगत होते. त्यानंतर तिच्या बाबतींत मीं कांहींच ऐकलें नाहीं ''

" झालें तर. तीच तिची शेवटची हकीगत. त्या भयंकर अपघातापासून तिचा पत्ता नाहीं." शहासुफीच्या नेत्रांत अश्रु आले. कारण ही जगत्सौंदर्यलतिका त्यानें लहानपणीं पाहिली होती.

" अं ? फारच भयंकर ! तेव्हांपासून ती आढळली नाहीं म्हणतां ? माझे वडील त्यानंतर बरेच वर्षे वसऱ्याला व्यापारानिमित्त गेले असल्यामुळें दिल्लीची कांहींच बातमी मला समजत नव्हती; त्यामुळें या बाबतींत त्यांना व मला कांहींच समजलें नाहीं; पण फकीरसाहेब ! आपण या शहाजादीचा तपास केला नाहीं का ?" " केला तर ! पुष्कळ केला. ज्या ठिकाणीं मी हिचा तपास केला नाहीं असा देशच नाहीं म्हटलें तरी चालेल. पण माझ्या खटपटीला यश आलें नाहीं. शेवटीं मी निराश झालों आणि हें चित्र त्या पुस्तकांत ठेवून दिलें." " प्रभुराज ! मी आपला गुलाम आहें ! जर मला परवानगी देत असलां तर मी तिच्या तपासाला जाईन. या सुंदरीचा तपास करणें व तिला सजीव पहाणें हेंच माझ्या आयुष्यांतील आतांचें मुख्य ध्येय आहे असें म्हटलें तरी चालेल." इब्राहिम अगदीं केविलवाण्या स्वरानें म्हणाला.

" बाळ, तूं मला माझ्या प्राणापेक्षांहि आवडता आहेस. मी या असल्या भयंकर कार्याला जाण्यासंबंधानें तुला कधींहि परवानगी देणार नाहीं. कारण तूं नसत्या संकटांत पडशील."

" शहासाहेब ! यांत एवढें भयंकर काय आहे ? मी कसा संकटांत पडेन?" इब्राहीमनें शंकित होऊन विचारलें. " या आपल्या लाडक्या मुलीचा बरांच शोध केल्यानंतर बादशहाला वाटलें कीं तिचा तपास लागणें कठीण आहे. कदाचित् ती या पृथ्वीच्या पाठीवर हयातही नसेल; तेव्हां तिचें कांहीं तरी स्मारक करावें म्हणून त्यानें शहाजादी दिलबहार हिची आठवण म्हणून यमुनेच्या तीरावर एक फारच मनोरम संगमरवरी दगडाचें मंदिर बांधलें असून त्यांत शहाजादीची सुवर्णमूर्ति स्थापन केली आहे. ती मूर्ति हिरे आणि जवाहीर यांनीं मढविलेली असल्यामुळें फारच प्रेक्षणीय झाली आहे.

या मूर्तीची स्थापना झाल्यानंतर सम्राट्नें असें जाहीर केलें कीं, जो कोणी शहाजादीला शोधून आणील अथवा ती अमुक ठिकाणीं आहे असें खात्री-लायक सांगेल त्याला ही मूर्ति दिली जाईल; पण या कामाला पुढें सरून जर त्यानें माझी निराशा केली–शहाजादीला त्यानें आणलें नाहीं, तर तो प्राणदंडाला पात्र होईल. त्याला कुत्र्यांकडून फाडून खावविलें जाईल. त्याचे भयंकर हाल केले जातील."

म्हणतां काय ? इतकी भयंकर शिक्षा ? पण फकीरसाहेब ! मला तुम्ही द्याच परवानगी. मला एकवार माझ्या नशिबाची परीक्षा पाहूं दे. जर माझा ईश्वरावर पूर्ण विश्वास असेल आणि जर मी जगापुढें येणार असेन तर मला दिलबहार सांपडेल. आणि जर पुढें न येतां असाच मरून जाणार असेन तर बादशहाकडून मेलों काय आणि या अरण्यांत कुजून आपोआप मेलों काय सारखाच."

इब्राहीमचें हें बोलणें ऐकून शहासुफीचें अन्तःकरण थरारलें. त्यांचा स्वाभाविक गंभीर असलेला चेहेरा ज्यास्तच गंभीर झाला आणि ते आपल्या कांपऱ्या आवाजानें त्याला म्हणाले," मुला, हा आत्मघातकी दुरा-ग्रह तूं सोडून दे. पतंगाप्रमाणें पेटत्या दिव्यावर उडी घेऊन मरून जाऊं नको. ज्या कामांत आजपर्यंत कुणालाच यश आलें नाहीं तें काम तुला सिद्ध करून दाखवितां येईल असें मी कसें मानूं बरें ?" "मी तरुण आहें. तरुणाला आळशासारखें बसून राहणें योग्य नाहीं. त्यानें उद्योगी असलें पाहिजे. धाडस,शौर्य वगैरे गुण दाखविण्याची वेळ हीच असते, असें आप-णच सांगताना ? श्रीमंतीमुळें मी आळशी बनलों तेव्हां आतां तरी मला सगळा आळस झाडून पुढें सरतां येतें कीं काय तें पाहूं द्या. नशिबाची परीक्षा पहाण्याची वेळ हीच आहे. ईश्वराची कृपा झाली तर वैभवाच्या शिखरावर चढेन नाहीं तर मृत्यु हा आहेच. मृत्यु कधीं कुणाला चुकला आहे का ? दिलबहार हयात असल्याबद्दलचा कांहींना कांहीं दाखला घेत-ल्याशिवाय मी कांहीं मागें फिरणार नाहीं. आणि फकीरसाहेब, मी हें काम उगाच नाहीं अंगावर घेत; मी या शहाजादीला पाहिलें आहे. मला ज्या माणसाबद्दल संशय येतो, त्या माणसाला आधीं मी पाहीन आणि त्यानंतर मी जाहीर रीतीनें हें जोखमाचें काम अंगावर घेईन. नाहीं तर मला जरूर

नाहीं. माझें मन मला निश्चितपणाची साक्ष देत आहे. मी यांत विजयी होऊन कीर्ति मिळवीन. मला आपण आज्ञा द्यावी.

इब्राहीमचा तो निश्चय पाहून शहासुफी फारच खिन्न झाले. त्यांना वाटलें हा आतां बादशहाच्या कोपानलांत जळून जाणार. अजूनपर्यंत या प्रयत्नांत कुणालाच यश आलें नाहीं; मग हाच कसा विजयी होणार ? कांहीं वेळ विचार केल्यानंतर ते प्रेमळस्वरानें त्याला म्हणाले, "मुला, कोणत्याही बिकट कार्याला आरंभ करतांना शहाणे लोक आधीं एक दोन दिवस शांतपणानें त्याचा विचार करीत असतात. तसा तूं विचार कर. जर या चित्राप्रमाणें खरोखरच तुझ्या ओळखीची कोणी व्यक्ति असेल तर तिला पुढें आणण्याला कांहीं विलंब लागणार नाहीं. मग निष्कारण घाई करण्याचें तरी काय कारण ? या चित्राशीं कदाचित् एखाद्या रमणीचें सादृश्य असेल आणि तेवढ्यावरच तूं उतावीळपणानें कार्याला हात घालीत असशील; पण आधीं तूं त्याचा अजमास पहा. प्रथम बादशहाकडे जाऊं नको. जगांत सारखवट माणसांचा अभाव नाहीं. गोष्ट खरेपणाला आली म्हणजे भ्रमनिरास होतो. कदाचित् या चित्राप्रमाणें असणारी स्त्री तुझ्या नजरेला आली असेल व तेवढ्यावरच तूं उतावीळ झाला असशील; पण तो भ्रम ठरल्यास तुला जिवंत राहतां येणार नाहीं. बादशहाचा राग फार वाईट आहे. या बाबतींत बादशहानें तीन तीन वेळ जाहिरनामे लावून झाले असून त्याचा शेवटचा जाहिरनामा फारच भयंकर आहे. त्यानें त्यांत असें लिहिलें आहे कीं, माझ्या मुलीचा तपास लावून देण्यासंबंधानें प्रतिज्ञा करून जो पुढें येईल त्यानें मला विश्वासार्ह वाटेल अशा एखाद्या उच्च दर्जाच्या मनुष्याला प्रथम जामीन दिला पाहिजे. तो जर माझ्या मुलीचा तपास लावून देऊं शकला नाहीं, व जिवाच्या भीतीनें त्यानें माझ्याकडेहि येण्याची टाळाटाळ केली तर जो जामीन असेल त्याला मी सुळावर चढवीन.' सांग बरें इब्राहीम, तुला असा जामीन कोण मिळेल तें ? आपल्या सर्वस्वावर केवळ जीव देण्यासाठीं तुला कोण बरें जामीन मिळेल ? यासाठीं मी म्हणतों तूं हा वेडेपणा सोडून दे. या नसत्या खटपटींत पडून निष्कारण बळी गेलेले मी पुष्कळ लोक पाहिले आहेत. तो क्रूर देखावा पहातां पहातां माझे काळ्याचे पांढरे झाले. तेव्हां नीट विचार करून काय करणें असेल तें कर. एवढेंच माझें तुला अखेरचें सांगणें आहे."

# प्रकरण २८ वें.



## दलियेचा नवा आश्रय!

दालियेला ताकितबिबीनें सोडविली खरी; पण तिला आतां ठेवावी कुठें हा एक नवा प्रश्न तिच्यापुढें उत्पन्न झाल्यावांचून राहिला नाहीं. घरीं घेऊन जाण्याची तर सोय नव्हती. कारण तसें केल्यास उमरची आणि तिची वारंवार नजरानजर होणारच. शिवाय दहा हजार रुपये खर्चून विकत घेतलेल्या दासीला कामावांचून बसवून ठेवलें तर शेजाऱ्या पाजऱ्यांच्याहि मनांत भलताच संशय येणार. शिवाय आपल्या नवऱ्याला तरी आपण किती जपणार! घरांतच तसा कांहीं बरावाईट प्रसंग आल्यास मला बाहेर तोंड काढण्याचीहि चोरी तेव्हां हिला घरीं ठेवतां येणें शक्यच नाहीं. बरें इब्राहीमच्या घरीं पोंचवावें तर हिच्या मागचा ससेमिरा पुन्हां आहेच. शिवाय ही विकत घेतलेली दासी त्यामुळें हिला स्वतंत्रता नाहींच.

ताकितबिबीनें दालियेच्या संरक्षणाच्या दृष्टीनें पुष्कळ विचार केला व शेवटीं कुणालाहि नकळत हिला आपल्या माहेरीं नेऊन ठेवावें असें तिनें आपल्या मनाशीं ठरविलें. कारण ती आपल्या परिचयाची व कुणालाहि न समजणारी अशी जागा असल्याबद्दल तिची खात्री होती. लागलीच तिनें एका मेण्यांत तिला बसविलें आणि जुल्सच्या मार्फत चार भोयांना आणून तो मेणा आपल्या देखरेखीखालीं ती माहेरीं घेऊन गेली. तिचें माहेर कांहीं फारसें लांब नव्हतें त्यामुळें तिला फार त्रास पडला नाहीं. माहेरीं ताकितचा भाऊ हिकमतखान याला हा सगळा प्रकार पाहून आश्चर्य वाटलें. घरांत आईबाप, भाऊ हिकमत आणि एक स्वयंपाकीणबाई इतकींच काय तीं माणसें असल्यामुळें विशेष गडबड झाली नाहीं. हिकमत कांहींसा अक्कलशून्य व आइतखाऊ असल्यामुळें तो अद्याप अविवाहित होता. ताकितबिबीकडून वेळोवेळीं मिळणाऱ्या सहाय्यावरच हा प्रपंच चालला होता असें म्हणायला हरकत नाहीं.

ताकितबिबी आपल्या भावाला म्हणाली, "ही माझ्या मुलीसारखी आहे. तेव्हां हिला तुम्हीं सर्वांनीं चांगल्याप्रकारें वागवा, त्रास देऊं नका. मी कांहीं हिला जास्त दिवस येथें ठेवणार नाहीं बाबा झोंपले असतील."

"होय ते झोंपले आहेत.त्यांना उठविण्याचे कारण नाहीं. मी हिची चांगली व्यवस्था ठेवीन; पण इथली सगळी परिस्थिति तर तुला ठाऊक आहे. मी सांगायला नकोच. हिकमतनें आपली गरिबी सुचविली.

दलियेसारख्या विकत घेतलेल्या दासीसमोर आपल्या भावानें आपली गरिबी व्यक्त करावी हें ताकितबिबीला आवडलें नाहीं तिला थोडासा राग आला. ती त्याला धमकावून म्हणाली," तें मला माहीत आहे. त्याबद्दल तूं ज्यास्त बोलण्याचें कारण नाहीं."

नंतर ती दलियेला घेऊन घरांत गेली. व आपण माहेरीं असतांना ज्या खोलींत राहात असे त्या खोलींत तिला पोंचवून म्हणाली," दालिये, दुसरी चांगली व्यवस्था करींपर्यंत तूं येथें राहा. इब्राहीम आज शहरांत असते तर मी त्यांच्याच स्वाधीन तुला केलें असतें; पण तुझें दुर्दैव त्याला मी काय करूं ! "

ताकितबिबीच्या तोंडून अकस्मात्, ' इब्राहीम शहरांत नाहीं ' ही बातमी ऐकतांच दलिया दचकली. जुल्सबद्दल तिला संशय आला. कांहीं तरी घोंटाळा आहे हें ती समजून चुकली. व तिचा चेहरा खिन्न झाला; पण या प्रसंगीं ज्यास्त कमी बोलणें योग्य नव्हे असें वाटून ती स्तब्ध राहिली. तरी पण तिचे नेत्र कांहीं स्तब्ध राहिले नाहींत. अश्रु वाहूं लागले. तिच्या हृदयालाच धक्का बसला मग अश्रु आल्यावांचून कसें बरें राहतील ? ताकितबिबीही समजली, कीं आपण अकस्मात् ही गोष्ट बोलल्यें हें ठीक केलें नाहीं; पण उच्चार झाला खरा; मग पश्चात्ताप करून काय उपयोग ! तिच्याहि मनाला ती गोष्ट लागल्यावांचून राहिली नाहीं.

ती दलियेचे डोळे पुसून प्रेमस्वरानें म्हणाली," बाळे दलिये, तुझ्यावरचा एक मोठा प्रसंग टळला ना ! मग असल्या सामान्य गोष्टी ऐकून तूं कां बरें रडावें ? तुझ्यावर आणखी कसले बिकट प्रसंग येणार आहेत कुणाला माहीत ! इब्राहीमसाहेब कर्जमुक्त झाले असल्याचें मीं जुल्सच्या तोंडून ऐकलें आहे. मुबारक म्हणाला." कदाचित् ते आपल्या मित्राकडेहि गेले असतील ' तेव्हां तूं दुःख करूं नकोस. एवढ्या तेवढ्यासाठीं अश्रु गाळीत बसणें बरें नव्हे. ते पुरुष आहेत. ते स्वतःचा कसाही सांभाळ करतील; पण तूं आपल्याकडे पहा. खुदानें तुला सगळ्या जगाचें सौंदर्य अर्पण केलें असल्यामुळें पदोपदीं तुझ्यावर संकटें येण्याचा संभव आहे. अजूनपर्यंत [illegible]

बड्या गृहस्थाच्या छत्राखालीं असल्यामुळें तुला जगाचे आघात सहन करण्याचा प्रसंग आला नाहीं; पण आतां तूं इतरांची काळजी करण्यापूर्वी स्वत:ची काळजी घेतली पाहिजे. माझा बाप कडक स्वभावाचा आहे तेव्हां तुला इतरांपासून फारसा त्रास होणार नाहीं; पण माझ्या भावासमोर तूं उघड्या चेहेऱ्यानें कधींहि बाहेर येऊं नको. निरुद्योगी माणसें सैतानाचे गुलाम असतात. तो जरी मूर्ख आहे आणि कामकाजासाठीं सारा दिवस बाहेर भटकत असतो तरी तूं जपून वाग. तुझें सौंदर्य फार घातक आहे. तें दुसऱ्याला आणि तुला दोघांनाही संकटांत लोटील. मी तुला त्यांच्या हातून सोडविल्यामुळें माझ्यावर त्यांची फार कडक नजर राहील; तेव्हां मला इकडे वारंवार येतां येणार नाहीं. तूं जपून वाग. एकटी बाहेर जाऊं नको."

अशा तऱ्हेचा आणखीं बराच उपदेश करून ताकितबिबी त्याच पावलीं मागें फिरली; कारण ती तेथें राहिली असती तर उमरशेख तिच्या पाठोपाठ तेथें आला असता आणि मग तिचें कांहीं न चालतां दालियेवर येऊं नये तोहि प्रसंग येता; पण तिच्या निघून जाण्यानें उमरशेख दलियेच्या बाबतींत अज्ञच राहिला.

ताकितबिबी निघून गेल्यानंतर दलिया बिछान्यावर पडून विचार करूं लागली. कारण त्या अपरिचित ठिकाणीं तिला झोंप येणें शक्यच नव्हतें. ती मनांत म्हणाली," खुदा ! तूं माझ्या नशिबांत आणखी काय काय लिहिलं आहेस ! स्वत:चें संरक्षण करण्यांतच माझें आयुष्य संपणारसें वाटतें ! मला दुसऱ्यासाठीं कांहींच का करतां येणार नाहीं ? निराधाराचे आधार प्रभुराज इब्राहीमसाहेब, मला पुन: भेटतील का ? त्यांचा प्रफुल्लित चेहेरा पहावा आणि त्यांची सेवाचाकरी करून प्रभूचे गुणानुवाद गात स्वस्थ राहावें असें मला वाटतें; पण तेवढेंहि माझ्या नशिबीं लिहिलेलें नाहीं काय ? मला ते केव्हां भेटतील बरें ? पण मी येथें आहे हें त्यांना कसें समजावें ? " दलिया थोडा वेळ थांबली; पण विचारांना विश्रांती कुठची ! तिच्या विचारांनीं आतां निराळीच दिशा धरली होती. ती म्हणाली," मला त्या संकटांतून सोडविण्यांत या ताकितबिबीचा तर कांहीं हेतु नसेलना ? छे. छे. त्या माउलीबद्दल असली शंकाच घेणें योग्य नाहीं. शिवाय मला कांहीं इथें कायमचें राहावयाचें नाहीं. थोडे दिवस राहायचें आहे, तेव्हां तेवढं सावधपणानं राहिलं म्हणजे झालं. "

❀ ❀ ❀

दलियेला अगदींच उघडें वाटूं नये म्हणून ताकितबिबी दोन दिवस माहेरीं राहून आपल्या घरीं निघून गेली. तेथें उमरशेखचा आणि तिचा बराच झगडा झाला; पण दोघेंहि सारख्याच वृत्तीचीं असल्यामुळें एकमेकांत जरी अबोला होता तरी त्यामुळें दैनंदिन व्यवहाराला कांहीं अडथळा आला नाहीं. जुल्सला मात्र बराच मार बसला आणि तो बिचाऱ्यानें कांहीं चांगल्या माणसांच्या कल्याणासाठीं निमूटपणानें सहनही केला.

ताकितबिबीच्या माहेरीं दलियेला कांहीं फारसा त्रास पडत नव्हता. ताकितचा आडदांड भाऊ आपल्या कामधंद्यासाठीं सकाळींच उठून बाहेर जात असे घरांत म्हातारा आणि म्हातारी स्वयंपाकीण यांवाचून कोणीही नसे. त्यामुळें दलिया बरीचशी निश्चिंतपणानें घरांत वापरत असे. घरांतील कामकाज म्हातारीच करीत असे; पण दलिया आल्यापासून तिला थोडा-थोडा विसावा मिळूं लागला. आणि त्यामुळें ती म्हातारीही दलियेवर ममता करूं लागली. दलिया ही तिला आपल्या मुलीसारखीच वाटूं लागली म्हटलें तरी चालेल.

ताकितच्या म्हाताऱ्या बापाचें जेवणखाण व औषधपाणी दलियाच करी. तिला त्या म्हाताऱ्यापुढें जायला कसलाच संकोच वाटत नसे. तिच्या हातचें जेवण म्हाताऱ्याला फारच पसंत पडत असे. तो मोकळ्या मनानें तिची प्रशंसा करून म्हणे, “ दलिये, तुझें पुढें खरोखरच कल्याण होईल ! खुदा तुला सुखांत ठेवो. माझा मुलगा थोडेंसें मिळवतो खरें; पण घरांत फारसें देत नाहीं. दोस्त मंडळींत बसून दारू पिण्यांतच त्याला मौज वाटते. ताकित तर सासरीं राहते; माझ्याकडे कोण पहाणार ! तेव्हां दलिये, अशा या बिकट प्रसंगांत माझी तूं जी ही सेवाचाकरी करीत आहेस ती खात्रीनें तुला फलद्रूप होईल. लवकरच तूं सुखी होऊन आनंदांत राहाशील असा माझा तुला पूर्ण आशिर्वाद आहे. ”

म्हाताऱ्यानें केलेली आपली ही प्रशंसा ऐकून दलियेचे गाल आरक्त होत. तिला आपली स्तुती आवडत नसे; पण या म्हातारजीला ती कशी गप्प बसविणार ! तिला तें ऐकून घ्यावें लागे. दलियेसारखी गोड मुलगी आपल्याला सून असावी असेंहि म्हाताऱ्याला वाटल्यावांचून राहिलें नाहीं; पण आपल्या मुलाकडे पहातांच त्याची ती आशा नाहींशीच होई.

असो. अशा रीतीनें दलियेचे दिवस चालले होते. ती केव्हां केव्हां मनांत म्हणे, " त्या बागेंतील एकांतवासापेक्षां ही गरिबीची पण स्वतंत्र जागा किती तरी बरी ! या दरिद्री ह्मातान्याच्या संगतींत माझा काळ बरा लोटत आहे. दुःख असलें तरी भीति नाहीं, हाच आनंद..." दलिया अशा प्रकारें मनाची समजूत करीत होती; पण विश्रांतीसाठीं म्हणून बसलेल्या दगडाखालींच खवळलेला भुजंग आपणाला दंश करूं पहात आहे हें तिला माहीत नव्हतें. पण होणाऱ्या गोष्टीला कोण काय करणार ?

हिकमतला एक दिवस घरीं राहण्याची लहर आली व आपण आजारी आहें असे सांगून त्यानें एका दिवसाची रजा घेऊन घरीं ठाणें दिलें. दलिया रोजच्याप्रमाणें घरकाम करीतच होती. हिकमतसमोर उघड्या चेहेऱ्यानें फिरायला तिला थोडासा संकोच वाटल्यामुळें तिनें डोकीवर पदर घेतला होता. बुरखा घेऊन काम करणें शक्य नव्हतें त्यामुळें तिला बुरखा घेतां आला नाहीं. हिकमतला जेवणवगैरे वाढतांना ती तशाच पोषाखानें त्याच्या समोर आली. हिकमतनें सहज म्हणून तिच्याकडे पाहिलें. यावेळीं तिचें संपूर्ण लावण्य जरी त्याच्या नजरेला पडलें नाहीं तरी हिचें सौंदर्य अप्रतीम असून आपण आजपर्यंत हिच्याकडे पाहिलें नाहीं हा अगदीं आपला मोठा मूर्खपणा झाला असें त्याला वाटल्यावांचून राहिलें नाहीं.

दलियेच्या सौंदर्यतेजानें हिकमत दिपून गेला. आणि तिच्याबरोबर बोलण्यासाठीं तो अगदीं उत्सुक झाला; पण बराच वेळपर्यंत त्याला काय बोलावें हें सुचेना. शेवटीं त्यांच्या स्वयंपाकाची प्रशंसा केल्यास बायकांना विशेषतः दासीवर्गाला फार आनंद होतो असें त्याला आठवलें आणि तो अधीरतेनें म्हणाला, " दलियाबिबि ! तुम्हीं जशा स्वरूपानें सुंदर आहां तसे तुमचे गुणही अनुपम आहेत ! आजच्या पदार्थासारखे रुचकर पदार्थ तर मी जन्मांतही खाल्लयाचें मला आठवत नाहीं. नाहींतर ही आहे थेरडी; एक तरी जिन्नस कधीं चांगला करील तर शपथ ! "

हिकमतला वाटलें आपल्या या प्रशंसेनें दलिया खूष होऊन आपल्यासमोरच उघड्या चेहेऱ्यानें बसेल. आणि सामान्य परिजनाप्रमाणें मोर लांबलचक गोष्टी सांगूं लागेल; पण तसा कांहीं त्याला अनुभव आला नाहीं. दलिया ही कोणत्या प्रकारची स्त्री आहे हें त्याला काय माहीत ?

कदाचित् दलिया लाजून आपणाशीं बोलत नसेल असें वाटून तो विशेषच आपलेपणा दाखविण्याच्या हेतूनें म्हणाला, " दलिये, माझ्यासमोर कांहीं लाजावयाला नको. माझ्या बहिणीला जर तूं आई म्हणालीस तर तूं आपल्याच कुटुंबांतली झालीस! मग माझ्याशीं बोलण्याला इतका संकोच कां बरें! मी कांहीं कोणी परका नाहीं. तुझा मामाच आहे. छ. इतका लाजवटपणा बरा नव्हे. "

मूर्ख मानलेल्या हिकमतला केवळ आपल्या दर्शनानेंच इतकें ज्ञान झालेलें पाहून दलियेला विधात्याच्या कर्तृत्वशक्तीबद्दल हसूं आलें. ती मनांत म्हणाली, " या अविचारी दांडगटाला एकाहि शब्दानें प्रोत्साहन देणें बरें नाहीं; पण त्याच्या प्रश्नाला कांहीं तरी उत्तर दिल्यावांचून मुकाट्यानें जाणें हेंहि योग्य दिसणार नाहीं. अर्थात् कांहीं तरी उत्तर देणें भाग आहे, असा मनाशीं विचार करून ती म्हणाली, " माझी योग्यता ती कसली आणि लाजायचं कोणाला! तरी पण दासी कुणबिणींनीं मोठ्या माणसासमोर बोलणें बरें नाहीं. त्यामुळें मोठ्या माणसांना एक प्रकारचा कमीपणा वाटतो. माझ्या कामाबद्दल तुम्हांला संतोष वाटतो इतकेंच पुरें आहे. सेव्यसेवकभाव विसरून वागणें बरें नाहीं. "

हिकमत खूष झाला. ' मी वीणेचा मधुर झंकार तर ऐकला नाहीं ना! ' असेंहि तो मनाशीं म्हणाला. जर या वेळीं तो आपल्या दोस्त मंडळींत असता तर ' हाय! हाय! मारडाला परीनें ' असेंच बोलला असता. बायकांचें बोलणें इतकें मधुर असतें हें त्याला अद्याप माहीत नव्हतें तो त्या वीणाविनिन्दित स्वरानें अगदीं वेडा झाला. हा वीणानिनाद आणखी एकवार ऐकावा म्हणून तो म्हणाला, " दलिये, तुला दासी कुणी केलें! तूं दासीपणाला योग्य नाहींस. तुला कोणी तरी शहाजादीच म्हणेल. तुझ्यासारखी सौंदर्यलतिका निर्माण करणाऱ्या त्या खुदाला हजारों धन्यवाद दिले तरी ते थोडेच आहेत. तुझे गुण, रूप, आणि भाषण हीं दासीजनाला योग्य नाहींत. तूं सर्वांत श्रेष्ठ आहेस.—"

हिकमतला आज वाचा फुटली होती. तो सारखा बोलूं लागला. त्याचें जेवण जेथल्यातेथेंच राहिलें. हातांत घेतलेला पदार्थ तोंडांत घालण्याचीहि त्याला शुद्धी राहिली नाहीं. तो अगदीं वाहावतच चालला. दलिया आपणाशीं

तो समज चुकीचा ठरला. त्याचें अनावर बोलणें ऐकतांच ' आतां इथें उभें राहणें योग्य नाहीं. ' असें मनाशीं ठरवून ती चटकन तेथून निघून गेली. हिकमतला तरी मग जेवण कसचें सुचतें ? तो तसाच उठला आणि या बाबतींत पुढें काय करावें त्याचा विचार करूं लागला.

संध्याकाळ होत आली तरी तो बाहेर पडला नाहीं. कारण कोणत्याना-कोणत्या तरी कारणानें दलिया आपल्याकडे येईल आणि तिचें दिव्य लावण्य आपल्याला डोळेभर पहावयाला मिळेल असें त्याला वाटत होतें. पण सगळ्या दिवसांत तसा योग आला नाहीं. तिच्या खोलींत जाण्याची कांहीं त्याला छाती नव्हती. तो बापाला फारच भीत असे. तरी पण त्याचें अंत:-करण वासनानलानें दग्ध होऊं लागलें. त्याचे अंत:करणांत प्रतिबिंबित झालेली स्वरूपाची ठिणगी त्याला स्वस्थ बसूं देईना. तो नसत्या कामाग्नीच्या ज्वालेंत सांपडून पतंगाप्रमाणें तडफडूं लागला. ती पुन्हा नजरेला पडावी म्हणून त्यानें फार प्रयत्न केला. पण त्याची ती मनीषा तृप्त झाली नाहीं. तो जसजसा विचार करूं लागे तसतशी त्याची वासना वाढत जाई. त्याला अगदीं नुसती तळमळ लागून राहिली होती. शेवटीं काळोख पडण्याच्या सुमारास तो घरांतून बाहेर पडला. आणि मोठ्या खटपटीनें उंची मद्याची एक बाटली विकत घेऊन दरवाजा बंद होण्यापूर्वी तो घरीं आला. आपल्या सैतानी विचारांना मद्याची सोबत त्याला योग्य वाटली.

हिकमतची ती स्थिति पाहून दयाळू अन्त:करणाच्या दलियेला फार वाईट वाटलें. व आपणाला सौंदर्यवती स्त्रीच्या जन्माला घातल्याबद्दल ती परमेश्वराला दूषणहि देऊं लागली आपल्या या सौंदर्यामुळें जगांत आणखी काय काय अनर्थ होणार आहेत कुणाला माहीत, असेंहि ती मनाशीं म्हणाली. तिच्यानें ती हिकमतची तळमळ पहावत नव्हती. पण भीतिहि वाटत होती. एका गरीब आणि चालत्या कुटुंबांत अस्वस्थता पसरविण्याला आपण कारण झाल्यें याबद्दल तिला वाईट वाटत होतें आणि एका निराधार कुमारिकेसंबंधानें भलभलतेच विचार करीत बसण्याच्या या पुरुषीसंवयीचा तिला तिटकाराही येत होता. हिकमतचें रात्रीचें जेवण वाढण्यासाठींहि ती खोलीच्या बाहेर आली नांहीं आणि स्वत:हि जेवली नाहीं. ' आतां

आपणावर काय प्रसंग येतो कुणाला माहीत,' अशी तिला भीति वाटत होती

---

# प्रकरण २९ वें



## शांततेच्या काळांतील राजकारण.

इब्राहीमची अस्वस्थता वाढत चालली आणि आतां आपण पुढें काय करावें हें त्याला समजेना. शहाजादीचा शोध लावण्यासाठीं तर तो उतावळा झाला होता. पण एकवार दलियेला पाहिल्यावांचून तसबिरीबद्दलचा आपला संशय त्याच्यानें उवड करवत नव्हता; दलियेची भेट घ्यावयाची ह्मणजे आधीं तिला दास्यत्वांतून मुक्त केलें पाहिजे होतें आणि तशी तिला मुक्त करावयाची ह्मणजे पैशांची जरूरी होती.

बराच विचार केल्यावर प्रथम आपला मित्र इसाक याच्या घरीं आपण जावें आणि त्याच्यामार्फत पैशाची तजवीज करावी व नंतर मुबारकामार्फत दलियेचा समाचार घ्यावा. तत्पूर्वी तिला भेटणें योग्य नाहीं व शक्यही नाहीं. असें ठरवून इब्राहीमनें शहासरीफचा निरोप घेतला आणि तो इसाकला भेटण्यासाठीं फत्तेपूरला आला. आज तरी आपला मित्र आपणाला भेटतो कीं नाहीं याचा त्याला संशयच वाटत होता. कारण राजकारणांत मन घातलेल्या मनुष्याला शांतपणा मिळणें फारच कठिण काम असतें.

शिकंदर लोदीची कारकीर्द चालू झाल्यावर प्रथम बरेच दंगेधोपे झाले आणि बंडेंहि झालीं; पण त्यानें आपल्या हुषारीनें तीं सगळीं थोड्याच वेळांत आणि प्रचंड धडाडीनें मोडून टाकल्यावर प्रजाजनाला जी त्याची एक प्रकारची भीति बसली ती कायमचीच. कुणीही फारसें वर डोकें केलें नाहीं. त्यामुळें राजालाही बराच स्वस्थपणा मिळाला व राज्यांत सुधारणा करण्यालाहि त्यानें सुरवात केली.

पण नेहेमीं पळापळ असली, हातांत घेतलेला घांस तोंडांत कसा पडतो ही काळजी असली आणि अत्याचारानें पीडल्यामुळें शांततेसाठीं जीव तळमळत असला म्हणजे 'कधीं एकदां हा धुमाकूळ आटपेल आणि

सुखाचा घांस खाऊन स्वस्थ पडूं ' असें प्रत्येक मनुष्य म्हणत असतो; पण तीच त्याची इच्छा पूर्ण झाली कीं मग त्याला निरनिराळे ढंग सुचूं लागतात.

शिकंदर लोदी बादशहा असतांना कुणाला कसलीच काळजी नव्हती; पण आतां बरीच स्वस्थता मिळत असल्यामुळें राजाच्या वर्तनावर आणि त्यानें केलेल्या कायद्यांवर आतां लोकांनीं टीका करायला सुरवात केली होती. पैशाला मोटेपणा मिळाला होता. लहान मोठे अधिकारी स्वतःलाच राजा म्हणवून घेत होते. न्याय करण्यासाठीं नेमलेले धर्मावतार तर मन मानेल तसा न्याय करीत होते. लोकही आपसांत नसतीं कुलंगडीं उपस्थित करून कायद्याचा कीस काढण्यांत भूषण मानीत होते. एवढ्या तेवढ्या कारणा-साठीं शेजाऱ्या पाजाऱ्याशीं झुंजून पैशाच्या जोरावर आपल्यासारखा न्याय करून घेण्याची श्रीमंतांला खोड लागली होती. राजानें नेमलेल्या अधि-काऱ्यांवर पूर्ण विश्वास टाकल्यामुळें ते भलतींच काररथानें करून लोकांना त्रास देत होते व स्वतःला न समजतां राजाबद्दल असंतोष पसरवीत होते. आपला तांळिराम गार करण्यापलीकडे त्यांची मजल जात नव्हती. शस्त्रें गंजून गेलीं होतीं, कोठारांतील दारू थंडावली होती, आणि सैन्याची शिस्त नाहींशी होऊन पराक्रमी शिपाई आळशी बनले होते.

इसाकसारखे बादशहाचे कांहीं हितचिंतक लोक होते, त्यांनीं बादश-हाला खऱ्या व चालू परिस्थितीची जाणीव करून दिल्यामुळें त्यानें आपले डोळे उघडून सभोंवार पाहिलें तों शत्रु कोणी नसून आपण नेमलेले अधि-कारी लोकच कांहीं तरी कट करून लोकांत भलताच असंतोष पसरवि-ण्याची खटपट करीत असुन आपला नातेवाईक जमालखान हा या भयंकर कटाच्या मुळाशीं आहे, असें त्याला आढळून आलें. लागलीच त्याला खऱ्या परिस्थितीचीहि जाणीव झाली. आणि त्यानें प्रत्येक अधिकाऱ्याची पहाणी सुरू केली. इसाकला त्यानें गुप्त माहिती मिळविणारा हेर निवडलें व त्यानें गुप्तपणानें कशी कामगिरी चालविली होती हें मागील एका प्रकरणावरून वाचकांच्या लक्षांत आलेंच असेल. धर्मावतार खुदादादच्या बाबतींतही त्यानें बराच पुरावा गोळा केला होता. एकंदरींत इसाक स्वस्थ बसला नव्हता, आणि त्यामुळेंच इब्राहीमसारख्या आपल्या दोस्ताकडेहि त्याला

लक्ष देतां आलें नाहीं. नाहींतर त्याची इतकी शोचनीय स्थिति त्यानें कधींहि येऊं दिली नसती. असो.

आज इसाक घरींच असल्यामुळें इब्राहीमची खेप व्यर्थ गेली नाहीं. मित्रानें मित्राचें योग्य तें स्वागत केलें आणि जेवणखाण आटोपल्यावर दोघेही बागेंत जाऊन बोलत बसले. दोघांनाहि बरेंचसें बोलायचें होतें. आणि दोघांनाही एकमेकांची हकीगत समजण्याबद्दल विलक्षण उत्सुकता उत्पन्न झाली होती. औपचारिक प्रश्नोत्तरें झाल्यावर इब्राहीमनेंच प्रथम सुरवात केली. तो म्हणाला, " जंगलांत रात्रीच्या वेळीं तूं अकस्मात् कसा आलास आणि एकट्यानें सर्वांचा पराभव कसा केलास तें मला समजेल का ? बादशहाच्या जनानखान्यांतही हात पोंचविणारा असा त्याचा कोण शत्रु आहे बरें ? "

इसाक शूर होता, धाडसी होता; पण स्वतःची प्रशंसा त्याला ऐकायला नको होती आणि सांगायलाहि नको होती; पण या प्रसंगीं वेळच तशी आल्यामुळें त्याला त्या बाबतींत बोलावें लागलें. " अल्लादीन लोदीला वेडसर ठरवून बदौनीला तख्तावर बसविल्यानंतर त्यानें आपण होऊनच हें राज्य शिकंदरच्या स्वाधीन केलें हें तुला ठाऊक असेलच. अल्लादीनचा पुतण्या जमालखान नांवाचा असून त्याला पंजाबांत सुभेदारी दिलेली होती; पण त्याला जास्त अधिकाराची हांव उत्पन्न होऊन त्यानें मुख्य मुख्य शहरीं बादशहाच्या इमानी नोकरांना लांचलुचपतीनें वश करण्याचा सपाटा सुरू केला. आणि या प्रयत्नांत त्याला यशही आलें. अजमीरचे धर्मावतार काजी यांचेंहि नांव या राजद्रोही लोकांच्या यादींत आहेच. माझ्यावरही हा लांचाचा प्रयोग झाला तेव्हां माझे डोळे उघडले व माझ्यासारखेच जे इतर होते त्यांनाही मी सावध करून ताबडतोब बादशहाला वर्दी दिली. पुढें बादशहानें मलाच या कामांत विशेष अधिकार देऊन गुप्त हेर नेमिलें. शहाजादी गुलबहारचा स्वभाव कांहींसा चंचल असून ती नसत्या भानगडींत पडते व आपला थोरपणा मिरविण्यासाठीं बादशहाला भलताच सल्ला देते अशी मला कुणकुण समजल्यामुळें मी तिच्यावर देखरेख ठेविली तोंच जमालखानाचा आणि तिचा माझ्या विरुद्ध झालेला पत्रव्यवहार मला सांपडला. तेव्हां या अल्लड शहाजादीस एकदां खरा प्रकार दाखविलाच पाहिजे असा विचार करून मी त्या तपासांत होतों तोंच जमालखानानें

माझ्या नांवचें पत्र लिहून तिला बोलविल्याचें व जंगलांतील एका बिकट ठिकाणीं तिला पकडण्याचें निश्चित केल्याचें मला समजलें आणि मी तिला खरा प्रकार समजाऊन दिला; पण त्या हट्टी शहाजादीची समजूत पटेना व त्यामुळें तिला त्या रात्रीं एका भयंकर प्रसंगांत सांपडावें लागलें. जमाल-खानाचाही पुरा मोड झाला; पण तो पुन्हां उचल केल्यावांचून राहणारा नाहीं. तरी पण आतां जनानखान्यांतून त्याला बादशहाच्या सिंहासनाखालीं सुरुंग लावतां येणार नाहीं. बरें; पण इब्राहीम, तुझे रंगविलास सगळे संपले का ? कीं अजून कांहीं हौस राहिली आहे ? मला नुकतीच तुझ्या-कडची सगळी हकीगत समजली म्हणा; पण तुझ्या तोंडून एकदां ती ऐक-ण्याची इच्छा आहे. " इसाक हंसत हंसत ह्मणाला.

इब्राहीम खजील होऊन कांहीं वेळ स्तब्ध राहिला आणि नंतर म्हणाला, " मला आतां लाजविण्यांत काय अर्थ आहे इसाक ! झालें तें हो-ऊन गेलें. तो काळ आतां पुन्हां येणार नाहीं. मी बाडवडिलांचें नांव धुळीला मिळविलें ! आतां बोलून काय उपयोग ! तुझ्या म्हणण्याप्रमाणें वागलों असतों तर अशी दशा कां झाली असती ? असो. जाऊं द्या. तुझ्या दिवा-णजीकडे दिलेल्या जवाहिराचें काय झालें ? "

झाल्या गेल्या गोष्टींबद्दल तुला जर असा पश्चात्ताप झाला असेल तर मी तरी त्या बाबतींत कशाला बोलूं ! तुला दु:ख झालें ह्मणजे मला कांहीं आनंद होणार नाहीं; पण तूं एकंदरींत भाग्यवान खरा; कारण इतकी जरी तुझी हीनदशा झाली तरी बापानें तुला हात दिला. तुझ्या वडिलांचा दूर-दर्शीपणा तुला सहाय्य झाला हें खरें. कारण त्या तुझ्या जवाहिराची किंमत सुमारें दोन लाख रुपये होत आहे.

इब्राहिमलाही आश्चर्य वाटलें. त्या जवाहिराची इतकी मोठी किंमत असेल असें त्याला कधीं वाटलेंहि नव्हतें तो म्हणाला, " तूं तर मला आश्चर्यच सांगत आहेस ! ही किंमत कुणी केली ? "

बादशहाचा मुख्य खजीणदार आलीन हा माझा दोस्त आहे आणि तोच हें जवाहीर तेवढ्या किंमतीला घ्यायला तयार झाला आहे विकतोस का ? "

ठेवून तरी काय करायचें आहे ? शिवाय मला पैशाची गरज आहे हें तूं जाणतच आहेस ! "

" पैशाची गरज आहे हें खरें असलें तरी असली मोठी वस्तु पहिल्याच सौद्याला ओपून टाकणें बरें नाहीं. याचा सौदा वाढण्याचा संभव आहे. शिवाय आज तुला गरज असेल तर मी पन्नास हजार रुपये तुला आतांहि देऊं शकेन. कारण माझ्या वडलांचा आणि तुझ्या वडलांचा व्यवहार असून त्यांनींच माझ्या वडलांना व्यापारांत वर चढविलें होतें. प्रथम पन्नास हजारांचें भांडवल दिलें तें तुझ्या वडलांनींच कारण तसा उल्लेख असलेलें तुझ्या वडलांच्या हातचें एक पत्र माझ्याजवळ आहे. " असें म्हणून इसाक घरांत गेला आणि त्यानें एक जुनें पत्र आणून इब्राहीमच्या हातांत दिलें. इब्राहीमला आपल्याला मित्राच्या सच्चेपणाची खात्री होतीच; पण तें पत्र पाहून इसाकबद्दल त्याच्या हृदयांत फारच पूज्यबुद्धि उत्पन्न झाली. व असा मित्र आपणाला लाभल्या-बद्दल मनांतल्या मनांत तो ईश्वराचे आभार मानूं लागला. कांहीं वेळ अशा स्तब्धावस्थेंत गेल्यानंतर तो इसाकला ह्मणाला, " मित्रा मला तूं कल्पनातीत चकित केलें आहेस. तुझे कसे आभार मानावे तेंच मला समजत नाहीं.

" इब्राहीम हेच शब्द तूं आपल्या दोस्त मंडळींत मिळून ज्या वेळीं राजरंग उडवीत होतास त्यावेळीं बोलला असतास तर मला धन्यता वाटली असती! पण माझा उपदेश त्यावेळीं धुडकावून लाविलास. इब्राहीम आतां असले हे शब्द वापरण्यांत काय अर्थ आहे? इसाकनें गंभीरपणानें उत्तर दिलें.

इब्राहीमलाही त्याचे ते शब्द लागले. त्यानें एक दीर्घ सुस्कारा सोडला आणि तो व्यथित स्वरानें म्हणाला, पातिप्रेमपरायण पत्नी आणि निःस्वार्थी मित्र या दोन वस्तु फारच दुर्लभ असतात. ज्याला त्या मिळाल्या तो खरें-खरच धन्य होय. पहिल्या गोष्टीबद्दलचें भाग्य मला लाभलें नाहीं. आणि पुढें मला लाभेल कीं, नाहीं. हें सांगतां येत नाहीं. पण दुसरी गोष्ट मात्र मी मिळविली. मला ती फार वर्षांपूर्वींच मिळाली होती. पण माझ्या मूर्खपणामुळें मला ओळखतां आली नाहीं. इसाक जगांत दुर्लभ असा तूं माझा खरा मित्र होय. आतां मला तूं हिणवूं नकोस.' असें म्हणून इब्राहीमनें आपल्या मित्राचे हात धरले व आपणाला आत[illegible] लहर आली आणि त्या वेळीं हें जवाहीर कसें [illegible] तें त्यानें [illegible] हृदयद्रावक भाषेनें त्याला सांगितलें. इसाकलाही [illegible]

वाईट वाटलें. तो त्याला आपल्याजवळ घेऊन सद्गदीतपणानें म्हणाला, " इब्राहीम! झाल्या गेल्या गोष्टींची आठवण काढून वाईट वाटून घेण्यांत आतां कांहीं अर्थ नाहीं. तुला आतां नवा जन्म मिळाला आहे असेंच तूं समज. मागचें सगळें विसरून जा. तावून सुलाखून निघालेलें सोनें उत्तम असतें, हें विसरूं नको. आतां तूं निष्कलंक झालास तूं आतां कोणत्याहि प्रकारची काळजी करूं नकोस. तूं आतां कर्जबाजारी नाहींस. तुझा कोणीहि अपमान करूं शकणार नाहीं. तूं आतां कोणत्याही कार्याला धडाधडीनें सुरुवात कर. तूं आज तीन चार लाख रुपयांचा मालक आहेस. तूं येथें राहा वाटेल तर आपल्या घरीं जाऊन पूर्वीसारखा थाटांत राहा; मात्र मित्रांची पारख चांगली कर; निरुद्योगी लोकांना तूं मुळींच जवळ करूं नकोस. ' महात्मा अबूअयूबचा मुलगा कधींहि दरिद्री राहणार नाहीं. असें लोकानीं म्हटलेलें तूं ऐकशील.

आपल्या मित्राचें बोलणें ऐकून इब्राहीमच्या देहांत नव जीवनाचा संचार झाला. त्याला विलक्षण उत्साह वाटूं लागला. तो म्हणाला, 'मला आतां अजमीरला जावेंसें वाटत नाहीं. तिथें गेल्यानें त्या पूर्वीच्या सगळ्या आठवणी मला त्रास देऊं लागतील. जी उज्वलदीपिका माझ्या कराला शोभवीत होती, तीहि आज तेथें नाहीं. तिच्या एकट्याच्या अभावामुळेंच मला सगळें जग ओस झालें आहे. तिनें माझ्यासाठीं जो भयंकर आत्मत्याग केला आहे तो मला स्वस्थ बसूं देत नाहीं.

इब्राहीमच्या बऱ्याचशा गोष्टी इसाकला समजल्या होत्या. तो कांहीं वेळ थांबून इब्राहीमची उद्विग्नता दूर करण्याच्या हेतूनें म्हणाला, " इब्राहीम! तूं माझ्यापासून आतां कोणतीही गोष्ट लपवूं नको. खरें सांग. दलियेवर तूं खरोखरच प्रेम करीत आहेस का ? "

" प्रेम करणें म्हणजे काय हें कांहीं मला चांगलेंसें माहीत नाहीं; पण ती घरांत असली म्हणजे मला आनंद होतो. मधुर–तान–लय–युक्त संगीत एकदम थांबल्यानें ऐकणारा ज्याप्रमाणें उद्विग्न होतो व त्याला कांहीं सुचत नाहीं त्याप्रमाणें तिला क्षणभर पाहिलें नाहीं कीं माझी स्थिति होते. तिचें बोलणें वीणेच्या झंकाराप्रमाणें आहे असें मला वाटतें. तिचें सौंदर्य निरुपमेय असल्यामुळें जगांत तिच्यावांचून दुसरी प्रेक्षणीय वस्तुच नाहीं अशी माझी खात्री आहे. तिच्या अप्रतीम गुणांनीं आणि सौंदर्यानें

मीं अगदीं मोहीत होऊन गेलों आहें. माझें तिच्यावर प्रेम आहे कीं नाहीं हें माझ्यानें सांगवत नाहीं; पण मी तिचा उपासक आहें; ती माझी देवता आहे. तिचा आत्मत्याग, हृदयाचें मार्दव, प्रेमळपणा आणि निष्ठा सगळें कांहीं अवर्णनीय आहे. आपल्या मालकाची अब्रू वांचविण्यासाठीं कोणत्या नोकरानें कधीं आत्मविक्रय करून घेतला आहे मला सांग पाहूं !

" मी समजलों. तुझ्या अन्तःकरणाला काय वाटत आहे तें मी समजलों; पण उमरशेखकडून तिच्या विक्रीचे जे दहा हजार रुपये आले ते कुठें आहेत? "

यावर इब्राहीम तिरस्कारानें म्हणाला, " त्या पैशांची मला जरूर नसल्यामुळें मी त्यासंबंधानें कांहींच बातमी मिळविली नाहीं. त्या गोष्टीची चर्चा करणेंहि मला दुःखास्पद वाटतें."

" तुला कांहीं कां वाटेना; पण मी त्याची खबर ठेविली आहे. मुबारकानें तो सगळा पैसा माझ्या पेढीवर आणून तुझ्या नांवानें जमा केला आहे; पण तुला वाईट वाटेल म्हणून ही बातमी तुला न कळविण्याबद्दल त्यानें सांगून ठेविलें होतें. दिवाणजीनीं मला ही गोष्ट सांगीतली."

हाय! हाय! खुदानें मला दोन अपूर्व रत्नें दिलीं होतीं पण मी हतभाग्यानें त्यांना उकिरड्यावर फेंकून दिलें. दोघांनांहि मी मुकलों—" इब्राहीमला गहिंवर आला; त्याच्यानें पुढें बोलवेना.

इसाकला इब्राहीमचें तें दुःख पहावेना. तो म्हणाला, तूं आतां हें असलें अमंगळ रडणें सोडून दे. शूरासारखा शूर असून रडत बसतोस याला काय म्हणावें? कुणाला वाईट दिवस येत नाहींत? सर्वांना येतात. दालियेला पुन्हां आणण्याच्या बाबतींत तूं अगदीं निश्चिंत राहा. खुदादाद हा माझ्या हातांतील नुसतें बाहुलें बनला आहे. मी त्याला जसा नाचवीन तसा तो नाचेल. उमरशेख आपण होऊन दालियेला तुझ्या स्वाधीन करील त्याचे रुपयेहि त्याला देऊन टाकं; पण याचकवृत्तीनें नाहीं शूरपणानें दालिया तुला मिळाली म्हणजे तूं आनंदित होशील ना?"

इसाकच्या तोंडचे ते उत्साहाचे शब्द ऐकतांच इब्राहीमला अतिशय आनंद झाला आणि त्याला आलिंगन देऊन तो म्हणाला, " अहाहा ! दोस्त, माझी तूं एवढी कामगिरी केलीस म्हणजे मला एका पैशाचीहि जरूरी नाहीं. ते सगळे तीन लाख रुपये तुलाच घे. इतकेंच नव्हे तर मी

तुझा कायमचा गुलाम होऊन राहीन मी इथें असल्याबद्दल कालच मुबार-कला चिठी पाठविली आहे. तो दालियेची खबर आणीलच. तो आला म्हणजेच आपण पुढील बेत ठरवूं."

इसाक हंसत हंसत म्हणाला, "तर मग समज, दालिया येथें आली असून ती स्वतंत्र आहे. तिच्याशीं विवाह करून तूं सुखी होशील काय?"

इब्राहीमला ही कल्पना मधुर वाटली; पण तितक्यांत कसलासा संशय येऊन तो एक दीर्घ निश्वास सोडून म्हणाला, "मला ती स्वार्थी म्हणेल इसाक! तिचें माझ्यावर प्रेम आहे कीं नाहीं कुणाला माहीत! ती माझ्यावर प्रेम करते व माझ्याशीं विवाह केल्यानें तिला सुख वाटेल असें मला स्पष्टपणानें समजल्यावांचून मी मुळीं असल्या काल्पनिक आनंदाची मुळीं कल्पनाच करणार नाहीं."

इसाकला थोडासा राग आला. तो किंचित तीव्र स्वरानें म्हणाला, "मूर्ख आहेस तूं अगदीं! अरे, जिनें तुझ्यासाठीं स्वतःला विकून घेतलें ती तुझ्यावर कधीं तरी प्रेम करीत नाहीं असें होईल काय?"

"तुझ्या बोलण्याचा अर्थ मी समजलों. मी इतका मूर्ख नाहीं; पण ही तिची कृतज्ञता नसेल कशावरून? घराण्याची मानमर्यादा राखण्यासाठीं तिनें हा आत्मत्याग केला नसेल कशावरून? तिनें मलाच आत्मसमर्पण केलें आहे याचें अद्याप कोणालाहि प्रमाण मिळालेलें नाहीं. आणि तोंपर्यंत मला तशी आशाहि करतां येणार नाहीं. तिच्या मनांत नसतांना मी तिला कोणत्याही बाबतींत भीड घालूं इच्छित नाहीं. ती आधीं त्या सैतानाच्या हातांतून सुटूं दे. या बाबतींत मागाहून विचार करूं. त्या पवित्र कुमारिकेसंबंधानें नसती चर्चा करणें योग्य नाहीं. तिथे तिचे काय हाल चालले असतील कुणाला माहीत!"

"तर मग या बाबतींत बोलण्यापूर्वीं मी एकवार काजीची भेट घेऊन दालियेलाच येथें आणण्याची व्यवस्था करतों." पण दालिया कुठें आहे हें तरी इसाकला काय माहीत!

# प्रकरण ३० वें.

## इकडे तिकडे.

इसाकनें आपल्या दुःखीकष्टी मित्राची फारच चांगली व्यवस्था केली होती. राहण्यासाठीं त्याला एक स्वतंत्र खोली देण्यांत आली असून त्याच्या खास तैनातीस दोन दासी आणि गुलाम दिले होते. खोलीही चांगली शृंगारलेली होती. घरांतील सगळे नोकर चाकर इसाकप्रमाणेंच इब्राहीमचा मानमरातब ठेवण्यासाठीं जपत होते त्यामुळें आपण आपल्या घरीं नसून परक्या ठिकाणीं आहों असें त्याला मुळींच वाटलें नाहीं. उलट त्याला आपलें दुःख हलकें करण्याला अवसर मिळाल्याबद्दल आनंद वाटला.

इसाकचें अंतःकरण इब्राहीमपेक्षां फार सरळ असून त्याचें हृदय अकृत्रिम मित्रप्रेमानें अगदीं भरून गेलेलें होतें. मग आपल्या भावाप्रमाणें असणाऱ्या इब्राहीमला, आवडत्या दोस्ताला सुखी करण्यासाठीं तो थोडा तरी दिरंगाई करील काय ? आपल्या दोस्ताला कधीं एकदां कायमचा सुखी करीन असें त्याला झालें होतें. त्याच्या आनंदांत बारीक सारीक गोष्टीनेंहि व्यत्यय न येऊं देण्याबद्दल तो जपत होता. शिवाय या बाबतींत त्यानें सर्वांना ताकीदही दिलेली होती.

दिवस मावळला आणि संध्याकाळ झाली नोकरांनीं इब्राहीमच्या खोलींत सुगंधी तेलाचे स्वच्छ दिवे लावून दिवसासारखा उजेड केला. तरी पण अजूनही इब्राहीम खिडकींत उभा राहून निसर्गाची शोभा पाहातच होता. मित्राच्या साहचर्यानें व कर्जमुक्त झाल्यामुळें त्याला एक प्रकारचा विलक्षण आनंद वाटत होता. आज आपण श्रीमंत, स्वतंत्र आणि सुखी आहों असेंहि तो मनाला सांगत होता.

त्याच्या अन्धकारमय हृदयांतून अंधारराशी निघून जाऊन चंद्रिकेचा स्वच्छ प्रकाश पडला होता. आणि त्या चंद्रिकाविधौत हृदयसिंहासनावर एक ज्योतिर्मय रमणीची मूर्ति अधिष्ठित झालेली त्याच्या अन्तश्चक्षूंना दिसत [illegible]

ओळखलें असतें. इतकेंच नव्हे तर शहासुफीच्या दर्ग्यांत जी आपणाला तसबीर मिळाली त्या तसबिरींतील रमणीशीं या मूर्तीचें विलक्षण सादृश्य असल्याचेंहि त्याला कळून आलें असतें. त्याला तसा अस्पष्ट संशय येत होता; इतकेंच नव्हे तर तसा संशय आल्यामुळें उत्सुकतेनें तो, मनांतल्या मनांत—' ही माझी आवडती दलियाच, नाहींशी झालेली शहाजादी दिलबहार नसेलना ? असें म्हणालाहि; पण खात्री होईना. मन तळमळत होतें, ओठ पुटपुटत होते, आणि डोळे बारीक मोठे होत होते. भुंवयाहि एकेजागीं स्थिर राहात नव्हत्या; पण ' तीच ती ' असें कांहीं त्याला स्पष्टपणानें म्हणतां येईना.

बराच वेळपर्यंत स्वतःशींच या गोष्टीचा विचार केल्यावर तो अगदीं त्रासल्यासारखा होऊन मोठ्यानें म्हणाला, " छे, छे; हें असें असणें शक्य नाहीं. माझ्या वेड्या झालेल्या मनाचे हे ' वासनेचे खेळ ' आहेत. माझ्या वडलांनीं मला स्पष्ट सांगितलें होतें, ' एका इस्पहनी सावकाराकडून हिला—दलियेला—काश्मिरी सौदागरानें विकत घेतली आणि त्या काश्मिरी सौदागराकडून बऱ्याच मोठ्या किंमतीला आपण खरेदी केली. त्या वेळीं तर दिल्लीची शहाजादी अकस्मात् नाहींशीं झाल्याबद्दल जिकडे तिकडे मोठा गवगवा झालेला होता; मग जर हिच्या बाबतींत माझ्या वडलांना संशय आला असता तर त्यांनीं दलियेच्या बाबतींत बादशहाकडे उल्लेख केला असता ! " हाय रे विधात्या ! कसल्या भ्रांतिमय कल्पनेंत मी गर्क झालों आहें ! माझें हें सुखस्वप्न शरदृतूंतील मेघांप्रमाणें केव्हांच नाहींसें होईल ! मग असंभवनीय गोष्टीबद्दल निष्कारण मी माझ्या मस्तकाला कां बरें त्रास द्यावा ? नको. ती कल्पना नको आणि ती यातनाहि माझ्यानें सहन करवत नाहीं. माझी दलिया मला मिळाली म्हणजे झालें. ती शहाजादी नसली तरी चालेल; कारण दलियेचें शहाजादींत रूपांतर झाल्यास माझ्यासारख्या गरिबाला तिचें दर्शनही होणार नाहीं. कदाचित् एकाद्या शहाजाद्यानें तिला मागणी—छे. छे. पण ती कल्पनाच नको."

याच वेळीं इसाक त्या खोलींत आला, आणि इब्राहीम उघड्या खिडकीसमोर उभा राहून विचारांत गढून गेलेला पाहून हंसतच म्हणाला, " कां,

कसला विचार चालला आहे दोस्त ! मला वाटतें दलियेसंबंधानेंच कांहीं तरी स्वारीचे बेत चालले असावेत. कां? खरें कीं नाहीं?"

इब्राहीम खिडकीजवळून पुढें आला आणि आपल्या मित्राला गाढ आलिंगन देऊन प्रसन्न चेहऱ्यानें म्हणाला, "होय, तुझें अनुमान खरें आहे. तूंच तर मला तिच्यासंबंधाचा विचार करायला लावलेस ! आतां तर ती माझ्या हृदयांत ठाणेंच देऊन बसली आहे."

मुबारकाला योग्य वेळीं एका मनुष्यामार्फत इब्राहीमचें पत्र पोंचलें. पत्र वाचून त्याला फारच आनंद झाला कारण धन्याच्या हातचें अगत्य-पूर्वक व पुष्कळ दिवसांनीं आलेलें पत्र कोणत्या इमानी नोकराला आनंदित करणार नाहीं? त्यानें अत्यंत श्रद्धापूर्ण अन्तःकरणानें तें पत्र मस्तकावर धारण केलें. कारण इब्राहीमनें अजमीर सोडल्यापासून तो इतका सुखी कधींहि झाला नव्हता. प्रभूनें त्याला सायंकाळानंतर भेटीला बोलविलें होतें. अर्थात् तो त्या दिवशीं घरीच राहून सूर्यास्ताची वाट पाहूं लागला. त्याला केव्हां एकदां धन्याला भेटतों असें झालें होतें.

पण आनंदाचा पहिला भर ओसरतांच तो विचार करूं लागला, "मालकांनीं जर आपणाला दलियेची हकीगत विचारली तर काय सांगावें? आणि प्रथम आधीं ते तोच प्रश्न करतील. बरें अलीकडे दोन तीन दिवस जुल्फ़ कां भेटला नाहीं बरें? दलिया आजारी तर नसेल ना? किंवा सैतानी उमरनें तिला दुसरीकडे कुठें तरी नेलें नसेल ना? छे. आपण आज दोन दिवस स्वस्थ बसलों हें बरें केलें नाहीं."

हा विचार मनांत येतांच मुबारक घरांतून बाहेर पडला आणि जुल्फ़-खानाच्या तपासावर निघाला. पण जुल्फ़च्या घरीं जाणें योग्य नव्हतें व जुल्फ़नेंहि त्याला तसलें धाडस न करण्याबद्दल बजावलें होतें तेव्हां त्यानें बाजारांत उगाच इकडे तिकडे भटकणाऱ्या एका मुलाला एक पैसा देऊन म्हटलें, "छोकऱ्या, उमरशेखचा वाडा तुला माहीत असेलच. त्या ठिकाणीं जुल्फ़खान नांवाचा एक गुलाम आहे. तूं झट्कन जाऊन जर त्याला येथें बोलवून आणशील तर मी तुला एक आणा बक्षीस देईन."

मुलानें तें कबूल केलें आणि तो धांवतच गेला. मुबारक विचार करूं

लागला, " हें असें आणखी किती दिवस चालायचें! दलिया त्या सैता-नाच्या घरीं तशीच पडून राहायची काय! इब्राहीम साहेबांना मी भेटून समाधान वाटेल आणि त्यांना पाहून मलाहि आनंद होईल; पण दलियेची निष्ठुर पराधीनता लक्षांत येतांच त्या सगळ्या आनंदाचें दुःखांत पर्यव-सान झाल्यावांचून राहाणार नाहीं—"

याच वेळीं तेथें जुल्सखान येऊन पोंहोंचला. त्याला पहातांच मुबा-रकानें उत्सुकतेनें विचारलें, " काय खबर आहे? गेल्या दोनतीन दिव-सांत आमच्याकडे कां आला नाहींस! "

" येणार कसा! धन्याचा तर माझ्यावर खडा पहारा आहे. "

" कां? नवीन कांहीं प्रकार झाला वाटतें? दलिया खुशाल आहे ना?"

" ती त्याच्या हातून निसटली. ताकितबिबीच्या सहाय्यानें तिनें आपली सुटका करून घेतली आणि त्यामुळें तिला ताकितच्याच माहेरीं गुप्तपणानें राहावें लागत आहे. पण त्यामुळें माझे मात्र हाल चालले आहेत. शिवाय दलियाबिबीची खबरबात समजायलाही कांहीं साधन नाहीं. " असें म्हणून जुल्सनें—आपल्या मालकानें दलियेशीं केलेलें वर्तन व त्यामुळें ताकितबि-बीला तिची आलेली दया आणि शेवटीं ऐनवेळीं झालेलें पर्यवसान वगैरे—सगळी हकीगत मुबारकाला सांगितली. मुबारकही ती हकीगत ऐकून थक्क झाला.

कांहीं वेळ दोघेहि एकमेकांच्या तोंडाकडे पहात राहिले. नंतर मुबारक म्हणाला, " कसेंहि करून मला दलियेची भेट घेणें भाग आहे. कारण इब्राहीमसाहेबांनीं मला आपल्या भेटीला बोलविलें असल्यामुळें त्यांना तिचा समाचार सांगावाच लागेल. मग तूं तिकडे येतोस ना? " " छे छे. मला तर तिकडे मुळींच जातां येणार नाहीं. कारण मी तिकडे जातांच शेखसाहेबांची नजर तिकडे वळेल आणि मग काय अनर्थ होईल कुणाला माहीत. तूं तुर्त कांहीं गडबड करूं नको. थोडीशी शांतता झाल्यावर मागाहून पाहूं. "

जुल्सच्या सांगण्याप्रमाणें मुबारकाला वागणें भाग होतें. अर्थात् त्याला कांहीं बोलतां येईना.

---

# प्रकरण ३१ वें.



## ' आर्धीच मर्कट !....'

हिकमतखानाचें उच्छृंखल वर्तन पाहिल्यापासून दलियेला अतीशय अस्वस्थता वाटत असल्यामुळें ती कांहीं न खातां न पितां बिछान्यावर पडून तळमळत होती. तिला मुळींच झोंप येईना. गतायुष्याचा चित्रपट तिला आपल्या डोळ्यांसमोर दिसूं लागला. ती मनांत म्हणाली, " सर्व शक्तिमान प्रभो! तुझ्या राज्यांत सगळे लोक सुखी असतात; मग या अभागिनीलाच तूं कां बरें वारंवार दुःखांत लोटतोस ? माझी अमुकच एक इच्छा तृप्त कर असें तरी मी कधीं म्हटलें का? दुसऱ्यांचें दुःख पाहवत नसल्यामुळें त्यांना सुखी कर असें मात्र मी म्हटलें असेल, पण तो माझा अपराध काय? वास्तवीक आशेमुळें दुःखाची उत्पत्ती होते. महत्वाकांक्षे-मुळें पदोपदीं मनुष्याला रडावें लागतें; पण मी कसली महत्त्वाकांक्षा धरूं ! माझे आईबाप, कुळगोत तर मला कांहींच माहीत नाहीं. फार काळा-पूर्वींची एक सुखकारक आठवण मला रात्रंदिवस जागवीत असते; पण ती अगदीं अस्पष्ट! त्याचा कुठें धागा ना दोरा ! ! डोक्याला कितीहि शीण दिला तरी कांहींच निष्पन्न होत नाहीं. त्यामुळें तें एक स्वप्न असेल असेंहि मनाला वाटतें; पण स्वप्नेंहि केव्हां केव्हां खरीं होत असतात!

" ती स्वप्नाची आठवण बुझते न बुझते तोंच एक सुखमय संसाराचा सुखाचा आश्रय मिळावयाची जाणीव हृदयाला उत्तेजन देत असते. मला त्या ठिकाणीं कांहींच कमतरता नव्हती. मी म्हणजे एक विकत घेतलेली दासी ही मला तेथें आठवणही झाली नाहीं. परलोकवासी अबूअयुबनीं तर मुलीप्रमाणें माझें पालन केलें; नंतर त्यांनीं ज्यांच्याकडे मला सोंपविली होती ते एक महात्मा पुरुष असल्यामुळें मला मुळीं परकेपणाच वाटला

नाहीं. त्यांची मी कोणी तरी आहें असें माझें मन मला सांगत होतें व अजूनही सांगत आहे. मनुष्याच्या हातून नेहेमीं चुका होतच असतात, तशा माझ्याही हातून झाल्या. करून न करून मी कांहीं अपराधही केले असतील; पण त्या दिव्य पुरुषसिंहानें मला एका शब्दानेंहि दुखविलें नाहीं किंवा माझा तिरस्कार केला नाहीं. त्यांच्या स्वतःवर दुःखाचीं आणि संकटाचीं मोठमोठीं वादळें आलीं; पण माझ्या बाबतींत ते दयाळूच राहिले. स्वतःचें पाऊल स्थिर नसतां दुसऱ्याला सांवरून धरण्याचें काम मोठें कठीण असतें; पण ते त्या वेळींहि सागरासारखे गंभीर होते. त्यांनीं मला नेहमीं गोड शब्दानें 'दालिया' म्हणून हाक मारावी आणि मी तेवढ्या एका हाकेसरशीं त्रैलोक्याचें राज्य मिळाल्याचा आनंद मानून त्यांच्याजवळ जावें. काय तो आनंदाचा क्षण! त्या सुखाच्या नुसत्या आठवणीनें मला हजारों संकटांना तोंड द्यायला धैर्य येतें. मी माझें सर्वस्व त्यांनाच अर्पण केलें होतें. हिंदूलोक आपल्या देवतेच्या समाधानासाठीं स्वतःचा बळीही देतात. देवतेची सेवा करण्यांत स्वतःला विसरून जातात. मी तसेंच केलें आणि पुढेंही तसेंच करीन; पण माझ्या देवतेला मी आत्मसमर्पण केलें असतां माझी अशी ही दुर्दशा कां बरें व्हावी? दुःखाचें कारण पाप असतें; मग माझ्या हातून कांहीं पाप तरी घडलें नाहींना?

"मला आतां या जन्मीं त्यांचें दर्शनही होणार नाहीं का? नाहीं. ती आतां आशा करणें योग्य नाहीं. कारण माझा हा आयुष्यक्रम वन्यचाशा दिव्यांतून पार पडला पाहिजे. कदाचित् त्या दिव्यांतून पार पडतां पडतां मुला कबरस्तानाचाही आश्रय करावा लागेल. ते आहेत कुठें, कोणत्या स्थितींत आहेत, त्यांनीं देशांतर कां केलें, वगैरे अनेक प्रकारचे प्रश्न मीं माझ्या मनाला केले तरी त्यांचीं उत्तरें मिळणें फारच कठीण आहे. कारण मला त्यांची कांहींच बातमी समजत नाहीं. कांहीं अलौकिक प्रकारानें त्यांना पुष्कळसें द्रव्य मिळालें असून ते ऋणमुक्त झाले असल्याचें मुबारिकानें मला सांगितलें, पण आपल्या दैवाची परीक्षा

पाहण्या करितां इसाकच्या मदतीनें त्यांनीं पुन्हां मोठ्या व्यापाराला हात घातला आहे हें खरें असल काय?

" मुबारक बरेच दिवस मला भेटला नाहीं. जुल्फसखानानें सुद्धां इकडे येऊं नये का? माझ्यावर कांहीं भलताच प्रसंग आला तर इथें कुणाला मी सांगूं बरें? लोकांनीं तरी माझ्यासाठीं किती त्रास सहन करावा? मी अशीच अखेरपर्यंत परावलंबी राहाणार काय?

समुद्रावर जशा अविरत लाटा उसळत असतात तशीच मनाचीहि स्थिति असते. विचाराचें चक्र एकदां सुरू झालें कीं, त्याला विराम म्हणून कसा तो मुळींच नसतो. तें सतत फिरूं लागतें आणि मग विचारांनाहि ताळतंत्र रहात नाहीं. दलियेचीहि तशीच स्थिति झाली. पर्वतप्राय लाटा उसळणें आणि त्या दिगंताशीं जाऊन विलीन होणें यापलीकडे त्याचें कार्य कांहींच नसतें. दलियेच्या विचारांचीहि हीच गत होत चालली.

इकडे दलिया अशा प्रकारच्या निरर्थक विचारांत गढून गेली असतां तिकडे हिकमतखान मद्यपानानें आपल्या मनाला शांति आणूं पहात होता. पण मद्याच्या प्रत्येक पेल्याबरोबर त्याची लालसा कमी न होतां दुप्पट जोरानें वाढत होती. सौंदर्याच्या जाळ्यांत तडफडणारा तो निर्बुद्ध जीव स्वतःला न कळत जाळ्याची गुंतागुंत वाढवीत होता. हां हां म्हणत मद्याची बाटली खलास झाली आणि मनावर तिचा पूर्ण अम्मल बसल्या-मुळें तो विचारशून्य झाला. त्याचें मन दलियेकडे ओढ घेऊं लागलें, व मद्यानें निरंकुशता प्राप्त झाली असल्यामुळें त्याच्यानें मनाला मागें ओढवलें नाहीं. आशेचें लोभांत रूपांतर झालें. व लोभाचें पर्यवसान फजीती: हें त्याला माहीत नसल्यामुळें दलियेची भेट घेण्यासाठीं तो धांवतच निघाला. मनुष्य विचारशून्य झाला कीं तो पशु बनतो. आधींच मूर्ख असलेला हिकमत मद्यपानानें पुरा पागल बनल्यामुळें आपण काय करीत आहों याचें त्याला भान राहिलें नाहीं.

दलिया ज्या खोलींत रहात असे तिच्या बाजूलाच आणखी एक खोली होती. तींत घरची म्हातारी स्वयंपाकीण आपली जुनी फाटकी पथारी टाकून पडत असे. खोली अगदींच लहान व हवा येण्याला दुसरें कांहींच साधन नसल्यामुळें तिचा दरवाजा नेहेमीं उघडा राही. मात्र तिची झोंप फारच गाढ असल्यामुळें आंगावरून बऱ्याचशा उंदीर घुशी गेल्या तरी तिला त्याचा कांहींच पत्ता लागत नसे. तिची झोंप एखाद्या प्रेताप्रमाणें होती म्हटलें तरी चालेल.

हिकमतखानाला हें सगळें माहित असल्यामुळें तो प्रथम हळूच तिच्या खोलींत गेला. कारण तिच्या खोलींतून दलियेच्या खोलींत जायला एक लहानसा दरवाजा असून त्याला कडी नव्हती. अर्थात् स्वयंपाकिणीच्या खोलींतून अगदीं अनायासें त्या मद्यप्याला दलियेच्या खोलींत येतां आलें. कल्पनातीत सुरक्षितपणानें तो दलियेपुढें येऊन उभा राहिला.

या वेळीं खोलींत एक लहानसा दिवा तेवत असून दलिया अगदीं खुल्या चेहऱ्यानें आपल्या बिछान्यावर अस्ताव्यस्त स्थितींत पडलेली होती. दिव्याच्या उज्ज्वल प्रकाशांत तिचें अनावरित सौंदर्य विजेप्रमाणें चमकत असल्यामुळें तिच्याकडे पहातांच हिकमत अगदीं वेडा झाला.

आपल्या खोलींत कोणी तरी अपरिचित व्यक्ति आली असावी असें वाटून दलिया खडबडून उठली. पहाते तों मद्यपानानें ज्याच्या डोळ्यांवर धुंदी चढली आहे आणि ज्याचा चेहरा अनावर विषयलालसेनें लाल झालेला आहे असा हिकमत तिला समोर दिसला. त्याच्या ओंठावर पैशाचिक हास्य खेळत होतें आणि मद्याची दुर्गंधी त्या खोलींतील हवा बिघडून टाकीत होती.

दलिया भ्याली. प्रसंग फारच बिकट आहे हें ती समजून चुकली. या पशूपुढें आपलें शहाणपण आणि सामर्थ्य अगदीं निरुपयोगी ठरणार असें तिचें मन तिला सांगूं लागलें; तरी पण शेवटपर्यंत धैर्यानें प्रयत्न करावयाचा

असा निश्चय करून ती म्हणाली " हें काय साहेब ! तुम्हीं अशा स्थितींत या वेळीं येथें कां आलां ? "

दलियेच्या सौंदर्यानें वेडावलेला हिकमत अडखळत म्हणाला, " मी इथें कां आलों; हें तुला समजाविलें पाहिजे काय ? तुझ्या या स्वर्गीय सौंदर्यानें मला येथें ओढून आणलें. तुझी पायधूळ माझ्या घराला लागली हें मी माझें मोठें भाग्य समजतों. तुझ्यासारख्या रत्नानें असें काळोखांत पडून राहावें हें कुणाला बरें योग्य वाटेल ? तूं माझ्या घरीं येऊन पडावें हा विलक्षण योगायोगच नसेल कशावरून ? तेव्हां तूं कांहींहि विचार न करतां माझ्यावर दया कर आणि मला एकवार तुझ्या गुलाबी गालाचें चुंबन घेऊं दे. तुझ्या आलिंगनावांचून माझ्या हृदयांतील ज्वाला शांत होणार नाहींत. "

हिकमतचें हें बोलणें ऐकून दलिया अगदीं थिजूनच गेली. ' हें आणखी एक नवेंच संकट आपणसमोर येऊन उभें राहिलें, ' असेंच तिला वाटलें. उमरशेख कांहीं तरी बरा; त्याला ताकितबिबीची तरी भीति होती; पण हा तर पुरा सैतान आहे. याच्यापुढें आपला कसचा टिकाव लागतो ! अशी तिला भीति वाटूं लागली. शिवाय मदिरापानानें तो उन्मत्त झालेला होता. यानें अति प्रसंग केला तर माझें या अपरिचित ठिकाणीं संरक्षण तरी कोण करणार ?

दलियेच्या उज्ज्वल रूपज्योतींत हिकमतनें पतंगाप्रमाणें उडी घेण्याचें ठरविलें. कारण आपल्या अंतःकरणाची उत्कट इच्छा त्याच्यानें दाबून धरवत नव्हती. तो मनांत म्हणाला, " या वेळीं तर चोंहोकडे शांतता आहे. माझा प्रतिकार करण्याला कोणीच येणार नाहीं. बाबा आणि स्वयंपाकीण झोंपलेली आहे. अर्थात् असली ही सोन्यासारखी संधि जर मीं गमाविली तर मागाहून मला हात चोळीतच बसावें लागेल. आर्धी हिच्या आलिंगनानें अंतरात्मा शांत केलाच पाहिजे. सर्व आयुष्यांत जर मला समाधान वाटणार असेल तर आजच. ही वेळ दवडतां नये. "

असा विचार करून हिकमतखान धाडसानें पुढें सरला आणि म्हणाला, " दलिये ! आजच्या सारखी चांगली संधि आपणाला पुन्हां कधीं मिळेल कीं नाहीं कुणाला माहीत ! तेव्हां विलंब न लावतां तूं माझी हो. मी भिकारी होऊन तुझ्या दाराशीं आलों आहें, माझी निराशा करूं नको. यानंतर केव्हांही असलें धाडस करणार नाहीं. केवळ तुझ्या आलिंगनानेंच मला विलक्षण समाधान वाटणार आहे. तूं निष्ठुर होऊं नकोस. "

दलियेनें विचार केला, याला असें बोलण्यांतच गुंतवून ठेवलें पाहिजे. दैव अनुकूल असेल तर तितक्यांत कोणी ना कोणी जागें होऊन इकडे येईल व आपोआपच याचें तोंड मिटेल. नंतर ती त्याच्याकडे वळून मधुर शब्दानें म्हणाली, " साहेब ! तुम्हीं बुद्धिमान् तरुण आहां ! माझ्यासारख्या एका गुलामडीनें आपणाला काय शिकवावें बरें ? मी एक निराश्रित आणि दुर्दैवी स्त्री आहें ! आतां मी जरी दासी असलें तरी अद्याप कुमारिका आहें. माझें जीवन कलंकित झालेलें नाहीं. स्त्रियांची अब्रू ही काचेप्रमाणें असते, हें मी आपणाला सांगितलें पाहिजे असें नाहीं. शिवाय मी तुमची बहीण म्हणून या घरांत आलें. तेव्हां माझ्याशीं असलें हें निंद्य वर्तन करणें तुम्हांला शोभतें का ? तुम्ही आपलें शूरत्व असल्या निंद्य-कर्मांत कां बरें व्यर्थ घालवितां ? "

इष्कानें मस्त झालेला हिकमत या बोधानें कसचा मागें फिरतो ! तो तिच्या त्या मधुर भाषणानें अगदीं मोहित होऊन पुढें सरला आणि तिला म्हणाला, " छे, तूं अशी निष्ठुर होऊं नकोस. तूं कुमारिका असलीस तर मी तुझ्याशीं शादी करायला तयार आहें. पण आधीं एकवार मला तुझें चुंबन घेऊं दे तूं मला कांहीं सांगितलेंस तरी माझी समजूत होणार नाहीं. मी तुला आपली पत्नी करतों व कधींहि तुझ्या आज्ञेबाहेर वागणार नाहीं, असेंहि तुला वचन देतों. आमरण मी तुझी सेवा करीन. जिवापाड मेहनत करून, तुला सुखासमाधानांत रहातां येईल इतका पैसा मिळवीन. दागिने आणि कपडे यांची तर तूं मुळीं काळजीच करूं नको. ये, ये; दलिये, ये !

आतां मी इतकीं वचनें दिलीं असतांहि माझ्याबद्दल तुझ्या मनांत अविश्वास उत्पन्न व्हावा ना ? तूं कांहीं म्हण; पण मला कांहीं आतां धीर धरवत नाहीं. मी तुला आतां आलिंगन देणारच. ”

आपणाला या ठिकाणीं कोणाकडूनही अडथळा होणार नाहीं अशी खात्री असल्यामुळें हिकमत अगदीं बेफिकीरपणानें पुढें झाला. दलियेला कांहींच उपाय सुचेना तेव्हां ती मोठ्यानें ओरडून म्हणाली, “ कोणी तरी माझें संरक्षण करण्याला धांवून या ! हा सैतान एका सतीचा घात करीत आहे. ”

या आक्रांताच्या ओरडण्यानें म्हाताऱ्या स्वयंपाकिणीची झोप उडाली. इतकेंच नव्हे तर ही हांक हिकमतच्या म्हाताऱ्यालाहि ऐकूं गेली होती. दलियेचें सुदैवच यावेळीं जागृत झालें असें म्हणायला हरकत नाहीं. म्हातारी घाबऱ्या घाबऱ्या डोळे चोळीत आंत आली आणि म्हणाली, “ दलिये, तुला ओरडायला तरी काय झालं बाई ! आणि हे हिकमतसाहेब इकडे कुणीकडे ? कां ? कां साहेब ! इतक्या रात्रीं इकडे काय काम ? तुम्हाला वेड तर नाहीं लागलं ? ”

झालेल्या आकस्मिक निराशेमुळें हिकमत अगदीं चवताळून गेला. त्याला तो म्हातारीचा प्रश्न असह्य वाटला. तो दांत ओठ चावीत तिला म्हणाला, “ थेरडे, तुला आंत यायला कुणी सांगितलें ? आणि मी इथें कां आलों, हें विचारणारी तूं कोण ? जा चालती हो इथून— ”

याचवेळीं हिकमतखानाचा म्हातारा बाप तेथें आला आणि आपल्या चिरंजिवाचा रागरंग पाहून क्रोधानें थरथर कांपत म्हणाला, “ती तुला विचारणार कोणी नसेल;पण मी आहेंना? कुलांगार कारट्या, तूं इथें कां आलास? अक्कलशून्य पोर किती भयंकर असतो हें मला आज चांगलेंच कळून आलें.मी अजूनपर्यंतचे तुझे सगळे रंगढंग डोळे मिटून सहन केले; पण माझ्या सहनशीलतेचा आतां मात्र अतिरेक झाला. आपल्या आश्रयाला विश्वासानें येऊन राहिलेल्या एका कुलस्त्रीवर हात टाकायला तुला कांहींच का

वाटलें नाहीं. मूर्खा ! तूं मनुष्य आहेस कीं पशु ? मी गरीब असलों तरी समाजांत मला मान आहे. तुझे हे सैतानी खेळ पाहून लोक मला काय म्हणतील बरें ? उद्यां सकाळीं हिनें काजीकडे जाऊन फिर्याद केली तर ? अकलेच्या खंदका, मला या गांवांत तरी कोणी राहूं देईल का ? वंशाचें नांव बुडाविलेंस. या म्हातारपणीं शेवटीं माझ्या तोंडाला काळें फुसलेंस. मला डाग लागला. नीच कारटा कुठचा ! ''

हिकमत आपल्या बापाला खरोखरच भीत असे. त्या म्हातारीला त्यानें धमकावून लावण्याचा प्रयत्न केला खरा; पण बाप समोर आलेला पहातांच त्याच्या डोळ्यांवर चढलेली मद्याची धुंदी पार उतरली. तो तावडतोब शुद्धीवर आला आणि कांहीं न बोलतां हांकलून लावलेल्या कुत्र्याप्रमाणें तेथून निघून गेला. डोळे वर करून बापाकडे पहाण्याचीही त्याला छाती झाली नाहीं.

तो गेल्यानंतर म्हातारा दलियेकडे वळून डोळ्यांत पाणी आणून म्हणाला, " मुली, झालेला प्रकार तूं गुप्त ठेवशील अशी मला आशा आहे. ताकितबिबीलाही समजतां नये. या पांढऱ्या केंसाकडे पहा आणि यांतील अक्षराक्षरही कुणाकडे न बोलण्याची खबरदारी घे. तुझें पुढें कोट कल्याण होईल असा माझा तुला आशिर्वाद आहे. आतां तुला माझ्या या द्वाड मुलाची भीति बाळगण्याचें कारण नाहीं. तूं स्वस्थ झोंप. "

दलियेला म्हाताऱ्याची कींव आली व आपण फार मोठ्या संकटांतून निभावल्याबद्दल आनंद झाला. ती त्याच्या पायांवर डोकीं ठेवून म्हणाली, " म्हातारे बाबा, तुम्हीं त्याबद्दल मुळींच काळजी करूं नका. तुम्हांला दुःख होईल अशी कोणतीही गोष्ट मी करणार नाहीं. तुम्हीं आतां जा आणि स्वस्थ झोंपा. मलाही स्वस्थ पडूं दे. "

दलियेच्या या आश्वासनाबद्दल म्हाताऱ्याला समाधान वाटलें आणि तो तिला आशिर्वाद देऊन तेथून निघून गेला. म्हातारीही आपल्या पथारीवर पडून हिकमतला शिव्याशाप देऊं लागली. दलियेला मात्र स्वस्थपणा

ळाला नाहीं. ती दरवाजे वगैरे बंद करून बिछान्यावर बसली आणि वतःशींच म्हणाली, " आतां मी येथें राहणें योग्य नाहीं. अजमीर हर सोडून गेलेंच पाहिजे; पण जावें कुठें आणि कुणाबराबर ? खुदाचें ला भरपूर सहाय्य असल्यामुळें प्रत्येक संकटांतून अचानक रीतीनें तो ला सोडवीत आहे हें खरें पण जाणून बुजून पुन्हां या घरांत राहणें ोग्य नाहीं. माझें हें सौंदर्य मला शत्रुरूपानें छळीत आहे. देवानें ारिबाला सौंदर्य देणें म्हणजे त्याचा छळच करणें नव्हे काय ? एकाद्या राच्या आश्रयाला असतांही मी अशी वारंवार संकटांत पडतें; मग कुठच्या तरी प्रवासाला निघाल्यास माझी काय स्थिति होईल ?

" हो असंच करावं. पुष्कळ लोक वेषांतर करून प्रवास करतात त्या-प्रमाणेंच आतां मलाही पुरुष बनून बाहेर पडलें पाहिजे म्हणजे माझें सौंदर्य झांकलें जाईल आणि स्त्रियांवर निसर्गतःच येणारीं संकटेंहि येणार नाहींत. पुरुषांचं मन इतकं विचित्र कसं ? त्यांना आत्मसंयमन मुळींच कां करतां येऊं नये ? एकाद्या असहाय अबलेवर हात टाकायला त्यांला कांहींच लाज वाटत नाहीं कशी ? खरोखर हें एक विचित्र रहस्यच आहे.. मीहि आतां पुरुषच बनतें, म्हणजे मला तितकी भीति तरी राहणार नाहीं. अजूनही दहा मोहोरा माझ्याजवळ आहेत तेवढ्यांत मला सहज पुरुषी पोषाख मिळवितां येईल. आतां हा शेवटचा उपाय तरी करून पहावा.

" मला पोषाखानें पुरुष बनतां येईल; पण जाणार कुठें ? मला आश्रय मिळेल अशी जगांत जागा तरी आहे का ? हो,दिल्लीला जावें. त्या ठिकाणीं माझ्या ओळखीची एक व्यक्ति आहे. शिवाय इब्राहीमसाहेबांचें आणि तिचें नातेंहि आहे. तो पुरुष माझ्यावर मुलीप्रमाणें ममता करील आणि दिल्लींत त्याच्या नांवाचा बराच बोलबाला असल्यामुळें त्याच्या आश्रयाला राहिल्यानें मला त्रासही होणार नाहीं. त्याच्या नांवाची अजीज

प्रसिद्ध असल्यामुळें मी त्याला लवकरच शोधून काढीन. बस्स, ठरला विचार आतां पुरुष बनून मी दिल्लीलाच जाणार.

" पण दिल्ली म्हणजे कांहीं नजीकचें शहर नव्हे. प्रवास बराच लांबीचा असल्यामुळें चालण्याचाही त्रास होणार आहे; घोडा मिळाल्यास उत्तमच. कांहीं तरी पराक्रमही गाजवावा लागेल. वाटेंतच पोषाख मिळवावा म्हणजे झालें. मी वेषधारी पुरुष बनतांच मला सहजच कुठेंहि प्रवेश करून घेतां येईल. कायमच्या आश्रयाला जातांच मुबारकाला बातमी द्यावी म्हणजे झालें.

" आणि असें कांहीं तरी साहस केल्यावांचून मला या सौंदर्याच्या संकटांतून मुक्तच होतां येणार नाहीं. कदाचित् माझ्यावर यापेक्षांहि एखादा बिकट प्रसंग येईल. उमरशेखनें मला विकत घेतलें खरें; पण आत्म-रक्षणासाठीं म्हणून जर मी अशा रीतीनें निघून गेलें नाहीं, तर तो स्वतःच पुन्हां कधीं तरी माझ्यावर पूर्वीचा प्रसंग आणील. या प्रवासांत मला इब्राहीम साहेबांचाही तपास लागेल. सुदैवानें त्यांची भेट झाली तर काळजीच नाहीं. ते कांहीं तरी खटपट करून मला या दास्यत्वांतून मुक्त करतीलच. अहाहा! माझ्या स्वातंत्र्याचा तो सोन्याचा दिवस कधीं उगवेल बरें? वारंवार येणाऱ्या संकटांनीं तर मी दमून गेलें आहे! "

विचार निश्चित झाला. आतां या घरांत राहाणें धोक्याचें असें तिला वाटूं लागलें. रात्र निस्तब्ध होती. उत्तर रात्रीचा तिसरा प्रहर चालला होता. बाहेर काळोखाचें साम्राज्य पसरलें होतें. पण दलियेला भीति वाटत नव्हती. नव्या नव्या येणाऱ्या संकटांमुळें ती धीट होत होती. ती तसल्या त्या काळोखांतच आपल्या खोलीचा दरवाजा उघडून मागच्या दरवाजानें बाहेर पडली आणि सभोंवार दिसणाऱ्या काळ्याकुट्ट अंधारांत अदृश्य झाली. तिच्या मागून जाणारा कोणी नव्हता आणि तिला पहाणाराही कोणी नव्हता. तरी पण तिचा आपल्या हृदयस्थ परमात्म्यावर विश्वास असल्यामुळें तो देवभावच तिला सहाय्य होणार नसेल कशावरून?

---

# प्रकरण ३२ वें



## स्वप्न कीं सत्य !

इब्राहीम अद्याप इसाकच्यांच घरीं राहात होता. कारण एके दिवशीं शहासुफीच्या आश्रमांत तो गेला असतां त्याला ते माळव्यांत निघून गेल्याचें समजलें. त्यामुळें एकाकी स्थितींत त्या जंगली आश्रमांत राहतां येणें शक्य नव्हतें. शिवाय मनही अस्वस्थच होतें. शहासाहेब आपणावर कदाचित् रागवूनही गेले असतील असेंहि त्याला वाटल्यावांचून राहिलें नाहीं. मुबारकाची वाट पहात इसाकच्या घरीं बसून राहिलों ही आपली चूकच झाली, अशीही त्याची मनोदेवता त्याला सुचवूं लागली. पण आतां त्याचा कांहीं उपयोग नव्हता.

वास्तवीक इसाकच्या वाड्यांत त्याला कांहींच कमी नव्हतें. पण आपल्यामागें लावून घेतलेल्या नसत्या काळजीनें तो आंतल्या आंत कुढत होता. मुबारक कां भेटला नाहीं हें गूढ त्याला अद्याप सोडवितां येत नव्हतें. दालियेची हालहवाल न समजल्यामुळें, त्याचा अंतरात्मा तळमळत होता आणि शहाजादीच्या चित्राशीं दालियेच्या स्वरूपाचें इतकें सादृश्य कां असावें याचें कोडें कितीहि विचार केला तरी त्याला सुटत नव्हतें.

शहाजादी दिलबहार हिचा तपास लावण्याची त्याला विलक्षण उत्सुकता वाटत होती; पण दालियेला पाहिल्यावांचून त्या कार्याला आरंभ करावयाचा नाहीं अशी त्याची विवेकवाणी त्याला सुचवीत होती. मात्र आपलें अन्तःकरण असें परस्परावलंबी कां झालें याचा त्याचा त्याला उलगडा होत नव्हता. दिलबहारच्या छबीनें त्याच्या हृदयाची जी खळबळ उडाली होती त्याचें कारण त्याला अद्याप उलगडत नव्हतें. तसेंच अन्तःकरणाला लागलेला तिचा चटका घुडकावून लावण्याचेंहि त्याच्यांत सामर्थ्य नव्हतें.

भावी सुखाशेचें स्वप्न अनुभविण्यासाठीं मात्र तो उतावळा झालेला होता. भावी सुखसूर्याचे विकासणारे किरण त्याच्या अंधकारपूर्ण हृदयकंदराला प्रकाशित करीत असल्यामुळें त्याला अननुभूत आनंद होत होता.

ती तसबीर बराच वेळपर्यंत एकाग्रतेनें पाहून व दालियेचें स्वरूप मनांत आठवून त्यानें निश्चित केलें कीं या दोन्ही चेहेऱ्यांत विलक्षण सादृश्य आहे. कदाचित् दोघेंहि एकरूप तर नसतील ना? दोघांतही कांहींच फरक नाहीं! पण हें असें कसें व्हावें?

"दलियेला माझ्या वडलांनीं बराचसा पैसा खर्चून काश्मिरी सौदागराकडून विकत घेतलें. सौदागर लोक देशोदेशीं फिरत असतात. कदाचित् नदीच्या किनाऱ्यावर अर्धवट बेशुद्धावस्थेंत असलेली एकादी सुंदर मुलगी त्यांना मिळाली असेल आणि पैशाच्या लोभानें त्यांनीं तिची शुश्रूषा करून ती चांगली झाल्यावर तिला विकलीहि असेल? देशोदेशींच्या सुंदर सुंदर मुली धरून आणून विकण्याचा तर यांचा धंदा आहे; मग त्यांत विचित्र असें काय आहे? असेल! तसेंहि असले. दलिया आणि दिलबहार एकच असली पाहिजे.

"तसें नसेल तर कदाचित् कोणी व्यापारी जहाजांत बसून यमुना नदींतून चालला असतां पाण्यांत तरंगणारी शहाजादी त्याला आढळली असेल.निराश्रित मुलगी म्हणून त्यानें तिला सांभाळली असेल आणि सौंदर्य पाहून ही कोणा तरी थोरामोठ्यांच्या कुळांतील असेल असें वाटल्यामुळें सर्व प्रकारचें शिक्षणही दिलें असेल. तो काळ मुली विकण्याचा होता. व्यापाऱ्याचें पैशाच्या वाढीकडे लक्ष असणें साहजिक आहे. जास्त किंमतीला माल जात आहे असें पाहून त्यानें ती सुंदर मुलगी विकली असेल. दालिया माझ्या बापाला मिळाली त्याचें मूळ असेंच असलें पाहिजे. आणि जर तें असें असेल तर दालिया हीच दिलबहार असणें साहजिक आहे. शिवाय दिलबहार हीच दालिया नसती तर या चित्रानें मला इतकें वेडही लावलें नसतें.

" दालिया ही वारंवार मला म्हणे कीं, ' लहानपणीं आपण थोरामोठ्यांच्या घरांत चांगलें खेळलें असून माझ्याबरोबर कांहीं परिचारिकाही असत असें मला आठवतें.' त्यावरून मला पदोपदीं वाटे कीं, ही कोणत्या तरी मोठ्या घराण्यांत जन्मलेली असावी आणि तें माझें अनुमान आतां खरें होऊं पहात आहे.

बादशहानें जाहीर केलें आहे कीं, ' माझ्या मुलीची जो बातमी आणील त्याला कत्तल करण्यांत येईल.' पण हें केवळ शोकजनित क्रोधाचें लक्षण असावें. निरनिराळे प्रयत्न करूनही जेव्हां शहाजादीचा तपास लागेना तेव्हां आत्यंतिक निराशेनें वेडा होऊन त्यानें हा विलक्षण हुकूम सोडला असावा. आशेची निराशा झाली म्हणजे मनुष्य असाच आततायी बनतो. तेव्हां खरोखरच जर त्याला त्याची अज्ञात झालेली मुलगी नेऊन भेटविली तर तो खात्रीनें खूष झाल्यावांचून राहाणार नाहीं. इतकेंच नव्हे तर पूर्वीच्या जाहिरनाम्याप्रमाणें तो त्याच्याशीं आपल्या मुलीचा विवाहही करून देईल. हा महोत्सव अनुभविण्याचें माझ्या नाशिबांत नसेल असें मी तरी कां मानावें ? याच साहसांत माझें भाग्यपरिवर्तन होणार नसेल कशावरून ? "

विचार करतां करतां त्यानें निश्चित ठरविलें कीं, दालिया हीच दिलबहार असली पाहिजे. आणि हा निश्चित विचार होताच दालियेची केव्हां एकदां भेट घेईन असेंहि त्याला होऊन गेलें. तिच्या भेटीसाठीं त्याचें हृदय तळमळूं लागलें, पण ती परस्वाधीन असल्यामुळें त्याला तिच्याकडे जातां येत नव्हतें. तो मनांत म्हणाला," तिची एकवार भेट झाली असती म्हणजे माझ्या नेत्रांचें सार्थक झालें असतें; पण तिच्या दर्शनासाठीं त्या सैतानाची आर्जवें कशीं करावीं ? तो तर माझा पुरा दुष्मन् बनला आहे. "

इसाक म्हणत होता त्याप्रमाणेंच आपण करावें असें त्याला वाटूं लागलें. आधीं दालियेला त्या राक्षसाच्या हातून सोडवावी आणि तिच्या मर्जीप्रमाणें पुढची सगळी तजवीज करावी असें त्याचें मन त्याला सांगूं लागलें.

पण याच वेळीं कांहीं राजकीय भानगडी उपस्थित झाल्यामुळें त्याचा मित्र इसाक दिल्लीला बादशहाला भेटण्यासाठीं गेला होता. शिवाय रक्कमही त्याच्या हातांत आलेली नव्हती. खुदादादच्या अपराधाचें माप त्याच्या पदरांत घालून उमरशेखला दांतीं तृण धरावयास लावणारी दिव्य शक्ति इसाकच्या आंगांत असल्यामुळें तो येईपर्यंत इब्राहीमला कांहींच करतां येणें शक्य नव्हतें. त्यामुळें दालियेसंबंधाचा निश्चित विचार त्यानें ठरविला तरी त्याला पुढें कांहींच करतां येईना. इसाक घरीं कधीं येणार तेंहि निश्चित नव्हतें. त्यामुळें इब्राहीम फारच उत्कंठित झाला. त्याला प्रत्येक दिवस नव्हे तर प्रत्येक क्षण विलक्षण मोलाचा वाटूं लागला.

पण त्याला आपल्या मित्राची फार दिवस वाट पहावी लागली नाहीं. कांहीं आगाऊ सूचना न देतां अकस्मात् त्याचा दोस्त घरी आला. जेवणखाण आटोपल्यावर इब्राहीमनें त्याला विचारिलें, " काय नवीन खबरबात आहे ? "

" तुझें थोडेंसें जवाहीर विकून बराच पैसा आला. इतकी किंमत येईल असें मला वाटलें नव्हतें; पण तुझें नशीब जोरावर दिसतें. कारण एकाच उमरावानें त्यांतील दोन नग एक लक्ष रुपयांना घेतले. या चढत्या दरानें सर्व जवाहीर गेल्यास तूं माझ्यापेक्षांहि श्रीमंत होईल. "

" मी या श्रीमंतीसाठीं भुकेलेला नाहीं. मी तुला जें काम सांगितलें होतें, त्याचें काय झालें तें आधीं सांग. मला श्रीमंती नको आहे. " इब्राहीमनें म्हटलें.

" हां. तुझें काम आतां आलें माझ्या लक्षांत. दालियेची सुटका करावयाची इतकेंच ना ? अं:; तें काम मी केलें नाहीं असा तुझा समज आहे कीं काय ? आसनीं, शयनीं, पानीं रात्रंदिवस जी तुला अदृश्य रूपानें उत्कंठित करीत आहे त्या दालियेबद्दलचा यापूर्वीच मी सगळा बंदोबस्त केलेला आहे. सम्राटच्या वजीर-उल-मुल्काजवळ तिच्या संबंधाचा मुक्ततेचा परवाना आणला असल्यामुळें खुदादाद किंवा उमरशेख यांपैकीं, को-

णीही तिला आतां अटकाव करूं शकणार नाहींत. ती आतां स्वतंत्रच आहे. मात्र ही सम्राटची मेहेरबानी मला नको होती व ज्याचा त्याला पैसा मिळणेहि योग्य होतें म्हणून मी सुभेदारालाच हुकूम पाठविण्याबद्दल दरबारला विनंति केली तेव्हां अजमीरच्या सुभेदाराला हुकूम पाठविण्यांत आला कीं, ' उमरशेखनें आपली रक्कम व व्याज घेऊन दालियेला दास्यत्वां-तून मुक्त करावें व तिला स्वतंत्रपणानें पूर्वीच्या घरीं पोंचवावें. ' कां ? केलें कीं नाहीं तुझें काम ? ''

इसाकचें हें बोलणें ऐकून इब्राहीमला अतिशय आनंद झाला. तो उत्साहपूर्णस्वरानें म्हणाला, " दोस्त इसाक ! तूं शतायुषी हो. खुदा तुझें कल्याण करो. ''

" आणि मीहि तुला आशिर्वाद देतों कीं दालियेसह तूं आनन्दानें संसार कर. ''

इसाकचा हा वस्तुस्थितीला सोडून असलेला आशिर्वाद ऐकून इब्राही-मला हंसूं आलें. तो म्हणाला, " तुझी इच्छा सफल होवो; पण इसाक, मी दालियेसंबंधानें एक नवाच शोध लावलेला आहे, तो ऐकून तुला आश्चर्य वाटल्यावांचून राहणार नाहीं. ''

" कसला शोध ? तुझें आपले एकेक ऐकावें तें नवेंच ! " इसाकउद्गीन आश्चर्यानें म्हणाला.

" ही दालिया दुसरी कोणी नसून नाहींशी झालेली दिलवहारच आहे !"

" तर मग तुला खात्रीनें वेड लागलें आहे. तूं भ्रमिष्ट झाला आहेस. ''

" तूं कांहीं म्हण पण माझें हें अनुमान खोटें नाहीं. " इब्राहीम निश्चयानें म्हणाला.

"बरें, तसें असलें तर त्याबद्दल तुझें म्हणणें काय आहे तें तर समजूं द्या."

" मी स्वतः सम्राटना ही बातमी देणार. आणि नाहींशा झालेल्या शहाजादीचा मी शोध लावला म्हणून सांगणार !" इब्राहीम छातीवर हात ठेवून गंभीरपणानें म्हणाला.

दिलबहार,

" आणि त्यानंतर दलिया ही शहाजादी नव्हे असें—"

" असें ठरलें तर बादशहाच्या हुकुमाप्रमाणें आपलें शीर धडावेगळें करून घ्यायला तयार आहें. या साहसांत मी विजयी झालों नाहीं तर मी मरून जाईन."

" वेडेपणानें अलौकिक जीवाचा नाश करणें बरें नव्हे. स्वतःला सुखी कर. तें तुझ्या हातांत आहे."

" तर मग मी काय करावें असें तुझें मत आहे ? " इब्राहीमनें विचारलें.

" या दलियेशीं तुला धर्मविधीप्रमाणें विवाह नाहीं का करतां येणार ? निष्कारण एवढ्यासाठीं बादशहाकडे जाऊन सुखाचा जीव दुःखांत घालण्याचें काय कारण ? धोपट मार्ग समोर दिसत असतां आडरानांत शिरण्याचें कारण काय ? "

" कारण आहे. कारणावांचून कार्य होत नसतें. या तसबिरींतील स्त्रीशीं दलियेचें इतकें साम्य आहे कीं, मत हें धाडस करण्याला मुळींच भीति वाटत नाहीं. दलिया शहाजादीच आहे, हें माझें मन मी आतां मुळींच बदलूं शकणार नाहीं. माझी विवेकवाणी मला जागृति करीत आहे. मी ही संधि आतां तरी निदान व्यर्थ दवडणार नाहीं "

" इब्राहीम, मनुष्य हा चुकीला पात्र असतो. तुझ्याकडून या भ्रमिष्ट-पणांत कसली तरी चूक होणार नसेल कशावरून ? या धाडसाला तूं प्रवृत्त होऊं नको. दलियेशीं लग्न करून तूं आनंदानें संसार कर. तुझ्याजवळ पैसा आहे. तुला कोणताही उद्योगधंदा करण्याचें कारण नाहीं. दलिया तुझ्यावर अनुरक्त आहे ! तेव्हां तूं ही सुसंधि दवडून नसत्या संकटांत उडी घेऊं नको. नसत्या भ्रमांत पडून तूं भयंकर दरीकडे धांव घेत आहेस. तूं हातीं घेतलेल्या कार्यांत यशस्वी झाला नाहींस तर बादशहाच्या रोषाला बळी पडशील. त्या संकटांतून तुला कोणीही सोडवूं शकणार नाहीं. विचार कर. " इसाक अगदीं विनवणीच्या स्वरानें बोलत होता.

बोलतां बोलतां दालिया विजेप्रमाणें गुप्त झाली. स्वप्नलिला अनुभवणारा इब्राहीम चकित होऊन इकडे तिकडे पाहूं लागला; पण त्याची प्रियतमा त्याला कुठेंच दिसेना. तेव्हां तो खडबडून उठला आणि अभिप्रासारखा मोठ्यानें ओरडून म्हणाला, " दालिये, दालिये ! तूं या अभाग्याला सोडून कुठें ग गेलीस ! मला क्षमा कर ! मी तुझा उपमर्द केला काय ? तुझी आज्ञा मान्य करून तूं सांगशील ती सेवा करायला हा गुलाम तयार आहे. पण—पण दालिये, तूं याला सोडून जाऊं नको. ये, माझ्या प्राणदेवते ये. मी तुला अनन्य शरण आहें. दलिये, दालिये ! ! "

यावेळीं प्रभातकाल संपून दिशा फांकल्या होत्या. अस्पष्ट प्रकाशांत दिग्वलयाची सीमा जगाची मर्यादा दाखविण्याचा प्रयत्न करीत होती. मोठ्यानें ओरडण्याच्या भरांत आपण झोपेंत आहों हें इब्राहीम विसरला आणि बिछान्याला कवटाळून ' दालिये, दालिये ' म्हणून आक्रोश करूं लागला. आपण एका बड्या माणसाच्या घरांतील खोलींत झोपलों आहों याचें त्याला भान राहिलें नाहीं. कारण तो अंतर्बाह्य दालिया बनला होता.

याच खोलीच्या बाहेरच्या बाजूला एक नोकर झोपत असे. इब्राहीमची ती भयंकर आरडाओरड ऐकून तोही खडबडून उठला आणि धांवत धांवत त्याच्या बिछान्याजवळ येऊन घाबरलेल्या आवाजानें म्हणाला, " साहेब ! आपण कांहीं भयंकर स्वप्न पाहिलें काय ? खुदा आपलें कल्याण करो. घाबरूं नका. मी इथेंच बाहेर आहें. "

आपण स्वप्नांतच एवढ्या मोठ्यानें ओरडलों व तें नोकरानें ऐकून तो धांवत धांवत आपल्याजवळ आला; हें समजून येतांच इब्राहीम लाजला आणि हळूच त्याला म्हणाला, " होय ! कदाचित् मी स्वप्नांत ओरडलों असेन; पण तूं हें कुणाला सांगूं नको बरें का ? "

नोकराची त्यानें अशा रीतीनें समजूत केली खरी; पण आपण पाहिलें हें स्वप्न कीं सत्य याचा त्याला उलगडा झाला नाहीं. कारण झालेला प्रकार अगदीं खरा असावा असें त्याला वाटत होतें.

---

# प्रकरण ३३ वें.



## दलिया दिलबहार !

इब्राहीमनें कांहीं दिवसांपूर्वी मुबारकाला एक पत्र पाठविलें होतें, त्याचें उत्तर न आल्यामुळें एक दोन दिवसांपूर्वी पुन्हां एका जासुदाबरोबर मुबारकाला कळविलें होतें कीं, " मी अद्याप इसाकच्या घरींच आहें; तूं मला एकवार भेटून जा. मागील पत्र तुला पोंचलें नसावें, नाहीं तर तूं मला भेटला असतास. तरी हें पत्र पोंचतांच जरूर यावें. दलियेचाहि समाचार आणावा."

जुल्फसकडून मुबारकाला बागेंत झालेली सगळी हकीकत समजली होती. दलिया कुठें आहे हेंहि त्याला माहीत होतें. बागेपेक्षां त्याला ती जागा पसंतही वाटत होती. पण तिला प्रत्यक्ष भेटण्याचा योग येत नसल्यामुळे त्याच्या मनाला चुटपुट लागली होती. त्यामुळेंच इब्राहीमकडे जाण्यालाहि त्याला संकोच वाटत होता. दुसरें पत्र आल्यानंतर आतां मालकाला भेटणें भाग आहे असें म्हणून तो उमरशेखच्या घरीं आला. हेतु हा कीं, जुल्फसकडून दलियेसंबंधाची माहिती घ्यावी अगर जमल्यास तिला भेटून समाचार आणावा."

अकस्मात् मुबारक आलेला पहातांच जुल्फसनें प्रश्न केला, " काय नवीन बातमी आहे मुबारक ? "

मुबारक खिन्नपणानें म्हणाला, " मी कसली खबर सांगणार जुल्फस ! तूंच मला कांहीं तरी सांगितलें पाहिजे. कारण मला आतां फत्तेपुराला जायचें असून मालकांना दलियेची बातमी कळवावयाची आहे. तिची भेट होईल तर फारच उत्तम. पहा, तूं एवढें काम करशील का ? "

जुल्फसचा चेहरा अगदीं कोमेजून गेला. तो एक दीर्घ सुसकारा सोडून म्हणाला, " नको, मुबारक ! तूं तिकडे जाऊं नको. मी खात्रीनें सांगतों, ती खुशाल आहे. तिला कोणीही त्रास देणार नाहीं. ताकितबिबीचा बाप, तिला कांहींच कमी पडूं देणार नाहीं."

" तुझा मालक कुठें आहे ? " मुबारकानें प्रश्न केला.

" काय सांगूं दोस्त ! धर्म करतां कर्म उभें राहतें तें हें असें. दलियेच्या बाबतींत माझ्यावर तर ते रागावलेच; पण बाईसाहेबांवरही त्यांनीं पुराच सूड उगविण्याचें ठरविल्याचें दिसतें. दलियेचें संरक्षण करण्याकरतां गेली; पण आतां स्वतःचें संरक्षण कसें होतें हीच तिला व तिच्यामुळें मला पंचाईत पडली आहे ! शेखसाहेबांनीं कुठें तोंड लपविलें कुणाला माहीत ! पेढ्यांना कुलुपें घातलीं आणि आपल्या परवानगीवांचून कोणालाही कसलाच जिन्नस देऊं नको असा त्यांनीं सर्व दुकानदारांना हुकूम केला आहे. माझें कसेंही होईल मुबारक; पण बाईसाहेबांची मात्र उपासांनीं मरणाची पाळी आली आहे. धनीसाहेब कुठें गेले कुणालाच माहित नाहीं. आम्हीं दोघांनीं मिळून दलियेला लांबविली अशी त्यांची खात्री झाल्यामुळें त्यांनीं आमचा कशा रीतीनें छळ मांडला आहे. सांग पाहूं मुबारक, आतां पुढें त्यांना कुठें शोधावें ? जुल्दसखान अगदीं दीनवाणें तोंड करून म्हणाला. मुबारकलाही वाईट वाटलें. आग्शेखचा सैतानीपणा या थराला पोंचेल असें त्याला वाटलें नव्हतें. जुल्दसला त्यानें मनांतल्या मनांत पुष्कळ धन्य वाद दिले आणि म्हटलें, " जुल्दस, तर मग सध्या तुमचें कसें काय चाललें आहे ?

" कसचें काय विचारतोस मुबारक ! तोंड मिटून दुःख सहन करीत आहों झालें. तुझ्याजवळ कशाला लपवालपवी करायची ? दररोज खडखडीत उपास पडत आहे म्हटलें तरी चालेल. मला स्वतःसंबंधीं इतकी काळजी वाटत नव्हती रे; पण त्या माउलीला निष्कारण हाल काढावे लागत आहेत! तिचें तें दुःख माझ्यानें पहावत नाहीं ती अगदीं सरळ स्वभावाची आहे. बिचारी नवऱ्याच्या अज्ञातवासाला आपण कारण झाल्यें असें मनांत आणून रात्रंदिवस रडत असते. तो सैतानी उमरशेख तिच्यांशीं रात्रंदिवस खिटखिट करीत असे; पण त्याच्यावर तिची भक्ति होती. आणि आज ती त्याच्या नाहींसा होण्यामुळें झुरत दिसत आहे ! माझा कांहीं इलाज चालत नाहीं "—

बोलतां बोलतां जुल्दसच्या नेत्रांतून अश्रु वाहूं लागले. आपल्या मालकिणीची हीनावस्था पाहून त्याला वाईट वाटल्यावांचून कसें राहील.

मुबारकाचेंहि डोळे शुष्क नव्हते तो डोळे पुसून सद्गदीत स्वरानें म्हणाला, " जुल्दस, तूं वाईट वाटून घेऊं नको. माझ्या आणि तुझ्या स्थितींत

फारसा फरक नाहीं. मी तुला आज वीस रुपये देतों त्यांत तूं आपल्या मालकिणीची आणि आपली गुजराण कर. तसेंच हे दुसरे दहा रुपये देतों ते दलियेला पोंचीव आणि इब्राहीमसाहेबांना किरकोळ खर्चासाठीं दिल्याचें तिला सांग. असेच दुःखाचे दिवस कांहीं नेहमीं राहणार नाहींत; पण थोडा धीर धरला पाहिजे. माझ्याजवळ पैसा असेपर्यंत तुझ्यासारख्या साधुपुरुषाच्या अन्तःकरणाला मी यातना होऊं देणार नाहीं. इब्राहीमसाहेबांच्या कृपेनें मलाही आतां चांगले दिवस येतील. त्यांच्याकडून त्या दिवशीं हे पन्नास रुपये आले होते. त्यांतूनच तुला हे रुपये देत आहें. प्रसंगीं एकमेकांच्या उपयोगीं पडणार नाहीं तर आमचा हा जन्म काय कामाचा आहे ? धन्या-चा तोच आपला संसार असें मानून चाललें पाहिजे.

दुसरी एखादी वेळ असती तर जुल्हसनें ते पैसे घेतले नसते; पण आजची वेळच आणीबाणीची असल्यामुळें त्याला ते रुपये घ्यावे लागले. आणि त्यानें ते निमूटपणें घेतले. तो कांहीं बोलला नाहीं. रुपये दिल्यावर मुबारक म्हणाला, " मी आतां इब्राहीमसाहेबांकडे जातों आणि दलिया सुखरूप असल्याचें सांगतों. तूं तिची व्यवस्था पहा. "

असें सांगून मुबारक फत्तेपुराकडे निघाला; पण जुल्हसला दलिया भेटली काय ? नाहीं. ती त्याच रात्रीं झालेल्या प्रकारामुळें उद्विग्न होऊन गुप्त-पणानें ताकिनबिबीच्या माहेरहून काळोख्या रात्रीं बाहेर पडली आणि काळोखांतच अदृश्य झाली. मुबारकानें पुढें काय केलें बरें ?

* * *

योग्य वेळीं मुबारक इब्राहीमकडे त्याच्या खोलींत येऊन पोंचला. माल-काला पहातांच त्याचें हृदय आनंदानें भरून गेलें; पण इब्राहीम एक चित्र पहाण्यांतच दंग झाला होता. मुबारकाला आपल्या मालकाशीं बोलल्यावांचून राहावेना. कारण पुष्कळ दिवसांनीं ती भेट झालेली होती. तो त्याच्या समोर जाऊन त्याला सलाम करून अत्यंत अदबीनें म्हणाला, " खुदा आपलें कल्याण करो. धनीसाहेबांची प्रकृती बरी आहे ना ? "

प्रश्न ऐकतांच इब्राहीम भानावर आला. दचकून वर पहातो तों आपला आवडता नोकर मुबारक हात जोडून उभा ! आपल्या गुलामाला पहातांच

इब्राहीमला प्रेमाचें भरतें आलें. तो सद्गदित स्वरानें म्हणाला, " कसें काय मुबारक ? दालिया खुशाल आहे ना ? "

" आम्ही खुशाल आहों; पण आपली बातमी बरेच दिवस समजली नसल्यामुळें फार काळजी वाटत होती. आपण इतके दयाळु असून आम्हां दोघांबद्दलच इतके निष्ठुर कां बरें झालां साहेब ! एकदां निघून गेलां ते गेलांतच. मी तर अगदीं जिवंत असून मेल्यासारखाच झालों होतों. "

आपल्या गुलामाची आपल्यावरील ती एकनिष्ठा पाहून इब्राहीमला एक प्रकारचें विलक्षण समाधान वाटलें आणि तो गहिंवरून त्याला म्हणाला, " झाल्या गेल्या गोष्टींबद्दल मुबारक तूं मला क्षमा कर. गेलें तें होऊन गेलें. गतायुष्यांतील अपराधांबद्दल मी खुदाची करुणा भाकली असून त्यानें माझीं आसवें पुसलीं असल्यामुळें मी कलंकहीन झालों आहें. त्यानें मला क्षमा केली. तुम्हींहि मला क्षमा करा. मी तुम्हां दोघांनाही केव्हांच विसरलों नाहीं; पण काय करूं ? काल प्रतिकूल होता; त्यामुळें माझी बुद्धी भ्रमिष्टासारखी मला खड्यांतच लोटूं लागली; पण आतां ती मला सावरीत आहे मला कुणाची भीति राहिलेली नाहीं. खुदा माझ्या सहाय्याला आला आहे. तूं दालियेचा कांहीं समाचार आणला का ? "

मुबारक खोटें बोलला. तो म्हणाला, " ती उमरशेखच्या बागेंत खुशाल आहे. "

इब्राहीमनें आश्चर्यानें विचारलें, " कां ? तिला त्यानें असें एकीकडे कां ठेविलें ? "

" ताकितबिबीच्या भीतीमुळें तो तिला घरीं नेऊं शकत नाहीं. " मुबारक उत्तरला.

" तर मग दालिया—"

इब्राहीम पुढें कांहींसें बोलणार होता; पण त्याच्यानें त्या शब्दाचा उच्चार करवला नाहीं. मुबारकाच्या लक्षांत ती गोष्ट आली व तो सूचकपणानें म्हणाला, " आपण कां बरें निष्कारण दलियेच्या काळजीनें स्वतःला त्रास करून घेतां ? सैतान उमरशेख तिच्या त्या देवीच्या आंगाला स्पर्श करील असें आपल्याला वाटलें तरी कसें ? दलिया सुखी आहे. तिला कोणीही त्रास देऊं शकणार नाहीं. शिवाय ताकितबिबीनें तिला आपल्या

मुलीप्रमाणें मानलें असल्यामुळें ती तिला जपत असते. जुलसकडून मला नेहेमीं तिची बातमी समजत असते. त्यामुळें मीहि संधि साधून एक वेळ तिला भेटलों होतों. मात्र ती सतत आपली आठवण काढून शोक करीत असते. त्यामुळें मला फार दुःख झालें."

इब्राहीमनें मनांतल्या मनांत ईश्वराचे आभार मानले; कारण दलियेच्या हृदयांत आपणाला जागा मिळाली असून ती कायमचीच आपली होणार असें त्याला वाटत होतें. खुदाच्या कृपेवांचून हे असे योगायोग येत नसतात अशी त्याची समज होती. कांहीं वेळानंतर तो हंसत हंसत मुबारकाला म्हणाला, "मुबारक, मी आतां गरीब राहिलों नाहीं. खुदाच्या कृपेनें माझें दारिद्र्य नाहींसें झालें आहे. वठलेल्या वृक्षाला पालवी फुटली ? तुम्हांला आतां दुःखांत दिवस काढण्याचें कारण नाहीं. वडलांच्या दूरदर्शीपणामुळें मला आज सुद्धां सुखाचे दिवस येत आहेत."

आपल्या धन्याची भरभराट झालेली ऐकून कोणत्या स्वामिनिष्ठ सेवकाला आनंद वाटणार नाहीं ? मुबारक अगदीं खूष होऊन म्हणाला, "आपणाला आनंद झाला कीं आम्हीं सुखी झालोंच आणि त्यामुळेंच खुदाताल्लाकडे आम्हीं नेहेमीं आपलें कल्याण इच्छित असतों."

आणखी इकडच्या तिकडच्या बऱ्याचशा गोष्टी झाल्यानंतर इब्राहीम गंभीरपणानें मुबारकाला म्हणाला, "मी आतां लवकरच एका महत्वाच्या कार्याला सुरवात करणार आहें. दैव अनुकूल असेल तर मी त्यांत विजयी होईन, इतकेंच नव्हे तर राजमान्य होऊन मला एखादा किताबही मिळेल. मी आतां तुला एक अपूर्व वस्तु दाखवितों ती पहा आणि तुला काय वाटतें तें सांग."

असें म्हणून इब्राहीमनें शहाजादी दिलबहारची तसबीर त्याच्या हातांत दिली आणि विचारलें, "मुबारक, हें चित्र पहा आणि तें कुणाचें आहे सांग."

"वा, यांत काय आपण विचारलें साहेब ! हें चित्र दलियेचें आहे." मुबारक सहजस्वरानें म्हणाला. या आपल्या उत्तरानें केवढें मोठें कोडें उलगडलें जात आहे याची त्या बिचाऱ्याला कल्पनाच नव्हती.

"तूं हें अगदीं बरोबर सांगत आहेस ना ? विचार कर. कांहींशी चुक

होत असेल ? " इब्राहीमनें विचारलें.

" स्वरूप तर अगदीं बरोबर आहे; पण दलियाबिबीचा पोषाख आहे साधा, आणि यांत मात्र तिला चढविलेला पोषाख आहे मूल्यवान्, फरक काय तो इतकाच. " मुबारकानें जबाब दिला.

" मी तुला आणखी थोडा वेळ देतों, नीट पहा; चांगल्या प्रकाशांत घेऊन जा आणि मनाची खात्री कर. "

मालकाच्या हुकमाप्रमाणें मुबारकानें तें चित्र अगदीं खिडकीजवळ नेऊन पाहिलें. मनाची खात्री केली. आपली कांहीं चूक होत नाहीं असें ठरविलें आणि तें पुन्हां साहेबांच्या हातांत देऊन म्हटलें, " मुबारकाची नजर अद्याप साफ आहे. हुजूरच्या कृपेनें मी हें चित्र ओळखूं शकलों असून तें दलियाबिबीचें आहे अशी माझी मनोदेवता मला स्पष्ट सांगत आहे. दलियेशीं मी जितका साहचर्यानें वागलों आहें तितके धनीसाहबही वागले नसतील. तेव्हां या चित्राच्या बाबतींत माझें मतच योग्य आहे, असें आपण मानलें पाहिजे. आपणाजवळ येतांना तिची मुद्रा थोडीशी संकोचित आणि सलज्ज झालेली असे. त्यामुळें तिच्या नैसर्गिक मुद्रेची आपणाला बरोबर परीक्षा होणार नाहीं. मी खात्रीपूर्वक सांगतों कीं, हें दलियेचेंच चित्र आहे. कुणालाहि हें तिचें नव्हे असें ठरवितां येणार नाहीं. मुबारकाचा प्रत्येक शब्द अन्तःकरणापासून येत होता. त्यामुळें इब्राहीमची खात्रीच झाली. त्याला आतां कसलाच संशय राहिला नाहीं. कारण मुबारक कधींच खोटें बोलणार नाहीं हें त्याला माहीत होतें. धन्याची मर्जी राखण्यासाठीं केवळ हांजी हांजी करणारा तो गुलाम नव्हता. त्याच्या हृदयांत खरी कळकळ व निष्ठा असल्यामुळें तो प्रत्येक कृत्य मनापासूनच करीत असे.

हें चित्र आपल्याला कां पहावयाला दिलें तें मुबारकाला समजलें नव्हतें तरी पण यांत कांहीं तरी गूढ असावें असें वाटल्यावरून मुबारकानें आपण होऊनच आपल्या धन्याला प्रश्न केला. " साहेब, आपण केवळ दलियेच्या आठवणीनेंच हें चित्र काढलें काय ? "

इब्राहीम कधींच खोटें बोलला नव्हता; पण यावेळीं कार्यानुरोधानें त्याला खोटें बोलणें भाग पडलें. तो कांहींसा शांतपणानें मुबारकाला म्हणाला,

' समज, मी हें केवळ तिच्या स्मरणानें काढलें आहे; पण तिच्या खऱ्या स्वरूपांत आणि यांत कांहीं फरक तर झाला नाहीं ना ? "

" नाहीं. मुळींच नाहीं. इतकेंच नव्हे, तर तिचें सौंदर्य यांत जास्त खुलविलें आहे. जर ती दैवदुर्विलासाच्या तडाक्यांत सांपडली नसती तर ती अशीच दिसली असती. " मुबारक स्पष्टपणानें म्हणाला, दलियेचे गोडवे गातांना त्याला विलक्षण स्फुरण चढत असे.

मुबारकाचा हा स्पष्ट अभिप्राय ऐकून इब्राहीमला फारच संतोष वाटला. मनांत आणलेल्या साहसी कार्याला आतां सुरवात करायला मुळींच हरकत नाहीं अशी त्याची खात्री झाली. आपण आतां या कामांत खात्रीनें यशस्वी होणार, असें त्याचें मन त्याला सांगूं लागलें.

बोलतां बोलतां बरीच रात्र झालेली पाहून मुबारक म्हणाला, " मी आतां निरोप घेतों. घरीं कोणींच नाहीं हें आपण जाणत आहांच. शिवाय जातां येतांच्या भाड्यानें मी गाडी ठरविलेली आहे तेव्हां मला गेलेंच पाहिजे. मग निष्कारण रात्र कशाला करूं ? "

इब्राहीमलाहि त्याचें तें बोलणें योग्य वाटलें. तो म्हणाला, " तुला आतां विशेष कांहीं सांगितलें पाहिजे असें नाहीं. दलियेच्या आणि तुझ्या खर्चासाठीं म्हणून दरमहा तूं इसाकच्या गुमास्त्याजवळून शंभर रुपये घेऊन जात जा; मला तूर्त कांहीं महत्त्वाचें कार्य आरंभावयाचें असल्यामुळें मी कांहीं घरीं येत नाहीं. गेलेलें नांव मिळविल्यावांचून अजमिरांत पाऊल ठेवणें योग्य नाहीं. दलिया परक्याच्या ताब्यांत आहे. मी तिला लवकरच त्या सैतानाच्या हातांतून सोडवितों; पण तोंपर्यंत तूं स्वतः तिची हालहवाल पहा. तिला कोणत्याही प्रकारची कमतरता पडतां कामा नये. खर्चाला लागेल ती रक्कम तूं इथून नेत जा. मी येथील दिवाणजींला सांगून जातों. तसेंच दलियेला मुद्दाम भेटून सांग ' तुला मी लवकरच उमरशेखच्या हातून सोडवितों. तूं स्वतंत्र झाल्यावांचून मला सुखाची झोंप येणार नाहीं. शिवाय या बाबतींत मला इसाकसाहेबांची मदत असल्यामुळें मला यश येण्याबद्दल मुळींच काळजी वाटत नाहीं. तूं लवकरच दास्यत्वांतून मुक्त होशील. सुखाची वेळ नजीक येत आहे. निश्चित रहा ! हा माझा निरोप तिला कळीव. शिवाय तूंहि तिच्यावर नजर ठेव. जुल-

सर्वी नजर उमरशेखवर राहीलच. तूं आतां जा. सांगितलेलें विसरूं नको. ”

मुबारकानें सलाम केला आणि तो जातां जातां म्हणाला, “ हुजूर, आतां आपण कसलीच काळजी करूं नये. मी इकडचा सगळा बंदोबस्त ठेवतों. आपण आपल्या कार्यांत यशस्वी व्हा म्हणजे झालें. दलियेचे नेत्र आपली मार्गप्रतीक्षा करीत आहेत हें लक्षांत ठेवा. ”

प्रभूचा निरोप घेऊन मुबारक निघून गेला आणि इब्राहीम भावी सुखस्वप्नांत गढून जाऊन भविष्यकालचीं चित्रें रंगवीत तेथेंच बसला. कदाचित् एकाद्या जोराच्या वादळापूर्वींची ही शांतता नसेल कशावरून ! देवाच्या मनांत काय असेल कुणाला माहीत. मानवी आशेचा आणि देवाच्या इच्छेचा झगडा नेहमींच चालू असतो.

---

# प्रकरण ३४ वें.



## नवी जागा नवा अनुभव.

आजपर्यंत दलियेचे दिवस एकाद्या अमीर उमरावाच्या जनान्याप्रमाणें सुखांत गेले होते, असें म्हणावयाला हरकत नाहीं. तिला मानसिक त्रास झाला व होतही होता; पण तो बादशहालाहि सहन करावा लागतो; मग दलियेची कथा काय ! दलियेला अद्याप घराबाहेर पडणें माहीत नव्हतें. अर्थातच ताकिदच्या माहेराहून मोठ्या काळो[illegible] रात्रीं ती बाहेर पडल्यामुळें तिला भीति वाटल्यावांचून राहिली न[illegible]ट्यानें प्रवास करणें तिला मोठें संकटकारक वाटलें, पण इलाज नव्हता.

रस्ता गैरमाहितीचा, रात्र काळोखी आणि मनांत भीति यामुळें आपण कुठं जात आहों आणि आश्रयाला योग्य जागा कोणती हें तिला नाहींच समजेना. तरी कमी रहदारीच्या निर्जन रस्त्यानें ती जात होती. कारण आपणाला कोणींहि पाहूं नये असा तिचा हेतु होता. मध्यरात्र होऊन गेली असल्यामुळें चोहोंकडे विलक्षण निस्तब्धता पसरली होती.

चोहोंकडे निबीड अंधकार पसरला होता. गर्द झाडीमुळें वाऱ्याचा आवाजही अन्तःकरणांत भीतीचे तरंग उठवीत होता. दलियेला भीति वाटली. असल्या या रात्रीं अगदीं एकाकी स्थितींत आपण घराच्या बाहेर पडण्यांत मोठीच चूक केली असें.तिला वाटूं लागलें.

एकएकदां दलियेला वाटे, "पुन्हां ताकितबिबीच्यास माहेरीं जावें; पण घरांत जातांना तो म्हातारा जर वाटेंत भेटला तर तें एक संकटच होय. कारण तो नेहमीं पहाटेलाच उठतो तेव्हां रात्र संपतांना मी बाहेरून घरांत आलेली पाहून तो कदाचित् मला बाहेरचालीचीही ठरवील. रात्रीं एकाकी स्थितींत स्त्रियांनीं विशेषत: तरुणींनीं बाहेर फिरूं नये अशी धर्माज्ञा आहे! त्यानें जर मला विचारलें तर मी काय सांगावें बरें? खरें बोललें असतां त्यावर त्याचा विश्वासही बसणार नाहीं."

दलियेनें आकाशाकडे पाहून दीर्घ सुस्कारा सोडला. आकाशांत असंख्य तारका चमकत होत्या, पण चंद्र नव्हता. तारकांच्या अस्पष्ट प्रकाशांत जगाचें छायामय स्वरूप पाहून जग हें असेंच आहे कीं काय असें तिला वाटलें.

बराच वेळ चालल्यावर सवय नसल्यामुळें तिच्यानें पुढें पाऊल टाकवेना तेव्हां एका अश्वत्थवृक्षाखालीं येऊन ती शांतपणानें उभी राहिली. अकस्मात् माणसाची चाहूल लागताच फळें खाण्यासाठीं झाडावर बसलेले रात्रीचर पक्षी फडफड असा आपल्या पंखांचा शब्द करीत तेथून उडून गेले;. पण तेवढ्यानेंच दलियेच्या सर्वांगाचा थरकांप झाला. ती हात जोडून प्रार्थनेच्या स्वरानें म्हणाली, हे दयाघन परमेश्वरा! तूं दीनदयाळू आहेस. निराश्रि-तांचें तूं नेहमीं संरक्षण करीत असतोस. मी तुझीच दासी आहें आणि लहानपणापासून तुझ्यावर विश्वासूनच एकेक दिवस घालवीत आहें. तेव्हां याही प्रसंगीं तूंच माझा संरक्षक हो. अन्तःकरणांतील भीति नाहींशी कर, कारण बुद्धीचा प्रेरकही तूंच आहेस."

अशा प्रकारें जगन्नियंत्या प्रभूची प्रार्थना केल्यावर तिला बरेंच समाधान वाटलें व भीतीहि नाहींशी झाली. इतकेंच नव्हे तर कोणी तरी अदृश्य शक्ति आपलें संरक्षण करण्यासाठीं पाठीशीं उभी आहे अशीही तिची मनो-देवता तिला सांगूं लागली. ती पुन्हां म्हणाली, "देवाचें मला सहाय्य

आहे. मी आतां कुणालाच भिणार नाहीं. वनस्पतीचा आहार आणि पिण्याला निर्झराचें पाणी हीच आतां माझ्या उपजीविकेची सामुग्री होय. "

असा मनाचा निश्चय करून तिनें राजमार्ग सोडला आणि ती एका लहानशा पाऊलवाटेनें जंगलांत शिरली. लतागुल्मांनीं व्यापलेल्या अरण्यांत चालण्याचा तिला बराच त्रास होत होता खरा; पण मनुष्याच्या नजरेला न पडतां एखाद्या वन्य आश्रमांत आपण जाऊन राहावें आणि नंतर काय तें ठरवावें असा तिचा बेत असल्यामुळें तिनें त्या वेलींच्या आणि कांट्याकुट्यांच्या अडथळ्याची पर्वा मुळींच केली नाहीं. ती सारखी चालत होती.

रात्र संपत आली तसतसा प्रकाशानें अंधकाराचा पडदा दूर सारून जगाचें खरें स्वरूप दाखविण्याला सुरवात केली. उषःकालची ती मनोहर दिसणारी सृष्टिशोभा पाहून दलियेला बरेंच समाधान वाटलें; तिचा श्रमपरिहार झाला म्हटलें तरी चालेल. आपण तीन चार कोस तरी चाललों असेल असें तिनें मनांत म्हटलें; पण कुठें आलों हें तिला समजेना.

हिरव्यागार रंगाचीं लहान मोठीं झाडें चोंहोंकडे पसरलेलीं तिला दिसत होतीं. मधून मधून असणारे हंसऱ्या फुलांचे गुच्छही तिचें मनोरंजन करीत होते. थंडगार वाऱ्याची झुळूक तिची ग्लानी दूर सारून चेहेऱ्यावर नवी टवटवी आणण्याची खटपट करीत होती. भालप्रदेशावर व इतर सर्वांगावर चमकणारे घर्मबिंदु नाहींसे व्हावे आणि तिला हुषारी वाटावी म्हणून आसुबाजूचीं झुबकेदार झाडें हालून डोलून तिला वारा घालीत होतीं. एकंदरींत या अपरिचित वनदेवीनें तिचा शक्य तो सत्कार चालविला होता; पण त्या सुकुमार कलिकेला बरेच श्रम झालेले असल्यामुळें तिला हुषारी वाटेना. शेवटीं नाइलाज होऊन जवळच असणाऱ्या एका ओबडधोबड दगडावर बसून ती धापा टाकूं लागली. अरेरे, गरीब बिचारी दलिया !

प्रभातवायूच्या लहरींनीं, बराच वेळ प्रयत्न केल्यावर तिला थोडासा शांतपणा आला. घामही नाहींसा झाला, वाढलेली उष्णताही बरीच कमी झाली आणि अरुणोदय होतो न होतो तोंच त्याच शिलाखंडावर

ती गाढ झोंपीं गेली. हिरव्या गार तरुराजींत काळ्याकुट्ट शिलेवर पडलेलें तें स्वर्गीय सौंदर्याचें दुर्मिळ चित्र प्रथम बालरवीच्या कोमल किरणांनीं कुरवाळलें; पण तिची झोपमोड होईल या भीतीनें तीं किरणें तरुशिखरांवर बसून आपला आनंद व्यक्त करूं लागलीं. सोनेरी किरणांच्या हिरण्यजालांत झोंपीं गेलेली ती देवता केवळ आपल्या मधुरस्मित हास्यानें उमलणाऱ्या फुलांनाही लाजवीत होती. अहाहा, तें दिग्दर्शन कुणा भाग्यवानाला घडेल बरें.

बराच वेळ तिला गाढ झोंप लागली होती; आणि त्या झोंपेमुळें तिचे श्रमही नाहींसे झाले होते. त्यामुळें ती जागी होतांच जेव्हां प्रफुल्लितपणानें इकडे तिकडे पाहूं लागली तेव्हां कधींही न पाहिलेली अपूर्व शोभा तिला दिसली. निर्जन अरण्य इतकें रम्य असेल असें तिला कधींच वाटलें नव्हतें. वनवासी फुलें वनांत उमलतात आणि तेथेंच तीं निर्वाणाला पोंचतात याचें कारण आतां तिला कळून चुकलें. नशिबाची परीक्षा पहाण्याचें धाडस त्यांच्यानें करवत नाहीं.

सगळ्या जगाला काळें फांसणारा तो काळोख आतां नव्हता. रवि-किरणानीं त्याला दऱ्याखोऱ्यांत लपायला लाविलें होतें. वसुंधरा आनंदांत होती. तिच्या अंगावर बुट्टेदार जरतारी शालू शोभत होता. हरित तृणांकुरांनीं वनभूमीवर गालिचा पसरण्याचें पवित्र कार्य केव्हांच उरकलेलें असल्यामुळें ही त्या दिव्य भूमातेच्या स्वागताची तयारी असावी असें वाटत होतें. वनभूमी संपतांच उंचच उंच दिसणारे पहाड पाहून कदाचित् 'तक्क्या लोडांची' गरज भागविण्यासाठीं प्रकृतीदेवीनें या स्वयंभू पर्वतराजांचीच विनवणी केली असावी असें वाटत होतें. पाहाडाच्या धूसर ललाटावर चमकणारा सोनेरी किरणाचा भाग्यशाली सूर्य विश्वदीपकाचें श्रेष्ठ कार्य करीत असावासें वाटत होतें. अहाहा, काय ती शोभा! ही शोभा पाहण्याचा कुणा भाग्यवानाला प्रसंग येईल तो येवो, पण दुर्दैवी दलिया मात्र हें नैसर्गिक सौख्य अनुभवीत होती खरी.

अजमीरची सीमा एका मोठ्या थोरल्या पहाडानें मर्यादित केलेली आहे असें दलियेनें इब्राहीमच्या तोंडून एकदां ऐकलें होतें. तसेंच या पहाडापलीकडून दिल्लीला जाण्याचा मोठा रस्ता आहे असेंहि तिला

त्यानेंच सांगितलें होतें. त्यामुळें पहाडाकडे पहातांच तिला इब्राहीमची आणि दिल्लीला जाण्याची आठवण झाली. ती तिकडे पहातच राहिली.

तिच्यापासून कांहीं अंतरावर असलेल्या एका सखल भागांतून आपलें सर्वांग झाडांझुडपांनीं झांकून घेऊन व हृदयावर पाषाणाचें दडपण घालून एक लहानशी गिरिनदी कलसंगीत गात मृदुमंदगतीनें चाललेली होती. कदाचित् धाडधाड उड्या मारून ती थकली असेल असेंहि म्हणायला हरकत नाहीं. त्या गिरिनदीचा मार्दवयुक्त येणारा तो कलनाद मंजुळ वीणाझंकाराप्रमाणें दालियेच्या व्यथित व क्षुधित अन्त:करणाला रंजवीत होता. तिला तो प्रेमाचें आमंत्रणच करीत आहे असें वाटलें. त्यांत किती करुणा आणि आदर भरलेला होता तो तिच्यासारख्या दु:खी जीवालाच माहीत!

दालिया त्या शिलेवरून उठली आणि त्या प्रवाहाच्या अनुरोधानें निघाली. कांहींशी दूर गेली तोंच ती स्निग्ध शीतल प्रवाहानें अलंकृत झालेली क्षीणांगी गिरिनदी तिला आढळली. थोडकेंसें पाणी असलेल्या त्या तटिनीच्या तीरावर व्याधांनीं आणि गुराख्यांनीं लहानमोठे दगड जमवून एक साधारण मजबूतसा घांटही बांधलेला असल्याचें तिनें पाहिलें. पर्वतावरून धाड्धाड् उड्या टाकून आलेल्या त्या नदींतील पाणी कावळ्याच्या डोळ्याप्रमाणें स्वच्छ निर्मल असल्यामुळें तिला आनंद झाला आणि आपलीं वस्त्रें एका उंच दगडावर ठेवून तिनें मोठ्या उत्साहानें पाण्यांत उतरून स्नान केलें. स्नानानंतर तिला बरीच हुषारी वाटली. त्यामुळें वस्त्र परिधान करतांना तिला विलक्षण उत्साह वाटत होता. कपडे धुण्याचें वगैरे काम आटोपल्यावर मनांतल्या मनांत देवाची प्रार्थना करीत ती तेथेंच बसली. तेथून जनपदांत जावें असें तिला मुळींच वाटेना.

मनुष्य एकांतात बसून राहिलें म्हणजे त्याला निरनिराळे विचार सुचतात. आणि विचार हाच त्याचा सोबती बनतो. दालियेचेंहि तसेंच झालें. तिला निरनिराळ्या प्रकारचे विचार त्रास देऊं लागले. ती मनांत म्हणाली, "मी जें केलें तें योग्य आहे का? ताकितबिबीच्या माहेरीं या वेळीं मोठी गडबड उडाली असेल! मी तरी काय करणार! मला तिथें राहातां येणें शक्य नव्हतें. जुल्दसकडून ही बातमी मुबारकाला समजली असेल आणि तो मला शोधण्यासाठीं चोहोंकडे फिरत असेल.

अशा तऱ्हेनें निघून येण्यांत मी अविचारच केला म्हणायचा; पण आतां शोक करून तरी काय उपयोग!

" हें जंगल केवढें मोठें असेल कुणाला माहीत! अशा तऱ्हेनें इथें बसून माझ्या जेवणाची व्यवस्था कशी होणार! आणि पोटांत कांहीं नसलें तर चालणार तरी कसं? हाय! हाय!" या सगळ्या गोष्टींचा मी प्रथमच विचार करायला पाहिजे होता.

" खुदा! मी तरी नसत्या विचारांनीं मनाला कां त्रास देऊं! तुझ्या मनांत जें असेल तें होईल. या अरण्यांत किती तरी सुंदर फुलें फुलतात आणि कोमेजून जमिनीवर पडतात त्याच्याबद्दल कोणीं कधीं दोन अश्रु तरी टाकतात का? झालें तर, मी या अरण्यांत अशीच मरून गेलें तरी हरकत नाहीं. मला आतां कोणतीं सुखेंहि भोगावयाचीं नाहींत आणि कसली आशाही पुरवावयाची नाहीं. जें पाहिलें आणि अनुभविलें तें पुष्कळ झालें! जग हें असेंच आहे.

" मी कुणासाठीं जगूं? मी एक नसती आशा मनांत धरून जगाला गवसणी घालण्याचा प्रयत्न करीत आहें; पण माझी ती आशा कधीं तरी पूर्ण होईल का? इब्राहीमसाहेब मला आश्रय देतील असें मी मानावें का? मला कुलशील नाहीं, आणि जन्मभूमी माहीत नाहीं; मग ते माझा कसा स्वीकार करतील. शिवाय दर्या तुमच्यावर प्रेम करतें हें तरी कुणी कधीं त्यांना सुचविलें आहे! त्यांना माझ्यावरच प्रेम करावें आणि मलाच आश्रय द्यावा असें माझ्यांत तरी विशेष काय आहे? छे, छे; नकोत या यातना. भविष्यकाल सुखाचा होईल असें मला वाटत नाहीं."

" कधीं कधीं मला लहानपणची आठवण होते; पण ती अगदीं एकाद्या फार कालापूर्वी पाहिलेल्या सुखस्वप्नाप्रमाणें! सगळें कांहीं अस्पष्ट! मला केव्हां केव्हां वाटतें, मी जशी आहें तशी नव्हतें. आणि पुढेंहि अशीच राहाणार नाहीं. मग लहानपणापासूनच परिवर्तित होत जाणारी अशी मी कोण? माझा लहानपणचा इतिहास मला कोणी सांगेल का? खुदा! या भ्रमांतून मला मुक्त कर. माझ्यानें ही अस्पष्ट स्थिति सहन करवत नाहीं. तुझ्या कृपेवांचून कांहींच होणार नाहीं."

अशा प्रकारचे सुखदुःखमय विचार तिच्या मनांत येत असतां तिला

मागें कोणाचा तरी पायरव ऐकूं आला. त्याबरोबर लागलीच तिनें मागें वळून पाहिलें तों एक अत्यंत सुंदर तरुण आपल्याकडेसच येत असलेला तिला दिसला.

हा तरुण बराच वेळपर्यंत एका झुडपाच्याआड उभा राहून दालियेचें अतुलनीय सौंदर्य पाहात होता. तें स्वर्गीय सौंदर्य पाहून तो देहभानही विसरला; पण इतक्या दूरवर उभें राहून त्याचें समाधान होईना; तेव्हां तिच्याजवळ आला. त्या निर्जन अरण्यांत एकाकी स्थितींत असलेली ती सौंदर्यदेवता त्याला अपूर्व वाटली.

त्या अपरिचित तरुणाला आपल्याकडे येतांना पाहून दालियेला संकोच वाटला. आणि तिनें आपली ओढणी सांवरली व दूर सरून उभी राहिली. तेव्हां त्या तरुणानें हास्ययुक्त मुद्रेनें तिला प्रश्न केला, " देवी ! आपलें नांव मला समजेल का ? अनेक वेळा स्वर्गीय देवता असल्या या अरण्यांत मनोरंजनार्थ फिरत असतात असें मी ऐकलें आहे. तुम्ही अशांपैकींच कोणी आहां का ? माझ्याकडून तुमचें कोणतेंहि काम होण्यासारखें असल्यास तें मी करायला तयार आहें. तुमच्यासारख्या देवतांची अल्पस्वल्प सेवा घडली तरी मला समाधान वाटेल.

त्या तरुणाच्या या प्रश्नानें व भाषणानें दालिया फारच लाजली. त्याला उत्तर काय द्यावें तें तिला सुचेना. तरी पण कांहीं तरी बोललें पाहिजे असा विचार करून ती हळूच म्हणाली, " मला आपला परिचय झाल्यास फार आनंद वाटेल. "

तो म्हणाला, " माझें नांव महंमद अली. हा डोंगरी मुलूख माझ्याच वडलांच्या ताब्यांत असून ते या प्रदेशाचे राजे आहेत. मी त्यांचा एकुलता एक मुलगा. थोड्याशा मंडळीसह शिकारीकरितां इकडे आलों. सैनिक लोक चोहोंकडे पसरले असून मी विश्रांतीसाठीं इकडे येत होतों, तों अकस्मात् तुम्हांला पाहिलें. असल्या या निबिड जंगलांत आपल्यासारख्या स्त्रीनें एकाकी स्थितींत स्वच्छंदानें बसावें हें मला थोडेंसें आश्चर्यकारक वाटल्यामुळें नांव विचारण्याचें धाडस केलें. आतां तरी मला आपली ओळख होईल काय ? "

" माझी ओळख ती काय व्हायची ! मी अगदीं गरीब आणि निरा-

श्रित अशी एक स्त्री आहे. जगांत मला आपलें म्हणायला कोणीही नाहीं. माझा खरा आश्रयदाता परमेश्वर असून तो या नीलनभोमंडळांत राहून माझा सांभाळ करीत असतो. एका सभ्य कुटुंबांत मला एकदां आश्रय मिळाला होता; पण तेथीलच एका पशुवृत्तिसंपन्न दुश्चरित तरुणाची अन्याचारी वागणूक नजरेला आल्यामुळें केवळ स्वतःचें कौमार्य व अब्रू बचावण्यासाठीं मी या जंगलाचा आश्रय केला. मानवी संस्कृतींत मुरलेला किळसवाणा अनाचार कल्पनातीत रीतीनें मला कळूं लागल्यामुळें मी हा मार्ग पत्करला. या ठिकाणीं मला हिंस्त्रश्वापदांच्या भक्ष्यस्थानीं पडावें लागलें तरी तें मी माझें भाग्य समजेन. जगन्नियंत्यावर माझा पूर्ण विश्वास असल्यामुळें येथें स्वच्छंदानें फिरण्याचें मला धैर्य आलें. माझ्या मनोवृत्ती या निसर्गाशीं तादात्म्य झालेल्या असल्यामुळें मला भीति वाटत नाहीं."

"तुमचें नशीब चांगलें म्हणूनच मला इकडे येण्याची बुद्धि झाली. कारण हें जंगल इतकें विस्तीर्ण आणि बिकट आहे कीं, यांतून बाहेर पडण्याचा मार्गच मिळणार नाहीं. जनपदाची गोडी ज्या जीवानें चाखली नाहीं त्यालाच या जंगलांत सुख वाटेल! तुम्हांला आज जरी बरें वाटत असलें तरी आणखी एक दोन दिवसांनीं तुम्हांला ही स्थिती असह्य होईल. जनपदांत सर्वच लोक अविचारी असतात असें नाहीं. तुमच्या दुर्दैवानें तुम्हांला तसा अनुभव आला असेल; पण नेहमींच तसें होतें असें नाहीं. तेव्हां तुम्हीं मर्जीला वाटल्यास माझ्याबरोबर चला. चालवत नसेल तर एखादा मेणाही आणवितों कारण माझ्याजवळची तुतारी वाजविली कीं माझे लोक येथें जमा होतील. माझ्या घरीं माझी आई आणि वडील आहेत. तीं दोघेंही तुम्हांला आपल्या मुलीप्रमाणें सांभाळतील. या ठिकाणीं निष्कारण मरून जाण्यांत काय अर्थ आहे? तेव्हां माझें ऐका आणि माझ्याबरोबर चला."

महंमदअली चांगला सद्गुणी, बुद्धिमान, परोपकारी आणि सुशिक्षित तरुण होता. त्यामुळें थोडक्याशा बोलीभाषणानें दलियेच्या मनावर त्याच्या संबंधानें चांगला परिणाम झाला. त्याचें बोलणें चालणें मर्यादित आणि सभ्यपणाचें असल्यामुळें घराणें खानदानीचें असावें अशी तिची खात्री झाली. इतकेंच नव्हे तर घोर निराशेंत तिला आलेला [illegible]

आपल्या भाषणावर हिनें कोणत्याही प्रकारानें प्रतिवाद केला नाहीं तेव्हां ही आपल्या कृत्याला अनुकूल आहे असें समजून त्यानें आपल्या नोकरांना बोलाविलें आणि जवळच्या गांवांतून एक मेणा आणवून तिला म्हटलें, " मेण्याचे भोई माझ्या परिचयाचे आहेत तरी पण आपल्या समाधानासाठीं मी तुमच्याबरोबर माझ्या हाताखालचा एक मनुष्य देतों. तो तुम्हांला आमच्या वाड्यांतील अन्तःपुरांत माझ्या आईजवळ नेऊन पोंचवील. तुम्ही कोणत्याही प्रकारची काळजी न करतां संशयित न होतां या मेण्यांत बसा. साहसी बनल्यावांचून कोणालाहि उर्जितावस्था येत नसते. तेव्हां तुम्ही हेंहि एक धाडस आहे असें समजा आणि चला. "

दलियेलाही त्याचें तें म्हणणें पटलें आणि ती महंमदअलीचे आभार मानून मेण्यांत बसली. जगांत सगळेच हिकमतवान आणि उमरशेख नसतात असें ती मनांत म्हणाली आणि या तरुणाचे तिनें मनांतल्या मनांत आभार मानले. भोयांनीं मेणा उचलला आणि ते चालूं लागले महंमदअलीनें दिलेला मनुष्य बरोबर होताच.

वांकडीं तिकडीं वळणें घेऊन चांगला चार पांच घटका प्रवास केल्यावर त्या वेळीं भोयांनीं तो मेणा महंमदअलीच्या वाड्याशीं आणला. मेणा खालीं ठेवतांच दलिया बाहेर आली व सोबतच्या वृद्ध परिचारकाबरोबर ती त्याच्या सांगण्याप्रमाणें एकदम अन्तःपुरांत गेली. त्या परिचारकानेंहि कुणाला कांहीं सांगितलें नाहीं; पण अन्तःपुरांत जातांच आपल्या मालकिणीला अर्थात् महंमदाच्या आईला त्यानें तिच्या मुलाचा निरोप सांगितला आणि तो सलाम करून बाहेर आला.

त्याची मालकीण थोरामोठ्यांची मुलगी आणि थोरामोठ्यांची गृहिणी असून जगांत तिनें पुष्कळ दिवस घालविलेले होते. तिच्या नवऱ्याला चार लोकांत चांगला मान होता. मात्र तिला महंमदअलीवांचून दुसरें अपत्य नसल्यामुळें ती नेहमीं थोडीशी उद्विग्न दिसत असे; तरी पण आपलें हें दुःख लोकांच्या लक्षांत येऊं न देण्याची ती खटपट करी. दलियेचा सुंदर चेहरा आणि तिची आंगलोट पाहून तिला कन्यावात्सल्य उत्पन्न झालें. व तिनें मोठ्या प्रेमानें तिला जवळ घेऊन तिच्या तोंडावरून व पाठीवरून हात फिरविला. दलियेलाही आपली आईच आपणाला भेटली असें वाटलें.

दोघींच्याही नेत्रांत प्रेमाश्रु आले.

घरची मालकीण दालियेचा हात आपल्या हातांत घेऊन प्रेमस्वरानें म्हणाली, "वा:, तूं तर फारच सुंदर आहेस! मला असली मुलगी मिळाली हे मी माझें मोठें भाग्य समजतें. मुली, तुला इथें मुळींच त्रास होणार नाहीं बरें का! तूं जरी आपल्या विपन्नावस्थेत माझ्या घरीं आली आहेस तरी तुझी कोणत्याही प्रकारें अवहेलना होणार नाहीं. माझा महंमद फारच शहाणा आहे! त्यानें तुला इकडे पाठविली हें चांगलेंच केलें. नाहीं तर पोरी, तूं हिंस्र श्वापदांच्या भक्ष्यस्थानीं पडून जगाला मुकली असतीस. तूं इथें अगदीं घराप्रमाणेंच राहा."

घरवालीचा तो प्रेमळपणा पाहून दालियेला बरेंच समाधान वाटलें. आपणाला कोणा तरी चांगल्या कुटुंबाचा आश्रय मिळाला आहे, अशी तिची खात्री झाली. नंतर तिनें गरम पाण्यानें आपलें स्नान आटोपलें व घरवालीनें दिलेलें रेशमी वस्त्र नेसून आनंदित अन्त:करणानें भोजनही संपविलें. रात्रभर झालेला त्रासही नाहींसा झाला. त्यामुळें तिला समाधान वाटलें.

महंमदअल्लीची आई फारच दयाळू असून आपल्यावर ती आईप्रमाणें प्रेम करते असें जेव्हां दालियेच्या नजरेला आलें तेव्हां ती सद्गदित होऊन तिला म्हणाली "मला कोणी नाहीं; पण आज मात्र मला माझी आई आहे असें वाटूं लागलें. कारण जर ती असती तर तिनें आपण आज जशी मला जवळ घेतली तशीच घेतली असती. मला आज कृतार्थ झालेंसें वाटतें. माझ्यासारख्या अभागिनीची कोण कशाला दाद घेणार होतें!! मी आतां आपणाला आई म्हणूनच हांक मारणार आहें."

दालियेचें हें बोलणें आणि साधे विचार ऐकून ही कोणातरी थोरामोठ्यांच्या कुळांतली असावी व दुर्दैवानें हिला हे वाईट दिवस आले असावेत असें घरवालीला वाटलें. कारण जसें तिचें सौंदर्य लोकोत्तर होतें तसेंच तिचें हृदयही असावें अशी तिची खात्री झाली. ती स्मितहास्यपूर्वक तिला म्हणाली, "मी एका मुलाची आई असल्यामुळें मला एक मुलगी असावी असें बरेच दिवसांपासून वाटत होतें; पण तूं अकस्मात् येथें आल्यामुळें ती माझी हौस देवानें पुरविली आहे. तुझ्यासारख्या सर्वांगसुंदर

व सुविचारी मुलीची मी आई झाले हें मला मोठें भूषण वाटतें. घराचे मालक लवकरच इकडे येतील. तेहि तुला पाहून संतुष्ट झाल्यावांचून राहणार नाहींत. मी त्यांना तुझी सर्व हकीगत सांगेन. त्यांना त्यापासून सुख वाटल्यावांचून राहणार नाहीं. "

वाड्याची मालकीण अशा तऱ्हेनें बोलत आहे तोंच नवाबसाहेब तेथें आले आणि हंसत हंसत म्हणाले, " माझ्या सुखासाठीं काय बरें नवी तजवीज केलेली आहे ? "

नवाबसाहेबांच्या बिबीसाहेब मधुरस्वरानें म्हणाल्या, " आपणाला एकादी सुंदर मुलगी असावी असें वाटत नव्हतें का ? ती आपली इच्छा खुदानें पूर्ण केली आहे. ही पहा मुलगी ! "

नवाबसाहेब वयातीत होते; पण कांति तेजस्वी असून त्यांच्या मुद्रेवर तरुणांचा उत्साह खेळत होता. ते दालियेकडे पाहून विस्मयानें म्हणाले, "वा:, आहे खरी फार चांगली मुलगी ! कुठें मिळाली ही ! "

त्यांच्या पत्नीनें त्यांना ' ती आपल्या महंमदअल्लीला कशी मिळाली, व त्यानें तिला इकडे कशी पाठविली ' वगैरे हकीकत सांगितली. तेव्हां ते प्रसन्न चेहऱ्यानें म्हणाले, " असल्या उदार अन्त:करणाच्या मुलाचा बाप होण्यास मला फारच भूषण वाटत आहे. त्यानें या प्रसंगीं योग्य तेंच वर्तन केलें ! तो फारच कनवाळु मनाचा आहे. बरें बाळे, तुझें नांव काय ?"

दालिया लाजत लाजत हळूच म्हणाली, " माझें नांव दालिया ! "

" वा:, नांवहि फार सुंदर आहे. " नंतर ते आपल्या पत्नीकडे वळून म्हणाले, " तूं आतां हिला आपली मुलगीच मानली आहेस तेव्हां विशेष कांहीं सांगायला नको आहे. आपल्यासारख्यांच्या दर्जाला योग्य अशीच तूं हिची व्यवस्था ठेव म्हणजे झालें " असें म्हणून ते आपल्या महालांत निघून गेले. कारण ही त्यांची विश्रांतीची वेळ होती.

त्या पतिपत्नींचें बोलणें चालणें व मोकळेपणाचें वर्तन पाहून दालियेला पराकाष्ठेचें समाधान वाटलें. मनुष्यत्वाचा एक श्रेष्ठ आदर्श आपण पहात आहों, 'असेंहि ती मनांत म्हणाली, आपणाला योग्य मनुष्याचा आश्रय मिळाला असें पाहून तिला आनंद झाला.

संध्याकाळीं महंमदअल्ली घरीं आल्यावर त्याची आई त्याला म्हणाली.

" फार चांगली मुलगी शोधून आणलीस बाळ, तुझ्या इच्छेप्रमाणें मी तिची सर्व व्यवस्था ठेवण्याचें पत्करलें आहे; तिच्या बाबतींत तूं अगदीं काळजी करण्याचें कारण नाहीं.

त्यावर महंमदअली म्हणाला, " आई, मला वाटतें ती कोणा तरी अमीरउमरावाची मुलगी असावी. बिचारी दुर्दैवाच्या तडाक्यांत सांपडून आपल्याकडे आली आहे. तेव्हां तिला कोणत्याही प्रकारचा अभाव वाटणार नाहीं अशी तिची व्यवस्था ठेव म्हणजे झालें जर आपण अशा विपन्नावस्थेंत पडलेल्या माणसांच्या गरजा भागविणार नाहीं तर आपली ही श्रीमंती काय उपयोगाची ! तिची मर्जी असेल, तितके दिवस ती येथें राहूं दे. "

दाराबाहेरून दलिया हें सर्व भाषण ऐकत होती तिला महंमदअलीबद्दल फारच आदर वाटूं लागला. तिनें त्याला मनांतल्या मनांत असंख्य धन्यवाद दिले. " इतक्या दिवसांनीं ईश्वर माझ्यावर प्रसन्न झाला म्हणायचा ! " असेंहि ती अस्पष्ट स्वरानें म्हणाली.

ही तिची पहिली स्थिति झाली. प्रथमच्या दिवसांप्रमाणें दुसराही दिवस गेला आणि हां हां म्हणतां एक आठवडा सपून कित्येक पंधरा दिवस झाले. दालियेला कोणत्याही प्रकारची कमतरता नव्हती; पण जसजसे दिवस जाऊं लागले तसतशी तिची अस्वस्थता वाढत चालली. तिच्या अन्तःकरणाला येथें समाधान वाटेना. ती घरांतील कामकाज करी. नोकरचाकर तिला मान देत, नबाबसाहेब तिचे लाड करीत आणि त्यांची पत्नी तिला आईप्रमाणें असे; पण तिचें हृदय त्यांत रमत नव्हतें. आपणाला आणखी कांहीं तरी पाहिजे आहे असें तिला वाटत होतें. ती जनानखान्यांत आल्यापासून महंमदअलीनें तिकडे जाण्याचेंहि टाळलें. कारण पुरुषांच्या बाबतींत दलियेचा अनुभव अगदींच विचित्र असल्यामुळें तिचें मन कोणत्याही प्रकारें दुखवूं नये, असें त्याला वाटत होतें. शिवाय 'नजरानजर झाल्यास बोलण्याचालण्यांत बेभानपणानें कमजास्त शब्द यावयाचा' अशीही त्याला भीति वाटत असे. ती आपल्याकडून होईल, ती महंमदअलीची खाण्यापिण्याची व्यवस्था करी; पण तोच आपण होऊन तिच्यासमोर जाण्यायेण्याची टाळाटाळ करीत असे. तिच्या त्या दिव्य

सौंदर्याचा आपणावर कांहीं तरी परिणाम होईल अशी त्याच्या मनाची समजूत झाली होती कीं काय न कळे!

घरांतील सगळें कामकाज संपलें आणि सगळी मंडळी झोंपीं गेली म्हणजे दालिया बिछान्यावर अंग टाकी, पण निरनिराळ्या विचारांमुळें तिला झोंप लागत नसे. वारंवार इब्राहीमसंबंधाचेच विचार तिला जागवीत होते. शेवटीं धैर्य धरून तिनें आपल्या एकंदर स्थितीचें एक करुणापूर्ण पत्र लिहिलें आणि तें मुबारकामार्फत इब्राहीमसाहेबांकडे पाठवून देण्याचें ठरवून ती त्या कामाला एकादा मनुष्य मिळतो कीं काय तें पाहूं लागली.

सुदैवानें घरांतच बारीकसारीक कामें करणारा इस्कंदर नांवाचा एक मुलगा होता तो तिच्या विनंतीला कबूल झाला. पोरगा मोठा हुषार आणि चलाख असल्यामुळें तिला त्याच्याबद्दल बरीच खात्री वाटत होती. त्यामुळें तिनें मुबारकाकडे पत्र कसें पाठवावयाचें व तो कुठें भेटेल हें त्याला समजावून दिलें, व बक्षिसाची मोठी थोरली लालूच दाखवून तूर्त वाट खर्चासाठीं तिनें त्याच्या हातावर दोन रुपये ठेवले आणि त्याला अजमीरला रवाना केलें. 'काम फत्ते करून येतों.' असें आश्वासन देऊन तो घराच्या बाहेर पडल्यावर तिला थोडेंसें समाधान वाटलें. व आपलें पत्र वांचून इब्राहीमसाहेबांना काय वाटेल याच विचारांत ती मग्न झाली.

---

# प्रकरण ३५ वें.



## पुन्हां सांपडली.

आतां आमचें इथलें बहुतेक काम संपलेंच आहे. तेव्हां आपण अजमीरला जाऊं कसें ? "

"नाहीं इसाक ! मी अजमीरला इतक्यांत येणार नाहीं. जें कांहीं करावयाचें असेल तें तूंच कर. त्या सैतानी उमरशेखचें मी तोंडहि पाहणार नाहीं "

"वा:, असें कसें होईल ! तूं तेथें येण्यांत आतां तुलाच मोठेपणा आहे उमरशेसची रक्कम देऊन दलियेला आपल्या घरीं आणतांना तुला समाधान वाटणार नाहीं का ? लोकांनाहि अचंबा वाटेल ! "

"नको. जो होऊं नये तो व्यवहार झाला पण त्याच्या ताब्यांत असलेली दालिया माझ्यानें पाहवणार नाहीं. ती स्वतंत्र होऊं द्या. तोंपर्यंत मला तूं तिकडे येण्याचा आग्रह करूं नको."

"बरें. इतका जर तुझा निश्चयच झाला असेल तर मी तुला जास्त आग्रह करीत नाहीं; वजिराकडचा हुकूम घेऊन मी अजमीर—फौजदारामार्फत काजीकडे अंमलबजावणीसाठींच पाठवितों, म्हणजे त्यांनाच त्याबद्दल एक प्रकारचा विस्मय वाटेल. हें सगळें कृत्य त्या खुदादच्याच हातून मी करवतों. पाहूं या तो कारस्थानी थेरडा आतां काय काय मौज करतो ती. हा हुकूम पहातांच तो दांतओंठ चावीतच बसेल. तूं इथेंच रहा."

"अशी चांगली सोय असतांना तूं मला कां बरें इतका आग्रह करीत होतास ? "

"अरे आग्रह कसला ! तूं आला असतास तर नीच लोकांची कशी दुर्दशा उडते तें तुला पहायला सांपडलें असतें. दिलियेच्या बाबतींत तुला त्यानें बराच त्रास दिलेला आहे तेव्हां त्याचें फळ त्याला कसें मिळतें तें तुला दिसलें असतें. तुझ्या या इतक्या आपत्तीला कारण तोच झाला ना ? मग त्याची कशी फाजिती होते, हें तूं कां पाहूं नये ?"

"जाऊं द्या. मागच्या गोष्टी काढून झगडण्यांत काय अर्थ आहे ! या जगांत केवळ सहन करण्यासाठींच माझा जन्म झाला आहे असें तूं म्हटलेंस तरी चालेल. माझ्या दलियेची एकदां त्या दुष्टाच्या दास्यत्वांतून मुक्तता झाली म्हणजे झालें. मला आणखीं कशाचीच जरूरी नाहीं! "

"तर मग मी आज दुपारीं अजमीरला जातों. त्या सर्वांची काळीं कृत्यें चवाठ्यावर आणण्याला हें एक साधन बरेंच आहे म्हणायचें. "

"जा. खुदा तुझें कल्याण करो यशस्वी होऊन ये. मी तुझी मार्गप्रतीक्षा करीत येथेंच राहातों. नीचाच्या दास्यत्वांतून दलियेची मुक्तता झालेली पाहाणें हेंच माझें मुख्य कर्तव्य आहे.

वरील भाषण इसाकउद्दीन आणि इब्राहीम या दोघांत चाललें होतें, हें सांगायला नकोच. मित्रकार्यासाठीं इसाकउद्दीनची धडपड चाललेली होती. पण ती यशस्वी झाला काय ?

छोटा इस्कंदर दालियेनें दिलेलें महत्त्वाचें पत्र घेऊन निघाला तो दरकुच दरमजल करीत अजमीरच्या रोखानें चालला. शहर कांहीं फारसें लांब नव्हतें; पण त्या दहा पंधरावर्षाच्या मुलाला तो जंगली मार्ग फारच त्रास-दायक झाला. शेतकऱ्यांचीं मुलें काटक असतात खरीं; पण इस्कंदरला उन्हांतान्हांत फिरण्याची संवय नव्हती. त्यामुळें शहरानजीक येतो न येतो तोंच तो अगदीं दमून गेला आणि रस्त्याच्या बाजूलाच असलेल्या एका साधारण दर्जाच्या काफिगृहांत जाण्यासाठीं बाजूला वळला.

हा काफीखाना शहराच्या बाहेर असल्यामुळें कुटाळ चांडाळचौकडी नेहेमीं येथें बसलेली असे, त्यामुळें दुराचारी व कारस्थानी लोकांनाही त्यांत जागा मिळे. काफीखान्याचा मालकही त्यांतीलच होता म्हटलें तरी चालेल. कारण आपल्या पानगृहांत चाललेले सगळे प्रकार तो उघड्या डोळ्यांनीं पाही व गुप्त ठेवी. त्यामुळें त्या लोकांना एक प्रकारची मदतच होई म्हटलें तरी चालेल.

इस्कंदर आंत येतांच त्यानें प्रथम मालकाला शोधून काढलें आणि म्हटलें, " मी बराच लांबून आल्यामुळें अगदीं दमून गेलों आहें; तेव्हां एक पेला चांगली कॉफी आणि थोडासा फराळ योग्य किंमतीनें मला मिळाल्यास मी आपला आभारी होईन. "

हें कुळ नवीन असून येथें अपरिचित आहे, अर्थात् आपणाला लाभही बराच होईल, अशी दुकानदाराची खात्री झाल्यामुळें त्यानें मुलाला एका स्वतंत्र खोलींत नेऊन वेत्रासनावर बसविलें. तेथेंच आणखीं दोन मनुष्य बसून काफी पीत होते. आपल्यासारखे हेहि कोणी प्रवासी असावेत असें इस्कंदरला वाटलें व तो निर्भीडपणानें तेथें बसला. या दोन मनुष्यां-पैकीं एक उमरशेख असून दुसरा आसगरअल्ली होता. दोघेही दालियेच्या शोधांत असून उमरशेखच्या अन्तःकरणाला एक प्रकारची तळमळ लागून राहिलेली होती.

दुकानदारानें त्याला तेथें बसवून म्हटलें, " छोटेसाहेब ! तुम्हीं येथें बसा बरें का ! मी तुम्हीं सांगितलेले पदार्थ आणतों. "

मागाहून पैसे द्यावयाचे हें त्या मुलाला काय माहीत ! त्यानें चटकन् आपल्या जवळ असलेले रुपये त्याच्या हातांत दिले आणि म्हटलें, " तुझे जे पैसे होतील ते यांतून घे आणि शिलुक राहातील ते माझ्याजवळ दे. "

दुकानदार हंसतच निघून गेला आणि त्यानें कांहीं खाण्याचे पदार्थ व कॉफी आणून त्याच्यासमोर ठेवली व म्हटलें, " या सर्वांची किंमत एक रुपया आहे. "

मुलानें समाधानपूर्वक मान हालविली; पण आसगर आणि उमरशेख यांना त्याच्याबद्दल आश्चर्य वाटलें हा गरीब असून याच्याजवळ इतके पैसे कोठून आले; शिवाय मालाच्या किंमतीबद्दलच्या अज्ञानावरून हा कधीं शहरांत आला असावा असेंहि वाटत नाहीं. उमरशेखला तें एक कौतुकच वाटलें. कारण कृपण मनुष्याला पुष्कळ पैसा खर्च झालेला पहावत नसतो. तो ह्या मुलाकडे वळून म्हणाला, " छोकरा ! तूं कुठचा राहाणारा ? "

मुलानें चटकन् उत्तर दिलें, " हुजूर ! मी या शहरचा राहाणारा नव्हे. आणि इकडे कधीं आलोंहि नाहीं; मी तिकडच्या लांबच्या डोंगरी मुलखांत राहाणारा असून तेथील नबाबाकडे मला नोकरी आहे. दलियाबिबीनें दिलेलें एक पत्र घेऊन तें मुबारकाला देण्यासाठीं मी इकडे आलों. आतां शहरांत जाऊन त्याचा तपास करणार. "

मुलाच्या तोंडचे शब्द ऐकतांच दोघांनींहि एकमेकांकडे पाहून नेत्रसंकेत केला, उमरशेखनें दलियेचा पुष्कळ ठिकाणीं तपास केला होता; पण ती त्याला मिळाली नसल्यामुळें तो अगदीं उद्विग्न झालेला होता. अशा वेळीं हा अचानक तपास लागलेला पाहून त्याला फारच आनंद झाला; पण स्वतःचा तो मनोभाव व्यक्त न करतां त्यानें इस्कंदरला पुन्हां प्रश्न केला, " मुबारक आणि इब्राहीम एके ठिकाणीं राहतात हेंहि कदाचित् दलियाबिबीनें तुला सांगितलेंच असेल. तेव्हां इब्राहीमसाहेबांकडे देण्यासाठींच हें पत्र मुबारकाकडे द्यावयाचें असेल नाहीं का ? "

इस्कंदर उत्साहपूर्ण स्वरानें म्हणाला, " वा:, आपण तर त्यांच्या अगदीं घरचेच दिसतां. आपली भेट झाली हें एका अर्थी चांगलेंच झालें

म्हणायचें. तुम्हीं मला मुबारकाचें घर दाखवाल का ? निष्कारण इकडे तिकडे फिरायचा तरी नको. ”

उमरशेखला तेंच पाहिजे होतें. तो स्मित हास्यपूर्वक म्हणाला, “ तूं मोठाच नशिबवान् आहेस. कारण तूं ज्याच्या तपासाला जाणार आहेस तोच मुबारक मी. दालियाविषींची बरेच दिवस बातमी नसल्यामुळें मी अगदीं काळजी करीत होतों; तूं माझी ती काळजी दूर केलीस याबद्दल मी तुझा आभारी आहें. हें माझेंच कार्य असल्यामुळें तूं माझ्या घरचा पाहुणा आहेस तेव्हां या खाण्याच्या खर्चाबद्दल हा घे तुझा रुपया. हा तुला दिला आहे. ”

असें म्हणून उमरशेखनें एक रुपया इस्कंदरच्या हातांत दिला. इस्कंदर फसला. कारण उमरशेखचें बोलणें त्याला खरें वाटलें. व रुपया घेऊन आपल्या जवळचें महत्वाचें पत्र त्यानें त्या नीचाच्या स्वाधीन केलं; शिवाय तो म्हणाला, ‘ आपण इथेंच भेटलां हें बरें झालें. मला आतां इथूनच मागें जायला हरकत नाहीं. ”

उमरशेखनें तें पत्र वाचलें. त्यांत तिनें आपलें राहाण्याचें ठिकाण वगैरे लिहिलेलेंच होतें. पत्र वाचून त्याला फार आनंद झाला. त्यानें आणखी चार आणे त्या मुलाच्या हातावर टेवले आणि इतक्या लांब चालून आल्याबद्दलची ही बक्षिशी आहे असें तो त्याला म्हणाला. तेव्हां तर इस्कंदर ज्यास्तच खूष झाला; पण त्या सरळ मनाच्या पोराला माहीत नव्हतें कीं, ‘आपण आपल्या हातानें दालियेला शत्रूच्या हातांत देत आहों. दुर्दैव बिचाऱ्या दालियेचें. समाजांत वागतांना मोटमोठ्या लोकांची चूक होते मग या मुलाची चूक झाली यांत आश्चर्य कसचें ! तो तर बोलून चालून गांवढळ पोर ! त्याला दुष्ट लोकांचे डावपेंच कसे कळणार !

आपण ज्या कामाला आलों तें कल्पनातीत रीतीनें सिद्धीला गेल्याचें पाहून मुलाला आनंद झाला व उमरशेखला सलाम करून तो घरीं जाण्यासाठीं दुपारींच मागें फिरला. उमरशेखही आसगरच्या मदतीनें पुढें कसें काय करावें, दालियेला तेथून कशी आणावी वगैरे विचार करण्यांत गढून गेला; पण यांत आपल्या सहाय्य कर्त्या काजीचा विचार घेतल्यावांचून आपण कांहींच निश्चित करूं नये असें आसगरचें मत पडल्यामुळें उमर-

झेखनें तें मान्य केलें व रात्रींची खास बैठक खुद्द काजीच्या खासगी जागेंतच करावी असें तो म्हणाला.

*   *   *   *   *   *

रात्रींची वेळ असली तरी इसाकसारख्या धाडशी माणसाला त्याची कसली भीति वाटणार? तो फत्तेपुराहून निघाला त्यावेळीं साधारण दुपार टळून गेली होती. त्यामुळें अजमीरला येऊन पोंचण्याला त्याला रात्र झाली. आपल्या स्नेह्याच्या घरीं मुक्काम ठेवून जेवणखाण आटोपल्यावर त्यानें बेमालूम वेषांतर केलें आणि काजीची भेट घेण्यासाठीं त्याच्या घरीं गेला. बादशहाचा दायाद जमालखान लोदी हा नेहेमीं काजीच्या घरीं येऊन कांहीं तरी गुप्तवेत करीत असतो हें त्याला माहीत असल्यामुळें त्यानें आपण आल्याची एकदम वर्दी न देतां गुप्तरीतीनें घरांत प्रवेश करून घेण्याचें ठरविलें व सर्वांग काळया बुरख्यानें झांकून घेऊन तो घराच्या पिछाडीला गेला.

पण पिछाडीच्या उद्यानांतील कारंजाजवळ कोणी तरी माणसें बसून हलक्या आवाजांत कांहीं तरी बोलत असावीं असा त्याला भास झाला, त्यामुळें तो पुढें न सरतां थोडा बाजूला झाला आणि त्या माणसांच्या जवळच असलेल्या एका झुपकेदार फुलझाडाच्या मागें लपून तीं काय बोलतात तें ऐकूं लागला. चोंहोंकडे शांतता असल्यामुळें त्याला त्यांचें भाषण स्पष्टपणानें ऐकूं येऊं लागलें. आपणाला आतां नवीनच कांहीं तरी समजणार अशी त्याची खात्री झाली. बोलणारीं माणसें तीन होतीं. थोड्याच वेळांत त्यांचीं नांवेंहि त्याला समजलीं. कारण नामनिर्देशानेंच भाषण चालू होतें.

"उमरशेख! तिला आश्रय चांगल्याचा मिळाला आहे असें जरी तूं म्हणालास तरी तुझा तिच्यावर हक्क असल्यामुळें तूं कोठूनही तिला आणूं शकशील. पाहिजे तर मी तुला तसा परवाना देतों." हे उद्गार काजीसाहेबांचे होते. कारण पुढच्याच बोलण्यांत तें उघड झालें. व इसाकलाहि त्यांत रहस्य वाटूं लागलें.

"काजीसाहेब! उमरशेखला आपण असें सांगतां खरें; पण त्यानें तिच्याशीं फारच निंद्य वर्तणूक केली असल्यामुळें ती स्वतःच्या बचावासाठीं

वरून गेली ही खरी गोष्ट सिद्ध झाल्यास तुम्हालाही तें जड जाणार नाहीं का? जाणूनबुजून बलात्कार— "

मध्येंच उमरशेख रागावून म्हणाला, " आसगरअल्ली ! तूं माझा मित्र असून मलाच अपराधी ठरवूं पहातोस ? मी दहा हजार रुपये देऊन तिला विकत घेतली ती कशासाठीं ? ती लवंडी माझ्याशीं लग्नही लावायला कबूल होईना. मग मी कसा स्वस्थ बसूं बरें ? मी इतका पैसा कधीं जन्मांत खर्च केला नव्हता ! काजीसाहेब ! तें कांहीं नाहीं, ती मला मिळालीच पाहिजे. तुम्हीं काय मागाल तें मी देईन; पण ती माझ्या स्वाधीन होईल असें करा."

यानंतर बराच वेळपर्यंत कोणी कांहीं बोललें नाहीं; पण काजीसाहेबांनीं या शांततेचा भंग केला. ते कांहींशा चढत्या सुरानें म्हणाले, " ती तूर्त एका नबाबाच्या आश्रयाला आहे व योग्य कारणावांचून नव्हे; पण योग्य हुकुमावांचून तो तिला तुमच्या स्वाधीन करीलसें वाटतच नाहीं. तेव्हां मला जर तुम्हीं हजार रुपये देत असाल तर मी माझा एक मनुष्य त्याच्या सैन्यासह तुमच्या मदतीला देतों. त्याच्या साहाय्यानें तुम्हीं कार्यसिद्धी करा. मात्र त्यांत माझें नांव पुढें येतां नये. जमालखान योग्य मनुष्य आहे. तो तुमचें कार्य करील. आसगरच्या म्हणण्याप्रमाणें, ती तुमच्या विरुद्ध कांहीं तरी तक्रार करील, नाहीं असें नाहीं; पण तिचें खरें कोण मानतो. बोलून चालून विकत घेतलेली स्त्री ! मालकानें तिच्याशीं कसें वागावें हें प्रकरण माझ्याकडे अखेरच्या निकालाला आल्यास मी तुमच्याप्रमाणेंच निकाल देईन. मी केलेल्या कोणत्याहि न्यायांत बादशहा हात घालीत नसतो. कारण मी केव्हांच कांहीं गैर करणार नाहीं अशी त्याची खात्री आहे."

इसाक नुसते दांतओंठ चावीत हें भाषण ऐकत होता. दालियेच्या बाबतींत या सैतानांनीं कांहीं तरी घोटाळा केला असून ती कुठें तरी देशोधडीला लागली असावी व हे तिच्या तपासांत असतां यांना अकस्मात् तिचा ठावठिकाण माहीत झाला असावा, असा त्यानें अंदाज केला. तरी पण या राक्षसांच्या तोंडून ती कुठें राहते तें आपणाला समजणें कठीण आहे तेव्हां काजीची भेट न घेतां या मंडळीच्या पाळतीवर राहून आयत्या वेळीं कार्यभाग साधावा व या सर्वांना तेथेंच पकडावें असें त्यानें मनाशीं ठरविलें. शिवाय या भानगडींत बादशहाचा शत्रु जमालखान हाही सांपडणार

आहे तेव्हां आपण थोडीशी शिबंदी आपल्याबरोबर ठवणें जरूर आहे, असें त्यानें धोरण बांधलें.

* * * *

इस्कंदरच्या हातीं पत्र पाठविल्यापासून दलिया सारखा विचार करीत होती. परिणामाकडे तिचें लक्ष लागलें होतें. इब्राहीमशीं पत्रव्यवहार करण्याचा हा तिला पहिलाच प्रसंग असल्यामुळें तिला कसेंसेंच वाटत होतें. आपण हें धाडस केलें नसतें तरी बरें झालें असतें असेंहि ती वारंवार म्हणत होती; पण आतां तसें म्हणून काय उपयोग ! शेवटीं ती आपल्याशींच म्हणाली, " एवढ्या मोठ्या शहरांत या पोराला मुबारक सांपडतो कीं नाहीं कुणाला माहीत ! पोरगा मोठा हुषार आहे. तो चांगला तपास केल्यावांचून मागें फिरणार नाहीं पत्र हातांत पडतांच मुबारक धांवतच तें साहेबांकडे पोंचवील. आणि मला येथून नेण्याची तजवीज होईल. इब्राहीमसाहेब स्वतः मला नेण्यासाठीं येतील, आणि ते आले म्हणजे मी येथील मंडळीला सांगेन हेच माझे—हाय ! पण तो सुखाचा दिवस कधीं उगवेल बरें ! माझ्या नशिबांत तो सोन्याचा दिवस पाहण्याचें लिहिलें आहे का ? "

अशा प्रकारचे सुखदुःखमय विचार करण्यांत दलिया गढून गेली आहे तोंच तो चलाख पोरगा इस्कंदर तिच्याजवळ आला. व त्याचा तो हास्यास्फुल्ल चेहरा पाहून हा आपलें काम फत्ते करूनच आला असला पाहिजे अशी तिची खात्री झाली.

तो जवळ येतांच त्याचा हात आपल्या हातांत घेऊन तिनें त्याला प्रश्न केला, " मुबारक तुला भेटला ना ? मी दिलेलें पत्र तूं त्याला दिलें असशीलच. "

मुलगा हंसत हंसत आत्मप्रौढीनें म्हणाला, " मी लहान असलों तरी इतका वेडा नाहीं आहें ! दलियाबिबी ! तुम्हीं सांगितलेलें काम मी अगदींच चोख रीतीनें बजावलें आहे. मला प्रत्यक्ष मुबारकच भेटले. शिवाय या कामाबद्दल त्यांनीं मला एक रुपया बक्षीसहि दिला. मी तें पत्र अगदीं त्यांच्या हातांत दिलें. "

दालियेला वाटलें, असेल; तसेंहि असेल. माझें पत्र पाहून मुबारकाला

आनंद होणें संभवनीय आहे. अर्थात् त्यानें त्याला बक्षीस दिलें यांत आश्चर्य कसचें ! आतां मात्र मला काल अनुकूल झाला असें मानायला हरकत नाहीं. कारण मुबारक, इब्राहीमसाहेबांसह लवकरच येथें येऊन मला तिकडे घेऊन जाईल. दालिये, तूं आतां निश्चिंत झालीस ! "

दालिये ! दालिये !! वेडे पोरी! तूं कसल्या आनंदांत आहेस ? तूं पुन्हां पकडली जाणार कारण तूं आपण होऊन त्या वेडया पोराच्या हातानें आपला नाश करून घेतला आहेस सावध रहा.

---

# प्रकरण ३६ वें.

## प्रेमाचा भुंगा.

जगांत जितके म्हणून कांहीं अनर्थ होतात त्यांच्या मुळाशीं कनक आणि कांता या दोन अथवा दोहोंपैकीं कोणतीहि एक वस्तु असेलच, आणि त्यासाठींच फकीर लोक कामिनी—कांचनाचा त्याग करण्याबद्दल विनवीत असतात; पण ऐकतो कोण ! मनुष्यस्वभावच असा विचित्र आहे कीं, जें नको करूं म्हणून सांगावें तें त्याला करावेंसें वाटतें; आणि जगांत विचित्रपणा आला आहे तो यामुळेंच.

दालिया ज्या नबाबाच्या आश्रयाला होती त्याचें नांव नसरतखान असून त्याच्या पत्नीचें नांव मुन्नाबिबी असें होतें. दोघेंहि दालियेला आपल्या मुलीप्रमाणें वागवीत व तिला कोणत्याही प्रकारचा त्रास पडूं देत नसत; त्यामुळें तिला वाटे कीं, देवाला आपली आतां दया आली असावी; ' पत्र पाठवून दोन दिवस झाले तरी अद्याप तिकडून कोणीच कां येऊं नये. ' ही भयंकर काळजी तिच्या मनाला स्वस्थपणा देत नव्हती. तिला घरांत, बाहेर, रात्रीं, दिवसा, सुख वाटत नव्हतें तें यामुळें.

दुपारचें कडक ऊन टळल्यावर दालिया बागेंत फिरण्यासाठीं म्हणून घरांतून बाहेर पडली आणि बागेंतील पुष्करणीजवळील एका चबुतऱ्यावर

बसून आपल्या विचित्र नशिबाचा विचार करूं लागली. सुशो-भित व नवविकसित उद्यान तिला सुखवीत नव्हतें. तसेंच सायंकाळचा मंद मलयानिलही तिला रंजवीत नव्हता. तिनें आज ओढणी घेतली नस-ल्यामुळें तिचें मोकळें सौंदर्य त्या उद्यानाला शोभा आणीत होतें म्हटलें तरी चालेल. अकस्मात पहाणाराला ही कोणी तरी स्वर्गीय परीच असावी असें वाटल्यावांचून राहिलें नसतें.

दलिया सुंदर होती. आणि तिचें सौंदर्य पाहून लोक वेडे होत होते; पण तिला त्याची मुळींच किंमत वाटत नव्हती. उलट आपण सुंदर झालों नसतों तर बरें झालें असतें असेंच ती म्हणत होती. विचार करतां करतां ती अगदीं दमून गेली आणि शेवटीं एक दीर्घ निश्वास सोडून मोठ्यानें म्हणाली, " हाय ! काय बरें या जगाचा हा विचित्र व्याप आहे ! त्याला जें पाहिजे असतें तें त्याला मिळत नाहीं, असें कां व्हावें ? "

पण याचवेळीं तिला मागून कुणीसें उत्तर दिलें, " खरेंच दलियाबिबी ! मलाही या विचित्र प्रश्नाचें एक कोडेंच पडलेलें आहे. असें कां व्हावें बरें ? "

दलिया दचकली आणि चबुतऱ्यावरून खालीं उतरून तिनें मागें वळून पाहिलें तों महंमदअल्ली तेथें उभा असलेला तिला दिसला. ती त्याला हळूच म्हणाली, " आदाब साहेब ! आपण या निर्जन जागीं कां आलां बरं ! इकडे आपलं कांहीं काम आहे का ? "

" मी येऊं नये अशी का आपली इच्छा आहे ! आपल्यासारखा प्रिय-जन ज्या ठिकाणीं मनोरंजनासाठीं विहार करीत आहे त्या जागेला निर्जन कोण म्हणेल बरें ! " महंमदअल्लीनें उत्तर दिलें. " आपल्याला इथं येऊं नको म्हणणारी मी कोण ! पण कोणाच्याही वागणुकींत फरक झाला कीं थोडंसं विचित्र वाटूं लागतं. मनुष्याचं वर्तन नेहेमींच निर्दोष असतं असं नाहीं. डोळे पापी आहेत आणि मन स्वार्थी आहे. मी आपल्यासारख्या थोरांमोठ्यांच्या आश्रयाला येऊन राहिलेली एक निराधार कुमारिका आहें. मला स्वार्थी जगाच्या आलेल्या अनुभवाची पुनरावृत्ति होऊं नये म्हणज झालें. "

" दलियाबिबी ! तुम्हांला वाईट वाटेल असें कोणतेंहि कृत्य आमच्या

घरांत झालें असेल, अगर तुमच्या खाण्यापिण्याच्या बाबतींत कोणाकडून हलगर्जीपणा झाला असेल असें मला वाटत नाहीं. " " होय आपल म्हणणं खरं आहे, आणि त्याबद्दल आपणा सर्वांची मी ऋणी आहे. आपले वालिद वालिदा मला आपल्या मुलीप्रमाणें मानतात व त्यांनाही मी माझ्या वडलांप्रमाणें मानतें. तसेंच आपण—" "बोल-बोल. दुलियाबिबी, बोल. माझ्यासंबंधानें तुला काय वाटतें तें बोलून दाखीव. तुझे ते बोल ऐकून मी फार सुखी होईन असें मला वाटतें. कारण प्रथमपासूनच मी तुझ्यावर प्रेम करीत आहें."

" साहेब ! आपण दयाळू आहां आपल्या अंतःकरणांत दीन दुबळ्यांबद्दल वत्सलता उत्पन्न होते, हें खरें आहे; पण प्रेम म्हणजे दया नव्हे-प्रेम म्हणजे ममता नव्हे, प्रेम म्हणजे वत्सलता नव्हे आणि प्रेम म्हणजे कनवाळूपणा नव्हे. असें जर आपणाला वाटत असेल तर तें प्रेम आपण असें उधळूं नये अशी आपणाला माझी सविनय प्रार्थना आहे. माझ्यावर झालेल्या उपकाराबद्दल मी आपली ऋणी आहें."

" बरें तसें कां होईना. मी हें प्रेमाचें आख्यान बाजूला ठेवतों; पण या ऋणाची फेड करावी अशी तरी आपली मर्जी आहे का ? " महंमद अल्लीनें साध्याभोळ्या दुलियेसाठीं जाळें पसरण्याला सुरुवात केली. फांसे-पारधी खेळ खेळूं लागला. फांसे व्यर्थ जात चालले; पण त्याच निराश झाला नाहीं."

" कां बरं मला तसं वाटणार नाहीं ! आपल्या या उपकाराची फेड करण्याची संधि मी कधीं तरी व्यर्थ घालवीन का ? आपल्या उपयोगीं पडण्यासाठीं मी केव्हांही तयार आहें." दलिया सरळपणानें म्हणाली.

" तर मग ऐक." महंमदअल्ली सांगूं लागला, " आजच नव्हे, आज तीन दिवस मी तुझ्याच हालचालींवर लक्ष ठेवून आहें; त्यामुळे तुझें मुक्त-सौंदर्य मला पहायला सांपडलें, आणि मी अगदीं वेडा होऊन गेलों. माझें हृदय अजूनपर्यंत कोणाही तरुणीनें मोहित केलें नव्हतें; पण तुला पाहून मी माझें स्वातंत्र्य गमावून बसलों. तुझ्याशीं दोन शब्द बोलण्यासाठीं माझें हृदय तळमळूं लागलें. मी माझ्या मनाला आवरण्याचा प्रयत्न केला; पण तें माझ्या स्वाधीन नसल्यामुळें मला त्या प्रयत्नांत यश आलें नाहीं. तुझ्या

या सौंदर्यानें किती लोकांना अंधळें केलें असेल कुणाला माहीत! दलिये! माझी तुला दया येत नाहीं का? या सौंदर्याचें अंतरंग पाषाणाचें नाहीं ना? मी अगदीं असभ्यपणानें तुझ्या सौंदर्यामृताचें प्राशन केलें याबद्दल मला तूं क्षमा कर; पण क्रूरपणानें दूर लोटूं नको. तुला मी विकला गेलों आहें."

"माझा अद्याप विवाह झालेला नाहीं. कारण स्त्रियांच्या बाबतींत मी कांहींसा अनुदारपणानें वागत होतों; पण जंगलांत राहूनही मला दिव्य सौंदर्याचें दर्शन झालें त्यामुळें मी पुनीत होऊन प्रेम म्हणजे काय तें मला कळूं लागलें. मी धर्माज्ञेप्रमाणें मद्याला स्पर्श करीत नाहीं. व कोणी स्त्रीहि अद्याप माझी सहचारिणी बनलेली नाहीं; पण दलिये, तुझें दर्शन होतांच विशेषत: तुझें अनिंद्य सौंदर्य पहातांच माझें अंत:करण जागें झालें. तुझ्यासारखी रमणी मी अद्याप पाहिलीच नाहीं. वडलांनीं मला विवाहाच्या बाबतींत बराच आग्रह केला; पण मी त्याचें ऐकलें नाहीं.

"पण दलिये! आतां मात्र मीच त्यांना विनंति करणार आहें. तुझी मात्र संमती पाहिजे. ऐश्वर्याला सीमा नाहीं तुला कोणत्याही प्रकारचें दु:ख होणार नाहीं. मी तुझ्या अर्ध्या वचनांत वागेन, हें पाहिजे तर मी शपथेवर सांगतों. फक्त तूं एका शब्दानें मला संमती दे. आणि जर या बाबतींत मला निराश व्हावें लागलें, तर माझें सर्व आयुष्य व्यर्थ गेलें असेंच तूं समज. मी आजन्म अविवाहित राहीन आणि संसाराचा त्याग करून या तुझ्या स्वरूपाचें ध्यान करीत जगभर फिरेन."

पुन्हां हा प्रेमाचा मुंगा मागें लागलेला पाहून दलियेला काय वाटलें असेल बरें? ती अगदीं हताश झाली. आतां जाव कुठें आणि करावें काय हेंच तिला सुचेना. सौंदर्य म्हणजे काय आणि तें मनुष्याला कसें वेडें बनवितें याचा तिला उलगडा होईना. हें सौंदर्य आतां मला शत्रूप्रमाणें छळणार आणि त्यांतच आपला अंत होणार असें तिला वाटूं लागलें.

ती कांहीं वेळ स्तब्ध राहून नंतर म्हणाली, "साहेब! आपण दयाळू आहां. माझ्यावर दया करा. आपणाला त्रास व्हावा अशी माझी इच्छा नाहीं; पण ज्या ज्या ठिकाणीं मी आश्रयाला जातें त्या त्या ठिकाणीं एखाद्या हिंस्र पशूप्रमाणें जो तो माझ्यावर वाक्प्रहार करून मला घालवून

देण्याची खटपट करतो. हें माझें दुर्दैवच का ? कीं सौंदर्य म्हणजे कोणीही तोडून घेण्यासारखें फळ आहे ! स्त्रियांबद्दल पुरुषांची समजूत तरी काय असते ! प्रेमाचा खेळ कोणीही कुणाशीं खेळावा इतकें तें सोपें आहे काय ? अल्लीसाहेब ! आपण समंजस आहां. माझ्या बोलण्याचा तुम्हीं विचार करा. माझ्याशीं आजपर्यंत असलेली आपली सभ्यपणाची वागणूक मी कधींही विसरणार नाहीं; पण मला या बाबतींत क्षमा करा. माझ्यावर दुसऱ्याचा ताबा चालवून घेण्याइतकी मी स्वतंत्र नाहीं. माझें आत्मदान पूर्वींच होऊन गेलें आहे. प्रतिदान होणें शक्य नाहीं. तेव्हां माझ्याशीं आधींच आपण जोडलेलें भावाचें नातें विसरूं नये म्हणजे झालें. आपले वडील आहेत तेच माझे वडील असें मी मनाशीं ठरविलें आहे. समंजस मनुष्याला मीं यापेक्षां जास्त काय सांगणार ! अल्लीसाहेब ! माझे बंधु होण्यांतच तुम्हांला भूषण आहे."

महंमद अल्ली चांगला शिकलेला असून सदाचरणी होता. हिकमतखान अगर उमरशेखाप्रमाणें तो अविचारी नव्हता. दालियेच्या सांगण्याचा त्यानें आपल्या मनाशीं विचार केला. आपल्या आश्रयाला आलेल्या एका गरीब दुबळ्या स्त्रीवर अत्याचार करणें अयोग्य आहे, हें त्याला समजत होतें. सौंदर्य पाहून वेडावून जाणें ही तरुणाची एक लहर आहे; पण विचारानें मन आवरणें हें भूषण आहे. महंमद अल्लीला आपली चूक कळून आली आणि तो किंचित् लाजल्यासारखा होऊन तेथून निघून गेला. मात्र आज आपण एक नवीन धडा शिकलों असें जातां जातां तो मनांत म्हणालाच.

तो निघून गेल्यानंतर दालिया आपल्या खोलींत आली. या वेळीं रात्रींच्या जेवणाची तयारी चाललेली असल्यामुळें तिला विचार करीत बसण्याला फुरसत मिळाली नाहीं. तिनें रोजच्याप्रमाणें जेवण वगैरे आटोपलें आणि घरवालीचा निरोप घेऊन ती झोंपण्याच्या जागीं आली व आतां आपण पुढें काय करावें हा विचार करूं लागली. कारण तिथें राहाणें धोक्याचें आहे असें तिला वाटत होतें. मात्र आपलें हें असें आणखी किती दिवस चालायचें याचा तिला कांहींच अंदाज करतां येईना.

ती मनांत म्हणाली, "खुदाचा मी काय अपराध केला असेल कुणाला माहीत ! आजपर्यंत मला मुळींच क्षमा होत नाहीं. रात्रंदिवस मी

त्याच्या नांवानें टाहो फोडीत आहे पण माझी त्याला अजून दया येत नाहीं ! प्रभुराज ! मी आणखीं काय करूं म्हणजे माझ्या अनन्य भक्तीबद्दल तुझी खात्री होईल ? माझें हें दैन्यवाणें जीवन कधींच संपणार नाहीं का ? माझें सौंदर्यच मला शत्रु व्हावें हें केवढें आश्चर्य ! पण मी सुंदर झाल्यें यांत माझा काय अपराध !

" मी जाऊं तरी कुठें ! जिकडे जावें तिकडे संकटांनीं मला वेढून टाकलेलें आहे. असल्या देवचरित लोकांमध्येंहि जर मला सुखासमाधानानें राहातां येत नाहीं तर मी जाणार तरी कुठें ! महंमदअल्लीची आजच अशी बुद्धि पालटण्याचें काय कारण असावें बरें ? "

" कांहीं कां असेना ! मला ही सुखाची जागा आतां सोडली पाहिजे यांत संशय नाहीं. येथें राहाणें सुरक्षितपणाचें नाहीं; पण आतां जावें तरी कुणीकडे ? असल्या प्रेमळ माणसांना आश्रय मला दुसरीकडे कुठें मिळणार ?

" होय. आतां माझेंच मला संरक्षण करणें भाग आहे; पण सहाय्य तरी कुणाचें घ्यावें ? कदाचित् तो छोकरा इस्कंदर माझ्या उपयोगीं पड-ण्याचा संभव आहे. माझ्याजवळ आज दोनचार मोहरा आहेत. शिवाय नवाबसाहेबांनींहि हातखर्चासाठीं म्हणून दहा मोहरा मला दिल्या त्याहि तशाच आहेत. इब्राहीमसाहेबांनीं स्वतःची आठवण म्हणून दिलेली हिऱ्याची आंगठीहि अद्याप माझ्या हातांत आहे; तेव्हां मी मुशाफरी सुरू केल्यास मला पैशाची कांहीं अडचण पडणार नाहीं. ही नुसती आंगठी विकली तर पांचसहाशें रुपये सहज मिळतील.

" मला निरनिराळ्या प्रकारच्या कलाकुसरीचें काम करतां येतें. मनु-ष्याला उद्योग करतां येत असला तर त्याला कोणत्याहि प्रकारची काळजी करण्याचें कारण नाहीं. असें अबूअयूब म्हणत होते; मग मी निष्कारण कशाला काळजी करूं बरें ! इस्कंदरला नोकर म्हणून बरोबर घेऊन पुरुष-वेषानें दिल्लीसारख्या ठिकाणीं जाऊन राहावें आणि खुशाल उद्योगधंदा करून पोट भरावें. ही गुलामगिरी नको आणि या प्रेमाच्या मुंग्यांची भीतिहा नको. चांगली व्यवस्था झाली म्हणजे इब्राहीमसाहेबांना कळवावें; त्यांनीं विचारपूस करून आश्रय दिला तर उत्तमच झालें नाहीं तर अभागी

दलिया शेवटीं आपल्या दुर्भाग्याचे दिवस निराशेच्या ज्वालांनीं दग्ध करून शक्य तितक्या लवकर मातींत मिळून जाईल. सर्वांनीं दूर लोटलें तरी भूमाता कांहीं कुणाला दूर लोटीत नाहीं. आणि तिला कोणता स्वार्थही साधावयाचा नसतो. खुदाच्या दुनियेंत सर्वांचे दिवस सारखे जातात असें नाहीं. मग माझे चांगल्या तऱ्हेनें दिवस जावे असा मी तरी कां हट्ट धरावा ..."

अशा तऱ्हेचे अनेक विचार करून दलियेनें आपल्या भावी आयुष्याची दिशा निश्चित केली आणि त्यामुळें तिला त्या रात्रीं फारच सुखाची झोंप लागली. दुसऱ्या दिवशीं सकाळींच तिनें त्या मुलाला एकीकडे नेलें आणि आपला सगळा बेत उघड करून त्याला सांगितला. इस्कंदर फार चलाख होता. त्याला तो विचार पसंत पडला, व आपणाला नवे नवे देश पहावयाला मिळणार याचा त्याला आनंद झाला. घरांत त्याला मुखत्यारीनें कोणत्याहि उद्योगाला सुरवात करण्याची मुभा नव्हती, त्यामुळें त्याला सर्वांकडून बोलून घ्यावें लागे. अर्थात् तो तेथें कंटाळलाच होता तेव्हां या नव्या व्यवस्थेनें त्याला आनंद झाला यांत आश्चर्य कसचें ! शिवाय दलियाबिबीचा स्वभावहि त्याला पसंत पडला होता. तिच्याकडे राहिल्यानें आपणाला सुख मिळेल अशी त्याची खात्री होती, त्यामुळें तिनें आपला विचार सांगतांच तो अगदीं हुरळून गेला आणि ती पुढें काय हुकूम करते तें ऐकूं लागला.

इस्कंदरची निरपेक्ष अनुकूलता पाहून दलियेलाहि आनंद झाला. ती त्याला म्हणाली, " तर मग इस्कंदर, आतां तुलाच सगळी व्यवस्था केली पाहिजे. मी पैसे देतें. दिल्लीपर्यंत भाड्यानें जाणारी एक बैलगाडी तूं ठरीव. दिल्ली येथून किती कोस आहे हें तूं जाण-तोस काय ? "

" इथून फार लांब नाहीं. दहा बारा कोस होईल. मी थोरल्या साहेबांबरोबर कितीदां तरी तिकडे गेलों आहें. दिल्ली फार मोठें शहर अ-सून पहाण्यासारखें आहे."

फार चांगलें. आतां एक मोहर घेऊन जा आणि दिल्लीपर्यंत जाणारी बैलगाडी ठरवून ये. त्यानें जास्त पैसा मागितला तरी तूं कबूल कर. त्याच्याशीं भांडूं नको. हे दोन रुपये तुझ्याबरोबर ठेव. गाडीचा ठराव

झाल्यावर त्याला थोडासा आगाऊ पैसा द्यावा लागेल. शिवाय त्या गाडीवाल्याला सांग कीं, " बरोबर मध्यरात्रीं गाडी घेऊन तूं बागेच्या पिछाडीला आलें पाहिजे. कारण त्या वेळीं घरांतल्यांपैकीं सगळी मंडळी झोपीं गेलेली असते त्यामुळें आम्हांला जातां येईल. "

दोन रुपये हातांत पडतांच इस्कंदर जायला निघाला. पण तितक्यांत त्याला थांबवून दालिया म्हणाली, " आधीं चांगलें ऐकून घे. जनाना स्वारी आहे असें सांगावयाचें नाहीं. कारण तूं तसें त्याला सांगितलेंस तर तो जास्त पैसे मागेल. तसेंच हे आणखी दहा रुपये तुझ्याजवळ घे. आणि माझ्यासाठीं पुरुषाचा चांगला पोषाख आण. लांब रुंद होतां नये. बरोबर ठाकठीक झाला पाहिजे. मोजमापाचा हा कागद घे, विसरूं नको. सांगितलेलें काम करायचें. नाहीं तर उगाच कुणाला कांहीं तरी सांगत बसशील. तोंड सांभाळ. "

आज आपल्या हातांत पुष्कळ रुपये येत आहेत, तेव्हां आपण एक बडा माणूस झालों, असें इस्कंदराला वाटून तो अगदीं हुरळून गेला. त्याला असल्या जबाबदारीचीं कधींच कुणीं कामें सांगितलीं नव्हतीं. तो मोठ्या उत्साहानें दालियेला म्हणाला, " वा:, बाईसाहेब ! आतां तुम्ही मर्दांनी पोषाख करणार तर ! वा ! वा !! मजा आहे; पण तुम्ही पुरुष बनलां म्हणजे मला अगदीं हसूं येईल "

दालिया त्याला धमकावून म्हणाली, "हां, हळू बोल-कोणीं ऐकेल. पोषाख साधाच आण; पण बेताचा असूं दे दिलेल्या रुपयांत इतकें सगळें काम करून जें शिल्लक राहील तें तुझें बरें का ? काम मात्र चोख झालें पाहिजे; नाहींतर मी तुला बरोबर नेणार नाहीं. "

मुलगा मोठा हुषार होता. दालियेचा निरोप घेऊन तो धांवतच बाहेर गेला आणि सुमारें एक तासांत सगळी कामागिरी बजावून परत आला. त्याला विलक्षण उत्साह आला होता व आपण केव्हां एकदां दिल्लीला जातों असें त्याला होऊन गेलें होतें. त्यानें आणलेला पोषाख दालियेला पसंत पडला. आणि तिनें त्याला मनापासून शाबासकी दिली.

आगाऊ ठरल्याप्रमाणें मध्यरात्र होतांच पुरुषवेषानें इस्कंदरला बरोबर घेऊन दालिया बागेच्या पिछाडीला आली, व तेथें आगाऊ तयार

असलेल्या गाडींत बसून ती दिल्लीला जाण्यासाठीं निघाली. गाडींत बसतांना तिनें देवाचें नांव घेऊन, 'केलेलें धाडस यशस्वी करण्याबद्दल त्याची प्रार्थना केली.' कारण देवाचें नांव घेतल्यावांचून ती कोणतऱ्याही कार्याला आरंभ करीत नसे.

सूर्योदयापर्यंत पांच कोसांची मजल मारून दलियाबिबीची बैलगाडी एका लहानशा शहरांत आली. इस्कंदरला हें शहर अपरिचित नव्हतें. मोठमोठ्या बाजारपेठा पाहून दलियेला वाटलें शहर लहान असलें तरी येथें बराच मोठा व्यापार चालत असावा. या ठिकाणीं आपण मुख्य पेठेंत मुक्काम न करतां शहरच्या बाजूला असलेल्या एखाद्या सराईखान्यांत रहावें म्हणजे इतर लोकांशीं आपला संबंध येणार नाहीं, असें तिला वाटलें व ती इस्कंदरच्या मार्फत गाडीवाल्याला म्हणाली, "माणसांची वर्दळ नसलेल्या सराईखान्यांत गाडी नेली पाहिजे."

तिच्या मर्जीप्रमाणें नजीकच एक सराईखाना आढळला, व तेथें गाडी उभी करण्यांत आली. इस्कंदर व दलिया खालीं उतरून सराईखान्यांत गेलीं. गाडीवाला बैलांची व्यवस्था लावण्यांत गुंतला.

दलियेच्या सुदैवानें या सराईंत या वेळीं एकही उतारू नव्हता. अर्थात् तिला स्वतंत्र खोली वगैरे मिळायला मुळींच अडचण पडली नाहीं. तिनें एका खोलींत आपली पथारी टाकली. सराईच्या मालकानें ठेवलेली एक पगारी दासी असून ती उतारूंची व्यवस्था ठेवीत असे. अर्थात् दलियेला तिनें विचारून सगळी व्यवस्था केली. स्नान वगैरे आटोपल्यावर त्या दासीमार्फतच तिनें जेवणाचीहि व्यवस्था लावली. व दासीला निघून जायला सांगून दलियेनें इस्कंदरला आपल्याकडे बोलाविलें. कारण तिला आतां पुढचा बेत ठरवावयाचा होता.

आसपास कोणी नाहीं असें पाहून दलिया म्हणाली, "मुला! आतां आपण पुढें कसें काय वागायचें तें ठरवूं या. मी तुझी आईप्रमाणें सगळी व्यवस्था ठेवीन. तूंहि मला कधीं सोडून जातां नये. माझ्याकडून प्रत्येक महिन्याला तुला पगार मिळेल. आज रात्रीं पुन्हां पुढच्या प्रवासाला सुरुवात करावयाची. दिल्लीला पोंचल्यावांचून आपणाला सुरक्षितपणा येणार नाहीं. मी आतां दलियाबिबी नव्हे हें तुला सांगायला नकोच. मी आतां

पुरुषाचा पोषाक केला आहे. तेव्हां तूं मला आपला मालक समजावयाचें व ' जनाब, ' ' हुजूर, ' ' साहेब ! ' वगैरे शब्दांनीं आरंभ करून माझ्याशीं बोलायला सुरुवात करावयाची; विसरूं नको. सावध राहा. मी जनाना आहें, असा कुणालाही संशय येतां नये. मी सांगितलेलें सर्व लक्षांत राहिलें ना ? "

इस्कंदरनें जबाब दिला, " वा:, मला अगदीं मूर्खच ठरविलें बाईसाहेब ! खरोखरच मी दुर्दैवी आहें. नाहीं तर इतकी खटपट करूनही मला अडाणी ठरवून घेण्याचें नशिबीं झालें नसतें ! "

दालिया किंचित् हंसून म्हणाली, " तूं मूर्ख आहेस हें आतांच तुझ्या बोलण्यांत आलें. मी तुला इतकें समजावीत असतां तूं मला बाईसाहेब म्हणतोस हा काय शहाणपणा ! "

" इथें तर दुसरें कोणीच नाहीं बाईसाहेब ! "

" नसलें म्हणून काय झालें ! तुला तसें म्हणण्याची संवय झाली पाहिजे. मी हा मर्दानी वेष कां घेतला आहे, हें तुला योग्य वेळीं मी समजावून देईन. वेड्या, मी एक निराश्रित बायकोमाणुस आहें ! तेव्हां मला पदोपदीं जपलें पाहिजे. चोहोंकडे माझे शत्रुच पसरलेले आहेत तेव्हां मी दालियाबिबी आहें हें अगदींच विसरून जा. " दालिया गंभीरपणानें म्हणाली.

" आतां माझी समजूत पडली; पण लोकांनीं जर विचारलें कीं, ' तुझ्या मालकाचें नांव काय ? ' तर मी त्यांना कसें सांगूं ? " इस्कंदरनें प्रश्न केला.

" कुणी विचारलें तर त्यांना माझें नांव नबीबक्ष असें सांग. आणि आमचे साहेब आपल्या नशिबाची परीक्षा पहाण्यासाठीं दिल्लीला जात आहेत, ' अशी माहिती दे. "

" हां आतां माझी काळजी दूर झाली. आतां मी कुणालाही जबाब द्यायला भिणार नाहीं. "

असो. तो दिवस व अर्धी रात्र त्यांनीं त्या सराईतच घालविली. दालियेचा आतां बुरखा नव्हता, मर्दानी पोषाखांतच ती चांगली शोभत होती. सायंकाळच्या सुमारास इस्कंदरला पाठवून तिनें आणखी एक पोषाख

आणविला. कारण नेहमींच एका पोषाखानें राहाणें शक्य नव्हतें. अशा प्रकारें सगळी तयारी केल्यानंतर सराईच्या मालकाचा निरोप घेऊन व त्या दासीला बक्षीस वगैरे देऊन दोघेंही गाडींत बसलीं.

गाडी दिल्लीच्या रोखानें चालूं लागली. अंधार होता तरी दालियेला भीति वाटली नाहीं. कारण नशीब काढण्यासाठीं दरबारीं निघालेला सरदार भित्रा कसा असेल ! नबीबक्ष भित्रा नव्हता.

---

# प्रकरण ३७ वें.



## थोडक्यांत चुकलें !

दैवावर ज्यांचा थोडा सुद्धां विश्वास नसतो ते कदाचित् दांभिक असूं शकतील; पौरुषत्वावरच जोर देऊन कार्यारंभ केल्यामुळें पदोपदीं ठेचाळत असतील अथवा अगदीं मूर्ख बनून वाऱ्यासारखे चौफेर उधळत तरी असतील. दैवानुरोधानें होणाऱ्या गोष्टी कुणाल्राही टाळतां येणार नाहींत. आणि त्या टाळण्याचा प्रयत्न करण्यासाठीं छाती ठोकून उभा राहातो तो आपल्या अहंकाराचें प्रदर्शन करण्यासाठींच जगलेला असतो असें म्हणावें लागतें. दैवदुर्विलास भोगावयाचे ते भोगावे लागतातच; पण ' थोडक्यांतच चुकलें ! ' या सूत्रमय वाक्यानें तो आपलेपणा सिद्ध करीत असतो.

आमच्या या कादंबरींतील नायकनायिकेलाही दैवाचे तडाके सहन करावे लागत होते, दिशाभूल होत होती आणि सर्वांच्याच तोंडीं ' थोडक्यांत चुकलें ! ' हें वाक्य अनुच्चारित रीतीनें उच्चारलें जात होतें. कर्मफल म्हणतात तें यालाच.

प्रथम आपण मुबारकालाच पाहूं. त्यानें ज्या दिवशीं जुल्फखानाला मदत म्हणून वीस रुपये दिले आणि दालियेसंबंधानें बोलाचाली केली त्याच दिवशीं सायंकाळीं जर त्यानें दालियेची भेट घेण्याची खटपट केली असती तर दालियेला ताकिताबिबीच्या माहेराहून पळून जाण्याचा प्रसंग आला नसता.

त्यानंतरची गोष्ट अशी झाली. ताकितबिबीचा म्हातारा बाप दुसऱ्या दिवशीं सकाळींच जेव्हां दलियेच्या शोधासाठीं उमरशेखच्या घरीं आला, तेव्हां दलिया नाहींशी झाल्याची बातमी जुल्सखानाला समजली. त्याच वेळीं जर त्यानें मुबारकाला ही बातमी कळविली असती, तर कदाचित् तावडतोब धांवाधांव होऊन दलिया सांपडली असती; पण ही बातमी ऐकून मुबारकाला राग येईल, तो कांहीं तरी नसता घोटाळा माजवून बसेल, उमरशेख दुसरेंच कांहीं तरी करून बसेल वगैरे संशय आल्यामुळें जुल्सनें मुबारकाला दलियेसंबंधानें कांहींच सांगितलें नाहीं. अर्थातच या गोष्टीला दोन दिवस होऊन गेल्यानंतर जेव्हां मुबारक जुल्सच्या भेटीला आला तेव्हां त्याला त्याच्याकडून ही भयंकर बातमी समजली. तो बिचारा दलियेच्या या नाहींशा होण्यामुळें जेवणखाण विसरला आणि मारे धुमधडाक्यानें चोहोंकडे तिला शोधूं लागला; पण त्याला कुठेंच तिचा तपास लागला नाहीं. तसेंच हिकमतखानाच्या अत्याचारामुळें हा प्रकार झाला हेंहि त्याला समजलें नाहीं. कारण ताकितबिबीच्या बापानें आपल्या मुलाच्या कीर्तीला कलंक लागूं नये म्हणून त्यानें घरांतल्याघरांत केलेलें निंद्य वर्तन लपवून टेवलें. करूनसवरून पुन्हां त्याचा उजळ माथा राहिलाच.

आतां आपण इसाकउद्दीन आणि इब्राहीम या शहाण्या लोकांसंबंधानें विचार करूं. इस्कंदरनें ज्या दिवशीं उमरशेखला मुबारक समजून त्याच्याजवळ तें दलियेचें पत्र दिलें आणि त्याला तिचा समाचार सांगितला त्याच्यानंतर दोनच दिवसांनीं दलियेनें त्या नबाबाचें घर सोडलें. दलियेला सोडून देण्याचा हुकूम त्यावेळीं इसाकजवळ होता. व दलियेचें पत्र उमरशेखजवळ होतें. तो ज्या दिवशीं अजमीरला आला त्याच दिवशीं जर खुदादादच्या गुप्तमसलती ऐकण्यासाठीं बागेंत लपून न बसतां तो सरळ सरळ त्याला भेटला असता तर खुदादादला सरकारी हुकूम मान्य करणें भाग पडलें असतें आणि त्यानें उमरशेखला त्याचा जाब विचारला असता. उमरशेखलाही आपल्यावरचें हें किटाळ घालविण्यासाठीं दलियेकडचें आलेलें पत्र खुदादादला देणें योग्य वाटलें असतें व त्यानें तें दिलेंहि असतें. अर्थात् आधीं दलियेचा तपास लागून ती इसाकच्या ताब्यांत मिळाली असती; पण कर्तृत्वशक्तीची विलक्षण घमेंड असलेले इसाकउद्दीन बऱ्याच खोल पाण्यांत

शिरले आणि सर्वांना पकडण्याचा विचार करून ते या मंडळीच्या पाळतीवर राहिले; पण ही मंडळी तशी आपली चांगली तयारी झाल्यावांचून निघणार कशी ? कारण एका लहानशा कां होईना; पण स्वतंत्र नबाबाच्या हातून जबरदस्तीनें दालियेला आणावयाची होती. जमालखानाला बाहेरून यायला दोन दिवसांचा अवधी लागला त्यामुळें या तिघांनाही व त्यांच्या बरोबर इसाक-लाही कांहींच हालचाल करतां येईना. तोंपर्यंत नाशिबाच्या वाहत्या प्रवाहांत सांपडून दालिया वाहात चालली. इतकेंच नव्हे तर सर्वांच्याच हातावेगळी झाली. थोडक्यांत चुकलें नाहीं तर सगळाच ग्रंथ आटोपला असता.

संसार म्हणजे दिशाभुलीचा बाजार ! यांत प्रत्येकाकडून हरघडी चूक ही होतच असते. मायावादी लोक म्हणतात, हें जग म्हणजे कांहीं सगळा भ्रम आहे. यांत चिरस्थायी असें तर कांहींच नाहीं तुम्हीं आम्हीं बोलतों चालतों; पण तें कांहीं नाहीं सगळें कांहीं स्वप्न ! कालचक्राच्या भयंकर फेऱ्यांत सांपडून किती तरी जीव रोजच्या रोज नाहींसे होत आहेत; पण भ्रम कांहीं नाहींसा होत नाहीं. आम्हीं जें करतों, पहातों, जो विचार करतों, आणि ज्याच्यावर भरंवसा ठेवतों तो सगळा भ्रम आहे. सगळाच स्वप्नाचा देखावा, खरें कांहींच नाहीं. सुलतान महमूदनें सगळ्या भारतवर्षावर विजय मिळवून यवनसाम्राज्याची स्थापना केली होती; पण परिणाम काय झाला ? मोंगल आणि पठाण पांचशें वर्षेपर्यंत या भारतवर्षाच्या छातीवर नाचले पण त्यांच्या हातून काय झालें ? त्यांच्या ताब्यांत त्याचा एक तुकडा तरी आहे कांय ? वीरश्रेष्ठ नेपोलियनची काय गत झाली ? हा सर्व भ्रांतिकृत चमत्कार नव्हे काय ? खरें असें यांत कांहीं तरी आहे ?

मनुष्य जें ठरवितो, कल्पना करतो, आणि ज्या कार्याच्या पूर्ततेसाठीं आपलें अमोलिक आयुष्य खर्ची घालतो, त्याची त्याला सिद्धि मिळते काय ? नाहीं. कारण त्याच्या इच्छेच्या आणि सामर्थ्याच्या विरुद्ध त्याचें अदृष्ट त्याला विरोध करीत असतें. त्यामुळें तो विजयी होत नाहीं. कार्यासारखें फळ प्रत्येक मनुष्याला मिळत असतें. मात्र समजण्यांत चूक होते इतकेंच.

या असत्याच भ्रमानें परिचालित होऊन कर्मफळ भोगण्यासाठीं दालेयाबिबी नबाबाचा आश्रय सोडून मोठ्या तांतडीनें पळून गेली. महंमद-

अह्मीसारखा चांगला शिकलेला आत्मसंयमी तरुण तिच्या सौंदर्यानें वेडा झाला आणि त्यानें तिच्या समोर आपलें हृदय मोकळें केलें. झालें. तिला तें घर सोडून जाण्याला कारण घडलें! नाहीं तर ती तेथेंच राहिली असती आणि अदृष्टजन्माची गति रोखली गेली असती; पण तें व्हावें कसें! जो उमरशेख दलियेला पहाण्यासाठीं इतका उत्सुक झालेला होता, तो तिचा तपास लागला असतांहि दोन दिवस स्वस्थ बसला! केवढी ही दैवाची विचित्र गति. कारण तसें झालें नसतें तर भलताच कांहीं तरी प्रकार झाला असता!

आणि इसाक साहेब! त्यांनाही नसत्या भ्रमानें वेडें बनविलें. ते ताबडतोब खुदादादला भेटून आपल्याजवळचें पत्र दाखवित तर त्याला त्या हुकमाप्रमाणें करणें भाग पडलें असतें आणि त्याच दिवशीं दलियेसह तो इब्राहीमला भेटला असता; पण या मानवी आशेच्या विरुद्ध देवाची इच्छा अथवा दैव कामकरी असल्यामुळें इसाकही स्वस्थ बसला.

दोन दिवसांनीं उमरशेखची तयारी झाल्यानंतर 'जमालखानाच्या शिबंदीसह स्वारी नशीपूरच्या नबाबाकडे जाऊन थडकली; पण तेथें जातांच, दोन दिवसांपूर्वींच दालिया कुठें निघून गेल्याची बातमी त्याला समजली. काय ती त्या वेळची त्याची निराशा! त्याचा पाठलाग करीत असलेल्या इसाकला तर तोंड लपवायला जागाच नाहींशी झाली. या मूर्खांच्या संगतीला' न लागतां जर आपण पूर्वींच इकडे आलों असतों तर उमरशेख अपराधी ठरून दालियाही सांपडली असती! सर्वांचीच निराशा होऊन त्यांना दांतओठ खात परत यावें लागलें. आतां इसाकनें माल झालेली सगळी हकीगत बादशहाला कळवून या सर्वांना कैद करण्याची व्यवस्था केली ती गोष्ट निराळी; पण दालिया कांहीं कुणाला मिळाली नाहीं.

इकडे इब्राहीमनें निराळीच योजना चालविली होती. इसाक आतां दलियेला घेऊन येईल व आपण तिला ताबडतोब बादशहापुढें हजर करून त्याला चकित करून सोडूं या कल्पनेंत तो दंग होऊन इसाक येण्यापूर्वींच एक चूक करून बसला; पण ही त्यानें फारच भयंकर चूक केल्यामुळें त्याला प्रायश्चित्तही तसेंच भोगावें लागलें. आतां त्यानें काय केलें तें आपण पाहूं. कारण शेवटीं थोडक्यांत चुकलें असें म्हणण्याची पाळी आपणावरच यायची आहे.

शहासुफीनें, शहाजादी दिलबहारच्या बाबतींत झालेल्या सर्व हकीगतीचें एक पत्रक इब्राहीमला वाचण्यांसाठीं म्हणून दिलें होतें. त्या पत्रकांत पुढीलप्रमाणें मजकूर होता. "बादशहा शिकंदर लोदी आपल्या सही-शिक्क्यानिशीं असें जाहीर करीत आहे कीं, माझी नाहींशी झालेली मुलगी दिलबहार अजूनही जर कोणी शोधून आणील तर आम्हीं त्याला त्याच्या मेहेनतीचा कल्पनातीत मोबदला देऊं; पण जो मनुष्य आम्हांला आशा लावून भयंकर निराशेंत लोटून देण्याचें पातक करील व त्रास देईल, त्याला आम्ही भयंकर शिक्षा केल्यावाचून सोडणार नाहीं. दिलबहारचें स्वरूप पाहून तिला शोधायला जाण्याचा कुणाचा हेतु असेल तर त्यानें तिच्या नूतन मंदिरांत ठेवलेला तिचा पुतळा पाहून जाण्याला हरकत नाहीं. त्या पुतळ्याच्या मागें शहजादीचें तैलचित्र ठेविलेलें आहे त्यावरूनही तिच्या स्वरूपाची कल्पना होईल. तरी साहसी वीरानें आपल्या नशिबाची परीक्षा पहायला तयार व्हावें. विजय मिळेल कदाचित् मरणही येईल; क्षमा होणार नाहीं व देणगीला तोटा नाहीं. झाला तर राजा होईल नाहीं तर मातींत जाऊन बसेल."

इब्राहीमनें हें पत्रक वाचलें आणि त्यानें मनांतल्या मनांत असें ठरविलें, कीं दालिया आणि दिलबहार दोघेंहि एकच. शिवाय मुबारकानें याबाबतींत त्याची खात्रीच केली होती; अर्थात् आतां विलंब केल्यास आपणाला निराश व्हावें लागेल. दालियेची खरी योग्यता सिद्ध करण्याचा मान स्वतःच मिळविला पाहिजे. इसाक तर आतां दालियेला येथें घेऊन येईलच, तेव्हां ती येण्यापूर्वीं आपण एकवार दिल्लीला जाऊन तिच्या स्मारकमंदिरांतील पुतळा व चित्र पाहून यावें म्हणजे आपल्या कार्यांत मुळींच चूक होण्याचा संभव नाहीं. शहाजादीच्या स्वर्णमहालांतील तिचें तैलचित्र पाहिल्यावर आपली खात्री होणारच आहे." असा त्यानें विचार ठरविला. दालियेचें शहाजादींत रूपांतर झाल्याचें केव्हां पाहीन असें त्याला होऊन गेलें होतें त्यामुळें मनांत विचार येतांच त्यानें कार्याला सुरवात केली.

फत्तेपुराहून दिल्ली म्हणजे केवळ आठ कोसांचें अंतर! सकाळीच एका गाडींत बसून अगर घोड्यावर स्वार होऊन दिल्लीला जावें असें त्यानें ठरविलें व भविष्यकालीन सुखमय विचारांत दंग होऊन तो झोंपीं गेला.

झोंपेंत त्यानें अनेक सुखस्वप्नें पाहिलीं. मात्र तीं सत्यसृष्टींत कशीं काय खरीं होतात याचा त्याला अनुभव यावयाचा होता. गतायुष्यांतील चित्रपटही त्याला दिसत होते. आपणाला कशाचीच उणीव नव्हती; पण केवळ आपल्या उच्छृंखलपणामुळें स्वतःचा नाश करून घेतला. आतां आकस्मिक उर्जितावस्थेला येण्याचा योग आला आहे तेव्हां प्रत्येक पाऊल फारच सावधगिरीनें टाकलें पाहिजे असें त्याचें मन त्याला सुचवूं लागलें. बादशहाला आपली नाहींशी झालेली मुलगी मिळतांच तो अत्यंत खूष होऊन मला आपल्या सिंहासनावरही बसवायला मागेंपुढें पहणार नाहीं. व दैवांत असेल तर ' सम्राट इब्राहीम लोदी ' म्हणून लोकांची ललकारणी मला ऐकूं येण्याचा संभव आहे. दलिया ही शहाजादी दिलबहार झाली तरी मलाच वरील. कारण माझ्यावर तिचें प्रेम आहे. आणि मींहि तिच्याबांचून कधीं अन्यस्त्रीचें चिंतन केलेलें नाहीं. ईश्वराचें मला सहाय्य असल्यास यावेळीं माझा कल्पनातीत उत्कर्ष होणार आहे यांत संशय नाहीं, वगैरे विचार इब्राहीमला जागवीत होते त्यामुळें त्याला त्या रात्रीं गाढ झोंप लागली नाहीं.

आशेमुळें त्याला नवजीवन मिळालें. त्याच्या हृदयांत विलक्षण उत्साह संचारित झाला. आपण अजूनपर्यंतचें आयुष्य अगदीं झोंपेंत घालविलें, असें वाटून तो स्वतःशींच लाजला. सकाळीं उठल्यानंतर त्यानें आपला चेहरा आरशांत पाहिला तों त्याला त्यांत विलक्षण फरक झालेला दिसून आला. अजूनपर्यंत इधाककडून कांहींच बातमी न आल्यामुळें तो कांहींसा चिंतातुर झाला होता खरा; पण आपल्या चेहऱ्यावरचा तो तजेला पाहून आतां विचार करीत बसणें योग्य नाहीं असें त्यानें ठरविलें. एका उमद्या घोड्यावर स्वार होऊन तो दिल्लीकडे निघाला. त्या काळीं उदयाला येणारा कोणताही वीर दिल्लीलाच जात असे. इब्राहीमनेंहि तसेंच केलें.

त्या काळीं दिल्लींत अनेक मुशाफरखाने होते. आणि त्यांपैकीं कित्येकांत तर विनखर्चानें राहातां येत असे; पण वरच्या दर्जाच्या लोकांसाठीं आणखी निराळे मुशाफरखाने होते त्यांत श्रीमंत प्रवाशांची स्वतंत्र व्यवस्था ठेवली जात असे. हे मुशाफरखाने तीन तीन मजली असून त्यांतील

खोल्या भाड्यानें रहावयास मिळत. प्रत्येक खोली त्या काळच्या पद्धती-प्रमाणें उत्तम रीतीनें श्रृंगारलेली असल्यामुळें तेथें राहावेसें वाटे. नोकरांचाही अभाव नव्हता.

इब्राहीम दिल्लीला पोंचल्यानंतर अशाच एका मुशाफरखान्यांत भाड्याची खोली घेऊन राहिला. त्याला मिळालेली जागा फारच चांगली असून तेथें कुणाचीही गडबड नसे. शिवाय खोलीहि फारच उत्तम पद्धतीनें सुशोभित केलेली होती. शिवाय या मुशाफरखान्याच्या मालकानें इब्राहीमला पाहतांच ओळखलें त्यामुळें त्याला कशाचीच कमतरता नाहींशी झाली. तो तेथें एखाद्या अमीरउमरावाप्रमाणें थाटांत राहूं लागला.

पण अशा रीतीनें राहणें आपल्या भावी दर्जाला कमीपणा आणणारें आहे असें वाटल्यामुळें मुशाफरखान्याच्या मालकाचा फार आग्रह असतांही इब्राहीमनें दुसरीकडे जाण्याचें ठरविलें. कारण मनाच्या अस्वस्थ स्थितींत एकांतच फार पसंत असतो. मुशाफरखान्याचा मालक फार उमद्या स्वभावाचा माणूस होता. इब्राहीमसारख्या आपल्या स्नेह्याच्या मुलाला आपण दूर करूं नये, त्याच्या शक्य तितकें उपयोगीं पडावें असें त्याला वाटत होतें त्यामुळें त्यानें आपल्याच इमारतींत त्याची स्वतंत्र राहाण्याची व्यवस्था करून दिली व तैनातीला दोन नोकरही दिले. मधून मधून कांहीं नवे नवे खाण्याचे पदार्थ करूनहि तो त्याच्याकडे पाठवीत असे.

अशा प्रकारें खाण्याजेवण्याची व राहाण्याची एक प्रकारें चांगली सोय झाल्यानंतर त्यानें नसरतखानाला दिलबहारच्या स्मारकमंदिरासंबंधानें व त्यांतील सोन्याच्या पुतळ्यासंबंधानें माहिती विचारली. खानानेंही आपल्याला ठाऊक असलेली हकीकत त्याला सांगितली. शिवाय ' आतां जो माझ्या मुलीला आणून मला भेटवील, त्यालाच मी ती अर्पण करीन ' असेंहि बादशहानें नुकतेंच जाहीर केल्याचें नवे वर्तमान त्यानें त्याला कळविलें.

इब्राहीमला अत्यानंद झाला व त्यानें दुसऱ्या दिवशीं सुवर्णाचा पुतळा पहायला जाण्याचें ठरविलें. हाय ! इब्राहीमचें हें साहसच त्याच्यावर भयंकर संकट आणण्याला कारण झालें !! दैवाची गति विचित्र असते म्हणतात तें खोटें नाहीं; पण इसाक उद्दिनानें पुढें काय केलें तें आपण पाहूं.

# प्रकरण ३८ वें.



## अपराधी सांपडले पण--!

वजीर उल्-मुल्क हा बादशहाचा मुख्य मंत्री असल्यामुळें त्याच्या हुकुमानें बहुतेक कारभार चालत असे असें म्हणायाला हरकत नाहीं. कन्या-विरहानें उद्विग्न झालेला बादशहा दरबारांत मुळींच येत नसे. त्यामुळें सगळीं जबाबदारीचीं कामें वजिरालाच पहावीं लागत. जमालखानाच्या बाबतींत इसाक उद्दिनाला हाताशीं धरलें होतें त्यामुळें दर्येच्या मुक्ततेचा हुकूम मिळण्याला इसाकला फारसे श्रम करावे लागले नाहींत; पण नुसता हुकूम मिळवूनहि त्याचें कार्य झालें नाहीं.

त्यामुळें योग्य संधि साधून इसाक उद्दिनानें अजमीरच्या वृद्ध सुभेदाराची भेट घेतली. सुभेदार सलाबतखान हा इसाकची योग्यता जाणून होता. बादशहाकडे त्याचें किती वजन आहे हें त्याला माहीत होतें, त्यामुळें त्यानें त्याला पाहतांच योग्य तो मान दिला व आदरानें कुशल समाचार विचारून झाल्यानंतर भेटीला येण्याचें कारण विचारलें. तेव्हां इसाक म्हणाला, "चोहोंकडे माजलेल्या अंदाधुंदींत माझ्या एका मित्राचाहि सर्वस्वीं घात होऊं पहात आहे, तेव्हां आपल्याकडे तरी याबद्दल कांहीं दाद लागते का पहावी म्हणून मी आलों." असें प्रास्ताविक भाषण करून वजिरानें काजीला दिलेला हुकूम, सुभेदाराला दिलेलें पत्र व त्यासंबंधीं इतर हकीगत त्यानें त्याला सांगितली.

त्यावर सुभेदारांनीं उत्तर दिलें, "एवढ्यासाठीं तुम्हांला इतकी तसदी घेण्याचें कारण नव्हतें; बरें, आतां समक्षच त्याचा निकाल करूं." असें म्हणून त्यानें धर्मावतार काजी खुदादाद याला बोलवावयाला पाठविलें.

एका घोडस्वारानें ताबडतोब जाऊन काजीसाहेबांना तलब केल्यामुळें त्यांना आपल्या मदतनिसासह घाईघाईनें निघावें लागलें, व सुमारें अर्ध्या तासांत दोघेहि सुभेदारासमोर येऊन हजर झाले. बाजूला बसलेल्या इसाक उद्दीनाला पहातांच खुदादादचें धाबें दणाणलें, पण समक्षासमक्ष

सुभेदाराच्या कानांत मंत्र फुंकणें शक्य नसल्यामुळें त्याला हात चोळीत बसावें लागलें.

काजीच्या मदतनिसाकडून सुभेदारानें, दलियेच्या आत्मविक्रयासंबंधाची हकीगत विचारून घेतली. व त्यांना ती कौतुकास्पद वाटली. इतकेंच नव्हे तर उमरशेखसारख्या मनुष्याला इतका नीच बनविण्याला काजीनें सहाय्य करावें याचाही त्यांना राग आला. ते ह्मणाले, " आधीं त्या सैतानी उमरशेखलाच पकडून आणला पाहिजे. झालेल्या प्रकरणांत साक्षीदार कोण कोण आहेत.

मदतनिसानें उत्तर दिलें, " काजीचे कांहीं शिपाई व इब्राहीमचा नोकर मुबारक ! "

लागलीच सुभेदारांनीं मीरमुन्शीला सांगून सर्वांना हुकूम लिहिविले आणि आपली सही करून ते घोडेस्वाराच्या हातीं रवाना केले. तसेंच काजी खुरशद याला आपल्या घरून दुसरीकडे कोठेंही न जाण्याचा प्रतिज्ञालेख लिहून घेऊन आण्याला सांगितलें. कारण तोच मुख्य अपराधी असावा असें त्यांना वाटत होतें.

उमरशेखला सुटलेल्या हुकुमांत असें लिहिलें होतें:— " तुम्हीं, इब्राहीमची दासी दलिया हिला ज्या कागदाच्या आधारानें विकत घतला तो कागद घेऊन दलियाबिबीसह हुकूमदेखत आमच्यासमोर तावडतोब हजर व्हावें. "

हा हुकूम घेऊन सुभेदाराचा स्वार जेव्हां उमरशेखच्या घरीं गेला तेव्हां उमर आणि अजगर हे दोघेहि, दलियेसंबंधानें पुढें काय करावें हा विचार करीत बसले होते. अकस्मात् सुभेदाराचा स्वार आलेला पाहून ते भ्याले. आपल्यावर आज काय प्रसंग आलेला आहे, हें त्यांना माहीत नव्हतें. उमर घाईघाईनें पुढें झाला आणि मोठ्या सन्मानानें त्यानें त्या घोडेस्वाराला घोड्यावरून खालीं उतरून आंत नेलें. तोंच त्यानें तो हुकूम त्याच्या देऊन म्हटलें, " हा हुकूम पहातांच तुह्मांला तावडतोब निघालें पाहिजे. प्रसंग मोठा आणीबाणीचा आहे. काजी खुरशद यांनाही त्यांच्याच घरीं नजरकैदेंत ठेवण्यांत आलें आहे लवकर चला. "

नबाबाच्या वाड्याशीं आपली व इसाकची झालेली मुलाखत आणि जमालखानावरील त्याचा राग तसेंच दलियेच्या तपासांत त्याची झालेली

निराशा वगैरे प्रसंग डोळ्यांपुढे उभे राहतांच उमरशेखचें धाबें दणाणलें. आसगरअलीही भिऊन गेला, खुदादचा सल्ला घेणें शक्यच नव्हतें. राहतां राहिला जमालखान; पण इसाकची आपणावर तीक्ष्ण नजर आहे, हें लक्षांत येतांच गरुडाच्या भयानें लपणाऱ्या सर्पाप्रमाणें तो कुठें दडी मारून बसला होता तें उमरशेखला मुळींच समजण्यासारखें नव्हतें.

दालियेच्या निमित्तानें खुदादसह सर्वांना एकत्र करून बादशाही डाव साधण्याचा इसाकचा बेत उमरशेखच्या थोडासा लक्षांत आला; पण त्यांतून सुटावें कसें हें त्याला समजेना. दहा हजार रुपये गेले ते गेलेच, पण बादशहाच्या विरुद्ध बंडाळी माजविणारा जमालखान याच्याशीं संगमनत करून एका स्वतंत्र नबाबाच्या वाड्यावर हल्ला करण्याचा प्रयत्न केला, हा आरोप जर आपल्यावर लादला गेला तर त्यांतून आपली सुटका होणें शक्य नाहीं. तसेंच दालियेच्या बाबतींतही आपणावर जबरदस्त गुन्हा शाबीत होण्याचा संभव आहे..." उमरशेखच्या अन्तःकरणांत अशा प्रकारच्या विचारांचें काहूर माजलें असतां त्या स्वारानें दरबारला निघण्याची पुन्हां खडी ताकीद दिली. तेव्हां तो कांहींसा शुद्धीवर आला आणि योग्य तो पोषाख करून मोठ्या जड अन्तःकरणानें सुभेदाराच्या वाड्यांत जाऊन खास दरबारांत हजर झाला.

हा दरबार खास आपल्याच चवकशीसाठीं असून तो आपल्याला प्रतिकूल आहे हें समजून येण्याला उमरशेखला विलंब लागला नाहीं. काजीचे कांहीं शिपायी; मुबारक, इसाक वगैरे ठळक मंडळी आपापल्या दर्जाप्रमाणें आसनस्थ झाली असून सुभेदार उग्र चेहऱ्यानें प्रत्येकाची जबानी घेत आहेत हें जेव्हां उमरनें पाहिलें तेव्हां विशेषशी लपवाछपवी न करतां झालेला सगळा प्रकार सांगून मोकळें व्हावें असें त्याला वाटलें व तो आपल्या कबुलीजबाबाची जुळणी करूं लागला.

मुबारकानें आपल्या जबानींत उमरशेखचें कारस्थान उघड केलें. व काजीच्या शिपायांनीं त्याला दुजोरा दिला. दालियेसारख्या स्वर्गीय देवतेचा अशा रीतीनें छळ व्हावा आणि त्याबद्दल आपणाला कांहींहि समजूं नये याचें सुभेदाराला वाईट वाटलें. आपण नुसत्या भानगडींत पडून

दलियेप्रमाणें रत्न हातचें घालविलें याबद्दल इसाकलाहि पश्चा- त्ताप झाला.

उमरशेखवर जबाबाची पाळी येतांच दलियेचें दर्शन झाल्यापासून तों शेठ जमालच्या वाड्यांत तिच्यासाठीं आपण कसे घुसलों येथपर्यंत त्यानें सरळ रीतीनें व निर्लज्जपणानें सर्व माहिती सांगितली. हेतु हा कीं आपण खरें बोललों म्हणजे सुभेदार आपल्याला क्षमा करून सोडून देतील; पण त्याचा तो नीचपणा व सैतानी अत्याचार ऐकून सुभेदाराला इतका कांहीं राग आला कीं, त्यांनीं त्याला ताबडतोब कैद करण्याचा हुकूम केला व कडक सुरानें विचारलें, " तुझ्यावर बादशहाची थोडीशी दया व्हावी असें वाटत असेल तर तूं ताबडतोब जमालखान कुठें आहे तें सांग. दलि- येला घेऊन तो कुठें तरी पसार झाला असावा, व तूं निमकहराम कुत्र्या त्याच्याकडून बराचसा पैसा घेऊन आपल्या तोंडाला कुलूप घातलें असावेंस असा मला जबरदस्त संशय येतो. बोल, जमालखानाच्या बाबतींत तुला काय माहिती आहे ती सांग. "

जमालखानाबद्दल उमरशेखला कांहींच माहिती नव्हती; पण त्यानें तसें न सांगतां आणखी मूर्खपणा केला. तो म्हणाला, " धर्मावतार काजी खुदाद याला जमालखानाची सर्व माहिती आहे. कारण आपण बादशहा होतांच तुला अजमीरचा सुभेदार करतों असें काजीला त्यानें वचन दिलें आहे; त्यामुळें दोघांच्याही हालचाली एकमतानें चालत असतात. "

सलाबतखान अनुभवीक आणि दूरदर्शी होता. बादशहाच्या विरुद्ध चाललेल्या कारस्थानाचे बरेचसे धागे याच्याकडून आतां आपल्या हातीं येणार अशी त्याची खात्री होतांच त्यानें दलियेचें कारण पुढें करून खुदादादलाहि कैद करण्याचा हुकूम दिला आणि त्या कामावर खुद्द इसा- कचीच नेमणूक केली. कारण दुसरा अननुभवी मनुष्य पाठविल्यास त्याच्याकडून हें जोखमीचें काम होणार नाहीं व कदाचित् शत्रुहि हातचा निसटेल ! सुभेदाराची भीति बरोबर होती. व ती इसाकलाहि योग्य वाटली.

काजीला कैद करण्याचा हुकूम दिल्यानंतर त्याच्या घराची झडती घेण्या-

साठीं स्वतः जावयाचें ठरविलें व उमरशेखला म्हटलें, " उमर, तू बाद-शहाचा गुन्हेगार आहेस खरा; पण तुझ्यामुळेंच आम्हांला राजाविरुद्ध चाललेल्या एका मोठ्या कटाचा सुगावा लागला ही तुझी एक प्रकारची मदतच आहे असें मानून मी तुला या लढ्यांत बरीचशी सवलत देईन. इतकेंच नव्हे तर दालियेचा तपास लावून दिल्यास तुला तिचा पैसाहि मिळवून देण्याची व्यवस्था करीन; पण खुदादादच्या घराची झडती घेण्याच्या कामांत तूं आम्हांला सहाय्य केलें पाहिजेस. कारण त्याच्या सगळ्या गुप्त जागा आणि भुयारें तुला माहीत आहेत!"

उमरशेख म्हणजे एक कृपण सावकार! त्याला अक्कल ती कितीशी असणार! 'आपला पैसा परत मिळत आहे' एवढीच समजुत त्याला पुरेशी झाली. काजीच्या घरांतील सगळ्या चोरवाटा त्याला माहीत होत्या. पैशाचा लोभी मनुष्य कोणतेंहि नीच कामें करण्याला मागेपुढें घेत नसतो. उमरनेंहि तसेंच केलें. काजीचा सर्वस्वीं घात करण्याला तो तयार झाला, व सुभेदाराबरोबर निघाला. इसाकनें पुढें जाऊन आपली कामगिरी बजा-वलीच होती.

खुदादाद मात्र या आकस्मिक प्रकारानें अगदीं चकित झाला व नीच मनुष्यावर विश्वासून कोणत्याहि महत्त्वाच्या कामाला हात घातला असतां कसा घात होतो हें अनुभवून चुकला; तरी पण स्वतःला पकडलेलें पाहतांच त्यानें जमालखानाला इषारा करण्यांत चूक केली नाहीं, त्यामुळें सुभेदार येण्यापूर्वींच एका चोरवाटेनें जमालखान निघून गेला. व त्यानें दिल्ली दरबारला हादरून सोडलें; तरी पण इसाकच्या हातून त्याला सुटतां आलें नाहीं; तो प्रसंग आतानेंच येणार आहे.

---

# प्रकरण ३९ वें.



## मूर्तिदर्शन.

शहासुफीनें दिलेल्या एका लहानशा कागदांत दिल्लीच्या कनक—महालाचें संक्षिप्त वर्णन लिहिलेलें होतें. इब्राहीमनें तें वाचून पाहिल्यामुळेंच त्याला उत्सुकता उत्पन्न झाली होती.

हा 'कनकमहाल' किंवा हें 'हिरण्मंदार' सम्राट्च्या अन्तःपुराजवळच असून जनानखान्याच्या शेवटच्या महालाशेजारीं उभारण्यांत आलेलें होतें. संगमरवरी लाल दगडांनीं फारच सुशोभित रीतीनें तें बांधलेलें असल्यामुळें कोणालाही चटकन् आढळल्याशिवाय राहात नसे. या स्मारकमंदिराकडे लोकांची दृष्टी वेधावी असाच सम्राट्चाहि उद्देश होता.

दिलबाहार शहाजादीचें हें स्मारक सर्वांना फारच मनोरम वाटत असे. याच्या दोन बाजूंला दोन दरवाजे असून एका दरवाजांतून अगदीं थेट राजरस्त्यावर येतां येत असे. दुसरा दरवाजा मात्र जनानखान्याशीं संलग्न झालेला होता; पण तो नेहेमीं बंद असे.

या हिरण्मंदिराच्या चोंहोंबाजूंला आरक्त रंगाच्या दगडांचा मार्ग केलेला असून ठिकठिकाणीं लहानमोठीं फुलझाडें लावून पदपथांना शोभा आणलेली होती. त्यामुळें जिकडे तिकडे बहरलेल्या फुलांचा सुवास दरवळून गेलेला असे. जरी हें मंदिर म्हणजे एक शोकचिन्ह होतें तरी तो पुष्पबहार पाहून कोणाचेंहि अन्तःकरण तेथें रममाण झाल्यावांचून राहात नसे. पुष्पपरागांतून कणाकणांनीं मधुसंचय करणाऱ्या अलिकुलाचा मधुरगुंजारव जड हृदयाचें दडपण नाहींसें करून दिल खूष करीत असे.

या स्मृतिमंदिराला कबर असें नांव देतां येणें शक्य नव्हतें; कारण त्यांत कोणाचाही मृतदेह ठेवलेला नव्हता तरी पण त्याला महाल म्हणतां येणेंहि शक्य नव्हतें कारण कोणाही जिवंत परीची ती विलासभूमि नव्हती. जो तो त्याला हिरण्यमंदीर किंवा कनकमहाल असेंच म्हणत असे. मंदिराचा घुमट गोल असून पांढऱ्या दगडांचा केलेला होता. जमीन मात्र काळ्या फत्तरांनीं बनावेली असल्यामुळें मिश्र रंगाच्या वेदीला विलक्षण शोभा आली होती.

विचित्र रत्नखचित मिश्ररंगाच्या वेदीवर दिलबहारची निर्जीव स्वर्णमूर्ति विराजमान झालेली असून तिच्या मागच्या बाजूला असलेल्या भिंतीला तिचेंच तैलचित्र लटकत असलेलें दिसत होतें. या तैलचित्रांत शहाजादीचें पूर्ण सौंदर्य प्रस्फुटित झालेलें असल्यामुळें ती तेथें उभी आहे कीं काय असें वाटत होतें.

शहाजादीची कनकमूर्ति एक रेशमी वस्त्र पेहेरली असून अंगावर

हिऱ्यामोत्यांचे अलंकार शोभत होते; पण वेदीच्या खालच्या बाजूला एका शुभ्र दगडावर खोदलेली अक्षरें वाचण्याकडेसच बऱ्याचशा प्रेक्षकांचें लक्ष वेधत असल्यामुळें त्या अलंकारांकडे कोणीच पहात नसे.

दगडावर असें लिहिलें होतें:—" ही नाहींशी झालेली शहाजादी दिलबाहार जो कोणी शोधून आणून देईल किंवा ती अमुक ठिकाणीं आहे असें खात्रीपूर्वक सांगेल त्याला ही सालंकृत मूर्ति दान करण्यांत येईल." हें वाक्य वाचून पुष्कळांनीं आपल्या नशिबाची परीक्षा पाहिली पण त्यांत कुणालाच यश आलें नाहीं. ही मूर्ति नेहेमीं ताज्या पुष्पहारांनीं सुशोभित ठेवावी असा बादशहाचा हुकूम असल्यामुळें नेहेमीं त्या मूर्तीजवळ दोन दासींचा पहारा असे.

सम्राटच्या धाकट्या मुलीचें नांव गुलबहार. मागील एका प्रसंगीं या मुलीचा वाचकांना परिचय झालेलाच आहे. गुलबहार या वेळीं पूर्ण तारुण्यांत आली असून ती आपल्या सौंदर्यानें अगदीं गर्वाला चढलेली होती. तिनें अद्याप विवाह केला नव्हता. एका काळीं, रात्रीच्या वेळीं घडलेल्या एका घातकी प्रसंगानें ती इतकी क्षुब्ध झाली होती की ती सर्व पुरुषांचा तिरस्कार करीत असे. पुरुष तितके सगळे बेइमान असें ती म्हणत असे. कारण तिला कोणा एका बुरखेवाल्या पुरुषानें फसविलें होतें, व नसतीं धाडसें न करण्याबद्दल धमकाविलें होतें. जर त्या पुरुषाचा व तिचा परिचय झाला असता, त्यानें जर प्रेमाराधन केलें असतें, तर ती त्याच्या त्या शूरपणामुळें त्याला आपलें सर्वस्व अर्पण करायला तयार झाली असती; पण त्यानें तिची याचना केली नाहीं त्यामुळें कोणाही पुरुषाशीं आतां कसलाच संबंध ठेवावयाचा नाहीं अशी तिनें प्रतिज्ञा केली होती. गुलबहारनें आपला विवाह करावा म्हणून बादशहानें पुष्कळ प्रयत्न केले; पण त्यांत त्याला मुळींच यश आलें नाहीं. या बाबतींत मला कुणी जास्त त्रास दिल्यास मी आत्महत्या करीन असेंहि तिनें शेवटीं बादशहाला सांगितलें. त्यामुळें बादशहाला आपल्या मर्जीविरुद्ध तो नाद सोडावा लागला.

तिची प्रियतम वडील बहीण दिलबहार, हिच्या नाहींशा होण्यामुळें तिला नेहेमीं फारच दुःख वाटत असे. ती प्रत्येक शुक्रवारीं आपल्या बहिणीच्या त्या सुवर्णमूर्तीवर राशी राशी फुलें वाही आणि आपल्या मनाचें समाधान

करून घेई. तैलचित्रावर रोज पांच सहा माळा घातल्यावांचून तिला कधीं झोंपच आली नाहीं. तिची येण्याची वेळ झाली कीं या मंदिरांत चोहोंकडे कडक पहारा बसे. व शुक्रवारीं तर तेथें कुणालाही येण्याची परवानगी नव्हती. मात्र दर शुक्रवारीं कांहीं मुलें तेथें येऊन कांहीं गजल गाऊन जात अगर कुराणशरीफांतील कांहीं स्तोत्रें म्हणत. एकंदरीत तेथें नेहमीं जागर राहात असे.

असो. एका शुक्रवारीं अशा प्रकारें गायन करण्यासाठीं कांहीं ठराविक मुलें तेथें जमा झालीं असून त्यांनीं स्तोत्रपाठ म्हणून झाल्यानंतर गजल गाण्याला सुरुवात केली होती; इतक्यांत एक उच्च दर्जाचा पोशाख केलेला सभ्यसा दिसणारा मनुष्य त्या मंदिराच्या दरवाजाशीं येऊन उभा राहिला, गायन चालू होतें.

बालम्, आवो हमारे गेह रे ।
तुम बिन दुखिया देह रे ॥ धृ ॥
तु सब कोई कहे तुम्हारी नारी । मोको लागत लाज रे. ।
दिलसे नही दिल लगाया । तबलग कैसा सनेह रे ॥ १ ॥
अन्न न भावे नींद न आवे । गृह बन धरै न धीर रे ।
कामिन को है बालम प्यारा । ज्यों प्यासेको नीर रे. ॥ २ ॥

× × × × × ×

गायन अर्धवट बंद करून मुलें दुसरीच एक गजल गाऊं लागलीं.

हमतो हैं इस्क मस्ताना, हमको होशियारी क्या !
रहें आजाद या जनमें हमको चैन बेचैन क्या !
जो बिछुडे हैं पियारेसे, भटकते दर बदर फिरते ।
हमारा यार है हममें, हमको इन्तिजारी क्या !
न पल बिछुडे पिया हमसे, न हम बिछुडें पियारेसे ।
उनाहिसे नेह लागी है, हमको बे करारी क्या.

* * * *

मुलांचें गाणें ! निर्मल अर्थ ! ! निर्मल सूर आणि निर्मल भाव ! गायन-लहरी चोहोंकडे पसरत होत्या आणि ऐकणारांचे कान पवित्र करून दिगंताशीं विलीन होत होत्या. वेळ सायंकाळची असल्यामुळें प्रकृतिदेवीच्या

धूसरपणाची धुंदी पुष्पसुवासानें अधिकतर धुंद होऊन सूर्यकरांचा सोनेरीपणा मूर्तीच्या हास्योत्फुल्ल चेहऱ्यावर प्रतिबिंबित होऊन त्या प्रसंगाला अपूर्वता आणीत असल्यामुळें सर्वांचीच समाधी लागल्यासारखी झाली होती.

दरवाज्यांत उभा असलेला तो वरिष्ठ दर्जाचा मनुष्य हें चाललेलें गायन अगदीं लक्षपूर्वक ऐकत होता. कदाचित् त्याला आपण स्वर्गाच्या दरवाज्यांत उभे असल्याचाही भास झाला असावा. कारण आपण कुठें आहों आणि काय पहात आहों याचें त्याला भानच नव्हतें. त्या गृहस्थाला जरी त्या गायनानें अगदीं मोहून सोडलें होतें तरी त्याला मंदिरांत कांहीं येववेना, लोखंडी दरवाजा बंद असून छोटी दिंडी उघडी असल्यामुळें सर्वांनाच आंत जाण्याची परवानगी नसावी असें त्यास वाटलें असावें. नाहीं तर तो आंत गेल्यावांचून राहिला नसता, असें त्याचा चेहराच सांगत होता.

हा दुसरा कोणी नसून प्रेमवेडा इब्राहीम होता. त्याला मंदिरांत जावयाचें होतें; पण तो गेला नाहीं. अकस्मात् गायनही थांबलें. वीणेचा झंकार निस्तब्ध झाला आणि मोठ्या थोरल्या कड्यावरून लोटून द्यावें त्याप्रमाणें इब्राहीमला वाटलें, तो चकित होऊन इकडे तिकडे पाहूं लागला.

हृदयाच्या विलक्षण उत्सुकतेमुळें इसाकची परवानगी नसतांही त्याला न कळवितां तो दिल्लीला आला. इसाक घरीं येण्याचीहि त्यानें वाट पाहिली नाहीं, हें वाचकांना माहीत आहेच. सराईतील त्याच्या दोस्तानें-नसरतखानानें—त्याला कनकमहालाची गोष्ट सांगितल्यामुळें त्याचें हृदय जास्तच उतावीळ झालें आणि त्यामुळेंच त्या दिवशीं तो अगदीं सायंकाळ झाली होती तरी हिरण्मंदिराच्या दरवाजाशीं येऊन उभा राहिला.

पण त्या दिवशीं त्याच्या हृदयाची पिपासा तृप्त झाली नाहीं. कारण झांकलेला दरवाजा कुणीच उघडला नाहीं. आणि दरवाजा उघडल्यावांचून तर त्याला आंत जातां येणें शक्य नव्हतें. आधींच प्रेमवेडा बनलेला इब्राहीम तो प्रेमाचीं गाणीं ऐकून जास्तच वेडा बनला. व बरीच रात्र झाल्यावर निराशापूर्ण अन्तःकरणानें तो एखाद्या दारुड्याप्रमाणें पडत झडत आपल्या घराशीं आला. मालकाची वाट पहात दरवाजांत नोकर उभा होताच.

त्यानें लागलीच त्याचा हात धरून त्याला माडीवर नेलें. अतिरिक्त मद्यपानानें मालकाची कशी अवस्था झाली असली पाहिजे असा त्याचा समज होणें साहजिक होतें. इब्राहीमचेंहि त्याच्या त्या समजाकडे लक्ष नव्हतें.

नसरखानाच्या सहाय्यानें इब्राहीमनें आपल्याला पसंत असें एक दुमजली घर घेऊन त्यांत एक दोन नोकरांसह तो राहात असे हें पूर्वी सांगितलेंच आहे. निरनिराळ्या विलक्षण प्रसंगांतून त्याचा जीवनप्रवाह वाहात गेल्यामुळें त्याला आतां एकांतवासच फार पसंत वाटूं लागला होता. दुसऱ्या कोणाही माणसाच्या साहचर्याला जाणें अथवा त्याच्याशीं बोलणें त्याला अगदीं त्रासदायक वाटत असे. आणि यामुळेंच त्याला अगदीं एका बाजूला असलेलें हें घर विशेष पसंत पडलें होतें. कारण त्या बाजूला कोणीही येण्याचा संभव नव्हता.

ही इमारत एका लहानशा उद्यानांत असून घराच्या पश्चिमेकडची खिडकी उघडली कीं यमुनातरंगावर विहार करणारा निर्मल समीरण डोक्यावरून आलेला क्षीणभार उतरीत असे. यमुनातरंगाचा कलध्वनीही ऐकूं येई. जागा निर्जनच होती.

हिरण्मंदिराजवळून परत येतांना तो मनांत म्हणाला, " मी दिल्लीला आल्याला सातच दिवस झाले. इतक्यांतच निराश होतां नये. त्या मंदिरांत कधींना कधीं माझा प्रवेश झालाच पाहिजे. मग त्यांत मला मरण आलें तरी हरकत नाहीं. दलियेला तिच्या खऱ्या स्वरूपाची जाणीव उत्पन्न करून व तिला तिचा पूर्ण अधिकार मिळवून देऊन मग मी माझ्या हृदयांतील विचार तिला बोलून दाखविणार ! तिच्या सध्याच्या विपन्नावस्थेचा फायदा घेऊन मी तिला कधींहि माझी हो म्हणणार नाहीं. ती देवता आहे. मी तिची उपासनाच करीत राहीन.

असा विचार करून घरीं आल्यानंतर त्यानें इसाकला एक लांबलचक पत्र लिहिलें व ' येथें येण्याचा आपला उद्देश व पुढील कार्य ' त्याला जाहीर करून ' दलियेसह तूं ताबडतोब निघून ये असेंहि त्यांत त्याला सुचाविण्याला त्यानें कमी केलें नाहीं. तसेंच या पत्राचें अनुकूल उत्तर येतांच पुन्हां ती सुवर्णमूर्ति पहायला जायचेंहि त्यानें निश्चित ठरविलें.

# प्रकरण ४० वें.

## प्रियदर्शन आणि वेषांतर.

कांहीं संकटावांचून दुदैवी दलिया आपल्या झोंकदार पुरुषवेषांत दिल्लीला येऊन पोंचली. पहिल्या पहिल्यानें अशा वेषानें बाजारांतून वगैरे फिरण्याला तिला संकोच वाटत होता खरा; पण त्या पुरुषवेषाचा तिला असा कांहीं विलक्षण उपयोग होऊं लागला कीं, साहाजिकच तिचें धैर्य वाढलें व याच वेषांत आपली उर्जितावस्था होईल अशी तिची खात्री झाली.

शिवाय या पुरुषवेषांत ती फारच सुंदर दिसत असे. तिच्या त्या मर्दानी सौंदर्याची खुलावट तिलाच मोहीत करी व ती स्वतःवरच फिदा होऊन मोठ्या उत्साहानें वागे. तिला एक प्रकारचा आत्मविश्वास उत्पन्न झाला होता. हा कोणी तरी मोठ्या दर्जाचा सरदार असला पाहिजे अशी लोकांची झालेली समजूत पाहून, इस्कंदरनें पोषाख विकत घेण्यांत बरीच हुषारी लढविली असली पाहिजे अशी तिची खात्री झाली. तो पोरगा तिला फारच आवडूं लागला. त्याला सांगितल्यावांचून ती कोणतेंहि काम करीत नसे व तोहि आपल्या मालकाबद्दल विलक्षण पूज्यबुद्धि मानून त्याचा हुकूम मानण्यांत तत्परता दाखवी.

अशा स्थितींत दिल्लींत आलेला हा तरुण सरदार नवीवक्ष आपल्या नोकरासह एकदोन दिवस सराईखान्यांतच राहिला; पण तें तसें राहाणें दलियेला कसें पसंत पडणार! तिनें आपल्या नोकरामार्फत एक नवें घर भाड्यानें ठरविलें आणि त्यांत ती मोठ्या थाटानें राहूं लागली. आपल्या मनासारखी जागा मिळाल्याबद्दल तिला आनंद झाल्यावांचून राहिला नाहीं.

दलिया शिणकामांत फारच प्रवीण होती. त्यामुळें आपला निर्वाह कसा होईल याची तिला मुळींच काळजी वाटली नाहीं. तिनें स्वयंपाक वगैरे करण्यासाठीं एक दासीही ठेवून दिली. बाहेरच्या कामाला इस्कंदर होताच. त्यामुळें कुशलतेची शिलाई करण्याला तिला बराच वेळ मिळत असे. एकंदरींत तिचे बाह्य व्यापार यंत्रासारखे चालले होते खरे.

एक दोन दिवसांनीं तिनें इस्कंदरमार्फत कांहीं टोप्या व शबलें बाजारांत विक्रीकरतां पाठविलीं असतां तीं एका व्यापाऱ्याला फारच पसंत पडून त्यानें तेजीनें विकत घेतलीं व या व्यापारांत दालियेला—सगळा खर्च जाऊन—पांच रुपये लाभ झाला नंतर तिनें ठरविलें कीं रोज तयार होणारा माल एकाच व्यापाऱ्याला न देतां तो निरानिराळ्या पेठेंत पाठविला तर आपणाला जास्त किंमत येईल. तेव्हां या बाबतींत एकाशींच ठराव न करतां चढत्या दरानें माल विकावा व जास्त जास्त कलाकुसरीचें काम करून चढाओढ लावावी, कारण माल चांगला तयार होऊं लागला कीं मागणी फार असते हें तिला माहीत होतें. त्यामुळें आणखी एक दोन कामकरी माणसें ठेवून कापूस पिंजणें, सूत कातणें, कापड विणणें वगैरे बाबी तिनें घरांतच सुरू केल्या; त्यामुळें तिला पाहिजे तसें व पाहिजे तितकें कापड मिळूं लागलें, व तसलें कापड दिल्लीत तयार होत नसल्यामुळें तिच्या मालावर गिऱ्हाइकांच्या उड्या पडूं लागल्या. इस्कंदरही आपल्या धन्याची ती चतुराई पाहून हुरळून गेला व विक्रीचें काम मोठ्या हुषारीनें आणि किफायतीनें करूं लागला. पहिल्याच आठवड्यांत दालियेनें त्याचा पगारही वाढविला.

उत्साहानें उद्योग करण्यांत दालियेचे दिवस जात होते, त्यामुळें स्वतः—संबंधाचा विचार करण्यालाहि तिला फुरसत मिळत नव्हती. अशा स्वतंत्र व्यवसायांतच आपले दिवस जातील व दुसऱ्या कोणाच्याही तोंडाकडे पाहिल्यावांचून उत्तम रीतीनें आपली गुजराण होईल अशी तिची खात्री झाली व तिला एक प्रकारचा गाढ आत्मविश्वास उत्पन्न झाला.

इब्राहीम दिल्लींत येण्यापूर्वी फक्त आठच दिवस दालिया तेथें येऊन आपला जम बसवीत होती. व सरदार नबीबक्ष या नावानेंच लोक तिला ओळखीत असत. तिनें यापूर्वी बऱ्याच हालांत व त्रासांत दिवस घालविले असल्यामुळें तिला हा स्वतंत्र आयुष्यक्रम फारच सुखावह वाटला; पण इब्राहीमची आठवण केल्यावांचून तिचा एकही दिवस जात नव्हता. तिच्या नेत्रांपुढें तिला इब्राहीम दिसत होता. ती त्याला क्षणभरही विसरूं शकत नव्हती. मुबारकाचीही तिला आठवण होई. तीं दोन्ही माणसें जर आज मला येऊन मिळतील तर त्यांची गुलामगिरी करून दिवस घालवें-

त्यांतही मी आनंद मानीन इब्राहीमसारखा कट्टा प्रेमळ पुरुष जगांत मिळणें दुर्लभ आहे असें तिचें निश्चित मत झालेलें होतें. मुबारकासारिखा प्रेमळ भाऊ तिला हवा होता. आज जर तो येथें असता तर आपली बहीण इतक्या उर्जितावस्थेला चढलेली पाहून त्याला खरोखरच आनंद झाला असता. दालिया एकटीच बसली म्हणजे असे किती तरी विचार तिच्या मनांत येत; एकंदर सारख्या जिवाभावाच्या नोकरालाही ती आपलें हें हृद्गत सांगूं शकत नव्हती.

सुखी अथवा दुःखी कसाही मनुष्य असला तरी त्याचे दिवस कांहीं राहात नाहींत. उदयास्ताच्या चक्रांतून कुणालाच मोकळें होतां येणार नाहीं. दालियेचेहि असेच दिवस चालले होते; पण बरेच दिवसपर्यंत इब्राहिमकडची कांहींच बातमी समजली नसल्यामुळें ती अगदीं अस्वस्थ होत चालली होती. मुबारक जवळ असता तर त्याला तरी पाठविलें असतें असेंहे तिनें मनांत म्हटलें.

या विचारामुळें तिचें रोजच्या कामापासून मन उडालें. तिला त्यांत मौज वाटेना व एक भाड्याची गाडी करून आपण शहरांत फिरायला जावें असें तिनें ठरविलें. आपल्याकडे उत्सुकतेनें अथवा आश्चर्यानें कोणी पाहातो कीं काय, लोकांना आपल्याबद्दल काय कल्पना होते, हें तिला समक्ष पहावयाचें होतें. मनुष्य नेहमीं एकाच विचारांत गढून गेलेला असला म्हणजे त्याला कधीं कधीं असे विचित्र विचार सुचत असतात. कदाचित् त्यांत ईश्वराची कांहीं विचित्र योजना असेल की काय न कळे. पण दालियेला असें वाटलें खरें.

मनांत अशी विलक्षण कल्पना येतांच ती हळूच आपल्याशीं म्हणाली, "असं करण्यांत आपलें कांहींच नुकसान नाहीं. उलट फायदाच आहे! जर या शहरनिरीक्षणांत मला कांहीं विचित्र वाटलें नाहीं व लोकांनाहि माझ्याबद्दल संशय येत नाहीं अशी खात्री झाली तर निःशंकपणानें, शांततेच्या काळांत स्वतंत्र उद्योगानें पुढें आलेला एक सरदार म्हणून चार लोकांत जायला यायला हरकत नाहींशी होईल. व त्यामुळें उद्विग्न मनाचीही करमणूक झाल्यावांचून राहाणार नाहीं."

परिणाम कांहीं होवो; पण आपल्या मनाशीं ठरविलेला हा बेत तिनें

आपल्या छोट्या नोकराला सांगितला. इस्कंदरलाही ती एक मौजच वाटली. कारण आपल्यालाही आतां शहरांतून भिरवायला सांपडेल अशी त्यानें मनाशीं खूणगांठ बांधली. त्याला कामावांचून फारसें शहरांत जायला सांपडत नसे. अर्थात् गाडींत बसून इतर लोकांप्रमाणें मोठमोठ्या पेठांतून फिरण्याला तो कां बेर अनुकूल होणार नाहीं? आपल्या धन्याच्या या नव्या नवाईचें त्यानें चांगलेंच समर्थन केलें.

विलक्षण योगायोग म्हणतात तें यालाच. कारण याच संधीला इब्राहीमही दिल्ली शहरांत कांहींसा स्थाईक होऊन मनोरंजनासाठीं चांदणी-चौकांत फिरत होता. ज्या दिवशीं दालिया गाडींत बसून शहरनिरीक्षण करीत फिरत होती, त्याच दिवशीं इब्राहीमलाहि फिरण्याची लहर आल्या-मुळें सहजच इब्राहीमला दालियेनें पाहिलें. दोघांचीहि दृष्टिभेट झाली; पण कुणी कुणाला ओळखलें हें सांगावयाचें राहिलें. आणि म्हणूनच या धूळभे-टीच्या समारंभाचें थोडेसें विस्तृत वर्णन केल्यावांचून पुढें जाणें बरें नाहीं.

नीलनभोमंडळाच्या शेवटच्या पायरीवर सूर्यानें आपलें पाऊल ठेवलें होतें; पण तो अद्याप निवून गेला नव्हता. कारण उच्चप्रासादपूर्ण दिल्लीशहराचा निरोप घेतां घेतां त्याला काळवेळाचें भान राहिलें नव्हतें. आपल्या सोनेरी किरणांनीं उंच मंदिरांचीं शिखरें तो अद्याप गोंजारीतच होता. शहरांतील विशेषतः चांदणीचौकासारख्या बड्या पेठेंतील कोलाहल आणि गर्दी वाढत होती म्हटली तरी चालेल मोठे व्यापार थांबले होते तरी पण पानवाल्यांचीं दुकानें भरत होतीं. त्यांच्या शब्दांच्या फैरी झडत होत्या आणि उच्छृंखल गिऱ्हाइकें तांबूलचूर्णानें आपलें रसिकत्व प्रगट करीत होतीं. जनानखान्यांतील रहस्येंही सांकेतिक भाषेंत ओकलीं जात होतीं. लोकांच्याही तोंडावर हात कुणी ठेवावा! राजरहस्याचा खल पिच-कारीच्या फवाऱ्यांत रंगला जात होता. पण कोणत्याही राजदूताला तो थांबवितां येणें शक्य नव्हतें. सायंतनशीतल समीरणाच्या आशेनें किती तरी लोक सारखे बाहेर पडत होते. त्यामुळें शब्दाला शब्द वाढून कोला-हलीहि होत होती.

असो. रस्त्यापासून जवळ एका निवांत ठिकाणीं गाडी उभी करून दालिया आपल्या छोट्या नोकरासह पायींच फिरूं लागली. इतरांप्रमाणेंच

तिनेंहि पानवालीच्या दुकानांतील बाजारगप्पा ऐकण्याला सुरवात केली-मधून मधून उसन्या अवसानानें ती एकदोन शब्द बोलूंही लागली. इस्कंदरला हें सगळें विचित्र वाटत होतें; पण त्याला पानपट्टीची लज्जत घेण्याला मिळाल्यामुळें तोहि खूष झाला होता. आपणाकडे कोणीहि उत्सुकतेनें अथवा चौकसपणानें पहात नाहीं, अशी दलियेची खात्री होतांच तिला दुप्पट अवसान आलें व ती झोकदार लोकांच्या गर्दीतुनही मोठ्या नोकझोकानें फिरूं लागली. तरुण सरदाराचें तें अपूर्व सौंदर्य पाहून जरी कोणी कोणी थक्क होऊन जात असत तरी विशेष चवकशी करण्याच्या भानगडींत कोणीही पडत नव्हता. कारण जो तो आपल्याच नटण्या मुरडण्यांत व दिलखुष गप्पा झोकण्यांत गर्क झालेला होता. कोणा संस्थानिकाचा अगर नबाबाचा मुलगा असेल असें म्हणून लोक दुसरीकडे पहात.

एकंदर रागरंगावरून आपलें वेषांतर बेमालुम झालेलें आहे अशी दलियेची खात्री झाली. व मधून मधून अशी सफर केल्यास आपल्याला धोका येण्याचा संभव नाहीं असेंहि ती जाणूनच चुकली; असो. बाजारांत बराच वेळ फिरून झाल्यानंतर इस्कंदरला बरोबर घेऊन घरीं जाण्यासाठीं ती गाडीकडे येऊं लागली तोंच चौकाच्या मध्यभागीं उभ्या असलेल्या एका व्यक्तीकडे तिची नजर आकर्षित झाली, व तिचें पाऊल जागच्या जागींच थबकलें. मंत्रानें भारलेल्या माणसाप्रमाणें ती अगदीं निश्चित होऊन त्या व्यक्तीकडे पाहूं लागली; फार काय ? तिला स्थलकालाचीही विस्मृति पडली.

एकवार तिनें मनांत म्हटलें, " कदाचित् माझ्या पहाण्यांत चूक होण्याचाहि संभव आहे; पण जर चूकच झाली असेल तर संशयितपणानें इथून न जातां मनाची पूर्ण खात्री करूनच जावें म्हणजे जिवाला हुरहूर लागणार नाहीं. पण हा इस्कंदर जवळ उभा राहिल्यास मला कांहींच करतां येणें शक्य नाहीं. " त्या मुलाची अडचण भासतांच तिनें तावडतोब त्याच्या हातावर एक रुपया ठेविला व कांहीं सामानसुमान आणण्यासाठीं त्याला रवाना केलें.

इस्कंदर निघून गेल्यावर, ती कांहींशी पुढे सरली आणि निरखून पाहून

मनांत म्हणाली, "मी बरोबर ओळखलें. त्यांना ओळखण्यांत माझी कधींच चूक होणार नाहीं."

मनाची खात्री होतांच तिच्या सर्वांगांतून जोराचा रक्तप्रवाह सुरू झाला. हृदयांतही विलक्षण स्पंदन होऊं लागलें. आपल्याला काय होत आहे हें तिचें तिलाच समजेना. ती पुन्हां पुन्हां वेड्यासारखी ओठांतल्या ओठांत पुटपुटूं लागली! "हे मी काय पाहात आहे! खरोखर हे तेच काय? असें अकस्मात् त्यांचें दर्शन होण्याइतकी मी भाग्याची आहे!"

ज्या व्यक्तीला पाहून दालिया इतकी व्याकुळ झाली होती ती दुसरी कोणी नसून खुद्द इब्राहीमसाहेबच होते. आपल्या हृदयांत अक्षय वास करणाऱ्या त्या प्रत्यक्ष मूर्तीला पहातांच दालियेला असें वाटलें कीं, एकदम धांवत जाऊन त्यांच्या पायांवर लोळण घ्यावी आणि 'मी आपली दालिया आहें' असें स्पष्टपणें सांगावें; पण तिच्यानें तसें करवेना. बलवत्तर भवितव्यतेनें तिच्या हृदयांत लज्जा उत्पन्न केली. तिला पुढें जाण्याची लाज वाटली. पुढें टाकलेलें पाऊल तिनें मागें घेतलें. अधोमुख होऊन दीर्घ सुस्काराहि सोडला, पण तिच्यानें उभें असलेल्या जागचें कांहीं हालवलें नाहीं. ती तेथेंच उभी राहून विचार करूं लागली.

दारिद्र्यानें गांजलेल्या मनुष्याला अकस्मात् द्रव्याच्या राशी पाहून जसा अतिशय आनंद व्हावा, अथवा रूक्ष वाळवंटांतून जाणाऱ्या तृषाक्रांत प्रवाशाला समोर आकस्मिक निर्मल-जल पूर्ण सरोवर दिसल्यानें जसें समाधान वाटावें तसेंच दालियेला झालें. तिचा आनंद हृदयांत मावेना. तिचे गाल आरक्त झाले. ओठ थरथर कांपूं लागले. भालप्रदेशावर घर्मबिंदु चमकले. आपण पुरुषाचा पोषाख केलेला आहे हेंहि ती विसरली.

पहिली नजर कमी होतांच ती फारच सूक्ष्मपणानें इब्राहीमकडे पाहूं लागली. तव्हां त्यांची पूर्वींची स्वभावसुंदर कांती अत्यंत मलिन झालेली असल्याचें तिला आढळलें. त्याचा चेहरा काळजीनें निस्तेज झाला असून तो मधून मधून दीर्घ सुस्कारे सोडीत असावा अशीहि तिची समजूत झाली. कांहीं वेळानें एका दुकानांत जाऊन तो कांहीं जिन्नस खरेदी करीत असल्याचेंहि तिला दिसलें; त्या मुळें तिला पूर्वींची आशा बदलून

दुसऱ्या उंचवट्याच्या जागीं उभे राहावें लागलें. तिथून तिला तिचे आवडते मनुष्य चांगलें दिसत होतें; पण ती अशा प्रकारें त्याच्याकडे पहात आहे तोंच त्याचें सामान घेऊन झालें व त्यानें तें नोकराच्या डोकीवर चढविलेंऽहि तिनें पाहिलें. तिची निराशा झाली. आतां आपण काय करावें हें तिला सुचेना.

ती मनांत म्हणाली, लाजायचं कशाला! आणि आतां लपवाछपवी तरी कुणासाठीं? जावं आणि एकदम पाय धरावे म्हणजे झालें. आपणच ओळख पटेल."

पण तितक्यांत तिची विवेकवाणी तिला सुचवूं लागली, "छे. छे! एकदम इतकें अधिर होणें योग्य नाहीं. अजूनपर्यंत त्यांचा तो पूर्वीचाच स्वभाव कायम आहे कीं नाहीं हें चांगल्या प्रकारें समजून घेतल्यावांचून पुढें सरणें अविचारीपणाचें होईल. सगळें कांहीं विचारपूर्वक होऊं दे."

इब्राहीमच्या जवळच एक गाडी उभी होती. सामानसुमानाची बांधाबांध होतांच त्यानें ती गाडी नजीक बोलावली. अर्थात् त्याची निघण्याची तयारी झाली असें म्हणायला हरकत नाहीं.

त्याच वेळीं दालियेच्या मनांत एक नवाच विचार आला. ती म्हणाली. "मी जरी त्यांना या वेळीं भेटलें नाहीं तरी ते राहातात कुठें हें मात्र पाहून ठेवलें पाहिजे. त्याला काय हरकत आहे? त्यांच्या गाडीचा पाठलाग केला कीं सहजच ते कुठें राहातात तें मला कळून येईल."

वरील विचार मनांत येतांच लागलीच तिनें आपल्या गाडीवाल्याला पुढील गाडीच्या मागोमाग आपली गाडी नेण्याला सांगितलें व आपण चट्कन आंत बसली. इस्कंदर यावयाचा आहे याचें तिला भानहि राहिलें नाहीं. प्रेमानें वेडावलेलीं माणसें अशींच ज्या त्या ठिकाणीं चुकावयाचीं.

दोन्हीं गाड्या एकामागून एक याप्रमाणें चालूं लागल्या. बऱ्याचशीं इकडे तिकडे वळणें घेतल्यानंतर इब्राहीमची गाडी एका सुबक इमारतीसमोर येऊन उभी राहिली लागलीच इब्राहीमचा नोकर पुढें आला; त्यानें गाडींतील सामानसुमान आंत नेलें व गाडीवाल्याचें भाडें चुकतें होतांच तोहि गाडी घेऊन निघून गेला.

दालियेनें सर्व कांहीं लक्षपूर्वक पाहिलें. घराची निशाणी चांगली लक्षांत

ठेविली आणि ती आपली गाडी मागें फिरवून घरीं आली. आपली ही आजची शहरची सफर अशा रीतीनें कल्पनातीत यशस्वी होईल, हें दलियेच्या ध्यानींमनींही नव्हतें, पण तिच्या सुदैवानें तिला हात दिल्यामुळें आज बरेच दिवसांनीं तिचें अन्तःकरण थोडेंसें प्रफुल्लित झालें.

* * * * * *

दलिया ज्या घरांत रहात असे त्या घराच्या वरच्या मजल्याला दोन खोल्या असून त्यांपैकीं मोठ्या खोलींत दलियेची खास बैठक असे. लहानशा खोलींत इस्कंदर राही.

स्वयंपाकासाठीं जी कामकरीण ठेवण्यांत आली होती ती रात्रींचा काम उद्योग आटोपून झोंपण्यासाठीं आपल्या घरीं जात असे. अर्थात् रात्रीं नऊ दहा वाजल्यानंतर त्या घराच्या मुख्य दरवाजाला कडी घालण्यांत येई व कोणालाही आंत घतलें जात नसे.

रात्रींचा एकांत मिळतांच दलिया आपला पुरुषवेष उतरून ठेवी व आपल्या मूळच्या मोहिनी स्वरूपांत श्रांत अन्तःकरणानें बिछान्यावर पडून झोंपी जाई. पहांट होतांच स्नान वगैरे आटेपून पुरुषाचा वेष परिधान करी आणि त्यानंतर पुढचा दरवाजा उघडी. त्यामुळें तिचें स्वरूपरहस्य अगदीं गुप्त राहिलें होतें. आणि त्यामुळें तिलाही निश्चितपणा वाटत होता.

इब्राहीमचें दर्शन झाल्यापासून दलियेला एक मोठाच विचार पडला होता. आपलें आवडतें हृदयसर्वस्व आपल्या अगदीं जवळ असून आपणाला त्याची भेट घेतां येऊं नये, आपण नसत्या शंकाकुशंका काढून त्याच्यापासून दूर सरावें हें योग्य आहे काय हाच ती विचार करीत होती. तहानेनेल्यापुढें निर्मल जलाचें सरोवर दिसत होतें; पण सरोवराच्या तीरावर उभें राहून तहानेनें तळमळणाऱ्या जीवाची कोण कशी समजूत घालील बरें! दैवदुर्विलास किंवा भवितव्यता, दुसरें काय !

दलिया बिछान्यावर पडून पुढें काय करावें याचा विचार करीत होती. एकदां तिला वाटे असेंच आणखी कांहीं दिवस राहावें. त्यांची राहावयाची जागा तर मी पाहिली आहे, मग भीति कसची ? ज्यावेळीं त्यांना भेटावेंसें वाटेल त्यावेळीं मी त्यांच्याकडे जाईन ! त्यांचे पाय धरून क्षमा मागायला

मला कुणाचीच लाज वाटणार नाहीं. मी त्यांचीच आहें. ते माझा प्राण आहेत; मग आज भेटलें काय आणि चार दिवसांनीं भेटलें काय एकच.

पण पुन्हां विचारांची गति उलट होई. ती म्हणे, "पण असा विलंब केल्यामुळे पश्चात्ताप करावा लागला तर ? आधींच पावलोपावलीं माझ्यावर संकटें येत आहेत, दैव तर हात धुवून माझा पाठलाग करीत आहे, कदाचित् येथेंहि माझ्यावर कांहीं भलताच प्रसंग येणार नाहीं कशावरून ? नशिबाची परीक्षा पाहायला कांहीं तरी सीमा आहेच कीं नाहीं ! 'चांगलीं कामें शक्य तितक्या लवकर करावीं,' असें तर खुद्द इब्राहीमसाहेबच मला सांगत असत."

त्या दिवशीं पुरुषवेषानें ती चांदणी चौकांतून फिरून आल्यामुळें तिचा आत्मविश्वास वाढला होता. त्यामुळें साहसाचा विचार मनांत येतांच तिला वाटलें, "असें केलें तर ? याच वेषांतराला आणखी थोडेसें निराळें स्वरूप देऊन त्यांना भेटून यायला कोणती हरकत आहे ? मला त्यांनीं ओळखलें आणि दासी मानून आश्रय दिला तर उत्तमच झालें. पण तसें न होतां पूर्वींप्रमाणें माझ्यावर आतां प्रेम नाहीं असें अनुभवाला आलें तर ओळख न देतां निघून यायला मला कांहीं त्रास पडणार नाहीं. असें धाडस करण्यांत त्यांचें अंतःकरण कळून येईल आणि पुढें काय करावें तेंहि ठरविण्याला मला बरें पडेल."

प्रवाहाच्या ओघांत सांपडलेल्या शुष्क तृणांकुरांप्रमाणें दलियेच्या मनाची स्थिति झालेली होती. ती जो विचार करी तो तिला पसंत वाटे आणि त्याच मार्गानें ती पुढचे बेत करी. मात्र बराचसा विचार करूनहीं इब्राहीमसाहेबांचें दिल्लीला येण्याचें कारण कोणतें तें तिला समजून आलें नाहीं. त्यामुळें तिला तो विचार मात्र अगदींच सोडून द्यावा लागला.

निस्तब्ध निशीथकालीं सुखमय शय्येवर पडलेली असतांही दलियेला झोंप येईना. मध्यरात्र संपेपर्यंत तर तिचे विचारच चालू होते. पहांटेला तिचा साधारण डोळा लागला; पण तीहि गाढ झोंप नव्हती.

तितक्यांत तिनें एक स्वप्नही पाहिलें इब्राहीमसाहेब आपल्या बिछान्याजवळ आले असून त्यांनीं आपले दोन्हीं हात स्वतःच्या हृदयाशीं धरले आहेत आणि प्रेमळपणानें म्हणत आहेत कीं, 'दलिये ! ये. माझ्या हृद-

याजवळ ये. मी तुला इतके दिवस विसरून गेलों होतों याबद्दल मला क्षमा कर. मी आतां क्षणभरही तुला दूर ठेवणार नाही. " हें स्वप्न पहातां पहातांच ती जागृत झाली; पण कोणी कुठें नव्हते. तिला त्या वेळीं काय वाटलें असेल बरें !

उजाडतांच तिनें मात्र निश्चय केला कीं, ' नाशिवांत असेल तें होऊं द्या; पण पूर्ण वेषांतर करून आज त्यांची भेट घ्यावयाचीच. ते मला ओळखतात कीं काय तें पाहूं द्या. निदान त्यांच्या अंतःकरणांत काय आहे, तें मला समजलें तरी हरकत नाहीं.

---

# प्रकरण ४१ वें.

## वेड्याचें गाणें.

दिल्ली ही त्या काळच्या पठाण बादशहाची राजधानी होती. मोंगलांच्या कारकीर्दीत जरी तिनें वैजयन्तीसारखी शोभा धारण केली होती तरी पठाणी अमलांत ती अगदींच विशोभित दिसत होती असें नाहीं.

मनुष्य निराशेच्या अखेरच्या पायरीवर जाऊन पोंहोंचला कीं कोणतेंही भयंकर धाडस करायला तो तयार होतो. इब्राहीमची एकवार भेट झाल्यानंतर त्याला पुन्हां केव्हां पाहीन असें दिलियेला होऊन गेलें. ती त्याच्या दर्शनासाठीं उतावीळ झाली दीर्घकालाच्या विरहानंतरचें हें मीलन तिला अगदीं अस्वस्थ करीत होतें; पण एकदम मूळच्या स्वरूपांत त्याला भेटण्याला तिला धैर्य होत नव्हतें. प्रेमाची परीक्षा पाहायला ती उत्सुक झाली होती.

दोहींकडे ओढ घेणारें तिचें मन तिला सुचवीत होतें कीं, ' हा असा उतावीळपणा चांगला नाहीं. कारण स्त्रियांचा उतावळा स्वभावच त्यांच्या घाताला कारण होत असतो. ' यामुळें ती मनांतल्या मनांत म्हणे, " मी तर त्यांची दासीच आहें. त्यांची सेवाचाकरी करण्यांतच माझे अजूनपर्यंतचे दिवस गेले. त्यांचें स्वरूप निरीक्षण करण्यांतच माझ्या नेत्रांना

समाधान वाटतें. गायनापेक्षां त्यांचें बोलणेंच ऐकण्यासाठीं मी नेहमीं भुके-लेली असतें. कारण तें मला फारच श्रुतिमनोहर वाटतें. शिवाय त्यांच्या साहचर्यापुढें मला स्वर्गांतील सुखमय राहाणीही तुच्छ आहे; पण आज तीच स्थिति दोन्हीं अंतःकरणांत कायम आहे काय? अजून मी उमरखे-लच्या घरीं आहें असेंच त्यांना वाटत आहे. अर्थात् अशा स्थितांत माझ्या-वरचें त्यांचें पूर्वीचें प्रेम कायम आहे कीं नाहीं हें पाहायला नको काय? आणि अशी परीक्षा पहावयाची म्हणजे वेषांतर करून कांहीं दिवस त्यांच्या-बरोबर राहाणें भाग आहे. त्यावांचून त्यांच्या हृदयाचे बोल कळून येणार नाहींत. जर पूर्वीचें प्रेम कायम असेल तर लागलीच मी त्यांना माझी ओळख देईन; नाहीं तर दारुण निराशेंत कष्टमय जीवनाचा भार वाहाणें अशक्य होऊन कदाचित् मी दिवंगतही होईन.

"पण कांहीं असलें तरी या वेषानें त्यांच्या समोर गेल्यास ते मला ओळखल्यावांचून राहाणार नाहींत. तेव्हां चेहेऱ्यांत किंचित् परिवर्तन करणें भाग आहे. थोडासा काळेपणा आणला कीं झालें. या शहरांत सादीशेख नांव चा एक किमयागार हकीम राहातो असें मी ऐकतें; तेव्हां त्याच्या सहाय्यानें हें काम उरकणें योग्य होईल. इस्कंदरनें आणून दिलेल्या रंगानें विशेष उपयोग होणार नाहीं. रंग पक्का आणि संस्कार-युक्त पाहिजे."

मनाचा निश्चय झाला. साफ उजाडलें, दुपारही झाली; थोडेसे पैसे देऊन तिनें इस्कंदरला बाजारांत पाठविलें. हे जिन्नस खरेदी करण्यांत त्याचे तीन चार तास खर्च होणार होते आणि मुद्दामच तिनें तशी व्यवस्था केलेली होती.

इस्कंदर निघून गेल्यानंतर स्वयंपाकिणीवर घरच्या बंदोबस्ताचा भार सोंपवून दालिया स्वतःही बाहेर पडली. तिचें तुर्तचें वेषांतरही इतकें बेमालूम होतें कीं, त्या कामकरणीलाही ही स्त्री आहे हें उमगलें नाहीं. ती तिला 'धनीसाहेबच' म्हणत असे.

बाहेर पडतांच दालिया एका घोड्यावर स्वार झाली आणि त्या सादी-शेखच्या दुकानीं गेली. तेथें आपणाला पाहिजे असलेलें सामान त्याच्या

परीक्षेनें तिनें विकत घेतलें आणि ती पुन्हां घोड्यावर स्वार होऊन घरा-कडे फिरली.

या वेळीं एक प्रहर दिवस राहिला असल्यामुळें सायंकाळची कृष्णछाया दृग्गोचर होऊं लागली होती. मोठमोठ्या इमारतींच्या लांबच लांब छाया दिवसा काळोख करण्याची तयारी करीत होत्या. लोकांनीं आपले काम-धंदेहि आटोपते घेतले होते. दालिया घरीं येतांच ती एकदम आपल्या खोलींत गेली आणि तिनें दरवाजा आंतून बंद करून घेतला. नंतर तिच्या रूपांतराला सुरवात झाली. स्वतःच्याच प्रासंगिक अकलेनें तिनें आपला चेहेरा पूर्णपणें बदलून टाकला. आरशांत पाहिलें तों तिची तिलाही ओळख पटेनाशी झाली, तेव्हां तिला फार आनंद झाला आणि ती वेडसर माणसा-सारखा अव्यवस्थित पोषाख करून घराबाहेर पडली. तिला आतां कोणीही तातॅरी वेडा मुलगा म्हटलें असतें.

ती फिरत फिरत अगदीं सायंकाळच्या सुमारास इब्राहीमच्या घरा-समोरील रस्त्यावर येऊन उभी राहिली. इब्राहीम यावेळीं खिडकींत उभा राहून सायंकाळची शोभा पहात होता. दालियेनें त्याला पाहिलें व आपल्या वेषांतराचें आज सार्थक होणार असें तिला वाटलें. आपणाला आतां कोणीही ओळखणार नाहीं अशी तिची खात्री असल्या-मुळें ती अगदीं बेफिकीरपणानें रस्त्यांत उभी राहून वेडेचार करीत होती.

लवकरच त्या तातॅरी वेड्या मुलाला गाण्याची लहर आली; तो टाळ्या वाजवून एक हृदयस्पर्शी विरहगीत गाऊं लागला. वेड्याचें सगळेंच कांहीं अमर्यादित ! वेडा गात होता:—

प्रेमनगरका अन्त न पाया,
ज्यों आया त्यों जावेगा. ध्रु०
सुन मेरे साजन सुन मेरे मीता,
या जीवन में क्या क्या कीता,
सिर पाहनका बोजा लीता,
आगे कौन छुडावेगा. १ ज्यों०.
परली पार मेरा मीता खडिया,
उस मिलनेका ध्यान न धरिया,

टूटी नांव उपर क्या बैठा,
गाफिल गोता खावेगा. २ क्यों०.

* * * *

ऐसा प्रेम कहां है भाई. ध्रु०
सात दीप नौखंडको ब्यापै जहरां खोज लगाई. १
बा० देसबाके खबर न जानै जहं यहं प्रेम न पाई २
प्रेम नगरकी गैल कठिन है वंह कोई जान न पाई. ३

* * * *

गाण्याचे सूर जसे हवेंत तरंगूं लागले तसे लोकांनीं आपले कान टवकारले. गच्चींतून, खिडक्यांतून बाहेर आलेलीं सुंदर तोंडें खरी रसिकता व्यक्त करीत होतींच; पण कामकाजासाठीं रस्त्यानें जाणारे येणारे लोकही या वेड्या छोकऱ्याकडे वळलेले पाहून या गाण्यांत कांहीं तरी विशेष खुमारी असली पाहिजे असें एकाद्या दर्दी गवयालाही वाटल्यावांचून राहिलें नाहीं. हें गाणें इब्राहीमनेंहि ऐकलें आणि त्यालाहि तें इतरांप्रमाणेंच मधुर वाटलें; पण तो एकटाच असल्यामुळें व नेहेमीं प्रेमाच्याच विचारांत गुंगून गेल्यामुळें त्यांत त्याला एक प्रकारची आकर्षकता वाटली, व त्यामुळें तो सर्वांपेक्षां विशेष मोहित झाला. शिवाय त्याला संगीताची फारच आवड असे व दलियेनें त्याला किती तरी प्रेमाचीं गाणीं ऐकविलींहि होतीं. आजचें हें गाणें ऐकतांच त्याच्या सगळ्या पूर्वींच्या आठवणी जागृत झाल्या. व मन अगदीं अस्वस्थ होऊन गेलें. संगीताच्या लहरी पुनः पुन्हां त्याच्या कानावर येतच होत्या. गाणारा वेडा खरा; पण इब्राहीमसारखा सुज्ञ मनुष्यही त्या गाण्यानें वेडा झाला.

इकडे राजरस्त्यावर सारखी गर्दी वाढतच होती. दलियेनें वेड्याचें सोंग घेतलें होतें खरें; पण आपल्या सभोंवारची मनुष्यांची दाटी पाहून तीही आतां अस्वस्थ होऊन गेली. इब्राहीमनें पुन्हां खिडकींतून पहातांच तिला गाण्याची स्फूर्ति होईना. त्यामुळें तिनें आपलें गाणें थांबविलें. जमलेल्या मंडळींतून कोणी कोणी सद्गृहस्थ पुढें झाले आणि तिला पैसे देऊं लागले; पण तिनें कुणाकडूनही कांहीं घेतलें नाहीं. तरी पण कांहींनीं तिला म्हटलें, "अरे ए वेड्या मुला! आणखी एकादें

गाणें म्हण ना! असलीं गोड गाणीं उघड्या रस्त्यावर आम्हीं कधींच ऐकलेलीं नाहींत ”

हा आग्रह दलियेला आवडला नाहीं; आणि तिला आणखी गावें असेंहि वाटेना. तिनें विचार केला, ‘ आपण आणखी एकादें पद म्हणायला सुरवात केली तर गर्दी जास्तच वाढेल. तेव्हां इथून आपण निघून जावें हेंच उत्तम!’ लागलीच ती तेथून दुसरीकडे निघाली; पण तितक्यांत इब्राहीमचा एक नोकर माडी वरून खालीं आला आणि तिच्याजवळ येऊन म्हणाला, “ माझे मालक इब्राहीमसाहेब तुम्हांला बोलवीत आहेत!”

दलियेला आनंद झाला. याच बोलाविण्याची ती वाट पहात होती. आपण केलेलें साहस सिद्धीला गेलें असें तिला वाटलें. शिवाय जमलेल्या मंडळींतून निघून जाण्यालाही ही संधि बरी आहे असें तिनें मनाशीं ठरविलें. व ती त्या नोकराबरोबर त्या घरांत निघून गेली. लोकांनाही निराश होऊन निघून जावें लागलें. वेड्याला बोलविणारा कोणी तरी वेडाच असला पाहिजे असें मात्र म्हणायला मंडळी विसरली नाहीं.

इब्राहीम दलियेला ओळखूं शकला नाहीं. व त्यामुळें तिला आपल्या वेषांतराचें सार्थक झालेंस वाटलें. इतकेंच नव्हे तर त्याच्याशीं बोलायलाही तिला धैर्य आलें. ती म्हणाली, “ जनाब ! या गुलामाला आपण कशाकरतां बोलाविलें बरें ? ”

इब्राहीमनें एका वेत्रासनाकडे बोट दाखवून हंसत हंसत म्हटलें, वेड्या मुला! बैस-बैस; तुझें गाणें मला फारच आवडलें; पण तूं तरुण असतां असा बैरागी कां बनलास ?

दलियेनेंहि स्मितहास्यपूर्ण उत्तर दिलें, “ जनाब ! जगांत मला आपलें असें म्हणण्याला कोणीही नाहीं. त्यामुळें गाणीं गाऊन मी आपला निर्वाह करीत असतों. एकदोन दिनारांत माझी दिवसाची गुजराण होते, त्यामुळें सायंकाळचें दोनतास फिरल्यानें माझें काम होतें. मला कोणाची विशेषशी याचनाही करावी लागत नाहीं. ”

वेषांतर हें एक ढोंग होतें. पण हें आपलें ढोंग कल्पनातीत यशस्वी झालेलें पाहून दालियेला बरेंच धैर्य आलें. आपण केलें हें योग्य नाहीं हें जरी ती जाणून होती तरी भाषणाची मिळालेली अमोलिक संधि तिला सोडवेना. ती त्याच्या बरोबर अगदीं बेफिकीरपणानें बोलूं लागली.

इब्राहीम म्हणाला, " तुझें कोणी नाहीं म्हणतोस तरी तूं माझ्याकडे कां रहात नाहीं ? भिक्षा मागणें हें लाजिरवाणें काम आहे. मलाही दुसरें कोणी नाहीं, तेव्हां तूं येथें राहिलास तर माझीही करमणूक होईल. तुझें बोलणेंहि मला आवडतें. तूं नाहीं म्हणूं नको."

" माझी कांहीं हरकत नाही. तरी पण माझी राहण्याची एक स्वतंत्र जागा असल्यामुळें तिकडे मला गेलें पाहिजे. तेथें माझी एक म्हातारी राहते आणि ती माझ्यावरच अवलंबून आहे. तेव्हां मी येथें दिवसभर राहीन; पण रात्रौ राहतां येणार नाहीं. सायंकाळीं केव्हांही मी मोकळाच असतो."

इब्राहीमनें कांहीं वेळ विचार करून नंतर उत्तर दिलें, बरें तर, तुझ्या म्हणण्याप्रमाणें मी कबूल आहें दरमहा तुला कांहीं तरी वेतन द्यावें अशी माझी इच्छा आहे. "

वेषांतर केलेल्या दालियेनें जबाब दिला. जबाब! पोटाची काळजी खुदाला आहे. इतर कोणावरही मी माझा भार घालूं इच्छीत नाहीं आणि त्याबद्दल आपण विचारही करूं नये. इतकें असूनही मला कधीं आपली जरूर लागलीच तर मी आपणाकडे मागायला मुळींच संकोच करणार नाहीं. कारण मालकाकडे वेतन मागायला नोकराला लाज कसली.

इब्राहीम हंसतच म्हणाला, " बरें. तुझ्या म्हणण्याप्रमाणेंच होऊं द्या. तूं येथें कोणतेंही काम करूं नये. तुझा गळा मोठा गोड आहे तेव्हां प्रत्येक दिवशीं सायंकाळीं तूं मला चांगलीं चांगली गीतें म्हणून दाखवावींस. मी उद्यांपासून तुझी वाट पहात राहतों.

अशा प्रकारचा सगळा ठराव पास झाल्यानंतर दालियेनें त्याला एक लांबलचक सलाम करून म्हटलें आपल्या हृदयांचा हा मोठपणा पाहून मला अगदीं फारच आनंद होत आहे. खुदानें पैदा केलेल्या या सैतानी

दुनियेंत आपल्यासारखे उदारचरित महात्मे आहेत हें मला अद्याप समजलें नव्हतें; पण आतां खात्री झाली. "

असें बोलत बोलत दलिया माडीवरून खालीं उतरली आणि राजरस्त्यावर आल्यानंतर एक दीर्घ सुस्कारा सोडून आपल्या घराकडे निघाली.

---

## प्रकरण ४२ वें.



### विरहिजनस्य दुरन्तम् ।

सम्राट शिकंदरच्या दोन मुली असल्याचें आम्हीं एका प्रसंगीं वाचकांना सांगितलेंच आहे. पहिली आणि वडील मुलगी दिलबहार ही—जिच्यासाठीं एवढी कादंबरी लिहिणें भाग पडलें ती—तर नाहींशी झाली असून ती निदान बादशहाला तरी मेल्याप्रमाणेंच होती. इब्राहीम मात्र एक कसलें तरी निर्जीव सूत्र हातांत धरून ती जिवंत असल्याचें सिद्ध करूं पहात होता. इब्राहीमचे हे प्रयत्न कितपत सिद्धीला गेले हें पुढें समजणारच आहे.

शहाजादी गुलबहारसंबंधानें सांगायचें म्हणजे ती आतां त्याची एकटीच मुलगी होती. रंगमहालांत तिचेंच पूर्ण अधिपत्य असून बादशहावरही ती हुकूम चालवूं शकत होती. इतकेंच नव्हे तर बादशहाचा हुकूम अमान्य केल्यास क्षमा होत असे; पण तिचा हुकूम अमान्य केल्यास अपराध्याला खात्रीनें मृत्यु हा ठेवलेलाच. ती कुणालाच कधीं क्षमा करीत नसे. तिच्यासारखी गर्विष्ठ राजकन्या दिल्लीच्या अन्तःपुरांत आजपर्यंत जन्माला आलेली नव्हती. पुरुषजातीसंबंधानें तिला मूळचाच विलक्षण तिटकारा असे. अर्थात् कोणाही पुरुषाचें कधींच आपण वर्चस्व मानावयाचें नाहीं असें ज्याच्या त्याच्या जवळ ती म्हणत असे. ती स्वतःसंबंधीं कोणतेंहि कृत्य आपल्याच मालकीनें करीत असल्यामुळें तिचें जीवन विलक्षण रहस्यमय झालेलें होतें. ती पवित्र वर्तनाची आणि निर्मळ मनाची होती; पण अहं-

मन्यतेमुळें ती सर्वांकडेसच तुच्छतेनें पहात असे. मागील एका प्रकरणांत सांगितलेल्या त्या विलक्षण प्रसंगामुळें ती पुरुषजातीवर फारच दांत ओंठ खात असे व या जातीचें जगांतून निर्मूलन झाल्यास उत्तम असें ती म्हणत असे.

गुलबहार गाण्याची भोक्ती होती. कांहीं कांहीं तंबुऱ्यांवें वाजविण्यांत ती आपलें अलौकिक कौशल्य दाखवून लोकांना तोंडांत बोट घालायला लावी. आपल्या वादनानें श्रोते मुग्ध होऊन डोलूं लागले म्हणजे तिला एक प्रकारची धन्यता वाटत असे. अनेक वेळीं ती आपल्या बापाला धर्मसंगीत ऐकवून जगाचा विसर पाडी आणि त्याच्याकडून धन्य धन्य म्हणवून घेई.

गुलबहार अगदीं ठरलेल्या नियमानें दर शुक्रवारीं आपल्या बहिणीच्या मूर्तीसमोर जाऊन तिच्या अतृप्त आत्म्याला गोड गोड गाणीं ऐकवी. बहिणीवर तिचें विलक्षण प्रेम होतें. त्या मंदिरांत बसून स्वेच्छेनें गाण्याची तिला लहर आली म्हणजे ती आंत जाऊन एका चबुऱ्यावर मखमाली आसन घालून बसे. आणि मंदिराबाहेर खोजांचा पहारा ठेवी. जिवंत आणि मृत व्यक्तींचें जर एकमेकांवर निरतिशय प्रेम असेल तर त्यांचा केव्हांच लोप होत नाहीं असें गुलबहारचें मत होतें. ती अनेकवेळीं विचार करी, ' जरी माझी बहीण स्वर्गलोकीं गेली असेल, अथवा जरी समक्ष तिला माझें गायन ऐकविण्याची संधि मला मिळणार नाहीं, तरी हीं मी गात असलेलीं गीतें तिला ऐकूं जात असलीं पाहिजेत माझें हें प्रेम तिच्या अक्षय्यच्या कल्याणाला कारण होवो म्हणजे झालें. कारण हें सर्व तिच्या-साठींच आहे. '

अशा प्रकारचे कांहीं तरी विचार नेहमीं तिच्या मनांत येत असत. तेथें बसून गाणीं म्हटल्यानें तिला समाधान वाटत असे. दिलबहारची छाया मधून मधून दिसल्याचा तिला भास होई त्यामुळें तिला वाटे, माझ्या प्रेमाच्या बोलविण्याला तिचा प्रेमात्मा सशरीर येत असावा; पण तो गुप्तपणानें येत जात असल्यामुळें आपल्याला त्याची भेट होत नसावी. हा विचार तिच्या मनांत येतांच तिनें एके दिवशीं मंदिरासभोंवार कडेकोट पहारा बसविला आणि आपण आंत जाऊन अगदीं करुणस्वरानें प्रेमगीतें

आळवूं लागली. हेतु हा कीं, आपल्या बहिणीनें तावडतोब मूर्तस्वरूपानें आपल्या भेटीला यावें.

पण तिच्या या अशा करण्यामुळें एक निराळाच प्रसंग तिला अनुभवावा लागला. याचवेळीं इब्राहीमच्या मनांत दिलबहारची मूर्ति पहाण्याची इच्छा प्रबल झाल्यामुळें तो एकाद्या भ्रमिष्टासारखा त्याच मंदिराच्या दरवाज्याशीं आला.

मूर्तिदर्शनाची निराशा झाल्यामुळें पूर्वदिवशीं त्याला दुःखानेंच मागें फिरावें लागलें होतें; पण आज मात्र तशा प्रकारें मागें फिरावयाचें नाहीं असें त्यानें ठरविलें होतें

पण आपण येथें येण्यापूर्वीच मंदिराच्या चोहोंबाजूला पहारेकऱ्यांनीं वेढा दिला आहे, हें त्याला माहीत नव्हतें. त्यामुळें अचानकपणें तो त्या वेढ्यांत सांपडला.

मोठ्या उत्सुकतेनें तो आतां आंत पाऊल टाकणार तोंच एक सशस्त्र खोजा पुढें झाला आणि दरडाऊन म्हणाला, " कोण आहे ? आपणाला काय पाहिजे ? "

" सोन्याची मूर्ति पहाण्यासाठीं मी आलों आहे ! " इब्राहीमनें उत्तर दिलें.

" सम्राटची मुलगी शहाजादी गुलबहार ही इतक्यांत येथें येणार आहे त्यामुळें आम्हीं कुणालाही आंत जाऊं देऊं शकत नाहीं. " खोजानें उत्तर दिलें.

" पण आज कांहीं गुम्मा नाहीं ! "

" नाहीं का असेना ! शहजादीची मर्जी ! सम्राटची तिला नेहेमींच परवानगी आहे. "

" पण तिला यायला अद्याप विलंब आहे ! मी एक विदेशी मुसाफर असल्यामुळें मला कांहीं वारंवार इकडे येतां येणार नाहीं. मागच्या एके दिवशीं मी येथें येऊन परत गेलों. तर्‍हां आतां तरी माझी निराशा करूं नका. मी ती मूर्ति पाहून तावडतोब निघून जातों. मला तुम्हीं अडथळा न कराल तर फार मेहेरबानी होईल. माझी ही विनंति अमान्य करूं नका."

पहारेकरी खोजा प्रथम इब्राहीमशीं फारच गंभीरपणानें व हुकमी आवाजानें बोलत होता. पण त्याचा तो गोरा चेहेरा, तेजस्वी आंगकांति, उच

दर्जाचा पोषाख आणि बोलण्यांतील उदारता हीं पाहून तो मनांत म्हणाला, " हा खरोखरच कोणी तरी विदेशी मुशाफर असला पाहिजे; पण शहाजादी मंदिरांत येण्याची वेळ तर होत आली तेव्हां आपणाला याच्या बाबतींत कांहींच करतां येणार नाहीं गुलबहारचें सर्व पुरुषांसंबंधानें फारच वाईट मत झालें असल्यामुळें जर तिनें या प्रसंगीं याला या मंदिराच्या हद्दींत पाहिलें तर त्याचा परिणाम फारच भयंकर झाल्यावांचून राहणार नाहीं. कदाचित् याला खुनखान्यांतही जाऊन बसावें लागेल. "

असा विचार करून फारच सभ्यपणानें त्यानें इब्राहीमला समजाविलें कीं, तुम्हीं आज येथें राहूं नका. आणखी केव्हांही येथें आल्यास तुम्हांला येथील द्वाररक्षक सर्व मंदिर दाखवील. आपण कोणा तरी परक्या देशांतून आलां असून आपला दर्जाही बराच श्रेष्ठ असावा असें मला वाटतें; पण मंदिर दाखविण्याच्या बाबतींत माझा नाइलाज आहे. आपण नसत्या संकटांत पडाल. तेव्हां आज मेहेरबानी करून परत जा. "

इब्राहीमला फार वाईट वाटलें. त्याची भयंकर निराशा झाली. त्यानें शहाजादीला मनांतल्या मनांत किती तरी शाप दिले. आणि तो चरफडतच मागें फिरला व मनांत म्हणाला, " नाहीं. आज दर्शन घेण्याचा आतां कोणताही उपाय राहिलेला नाहीं. शहाजादीच्या हुकुमाविरुद्ध वागण्याची शक्ति मला कुठें आहे ? आणि निष्कारण मी तरी कां मरावें ? आधींच मला निरनिराळ्या संकटांनीं त्रासून टाकलें आहे तेव्हां आपण होऊन नवीन संकटांत उडी घेणें कांहीं योग्य दिसत नाहीं. दैवदुर्विलासाचे खेळ पहायला तरी जिवंत राहिलें पाहिजे. "

विचार करीत करीत व निराशेचे दीर्घ सुस्कारे सोडीत तो एकदांचा आपल्या घराजवळ आला. त्याचें सर्वांग विगलित झालें होतें आणि हृदयावरही दुःखाचा भार पडला असल्यामुळें जोराचे सुस्कारे टाकणेंहि त्याला अशक्य झालें होतें.

आजकाल इब्राहीमच्या अस्वस्थ मनाला थोडीशी स्वस्थता व आनंद मिळण्यास सुरुवात झाली होती, असें म्हणायला हरकत नाहीं. तारतरी वेडा मुलगा न याच्या सतत सान्निध्यामुळें त्याला एक प्रकारचें समाधान वाटूं लागलें होतें. त्याचें मधुर भाषण आणि गोड गोड गाणीं ऐकतां ऐकतां त्याचा केव्हांच

वेळ निघून जात असे. कां तें कुणाला माहीत; पण त्या मुलाकडे त्याचें मन ओढ घेत होतें. त्याचा वियोग त्याला सहन होत नव्हता; पण हें असें कां होतें हें मात्र त्याला कांहीच समजत नसे; पण संसारांत कार्यकारणा-वांचुनही कित्येक गोष्टी आकस्मिक रीतीनें घडत असतात त्यांचा तरी अंदाज कधी कुणाला होतो काय ? इब्राहीमला वाटलें, हीहि एक त्यात-लीच गोष्ट असेल झालें ! मात्र त्या मुलावांचून त्याला घटकाभरही करमत नसे एवढी गोष्ट खरी.

नबीबक्ष आपल्या म्हाताऱ्या आईला जेवणखाण घालून सायंकाळीं चार वाजण्याच्या सुमारास इब्राहीमकडे येई व बरीच रात्र होईपर्यंत तेथें राहून नंतर आपल्या घरीं जात असे. इब्राहीमचा नोकर त्याला पोंचवायला जाई. मात्र इतके दिवस चाललेल्या या संभाषणानेंहि त्यानें दालियेला ओळखलें नाही. हा एक वेडा मुलगा आहे असेंच त्याला वाटत असे. कधीं कधी बोलतां बोलता मध्यरात्रही होऊन जाई; पण नबीबक्ष त्या बाबतीत कधींहि तक्रार करीत नसे. व इब्राहीमची इतर परिचर्या पाहण्या-लाही तो नाखूष नसे.

वेड्या मुलाचा वेष घतलेली दालिया ही दिवसाउजेडी तेथें कां येत नसे हे वाचकांनीं ओळखलेंच असेल. तिला वाटे इब्राहीमसारख्यांशीं बोलतांना वेसावधपणानें आपण कांहीं तरी बोलून जाईन अगर उत्कट मनोविकारानीं स्वतःचें खरें स्वरूप उघड केलें जाईल. तेव्हां रात्रीच्या अ-स्पष्ट प्रकाशांत त्यांच्या जवळ बसलेलें बरें. कांहीं अंशीं तिची ही दक्षता कांही गैर नव्हती; पण इब्राहीमला मात्र तिनें वेड लावलें असल्यामुळें तो तिचें खरें स्वरूप शोधून काढण्याऐवजीं आपलेंच खरें स्वरूप उघड करीत होता. तरी पण ती प्रसंग ओळखूनच वागत असल्यामुळें त्याच्या भावलहरींनीं बेभान होत नसे.

इब्राहीम अन्तःकरणाचा प्रेमळ असून तो निःस्वार्थी प्रेम करीत असे. त्याला कसली अपेक्षा नव्हती. तो अन्तर्बाह्य प्रेमानेंच नटलेला होता आणि व्यवहारांत फसला तो यामुळेंच. जगाशी कसें वागावें हें त्याला माहीत नव्हतें. दुसऱ्यावर प्रेम करण्यांतच त्याला सुख वाटे आपणाला अमुक एक प्रकारचें सुख असावें अशी त्याला कधीच अपेक्षा नसे व तो दैन्या-

वस्थेतही कधींच गरजू नव्हता. तो प्रेमसाम्राज्याचा सम्राट असून कारभार घेतल्यावांचूनच राज्य चालवीत असे. दालियाही त्याच्याशीं तशीच वागे. तिलाही त्याच्या प्रेमावांचून कशाचीही जरूरी नव्हती. त्याला सुखी करणें हीच आपली इतिकर्तव्यता असें तिला वाटे. तिची स्वतःची अशी आपली कोणतीच इच्छा नव्हती. इब्राहीमशीं दोन घटका बोलायला मिळालें तरीहि तिला पराकाष्ठेचा आनंद होई. तिला त्याचें पाहचर्य पाहिजे होतें. मधुर संगीतसुधेचा वर्षाव करून इब्राहीमला ती खूष करी व त्याचा तो हास्य-प्रफुल्लित चेहेरा पाहून समाधान मानी. आपल्या अज्ञातवासाचें व आत्म-त्यागाचें योग्य चीज झालें असें तिला वाटे. एवंच इब्राहीमचें जें सुख तेंच आपलें सुख असें तिनें ठरविलें असल्यामुळें तिला आतां दुःख असें कांहींच राहिलें नव्हतें म्हटलें तरी चालेल. ती आतां प्रेमवेडी बनली होती व त्या-मुळें प्रेमाचीं गीतें गाण्यांतच तिला आनंद वाटत होता.

दालिया ऊर्फ नबीबक्ष यानें इब्राहीमची नोकरी पत्करून एकच आठवडा झाला होता; पण एकाच आठवड्यांत त्या दोघांत इतकी कांहीं एकवाक्यता होऊन गेली होती कीं, हे किती तरी दिवसांच्या परिचयाचे असावे असें इतरांना वाटत असे. इब्राहीम तर त्याला आपला नोकर न समजतां जिवलग मित्रच मानीत होता. आणि वास्तविक तो त्याचा पगारदार नोकर नव्हताही. खुषीनें जें मिळेल तें कुणाकडूनही घ्यावें एवढेंच त्याचें ठरलें होतें. गेल्या आठवड्यांत मिळालेल्या एका मोहोरेवरच तो खूष झाला होता. मात्र ती मोहोर त्यानें खर्च केली नव्हती. तर आपल्या चिमुकल्या पेटींतील एका कोंपऱ्यांत ती त्यानें लपवून ठेविली होती; कारण प्रियकराकडून मिळालेलें प्रथमचेंच प्रेमाचें बक्षीस खर्चून टाक-ण्याइतकी ती अनुदार नव्हती.

नबीबक्षानें इस्कंदराला सांगितलें होतें कीं, " आपल्याला एक नोकरी मिळाली असून तिकडे नेहेमीं सायंकाळीं जावें लागतें, तरी पण पंधरा दिवसांनीं हा आपला मालक दिल्ली सोडून जाणार असल्यामुळें नंतर आपल्याला आपला रोजचा धंदा चालविण्याला खूप फुरसत मिळेल. तोंवर तूं घरींच बसून राहा म्हणजे झालें. मी माझ्या मूळच्या स्वरूपांत-

ही या मालकाकडे जाऊं शकेन; पण शेजारी पाजारी त्याला कांहीं तरी दूषण देतील व आपल्यालाही तें योग्य नाहीं म्हणून मी हा नवीन वेष धारण केला आहे. तूं माझ्यासंबंधानें कोणत्याही प्रकारची काळजी न करतां आनंदांत राहा. तुला कांहीं जरूर लागली तर मला सांगत जा."

इस्कंदर लहानच होता व दलियेवर त्याचा पूर्ण विश्वासही होता. त्यामुळें त्याला तिचें हें सांगणें अगदीं अक्षरशः खरें वाटलें. शिवाय दलियेच्या उदार आणि ममतापूर्ण हृदयाचा त्याला चांगलाच परिचय झाला असल्यामुळें नसत्या शंका काढणेंहि त्याला योग्य वाटलें नाहीं. तो तिच्या त्या सांगण्यानें खूष झाला व आनंदांत राहूं लागला.

आज हिरण्मंदिराच्या दरवाजांतून निराशेनें मागें फिरावें लागल्यामुळें इब्राहीमच्या मनाची कशी स्थिति झली होती तें मागें सांगितलेंच आहे. तो असा चरफडत आणि दीर्घ सुस्कारे सोडीत जड अन्तःकरणानें घरीं येऊन पहातो तों नबीबक्ष आपलीच वाट पहात बसलेला त्याला आढळला.

या वेळीं सूर्यास्त होऊन गेला होता. इब्राहीमची खोली दिव्याच्या लख्ख प्रकाशानें सुशोभित दिसत होती, व त्याचें अव्यवस्थित सामानही व्यवस्थितपणानें लावून ठेवलेलें दिसत होतें. तो आंत येतांच नबीबक्षला पाहून खूष झालाच होता; पण ही सगळी व्यवस्था पाहून त्याला जास्तच आनंद झाला व तो श्रांतपणानें बिछान्यावर 'बसला. त्याच्या चेहेऱ्यावरचा खिन्नपणा केव्हांच नाहींसा झाला होता. तो प्रसन्न चेहेऱ्यानें नबीबक्षाला म्हणाला, " नबी! तुला येथें येऊन किती वेळ झाला?"

दलिया ऊर्फ नबीबक्षानें हंसत हंसत उत्तर दिलें, " थोडाच वेळ झाला, हुजूर! पण जनाब! आपणाला आज घरीं येण्याला इतका उशीर कां झाला बरें!"

इब्राहीमनें कोणाशीं कधींच लपंडाव केले नसल्यामुळें तो खरें तेंच सांगणार होता; पण अकस्मात् त्याला तसें सांगणें गैर वाटल्यामुळें तो

बोलण्याचा झोंक फिरवून सहजच्या स्वरानें म्हणाला, " एका मित्राला भेटायला गेलों होतों; पण दुर्दैवानें त्याची भेटच झाली नाहीं. "

असें सांगून आपले कपडे बदलण्याकरितां इब्राहीम आंतील खोलींत गेला. तेथेंहि दलियेनें कपडे वगैरे व्यवस्थित ठेवलेले असल्यामुळें त्याला बरेंच समाधान वाटलें. सरबताची भरलेली बाटली व पेला पाहून त्याच्या तोंडाला पाणी सुटलें. फराळाचे पदार्थही जवळच ठेवण्यांत आले होते. इब्राहीमनें हातपाय धुतले व फराळ करून सरबताचे दोन पेले घेतले तेव्हां त्याचे सगळे श्रम नाहींसे झाले. व आपल्यासाठीं इतकी व्यवस्था करून ठेवल्याबद्दल त्यानें नबीबक्षाचे आभारही मानले. कारण नोकर जर बरच्या- प्रमाणें आस्थेनें वागला तर धन्यालाही आनंद होत असतो.

असो. चंद्राच्या निर्मल प्रकाशानें रजनीदेवी स्नान करीत असून वसु- धरेच्या सर्वांग वरून तो रजतप्रवाह वाहात होता. श्यामल तरुशिखरां- वर शुभ्र ज्योत्स्नेचे किरण अमृताचा वर्षाव करीत असल्यामुळें झाडांनीं आपल्या मस्तकावर हिऱ्याचे मुकुट धारण केले आहेत कीं काय असें वाटत होतें. या वेळीं इब्राहीम खिडकींत उभा राहून सुधाधवलचंद्रिकेनें सुस्नात होत असलेल्या सुंदर रजनीच्या मोहक मूर्तीकडे पाहून आपल्या मनाचें समाधान करीत होता; पण त्या आनंदाचा वेग त्याला आपल्या हृदयांत कोंडून ठेवणें असह्य होऊन तो नजीक उभ्या असलेल्या नबीबक्षाला किंवा दलियेला म्हणाला, " चल! नबी; या चांदण्या रात्रीची मौज पहाण्यासाठीं आपण बागेंत जाऊन बसूं. "

दलियेची नाकबुली नव्हतीच. ती आनंदानें पुढें झाली व थोड्याच वेळांत दोघेंहि बागेंत आलीं:—यापुढें दलियेला नबीबक्ष याच नांवानें आम्ही संबोधणार आहों, तेव्हां वाचकांनीं तिच्या खऱ्या स्वरूपाची ओळख विसरूं नये—

नबीबक्षालाही असल्या एकाद्या निर्जन जागेंतच बसायला पाहिजे होतें. अर्थात् इब्राहीमची ही सूचना त्याला किती आवडली असेल याची वाचकांनीं कल्पनाच करावी. आपण शक्य तितकें प्रकाशांत येऊं नये असें त्याला वाटत असल्यामुळें बागेंत बसल्यानें अस्पष्ट प्रकाशामुळें आपणाला इब्राहीम ओळखूं शकणार नाहीं, अशी त्याची खात्री होती.

बागेत आल्यावर इब्राहाम एका चबुत्र्यावर बसला. कारण ती त्याची नेहमींचीच बसण्याची जागा होती. जवळ वाहाणाऱ्या कलनादिनी कालिंदीचें प्रवाहसंगीत ऐकूं येत होतें. आणि बागेंत फुललेल्या फुलांच्या सुवासावर यथेच्छ हात मारून तृप्त झालेला मलयसमीरण सुगंधाची चौफेर उधळण करीत संतप्त हृदयांचें शांतवन करीत होता.

इब्राहीमला कसली आठवण झाली कुणाला माहीत; पण तो अकस्मात् आग्रहपूर्ण स्वरानें नबीबक्षाला म्हणाला, " नबी! तूं कधीं कुणावर प्रेम केलें होतेंस का? सांग. संकोचित होण्याचें कारण नाहीं. तुझ्या हृदयाला कधीं प्रेमाचा चटका लागला असेल तर मला सांग."

इब्राहीमसाहेबांनीं विचारलेला हा प्रश्न ऐकून नबीबक्ष दचकल्या-सारखा झाला; पण तात्काळच भानावर येऊन शांतपणानें उद्गारला, "जनाब, मला असला चमत्कारिक प्रश्न आपण कां बरें विचारतां?" "हा काहीं आमुक एका कारणानें प्रश्न विचारला आहे असें नाहीं. सहज मनांत आ-लेली गोष्ट तुला विचारली इतकेंच. तूं तर वेडाच आहेस; पण कित्येक शहाणेहि या प्रश्नाचें उत्तर देतांना दचकतात. तूं प्रेमानें वेडा झालेला विरही मनुष्य तर नाहींस ना? कदाचित् प्रेमाची निराशा झाल्यामुळे अगर ज्याच्यावर तुझें प्रेम होतें ती वस्तु न मिळाल्यामुळेंहि तुझ्या चि-त्ताला भ्रम झाला असेल" "होय, मी एक वेडा आहें; एवढ्याकरच आपण असा प्रश्न विचारला असल्यास त्यांत विचित्र असें कांहींच नाहीं. पण, जनाब! माझें उत्तर ऐकून आपणाला निराशच व्हावें लागेल."

" कां बरें?" इब्राहीम आश्चर्यानें ह्मणाला.

" जगांत खरोखर प्रेम ह्मणून काहीं चीज आहे असें कांहीं मला वाटत नाहीं. प्रेम म्हणजे कोणातरी कवीची एक असंभवनीय कल्पना असावी इतकेंच. आपण ज्याला प्रेम समजतों तो एका विशिष्ट स्वार्थाचा खेळ आहे. मात्र हे प्रेमाचे नाटकी हावभाव ओळखणारा सच्चा दिलाचा वीरपुरुष पाहिजे; इतरांना हे असले अभिनय केव्हांच मोहून टाकतील. या स्वार्थी जगांत निष्काम प्रेम आढळणें कठीण असल्यामुळें अशक्य असें ठरून गेलें आहे. शिवाय मी एक गरीब दुःखी मनुष्य! पोटापुरतें मिळविण्यांतच माझा सगळा वेळ जातो; मग प्रेमाचे अभिनय दाखवून

एखाद्या साध्याभोळ्या माणसाला आपल्या जाळ्यांत ओढण्याला मला कुठचा वेळ मिळणार हुजूर ? शिवाय, खोट्या प्रेमाच्या मुलथापाहि द्यायला मी अद्याप शिकलों नाहीं. खऱ्या प्रेमाची अन्तःकरणपूर्वक मिळणारी मूक सहानुभूति ही नाटकी प्रेमाच्या मुलथापांपुढें निस्तेज होत असते; पण खऱ्या प्रेमाचा तो स्वयंप्रकाशी सूर्य त्याची मुळींच पर्वा करीत नसतो. दीनदुनियेचा मालक ईश्वर हाच त्या प्रेमाचा खरा भोक्ता होय. मग निराशा तरी कशी होणार ? "

" तूं ह्मणतोस तें कांहीं खोटें नाहीं; पण प्रेम करायला तुला फुरसत नाहीं असें ह्मणतोस तेव्हां यासंबंधाची माहितीहि तुला नसावी असें वाटतें. निःस्वार्थी निष्काम प्रेमाचा मोबदला या जगांत मिळत नाहीं हें तुझें बोलणें मला मान्य होणें अशक्य आहे. या दुःखमय संसाराच्या अंधारांत खरा प्रकाश पाडून लोकांना त्याची ओळख पटविण्यासाठीं कांहीं शापभ्रष्ट देवता जगांत वावरत असतात. त्याच्या बाबतीत हें तुझें म्हणणें फोल ठरेल. कारण मला त्याचा अनुभव आहे. मी एका शापभ्रष्ट देवीच्या निःस्वार्थी प्रेमानेंच आजपर्यंत जगांत वावरत आहें; पण हाय—माझी दिशाभूल झाली—माझे आतां ते दिवस—"

इब्राहीम पुढें बोलूं शकला नाहीं. प्रकाशाच्या स्निग्धपणामुळें त्याचा चेहरा दिसत नव्हता; पण जर या वेळीं तो नबीबक्षानें पाहिला असता तर नेत्रांतील अश्रु गालांवरून जमिनीवर टपकत असल्याचें त्याला दिसलें असतें नबीबक्षाचेहि नेत्र कोरडे नव्हते. इब्राहीमनें निरखून पाहिलें असतें तर त्यांतही विलक्षण तेज चमकत असल्याचें त्याला दिसलें असतें.

नबीबक्ष समजून चुकला कीं, आजचा प्रसंग कांहीं निराळाच आहे. तेव्हां हा प्रसंग सोडून देऊन दुसरीकडे वळल्यावांचून यांचें दुःखभारानें जड झालेलें अन्तःकरण हलकें होणार नाहीं. " त्याच्या मनांत हा विचार येतांच तो स्मित हास्यपूर्वक म्हणाला, " आज गाणें ऐकायचें नाहीं का साहेब ? रोज एकादें गीत ऐकल्यावांचून आपलें समाधान होत नाहीं, मग आज असें कां ? ईश्वराच्या नांवचें कांहीं ह्मणूं का ? "

" नको. त्याच्या नांवाला योग्य असा हा प्रसंग नाहीं. माझें अन्तःकरण यावेळीं निराळ्याच एका गोष्टीकडे वेधून राहिलें असल्यामुळें तुझ्या

त्या गाण्याकडे माझें लक्षही जाणार नाहीं. पण जर तुला एकादें प्रेम–गीत येत असेल तर तें म्हण. मला त्याची फार आवड आहे. मी एक प्रणय वेडा आहें असें म्हटलेंस तरी हरकत नाहीं. तूं कांहीं हम्ण; पण प्रेमावांचून जगांत खरी मौज नाहीं. प्रेम हाच या जीवितयात्रेचा सोपा मार्ग आहे. प्रेमाचा प्रवाह खुदाकडे वळो अथवा खुदाप्रमाणें पूज्य असलेल्या एकाद्या व्यक्तीकडे वळो; पण त्या प्रेमांत पवित्रपणा निःस्वार्थीपणा असल्यावांचून त्याच्या अपरोक्ष, हृदयाला कळवळा आणणारी हांक मारतां येणार नाहीं. म्हणून म्हणतों, नबी ! कृपा करून एकादें पवित्र प्रेमाचें गाणें गाऊन दाखीव. "

नबीबक्ष गाऊं लागला. वीणेच्या झंकारांत त्यानें एक नवाच राग छेडण्याला सुरवात केली. आलाप हवेंत तरंगूं लागले, आणि मीनकामाच्या सुरांनीं इब्राहीमचें हृदय नाचूं लागलें. आजच्या गाण्यांत सर्वच कांहीं अपूर्व असल्यासारखें त्याला वाटत होतें.

जाग पियारी, अबका सोवै,
रैन गई दिन काहेको खोवै !
जिन जागा तिन मानिक पाया,
तैं बौरी सब सोय गमाया.
पिय तेरे चतुर तूं मूरख नारी,
कबहुन पियकी सेज संवारी.
तैं बौरी बौरापन कीन्ही,
भर यौवन प्रिय अपन न चीन्हीं.
जाग देख पिय सेजन तेरे,
तोहि छांडि उठि गये सबेरे.

... ... .... ...

चोहोंकडे विलक्षण निस्तब्धता पसरलला असल्यामुळें गाण्याचे सूर व आलाप दिगंताशीं मिळण्याला धांवत होते. हें भावपूर्ण आणि हृदयवेधक संगीत ज्याला ज्याला ऐकूं येत होतें तो तो मनुष्य कान टवकारून स्तंभितच होत होता. गाणें आकाशांतही निनादत होतें.

पण अकस्मात् सूर बंद झाला आणि प्रतिध्वनि कायम राहिला. संगीत

संपलें आणि झंकाराचा झगझगाट कानाला ऐकण्याची पाळी आली; या गाण्यानें मनुष्याचें संजीवन आपण कांहीं तरी नवें शिकलों असें त्याला वाटूं लागलें आणि गाणें थांबतांच तो चमकल्यासारखा झाला. आपण काय ऐकत आहों याचें त्याला भान राहिलें नाहीं.

इब्राहीमच्या निराशापूर्ण अन्तःकरणांत मात्र अपूर्व प्रसन्नता उत्पन्न झाल्यामुळें त्याला ही संगीतसुधा ज्यास्तच प्राशन करण्याची इच्छा झाली. गाणें थांबतांच इब्राहीमनें उत्कटभावनेनें नबिबक्षाचे कोमळ हात आपल्या हातांत घेतले आणि आवेगपूर्ण स्वरानें म्हटलें "नबी ! तूं माझा अगदीं घात केलास ! हें गाणें तुला कुणी शिकविलें ? हृदयाला चटका लावून सोडणाऱ्या या तुझ्या गाण्याचा गुरु कोण ? "

नबीबक्ष हळूच म्हणाला, " त्याची काय मला आतां आठवण आहे हुजूर ! पण आपण असें कां विचारतां बरें ? माझें हें गाणें ऐकून आपणाला दुःख तर झालें नाहीं ना ? कदाचित् एकादी जुनी गोष्ट आपणाला आठवली असेल ! मी पुष्कळ ठिकाणीं हें गाणें म्हटलें पण कुणीही असा मला कधीं प्रश्न केला नाहीं किंवा आपल्यासारखा अस्वस्थही झाला नाहीं."

" होय नबी. तुझें अनुमान खरें आहे. तूं फारच कुशाग्रबुद्धीचा आहेस यांत संशय नाहीं. तूं अगदीं मनांत असेल तेंच बोलून दाखविलेस. खरोखर, तुझ्या गाण्यानें मला जुनी आठवण झाली. पूर्वीं कधींच मी तुझ्या तोंडून असलें गाणें ऐकलें नाहीं; पण दुसऱ्या एका माणसाच्या तोंडून हेंच गाणें अशाच रागरंगानें म्हणतांना मी ऐकलें होतें. तें गाणें त्या माणसाच्या तोंडून ऐकत असतां मी उदास अन्तःकरणानें डोळे झांकून बसत असें; पण मला त्यांत आनंद वाटे. मी तसल्या त्या स्थितींत किती तरी युगें घालविलीं असतीं; पण हाय ! ती माझी सुखाची आठवण स्वप्नाप्रमाणें अदृश्य झाली. ते दिवस कुठें बरें गेले ? "

" मला वाटतें, आपलें कुणावर तरी अन्तःकरणापासून प्रेम जडलेलें असावें. व ती व्यक्ति मरण पावली असावी अथवा आपला अव्हेर करून दूरदेशीं निघून गेली असावी. मी आज बरेच दिवस पहातें, तुम्हीं नेहेमीं कोणत्याशा एका तसबिरीकडे पाहात असतां व मनांतल्या मनांत कांहीं

तरी बोलतो ! मला वाटतें त्या चित्रानेंच आपलें मन चंचल केलें असावें. ती तसबीर मला एकवार दाखवाल का हुजूर ! "

नाहीं, नाहीं; ती कोणाला दाखविण्यासारखी नाहीं व दाखवितांहि येणार नाहीं. माझ्या वेड्या कल्पना, सुखाचीं मोहक स्वप्नें, आणि भावी आनंदाचें मनोराज्य मला एकट्यालाच उपभोगूं दे. मला त्यांत वाटेकरी नको आहे. शिवाय ती गोष्ट दुसऱ्याला सांगण्याचें साहसही मला होत नाहीं. कारण लोक मला हंसतील किंवा माझा उपहास करतील. नको, लोकांची ती विचक्षण परीक्षा पहाणें नको. माझा काल्पनिक आनंदच मला जिवंत ठेवायला पुरे आहे."

" पण एखाद्या छायेसारख्या अस्पष्ट कल्पनेनें भ्रमिष्ट बनून आपल्या हृदयाची अखंड शांति घालविणें हें तुम्हाला शोभत नाहीं." नबीबक्ष हळूच म्हणाला.

" या छायामय कल्पना नव्हेत. ही मूर्त कल्पना आहे. हें सत्य आहे. प्रत्यक्ष अनुभवलेली गोष्ट मी सांगत आहें. पण रुक्ष भूमीतील मृगजला-प्रमाणें ती दृश्य अदृश्य होत असल्यामुळें मला अद्याप निश्चित असें कांहीच ठरवितां येत नाहीं एखादे वेळ तुझ्यांतच त्या मूर्तीचा मला भास होतो. कारण त्या चेहऱ्याचें मोहक प्रतिबिंब मला तुझ्या चेहऱ्यांत दिसत आहे. नेत्रांतील चमक तीच. मुखकांति तसेच. बोलणें तेंच, पण तूं पुरुष असून फारच निस्तेज दिसतोस तशी ती दिसत नव्हती. तप्त कांचनाप्रमाणें ती चकाकत होती."

इब्राहीमचें हें बोलणें ऐकून नबीबक्षाला मनांतल्या मनांत अतिशय आनंद झाला. त्याचें अधिरें मन त्याला सुचवूं लागलें कीं, आतां आणखीं कसली परीक्षा पहायची ? ओळख द्यावी झालें ! आत्मसमर्पण करण्याला असली योग्य संधि पुन्हां मिळणार नाहीं. 'पण ती आपल्या मनाचा धिक्कार करून म्हणाली, "पुरुषांचें काय? त्यांचें किती जणींवर तरी प्रेम जडतें, पण आम्हीं स्त्रिया आपल्या आयुष्यांत एकावरच प्रेम करीत असतों. तेव्हां यांचें हें बोलणें कोणत्या रमणीला उद्देशून आहे हें समजल्यावांचून एकदम इतकें पुढें सरणें बरें नाहीं."

असा विचार करून नबीबक्ष हंसून म्हणाला. " वाः, माझ्यासारख्या

वेड्याला आपण आपल्या जुन्या आठवणींत ओढून घेतला वाटतें! पण सांभाळा बरें, आपल्या त्या सुखाच्या कल्पनेची माझ्यामुळें कदाचित् माती होऊन जायची. माझ्यांत आणि आपल्या त्या प्रेयसींत इतकें सादृश्य होतें म्हणतां तर! "

इब्राहीमनें निश्चयपूर्ण स्वरानें उत्तर दिलें, " होय. मी सांगतों यांत एक अक्षरही खोटें नाहीं. तूं आपल्या वागणुकीनें व बोली भाषणानें मला आपला गुलाम बनविलें आहेस. कां तें कुणाला माहीत; पण एखादे दिवशीं तूं आलास नाहीं तर मला दाही दिशा शून्य दिसूं लागतात. कांहीं सुचेनासें होतें. खरें सांग नबी, तूं कोण आहेस? तुला नुसता हात लावल्यानेंहि माझें हृदय इतकें उल्हसित कां होतें? तुझ्याकडे पहात राहिलें असतां मला त्या माझ्या प्रेममूर्तीची कां आठवण होते? तुला रात्रंदिवस पहात रहावें असें मला कां वाटतें? सांग. सांग नबी! माझी अशी दशा कां झाली? मनांत कांहीं ठेवूं नको. मी तुझ्याशीं कपटानें वागत नाहीं; मग मला असें तळमळत ठेवणें तुला योग्य बाटतें का?

बोलण्याचा ओघ दुसरीकडे वळविण्याच्या हेतूनें नबीबक्ष म्हणाला, " जनाब! आपण कांहीं तरीच विचारतां! आपणाला झालें आहे काय? कांहीं नाहीं. कसल्या तरी कल्पना लढवून आकाशांत दगडी इमारत उठवायला गेलें कीं ती कधीं आपल्याच मस्तकावर कोसळत असते. तेव्हां तो प्रयत्नच न केला तर! कदाचित् त्या चित्रामुळेंहि आपणाला हा असा भ्रमिष्टपणा येण्याचा संभव आहे. तेव्हां तें चित्रच बाजूला ठेवलें पाहिजे. अथवा माझ्यामुळें आपल्या मनाची ही अशी स्थिति झाली असेल तर मला निरोप द्या. मी आपला दुसरीकडे निघून जातों. आपलेंच अन्न खाऊन आपलेंच अनहित करावें हें योग्य नाहीं; पण मी आधीं आपणाला एक प्रश्न विचारतों त्याचें उत्तर द्या. आपलें कुणावर तरी प्रेम जडलें असून त्या व्यक्तीनें आपला कधीं धिक्कार केला होता का? "

या प्रश्नानें इब्राहीमच्या हृदयाचा चावा घेतला. तो एक दीर्घ निःश्वास सोडून क्षीण स्वरानें म्हणाला, " मी खोटें कशाला बोलूं नबी! जर मी कधीं प्रेम केलें असेल तर त्या एकाच व्यक्तीवर. त्या जीवावांचून माझ्या अन्तः-

करणांत दुसऱ्या कोणालाही जागा मिळालेली नाहीं. व तिला जें दिलें तें मी दुसऱ्या कुणालाही दिलेलें नाहीं. कारण तीच व्यक्ति योग्य होती. कारण तिच्याकडून मला जो मोबदला मिळाला तो माझ्या दानाच्या कितीतरी पट मोलाचा होता; पण मी केवढा निष्ठुर !! तिच्या त्या निःस्वार्थी प्रेमाला मी नुसतें जाणलें सुद्धां नाहीं. तिची मला ओळखच पटली नाहीं. माझ्या ओंठाला लावलेला अमृताचा पेला मी अविचारानें दूर झुगारून दिला. हाय! माझ्यासारखा दुर्दैवी मनुष्य जगांत कोणी तरी असेल का?"

"अशी कोण बरें ती भाग्यवान व्यक्ति! आपल्यासारख्या महाभागाचा जिला प्रेमलाभ झाला ती सुदैवाचीच असली पाहिजे यांत शंका नाहीं." यावेळीं नबीच्या नेत्रांत विलक्षण तेज चमकत होतें.

हृदयभेदक दीर्घ निश्वास सोडून इब्राहीम म्हणाला, "हाय! त्या गोष्टीची नुसती आठवण झाली तर गहिंवर येतो. मी कसें बोलूं नबीबक्ष! माझा हा हाडांचा पिंजरा तिच्या विरहाग्नीनें जाळत आहे. केव्हां तो जळून जाईल कुणाला माहीत! ती आठवण झाली म्हणजे हृदय इतकें अस्वस्थ होतें कीं, प्रलयकालचें तुफानही त्यापुढें कांहींच नाहीं. ती माझ्या घरीं दासीप्रमाणें राबत होती; पण तिचे गुण आणि सौंदर्य एखाद्या शहाजादीला शोभेसें अनुपम होतें; पण ती गेली! मला सर्वस्व हिरावून गेली!! माझ्यांत आतां मीपणा उरलेला नाहीं. तिचा आत्मत्याग विलक्षण, तिचें सौंदर्य लोकोत्तर, तिची दया देवदुर्लभ आणि तिचें प्रेम निरुपमेय असल्यामुळें मला तिनें आपला गुलाम बनविलें होतें; पण आतां ती कुठें आहे!"

"तिचें नांव आपणाला आठवतें का?" नबीबक्षानें मुद्दामच प्रश्न केला.

तिचें नांव दालिया. माझ्या हृदयाचें प्रत्येक स्पंदन दालियेच्या नांवाचा जप करीत आहे; मग मी तिचें तें पवित्र नांव कसें बरें विसरेन." बोलतां बोलतां इब्राहीमच्या नेत्रांत अश्रु आले.

"ती पुन्हां आपल्याला भेटण्याचा कांहींच संभव नाहीं का?"

" आहे. आणि मी तिला मिळविण्याची खटपटही चालविलेली आहे; पण नबी ! ती मला मिळेल का ? "

" कां बरें मिळणार नाहीं ? अवश्य मिळाली पाहिजे. समजा. ती आपल्याला मिळाली पुढें ? "

" पुढें काय ! ती माझी हृदयेश्वरी आणि मी तिचा गुलाम ! एक क्षणभरही तिच्या जवळून दूर जावयाचें नाहीं हा निश्चय ! ! आणखी काय करूं ! "

इब्राहीमच्या तोंडचे हे शब्द ऐकून नबीबक्षला फारच आनंद झाला. त्याच्या नेत्रांत आनंदाश्रु आले; ' पण हाच प्रसंग पुढें वाढविणें योग्य नाहीं. कारण तो फारच दुःखकारक होईल. हृदयाची परीक्षा झाली इतकें पुरें. ' असा त्यानें विचार केला आणि तो स्तब्ध राहिला.

नबीबक्ष कांहींच बोलत नाहीं असें पाहून इब्राहीमनें विचारलें, " माझ्या बोलण्यावर तुझा विश्वास बसत नाहीं का ? नबीबक्ष ! तुला काय वाटतें तें मला सांग. "

नबीबक्ष स्मित हास्यपूर्वक म्हणाला, " मला काय वाटायचें जनाब ! आपलें बोलणें मला खोटें वाटत नाहीं; पण असें तीन चार ठिकाणीं मनाला अडकवून ठेवल्यानें आपल्याला कसें सुख मिळेल त्याचाच मी विचार करीत आहें. आपण प्रथम दालियेवर प्रेम करीत होतां, त्यानंतर या तसबिरींतील सुंदरीनें आपणाला वेड लावलेलें दिसतें आणि आतां माझ्याशिवाय आपल्याला क्षणभरही करमत नाहीं ! ! जनाब ! मला वाटतें, आतां असा विचार करीत राहिल्यास आपणही माझ्यासारखेच वेडे बनाल ! ! तेव्हां दुसरीकडेसच लक्ष वळवावें हें बरें. मी आतां गाणें म्हणतों ! ! "

असें म्हणून नबीबक्ष आपल्या मधुरस्वरानें गजल गाऊं लागला,

चली मैं खोजमें पियकी; मिटी नही सोच यह जियकी,
रहे नित पासही मेरे; न पाऊं पारको हेरे.
विकल हूं ओरको धाऊं; तबहुं नही कन्तको पाऊं.
धरूं कहिं भांतसे धीरा; गयो गिर हातसे हीरा.
कटी जब नैन की झाई; लखो तब गगनमें सांई.

अजाना शब्द कहि भासा, नैनमें यारको वासा.

* * * *

मन मिलि पितमवा खेलो होरी, ध्रु० ॥
संसय जात सकल छिन माहीं,
अवागवनके फंदा तोरी. १
चित चंचल अस्थिर करि राखो,
सुरत निरत करो एक ठौरी. २

... ... ... ... ... ...

गाणें ऐकतां ऐकतां इब्राहीम अगदीं वेडावून गेला. कितीहि ऐकलें तरी त्याचें समाधानच होईना. त्यानें पुन्हा नबीबक्षाचे सुकोमल हात आपल्या हातांत घेऊन विनवणीच्या स्वरानें म्हटलें, "गा, गा. नबीबक्ष तूं थांबूं नको. गातच राहा. तुझ्या गाण्यावांचून मला आतां कांहीं नको."

नबीबक्ष पुन्हां गाऊं लागला,

नाथ! चला जाऊं! त्या देशीं! नाथ चला०
ज्वाला विरहाच्या नच जेथें,
नाहिं निराशा दुःखहि जेथें,
चिर-सुवास, चिर-मलय हास, प्रेम-गीत गाऊं. नाथ. १
अनुतापाच्या निश्वसनाहीं,
उपवन जेथें पोळत नाहीं,
शशि-विकास, चिर-मधुर-हास-एक-हृदय होऊं. नाथ. २

गाणें थांबतांच इब्राहीमनें नबीचा उजवा हात धरला आणि म्हटलें, "चल. नबी, तुला तो देश माहीत आहे का? मला त्या देशांत घेऊन चल. कारण या विरहाच्या यातना मला आतां सहन होत नाहींत. कोणा विरहिणीचें बरें हें गीत असावें? जर तुला तिचें नांव माहीत असेल तर सांग. कारण तीहि माझ्याप्रमाणेंच विरहानें पोळलेली असावी. समदुःखी मिळाल्यावर थोडेसें समाधान तरी वाटेल—"

हें बोलणें केव्हां संपणेंच शक्य नाहीं असें नबीला वाटलें. कदाचित् या प्रसंगीं आपलेंहि देहभान नाहींसें होईल तेव्हां येथून जावें हें बरें, असा

विचार करून त्यानें हळूच आपला हात सोडवून घेतला आणि म्हणाला, हुजूर ! रात्र बरीच झाली. माझी म्हातारी आई घरीं वाट पहात असेल, मी आतां जातों.

इब्राहीम तरी त्यावर काय बोलतो ! आपल्या प्रेमप्रवाहांतील हा अडथळा त्याला सहन झाला नाहीं. ' नवी हा एक अरसिक मुलगा आहे, ' असेंहि त्याला वाटलें; तो बोलून चालून वेडा त्याला तारतम्य तें कसलें असणार ! असेंहि तोच आपल्या मनाशीं म्हणाला, आणि त्यानें त्याला जाण्याला परवानगी दिली. हिरण्मंदिरांत जाऊन मूर्तीचें दर्शन घेण्याचें काम त्यानें दुसऱ्या दिवसावर लोटलें व अस्वस्थ मनानें तो आपल्या शयनमंदिराकडे वळला.

---

# प्रकरण ४३ वें.



## बादशहाच्या रंगमहालांत.

सगळ्या रात्रभर विचार करून इब्राहीमनें शेवटीं असें ठरविलें कीं, कसलेंहि धाडस करावें लागो; पण उद्दईक हिरण्मंदिरांत जाऊन ती सोन्याची मूर्ति पहावयाचीच. माझी पुढें होणारी उर्जितावस्था जर त्या दर्शनावरच अवलंबून असेल तर साहसानें पुढें सरणें भाग आहे.

दुपार टळलेली पहातांच इब्राहीम उंची प्रकारचा पोषाख करून घरांतून बाहेर पडला आणि इकडे तिकडे फिरण्यांत निष्कारण वेळ न घालवितां मंदिराजवळ आला; पण तेथें येऊन पहातो तों दरवाजा बंद असल्याचें त्याला दिसलें. आसपास कोणी मनुष्यही नव्हतें.

मुख्य रस्त्यावरचें दार बंद होतें खरें; पण मंदिराला लागूनच असलेला तटाच्या भिंतीला एक छोटासा दरवाजा असून तो उघडा असलेला त्याला आढळला. त्यानें त्या दिंडिदरवाजांतून आंत पाहिलें तों ती वाट सरळ अंतःपुराकडे जात असलेली त्याला दिसली. शिवाय त्या वाटेनें मंदिरांतही जातां येत होतें.

इब्राहीमच्या मनांत धाडसाचा विचार आला. व छातीचा कोट करून

तो त्या खिडकींतून आंत घुसला; मंदिरांत जातो न जातो तोंच अकस्मात् चार खोजे धांवत आले व त्यांनीं त्याचा हात धरला. ते काळेकुट्ट भयं-कर लोक पहातांच तोहि दचकल्यासारखा झाला. कारण त्या सर्वांच्या कमरेला तीक्ष्ण धारेचे खंजीर आणि छोट्या तरवारी लटकत होत्या. त्या खोजांच्या सरदारानें आपल्या मुठींत खंजीर धरून इब्राहीमला दरडावून विचारलें, " तुला येथें येण्याची परवानगी नसतां तूं आंत कां आलास ? हा बादशहाचा जनानखाना आहे हें तुला माहीत नाहीं का ? येथें येणाऱ्या प्रत्येक पुरुषाला मरावें लागतें ! "

पहारेकऱ्यांच्या त्या भीमभैरव मूर्ति पाहून इब्राहीमला प्रथम थोडीशी भीति वाटली; पण मंदिरांत जायला आपणाला हा पुन्हां अटकाव होत आहे, तेव्हां माघार घ्यावयाची नाहीं, काय होणार असेल तें होऊं द्या.' असा त्यानें विचार केला व धीर धरून मरेन किंवा विजयी होईन अशी प्रतिज्ञा केली.

बोलणारा पहारेकरी आपल्या अंगावर हात टाकूं पहात आहे असें इब्राहीमच्या नजरेला येतांच तो रागानें गर्जना करून त्यांना म्हणाला, " दूर उभे रहा. माझ्या अंगाला हात लावूं नको कारण माझ्या अंगाला स्पर्श कराल तर त्याचा फारच वाईट परिणाम होईल "

पण माणसांचें रक्त प्राशन करण्याची हिंसक बुद्धि त्या पहारेकऱ्यांच्या मनांत सतत जागृत असल्यामुळें ते त्याच्या त्या उसन्या धमकीला थोडेच त्यामुळें अर्थात् अगदीं एकटी असून हें श्रमाचें काम ती करीत होती.

माया ही सहानुभूतीची आई आहे. विशेषतः विपन्न मनुष्यावर जी ममता जडते ती फार सामर्थ्यवान् असते, असें म्हणायला हरकत नाहीं. गुलबहारचा अभिमान पार नाहींसा झाला होता. तिची अहंमन्यता पाण्यासारखी वितळली होती; नाहीं तर हें शुश्रूषेचें काम तिच्या हातून मुळीं झालेंच नसतें. ती सारखी अहोरात्र रोग्याच्या शेजारीं बसून त्याची सर्व प्रकारें सेवा-चाकरी बजावीत होती, याचें कारण नुसती सहानुभूति हेंच असेल का ? ती दमली नव्हती व तिच्या चेहेऱ्यावर तिरस्कारही दिसत नव्हता.

इब्राहीम दिसण्यांत सुंदर असून त्याचा रुबाबदारपणा मनोवेधक होता. त्याचा चेहेरा इतका आकर्षक होता कीं, तो एकसारखा पहातच राहावें असें वाटे ! पुरुष इतका सुंदर असूं शकतो हें गुलबहारला माहीतच नव्हतें म्हटलें तरी चालेल. कारण ती कोणाही पुरुषाकडे कधींच सहानुभूतिनें पहात नसे. आज मात्र तिच्या हृदयांत जी ममता अथवा सहानुभूती उत्पन्न झाली होती ती इतकी विलक्षण होती कीं आपणाला काय होत आहे हें तिचें तिलाच कळत नव्हतें. ती स्वतःला विसरली होती एवढें मात्र खरें.

रोग्याला एकाकी स्थितींत सोडून ती थोडा वेळ सुद्धां दूर जायला तयार होत नसे. रोग्याला वेळच्यावेळीं पथ्याचें देणें, औषध खावविणें, जखमांना औषध लावणें, जखमा धुणें, वगैरे कामें करतांना ती मुळींच कंटाळत नसे. उत्सुकतेनें व अगत्यानें प्रत्येक काम संपवी.

अशा प्रकारें कामें आटोपीत असतां तिला थोडासा वेळ मिळाला तर ती बिछान्यावर रोग्याच्या शेजारीं बसून त्याच्या तोंडाकडे निरखून पहात राही. त्या सरळ स्वभावाच्या सुंदर तरुणाकडे पहातां पहातां ती अगदीं दमून जाई, पण त्याच्याकडे पहाण्याची तिची इच्छा कांहीं पूर्ण होत नसे.

एकदां विचार करतां करतां शहाजादीला वाटलें कीं आपण हें कांहीं चांगलें करीत नाहीं. ज्या लोकांचा मी इतका तिरस्कार करीत असें त्यांच्याबद्दल अकस्मात् इतकी सहानुभूति दाखविणें हें एक प्रकारें विचित्रच नाहीं का ? लोक काय म्हणतील ? शिवाय मला माझ्या या असहिष्णु हृदयांत या तरुणाची छाया दिसत आहे ! मनांत आलें म्हणजे सुद्धां मला अगदीं लाज वाटते ! मी म्हणतें हें असें झालें तरी कसें ? याच्या सान्निध्यामुळें कदाचित् आपणाला असें वाटत असेल असें समजून ती शुश्रूषेचा भार दासीवर सोपवून एकादवेळीं दुसरीकडे निघून जाई, पण तिला दुसरीकडे राहावतच नसे. ती घाईघाईनें परत येऊन रोग्याजवळ बसे. त्या अपरिचित पाहुण्याचा वियोग तिला मुळींच सहन होत नव्हता.

अशा या अस्वस्थ मनःस्थितींतच चार दिवस निघून गेले. इब्राहीम-

च्या जखमाही बऱ्याचशा सुकलेल्या दिसूं लागल्या. ताप कमी झाल्यामुळें त्याला मधुन मधून आपली जाणीवही होऊं लागली; पण अद्याप तो चांगला शुद्धीवर आला नव्हता. जर तो शुद्धीवर असता तर आपण कुठें आहों हें त्यानें ओळखलें असतें. तो अद्याप भ्रमांतच होता.

शाहाजादी त्याच्या बिछान्याशीं बसून आपल्या मनाशीच म्हणे, रात्रीच्या एका भयंकर प्रसंगानंतर मी पुरुषजातीसंबंधानें तिटकारा दाखवूं लागलें व ती जात बेविश्वासू आहे असें ठरविलें. जनानखान्याची पूर्ण माहिती असलेला तो चिलखतवाला वीर आणि शहासुफींचा शिष्य यांनीं त्या प्रसंगीं मला वांचविलें हें खरें आहे; पण दोघांनींहि मला ओळख देऊं नये हें आश्चर्य नव्हे काय ? तसेंच ज्या पत्रानें मी हें धाडस केलें तेंहि कोणी तरी एका पुरुषानेंच मला फसविण्यासाठीं लिहिलें असलें पाहिजे. एवंच हे सगळे पुरुष नालायक आणि बेविश्वासू असल्यामुळें त्यांच्या छायेलाही मी उभी राहाणार नाहीं असें ठरविलें असतां या तरुणाला मी माझ्या या महालांत जागा द्यावी आणि स्वतः त्याची शुश्रूषा करावी हें आश्चर्य नव्हे काय ? बाबांना जर माझे हे खेळ समजतील तर ते मला जिवंत सुद्धां ठेवणार नाहींत. इतकेंच नव्हे तर या गरिबाचाहि ते जीव घेतील.

“ पण कांहीं झालें तरी मी या तरुणाला कांहीं मरूं देणार नाहीं. यांतून याला वांचविण्यासाठीं मला कितीहि श्रम पडले तरी मी ते सहन करीन. मला आतां मीपणाच राहिला नाहीं. हें मी माझें कर्तव्य म्हणून करीत आहें. माझ्या नशिबीं जें असेल तें होईल.

याच वेळीं तिची दृष्टी इब्राहीमच्या सुंदर चेहऱ्याकडे वळली; तेव्हां ती त्याला उद्देशून आपल्याशींच म्हणाली, “ तरुण वीरा ! तूं आपल्या या दिव्य सौंदर्यानें माझें अंतःकरण प्रकाशित केलेंस खरें; पण तूं इकडे आलास ही तुझी चूक नाहीं का झाली ? तुझी ही मूर्ति पहातांच माझा अभिमान पार नाहींसा झाला यावरून तुझी मोहिनीशक्ति विलक्षणच दिसते. पुनः पुनः तुझ्या चेहऱ्याकडेसच पहाण्याची इच्छा कां व्हावी बरें ? माझ्या अस्वस्थ हृदयाला विसांवा मिळण्यासाठीं तर तुझें आगमन झालें नसेल ना ? मी तर तुझी दासी बनलें आहे ! ! ”

गुलबहार अशा प्रकारें विकल हृदयानें स्वतःशींच पुटपुटत असतां इब्राहीमनें अकस्मात् डोळे उघडून तिच्याकडे पाहिलें; पण त्याच्या त्या दृष्टींत एक प्रकारची धुंदी आणि उदासपणा पूर्णपणें भरलेला दिसत होता. चोहोंकडे निरीक्षण केल्यावर त्याला कळून चुकलें कीं, "आपण कोणा तरी अमीरउमरावाच्या घरांत आहों!"

गुलबहार इब्राहीमच्या मस्तकाजवळच बसलेली होती. त्यामुळें तो सावध होतांच प्रथम तिचा श्वासोच्छ्वास त्याला ऐकूं आला. तोंड फिरवून तिच्याकडे पहावें असें त्याला वाटलें; पण तसें त्याला करितां येईना. कारण मानेवरची जखम अद्याप चांगली बरी झालेली नव्हती.

त्यानें कांहींशा आश्चर्यानें गुलबहारला विचारलें, "मी कुठें आहे?" गुलबहारनें हळूच उत्तर दिलें, "भिण्याचें कारण नाहीं. आपण अगदीं सुरक्षित जागीं आहां." "मला वाटतें, मी हिरण्मंदिरांत मूर्छित पडल्यानंतर मला या बड्या घरीं आणण्यांत आलें असावें. मला येथें कोणी आणलें हें आपण सांगूं शकाल का?"

"होय. शहाजादी गुलबहारनें आपला निराश्रितपणा आणि विपन्नावस्था लक्षांत आणून या ठिकाणीं आश्रय दिला आहे. तुम्हीं सध्यां तिच्याच महालांत आहां! मी शहाजादीची दासी असून तिच्या हुकमानें आपली शुश्रूषा करीत आहे." गुलबहारनें अगदीं शालीनतेनें उत्तर दिलें. "अशा वेळीं सहाय्य केल्याबद्दल मी शहाजादीचे फार उपकार मानतों. पण त्यांची भेट होईल का?" "कशी होणार! ती शहाजादी असल्यामुळें आपणाला ती अपरिचित असणार? तिच्या भेटीची जरूरी आहे का?" "जरूरीच आहे असें कांहीं नाहीं; तरी पण भेट झाली असती तर एका दैवदुर्विलासी मनुष्याला प्रसंगीं आश्रय देऊन वांचविल्याबद्दल मी तिचे समक्ष आभार मानले असते."

"आपण आतां जास्त बोलण्याचा त्रास न घेतां झोपावें. कारणपरत्वें शहाजादी आपणाला भेटेलच. विशेष बोलूं न देण्याबद्दल हुकमाची आज्ञा आहे. तेव्हां आपण ती त्यांची आज्ञा अमान्य करूं नये."

इब्राहीमनें एखाद्या लहान मुलाप्रमाणें चटकन डोळे मिटले. आणि बोलण्याचे बरेच श्रम झाले असल्यामुळें डोळे मिटल्यानंतर थोड्याच वेळांत

त्याला झोंपही लागली; पण ती झोंप गाढ नव्हती. त्यानें एक स्वप्न पहायला सुरवात केली. दलिया आपल्या बिछान्याजवळ येऊन बोलत असल्याचा त्याला भास झाला. ती म्हणाली, "माझ्यासाठींच ना आपल्याला हें दुःख भोगावें लागत आहे! जनाब, मला याबद्दल क्षमा कराल ना ?"

पण या वेळची दलियेची मूर्ति शहाजादीप्रमाणें दिसत होती. तिचा तो पूर्वींचा खिन्न चेहेरा आतां तेजस्वी दिसत असून नेत्रांतही एक प्रकारचें विलक्षण तेज चमकत होतें. आंगावरचे कपडेहि बरेच मोलवान असून टप्पोऱ्या मोत्यांत तिचें प्रतिबिंब चमकत होतें. दलियेचा असला हा तेजस्वी चेहेरा त्यानें यापूर्वीं कधींच पाहिला नसल्यामुळें त्याला प्रथम आश्चर्य वाटलें; पण लागलीच तो मनाशीं म्हणाला कीं, 'दलिया म्हणजेच दिलबहार!'

इब्राहीम स्वप्नांतच, सौंदर्यमयी दिलबहारला अथवा त्याला प्रिय असलेल्या दलियेला आलिंगन देण्यासाठीं पुढें सरला. जवळच यमुनेचा प्रवाह वाहत होता. इब्राहीमचा हा उद्धटपणा दिलबहारला सहन न होऊन ती पलीकडे गेली व एका दगडी जिन्यावर उभी राहून त्याच्याकडे तिरस्कारानें पाहूं लागली.

इब्राहीमला वाईट वाटलें. तो स्वप्नांतच ओरडून म्हणाला, "दिल-बहार! शहाजादी दिलबहार!! तूं स्वतःच्या हृदयाला फसवीत तर नाहींस ना ? कक्षेतून निसटलेल्या ताऱ्याप्रमाणें भटकत असलेला इब्राहीम आज तुझ्या पायांशीं स्थिर होत आहे. तूं त्याला दूर लोटूं नको. न होणारी भेट झाली; आतां तरी निदान मला विरहाग्नींत लोटून जाऊं नको. ये, माझ्या या तळमळणाऱ्या अन्तःकरणाला शांत कर."

पण त्याची ती स्वप्नांतली दिलबहार त्याचें मुळींच ऐकेना. इतकेंच नव्हे तर त्याच्या बोलण्याकडे दुर्लक्ष्य करून तिनें त्या दगडी सोपानावरून यमुनेच्या अथांग डोहांत एकदम उडी टाकली. इब्राहीम कळवळला व मोठ्यानें ओरडून म्हणाला, "दिलबहार! काय केलेंस हें!!"

आपल्या मृत भगिनीचें नांव भ्रमांत कां होईना; पण पुष्कळ वेळ उच्चारलें जाऊं लागल्यामुळें गुलबहारला एक प्रकारचें आश्चर्य वाटलें. ती

त्याच्याकडे आश्चर्यानें पहात आहे तोंच तो पुन्हां ओरडला, " थांब, थांब. मी येथें असतांना तुला अशी बुडूं देणार नाहीं. " हे शब्द उच्चारतां उच्चारतां तो चांगला जागृत झाला व त्यानें डोळे उघडले. गुलबहार अगदीं थक्क होऊन त्याचें बडबडणें ऐकत होती. ती त्याला म्हणाली, " साहेब, शांत व्हा; आपणाला एकादें भयंकर स्वप्न पडलें असेंच ना ? "

इब्राहीमच्या भालप्रदेशावर या वेळीं घर्मबिंदु चमकत होते. त्यामुळें त्याला या ओरडण्यानें फारच श्रम झाले असावे असें गुलबहारनें अनुमान केलें. ती थोडीशी घाबरलीही. लागलीच तिनें आपल्याजवळच्या हातरुमालानें त्याचें कपाळ पुसलें आणि हस्तिदंती पंख्यानें ती त्याला हळू हळू वारा घालूं लागली. या वेळीं त्याचें हृदय धडधडत असून सर्वांग थरथर कांपत होतें. श्वासोच्छ्वासही जोरानें वाहात होता. गुलबहारनें गुलाबपाणी अंगावर शिंपडलें आणि डोळ्यांनाही लावलें, तसेंच तें मस्तकाला चोळून त्याला शांतपणा आणण्याचाही ती प्रयत्न करूं लागली. थोड्याच वेळांत तिच्या प्रयत्नाला यश आलें—कारण इब्राहीम डोळे उघडून शांतपणानें म्हणाला, "होय. मी हें स्वप्नच पाहिलें असावें ! हाय ! माझी निराशाच झाली बरें !"

इब्राहीमला पुन्हा भ्रमाचा झटका येतो कीं काय नकळे अशी गुलबहारला भीति वाटून ती म्हणाली, " कांहीं तरी स्वप्न आहे झालें साहेब ! त्यांत विचार तो कसला करायचा ! दिलबहार कुठें ! कशाला कांहीं पत्ताच नाहीं. मी आणि आपण तर इथें आहों. स्वप्नांतला कांहींच प्रकार विचारांत आणूं नये. उगाच त्रास होईल. "

" नाहीं, मी स्वप्न पाहिलें नाहीं. मी प्रत्यक्ष अनुभव घेतला. ती माझ्याजवळ उभी होती. माझ्याशीं दोन शब्द बोलली, पण मी तिला आलिंगन देण्यासाठीं पुढें सरतांच तिनें पाण्यांत उडी टाकली ! हाय ! हाय, बिबीसाहेब ! मी आतां काय बरें करूं ! ! "

" आपण आपल्या त्या दिलबहारवर फारच प्रेम करीत होतां वाटतें ! ती आतां जिवंत नाहीं ? "

आहे, ती जिवंत आहे; हिरण्मंदिरांत मी तिची मूर्ति पहायला आलों होतों; पण माझी अशी अवस्था होऊन बसली. मी कितीतरी दुःखें सहन केलीं;

पण हें दुःख कांहीं माझ्यानें आतां सहन करवत नाहीं. ती आतां मला कुठें भेटेल बरें ! " इब्राहीमच्या नेत्रांतून पाणी वाहात होतें.

इब्राहीम बोलायचा थांबला. आणि त्या आवेगासरशीं आपल्या छातीजवळ लपवून ठेवलेलें एक चित्र—दिलबहारची तसबीर—त्यानें चटकन् बाहेर काढलें आणि गुलबहारच्या हातांत दिलें. गुलबहारनें ती तसबीर पहातांच तीहि दचकली. कारण तिची परलोकवासी बहीण दिलबहार हिचीच ती तसबीर असल्याचें तिला कळून चुकलें. पण ही या तरुणाजवळ कशी आली याचा मात्र तिला उलगडा होईना. ' कदाचित् कौतुकानें मिळविलेल्या या चित्रावरच ही स्वारी आषक होऊन भ्रमिष्ट झाली असावी. कारण पुरुषांचा स्वभावच मधुकरवृत्तीचा असल्यामुळें त्यांच्यांत अदूरदर्शित्वच फार दिसून येतें. ' असें तिला वाटून ती इब्राहीमला म्हणाली, " साहेब ! हें चित्र दिलबहारचें असेल यांत संशय नाहीं; पण ती तर कधींच स्वर्गवासी झाली असल्यामुळें आपण तिच्यासंबंधाचे सर्व विचार मनांतून साफ काढून टाकले पाहिजेत ! "

" नाहीं, नाहीं. ती स्वर्गवासी झाली नाहीं. आपला समज चुकीचा होत आहे. त्या सुकुमार फुलाला काळाचा कठोर स्पर्श होणें शक्य नाहीं. " इब्राहीम निश्चयानें म्हणाला.

" तर मग या शहाजादीला आपण प्रत्यक्ष पाहिलें असावें ? " गुलबहारनें मुद्दाम प्रश्न केला.

" कांहीं असलें तरी ती आतां मला लवकरच भेटणार अशी माझी खात्री आहे. "

" तिच्या भेटीची आशाच करायला नको असें मला वाटतें. आपला समज चुकीचा होत आहे. "

" आपल्या दयाळुत्वाबद्दल मी आपले अभार मानतों; पण माझ्या त्या हृदयेश्वरीबद्दल आपण असें निष्ठुर विधान केल्यास माझ्या मनाला फारच त्रास होणार आहे तेव्हां त्याबाबतींत आपण माझी निराशा करू नये ! तिची ती दिव्य लावण्ययुक्त मूर्ति माझ्या नेत्रांसमोर हंसत आहे. "

बोलतां बोलतां इब्राहीम एकदम उठला. गुलबहारला आपली ओढणी सांवरायलाहि वेळ मिळाला नाहीं त्यामुळें दोघांचेंहि त्या

स्वरूपांत नेत्रमीलन झालें. दोघांच्याही अन्तःकरणांत अननुभूत विकाराची जागृति झाली आणि इब्राहीम तर वेड्यासारखा तिच्याकडे पहातच राहिला. आपण हा केवढा मोठा अपराध करीत आहों याचें त्याला भानही राहिलें नाहीं.

कांहीं वेळानें तो तिला म्हणाला, " नाहीं. नाहीं. बिबीसाहेब! मला वेड लागलेलें नाहीं. मी त्या दिलबहारला या वेळींही आपल्यासमोर पहात आहें. बोलतों याची क्षमा असावी. तुमचे हे नेत्र जर जरा आणखी थोडेसे विस्तृत असते व हे नेत्रकटाक्ष जर इतके तीव्र नसते तर ही माझी दिलबहारच आहे असें मला वाटलें असतें. एका काळोख्या रात्रीं पेटत्या मशालीच्या लाल प्रकाशांत मी असेंच स्वरूप पाहून वेडा झालों होतों; पण ती अन्तःपुरांतील एक शहाजादी असल्याचें शहासुफींनी मला सांगितलें होतें. काय रूपसादृश्य! जगांत रूपवैचित्र्य आहे असें म्हणतात तें खोटेंच तर! मला आतां इथून जाऊं द्याल का ?

इब्राहीमचें हें बोलणें ऐकून गुलबहारलाही त्या रात्रीची आठवण झाली; पण त्या चिलखतवाल्या पुरुषानें तिचें मन त्या वेळीं आकर्षण केलें असल्यामुळें आपली शुश्रूषा करून ज्यानें वांचविलें त्याच्याकडे तिचें लक्ष गेलें नव्हतें, पण आतां ओळख पटली. तोच शिष्य हा असावा; पण हा असा येथें कां आला याचा तिला उलगडा न झाल्यामुळें तिनें मागचा परिचय न देण्याचें ठरविलें व आपला बुरखा सांवरून हळूच म्हटलें, " आपलें मन बरेंच बहकलेलें दिसतें; पण इथून जाण्याचीच आपली इच्छा असेल तर जायला हरकत नाहीं. शहाजादीच्या हुकुमाप्रमाणें मी आपली सेवा शुश्रूषा केली इतकेंच. इथें राहाणें अथवा निघून जाणें हें केवळ आपल्या मर्जीवर अवलंबून आहे. "

" तर मग मी कांहीं दिवस बादशहाच्या रंगमहालांतच राहिलों म्हणायचा ? "

" होय. आपलें अनुमान खरें आहे. "

" शहाजादी फारच थोर मनाची असली पाहिजे. मला येथून जातांना तिचा निरोप घेतां येणार नाहीं का ? जिनें माझ्यासाठीं इतकी चांगली व्यवस्था करून दिली तिला सांगितल्यावांचून जाणें योग्य नाहीं. "

" साहेब ! आपण तरी मला खरंच मा... दिसतां ! ! सम्राटच्या मुलीची भेट घेणें म्हणजे आपणाला काय पोरखेळ वाटतो ? तिला मानमर्यादा कांहींच नाहीं ? " गुलबहारनें तिरस्कारानें विचारलें.

आपल्या धाडसाबद्दल इब्राहीमलाही थोडीशी लाज वाटली. तो शालीनतेनें म्हणाला, " मला क्षमा करा बिबिसाहेब ! मी स्वतःच्या स्थितीचा विचार न करतां भलतेंच बोलून गेल्याबद्दल मला आतां अनुताप होत आहे. मी आपला व शहाजादीचा उपकारी आहें ! आणखीं काय सांगूं ! "

इब्राहीमच्या या बोलण्यानें गुलबहारला खरोखरच राग आला. ती फक्त इतकेंच म्हणाली, " आपण आमचे उपकार मानल्याबद्दल मीही आपले आभार मानतें. जर इथून जाण्यासाठीं आपण अगदीं उतावीळ झालां असाल तर आपला मी वेळ घेऊं इच्छित नाहीं. "

शहाजादी गुलबहार तेथें न थांबतां एकदम आंत निघून गेली; पण जातांना तिरस्कारपूर्ण तीव्र कटाक्ष फेंकण्याला ती विसरली नाहीं. इब्राहीमला मात्र हें कोडें काय आहे तें न उलगडल्यामुळें तो हतबुद्ध होऊन तिच्याकडे पहातच राहिला.

बादशाही जनानखान्यांतील गूढ रहस्यें उलगडण्याइतका इब्राहीम हुषार नव्हता. नाहीं तर गुलबहारला त्यानें केव्हांच ओळखलें असतें; पण गुलबहारनें तरी असें कां करावें ?

---

# प्रकरण ४४ वें.



## आशेचा डोलारा.

इसाकनें पुष्कळ खटपट करून पाहिलें; पण जमालखानाबद्दल त्याला पूर्ण निराश व्हावें लागलें. खुदादाद, उमरशेख, असगरअली, हिकमतखान वगैरे मंडळीला जमवून त्यानें दालियेसंबंधाचाही पुष्कळ तपास केला, डोंगराळ मुलखांतील नबाबाचा मुलगा महंमद अली याच्याकडे खासगी रीतीनें विचारलें; पण तिचा मागमूसही लागला नाहीं. निराशेचे दोन धक्के बस-

त्यामुळे इसाकसारखा धीराचा वीरही हारला. त्याला कांहीं सुचेनासें झालें. राजा आणि मित्र या दोघांना आतां काय जबाब द्यावा अशी तो काळजी करूं लागला. सुभेदाराला सांगून सर्व मंडळीला त्यानें कैद करून दिल्लीला पाठविलें खरें; पण दलियेला शोधून काढल्यावांचून त्याच्यानें घर सोडवेना. दालिया मिळाली नाहीं तर मित्राघत होणार याचेंच त्याला फार दुःख वाटूं लागलें.

त्यानें पुष्कळ विचार केला; पण आपल्या मित्राचें कशानें समाधान होईल हें त्याला समजेना. बादशहाच्या जनानखान्यांत दिलबहारपेक्षांहि सुंदर अशी एक स्त्री आहे. पण तिनें तर पुरुषांवर खड्ग उपसलें आहे. वास्तविक पाहिलें असतां याला कारणही मीच; पण राजकार्यापेक्षां मला स्वतःचें काम श्रेष्ठ वाटत नसल्यामुळें मी तिचा धिक्कार केला. जर खरोखर मला कोणी लग्नाचा आग्रह केला तर मी गुलबहारलाच माझी वधू म्हणून पसंत करीन; पण आतां मात्र तो मार्ग मला बंद झाला. कारण जमालखान न मिळाल्यामुळें मी राजकार्य केलें नाहीं. मग दरबारांत मला मान कसा मिळणार ? आणि दरबारी मानावांचून गुलबहारची प्राप्ति होणेंहि अशक्य झालें. त्या बाबतींतही निराशा झाली. जर शक्य असतें तर इब्राहीमला एकवार जनानखाना दाखवितां आला असता. दलिया तेथें नसेल कशावरून ? कारण आश्रयासाठीं ती तेथें जाण्याचा संभव आहे. तेव्हां मसायूदमार्फत प्रथम गुलबहारला एक पत्र लिहून पहावें. जर त्या पत्राचा तिनें अनादर केला नाहीं तर पुढें आशा करायला जागा राहील; पण आपण होऊन आज दिल्लीला जाण्याची कांहीं सोय नाहीं. '

इसाकनें असा विचार केला आणि गुलबहारच्या नांवाचें एक पत्र लिहून तें त्यानें रवाना केलें; पण त्याच दिवशीं सायंकाळीं इब्राहीमकडून त्याला एक पत्र आलें त्यांत त्यानें दलियेचा समाचार विचारला असून त्यांत किंठपत यश आलें तें कळविण्यास लिहिलें होतें.

इसाक पुन्हां मोठ्या फिकीरींत पडला. काय लिहावें हें त्याला सुचेना ' दालिया बेपत्ता झाली, मी तिच्या संबंधानें कांहींच करूं शकत नाहीं. ' असें लिहिलें असतां तो आत्महत्याच करायचा. बरें, या पत्राचें तर उत्तर दिलें पाहिजे. ' शेवटीं बऱ्याच विचारांतीं त्यानें इब्राहीमला पत्र लिहिलें त्यांत,

" तुमच्यासंबंधाचें माझें इकडचें काम संपलें असून मी माझ्या कामांत गढून गेलों आहें. तरी पण शक्य तितक्या लवकर मी दिल्लीला येतों. " असें लिहिलें

पत्र लहानसेंच खरें; पण या पत्रानें इब्राहीमला आशेच्या झोलान्यावर बसवून इतका लांबचा झोला दिला कीं शून्याकाशांत आपली आतां काय गत होते नकळे असेंच त्याला वाटलें.



नबीबक्ष रोज रोज इब्राहीमच्या बिऱ्हाडीं येई; पण सुमारें आठ दिवस होऊन गेले तरी तो घरींहि आला नाहीं असें पाहून त्याला एक प्रकारची काळजी वाटूं लागली. नोकर–चाकरही फिकीरींत पडले; पण दिल्लीसारख्या मध्या शहरीं आपल्या मालकाचा तपास करणें त्यांना शक्य नसल्यामुळें ते काळजी करण्यापलीकडे काय करणार !

नबीबक्ष पुष्कळ विचार करी; पण इब्राहीमचें कोणतेंहि जाण्याचें ठिकाण त्याला माहीत नसल्यामुळें त्याचे सगळे विचार निष्फळ ठरत. ज्या चित्राचें इब्राहीमला वेड लागलें तें चित्र कोणत्या सुंदरीचें आहे हें तरी पाहूं असा विचार करून नबीबक्षानें ऊर्फ दलियेनें तें चित्र शोधून काढण्याचा पुष्कळ प्रयत्न केला; पण तिला तें मिळालें नाहीं. त्यामुळें ती अगदीं निराश झाली. दैवावर हवाला ठेवून आतां अनंतकालपर्यंत मार्गप्रतीक्षाच करीत बसलें पाहिजे असेंहि तिनें ठरविलें; पण अस्वस्थपणामुळें तिला कुठेंच करमेना. आपण ओळख दिली नाहीं हें बरें केलें नाहीं असें वाटून ती पश्चात्ताप करूं लागली. मी त्यावेळींच ओळख दिली असती तर हा प्रसंग आला नसता असें तिला वाटूं लागलें; पण आतां त्याचा काय उपयोग !

अशा या काळजींत एकेक दिवस जात असतां अकस्मात् एके दिवशीं इब्राहीमला घरीं येतांच तिनें पाहिलें. तिला आनंद झाला; पण त्याच्या चेहेऱ्यावरचा उदासपणा व खिन्नता पाहून ती दचकली. कांहीं तरी बिकट प्रसंगांत स्वारी सांपडली असा तिच्या मनाला संशय आला.

नबीबक्षला पहातांच इब्राहीमनेंहि आपलें हृदय मोकळें केलें व झालेला सगळा घोंटाळा दीर्घ सुस्कारे सोडीत सांगितला. बादशहाच्या रंगमहालां-तून दोघां खोजांनीं मला येथें आणून पोंचविलें असेंहि [illegible] पाला रात्रि-

येला मात्र हें कांहींच समजलें नाहीं. हिरण्मंदिर आणि त्यांतील सोन्याची मूर्ति पहाण्यासाठीं यांनीं इतकें धाडस कां करावें याचा तिला उलगडा होईना. तरी पण तिनें तें सगळें ऐकून घेतलें व पुन्हां असलें धाडस न करण्याबद्दल विनविलें. नबीबक्षाचें हृदयही आपणासाठीं बरेंच तळमळतें अशी इब्राहीमची खात्री झाली.

पण हिरण्मंदिरांत जाऊन दिलबहारच्या मूर्तीचें दर्शन घेण्याचें वेड कांहीं त्याच्या मस्तकांतून जाईना. याच संधीला इसाककडून आलेलें दोन ओळींचें परिणामकारक पत्र त्याला मिळालें व वास्तविक अर्थ मनांत न घेतां भलताच अर्थ घेऊन त्यानें पुढील कार्याची योजना निश्चित केली. ' आपलें इकडचें काम संपलें आहे ' याचा अर्थ त्यानें दालिया ' आपल्या हस्तगत झाली आहे ' असा केला व लवकरच तिकडे येत आहें ' म्हणजे दालियेला घेऊन येत आहें ' असें तो समजला. पत्राचा असा अर्थ केला गेल्यामुळें इब्राहीमचा आनंद गगनांत मावेनासा झाला. आतां दिलबहार आपली पत्नी होणार याच आनंदांत तो बेहोष होऊन पुन्हां हिरण्मंदिराकडे वळला. ही वेळ मात्र त्याला अनुकूल अशीच मिळाली. कारण हल्लीं गुलबहारनें इकडे येण्याचें बंद केलें असल्यामुळें पहाराही असावा तितका कडक नव्हता.

दिलबहारची सुवर्णमूर्ति आणि त्या मूर्तीमागें भिंतीला लटकलेलें दिलबहारचें तैलचित्र पाहून इब्राहीमची खात्री झाली कीं, दालिया आणि दिलबहार दोघीही एकच आहेत. आज आपण एक मोठाच शोध लावला या आनंदांत त्या मंदिराजवळून तो आपल्या बिऱ्हाडीं केव्हां आला हें त्याचें त्यालाच कळलें नाहीं; पण दरवाजाशीं उभ्या असलेल्या नबीबक्षानें त्याला सावध करून म्हटलें, " साहेब ! आज आपण अगदीं आनंदांत आहां ! "

" नबी ! माझा आनंद तुला काय सांगूं ! इतक्या वर्षांचीं माझीं दुःखें आतां एकदम संपलीं आहेत असें तूं समज. माझी दालिया मला सांपडली, मी आतां तिला बादशहाच्या दरबारांत नेऊन उभी करणार ! नबी ! नबी !, असा माझ्या तोंडाकडे काय पहातोस ? उद्यां दरबारांत माझी प्रतिष्ठा पैक. "

इब्राहीमसाहेब काय बोलतात हेंच त्या बिचाऱ्याला समजेना. तो आ वासून नुसता पहातच राहिला.

* * * * * *

मध्यरात्र उलटून गेली होती. चोहोंकडे विलक्षण शांतता पसरलेली होती. आणि आकाशांत तळपणाऱ्या तारका यमुना नदीचा गंभीरपणा पहाण्याकरतां कीं काय नकळे; तिच्या पात्रांत बुड्या मारून हालत डोलत कलसंगीत गात होत्या. अन्तःपुरांतील गायन वादन नुकतेंच मंद होऊन दिवे मंद करण्यांत आले होते, त्यामुळें कोण कोठें जात आहे व कोण कुठून येत आहे हें समजायला कांहीं आधार नव्हता.

आणि यामुळेंच शहाजादीची दासी गुलेनार ही सर्वांगावरून काळी ओढणी घेऊन अगदीं भिम्या पावलांनीं रंगमहालांतून बाहेर पडून कालिंदीच्या तीराकडे येत होती; पण तिला कोणाची तरी भीति वाटत असावी. कारण इकडे तिकडे पाहून झाल्यावरच ती आपलें प्रत्येक पाऊल पुढें टाकीत असे. थोड्याच वेळांत ती तीरावर आली आणि तिनें जोरानें तीन वेळ टाळी वाजविली.

या संकेताला त्याच आवाजांत प्रत्युत्तर मिळालें. अर्ध घटकेंत एक लहानशी नाव तीराला लागली. नावेंत एकच मनुष्य होता आणि तोहि काळा बुरखा पांघरलेला. अर्थात् त्याची ओळखच पटणें शक्य नव्हतें.

तो खालीं उतरतांच गुलेनार त्याला घेऊन एका मोठ्या थोरल्या झाडाच्या काळ्याकुट्ट छायेंत गेली आणि शक्य तितक्या मंद स्वरानें म्हणाली, " आजच जनानखान्यांतून त्याला त्याच्या बिऱ्हाडीं पोंचविण्यांत आलें. पण शहाजादीच्या हृदयांत खळबळ उडालेली दिसते. बहुधा हा प्रेमभंगाचाच विकार असावा. "

" कांहीं कां असेना! ती इब्राहीमवर आसक्त झाली असली पाहिजे." ती काळी व्यक्ति बोलली, " त्यामुळें त्याला जगांतून नाहींसा केल्याशिवाय आपला कार्यभाग साधणार नाहीं. त्याचें प्रेम कुणावर आहे हें मी जाणतों आणि ती त्याला आतां मिळणेंहि शक्य नाहीं, आणि गुलबहारला तो स्वीकारणार नाहीं तेव्हां ती रागावून आयताच त्याला खूनखान्यांत पाठवील. मात्र त्यावेळीं तुझ्या कामेवर मलमपट्टी लावायचें काम तूं केलें पाहिजे. माझा तिथें प्रवेश झाला कीं पुढचें पाहून घेतों.

वारंवार मला बातमी कळवीत जा. आतां आपणाला फारच अनुकूल वेळ येणार आहे. "

" पण मला विसरणार नाहीं ना ? " गुलनार लडिवाळपणानें म्हणाली.

" नाहीं. हा जमालखान तूं इतका क्षुद्रबुद्धीचा समजतेस काय ? आज इसाकच्या डोळ्यांत धूळ फेकून जरी मी लपून छपून दिवस काढीत आहें, तरी योग्य वेळ येतांच मी सिंहासनावर बसेन आणि मग त्यावेळीं माझ्या या छबकडीला बेगम करून मौज मजा उडवीन. " बोलतां बोलतां त्या काळ्या कुरूप व्यक्तीनें गुलेनारला जवळ ओढलें. गुलेनारनेंहि त्याला अडथळा केला नाहीं; पण ती त्याच्या तोंडाजवळ तोंड नेऊन म्हणाली, " जमालखानसाहेब ! या इब्राहीमच्या गडबडीमुळें इसाक तर इकडे येणार नाहींना. "

" इसाक आणि इब्राहीम हे तर मला नाहींसाच करायला पहात आहेत ! त्या रात्रीं ही गुलबहार माझ्या अगदीं हातांत आली होती; पण या दोघांनीं तिला पुन्हां इकडे आणलें. दिलबहार कायमची नाहींशी झाली आणि या गुलबहारचा माझ्याशीं विवाह झाला तर मला शत्रुच कोणी राहणार नाहीं; पण तत्पूर्वी हे दोघेहि नाहींसे झाले पाहिजेत ! "

" मी सांगतें, तो प्रेमवेडा इब्राहीम पुन्हां त्या हिरण्मंदिरांत येणार आणि शहाजादीच्या हातांत सांपडणार. मसायूद्रला मी तयार करून ठेवलाच आहे. तो पुढची व्यवस्था करील ! "

" आणि तसें झालें म्हणजे इब्राहीमचें शयनमंदिर खूनखाना ! " असें म्हणून त्या काळ्या व्यक्तीनें अथवा, जमालखानानें विकट हास्य केलें. गुलेनारही त्याला बिलगली. कारण तिला त्या विकट हास्याचीच भीति वाटली. जमालखान तर ही रंगमहालाची चावी आपल्या पूर्णपणें हस्तगत झालेली पाहून आशेच्या तरंगावर रचलेले मनोरे डोळे भरून पहात होता.

पण या सर्वांच्याच आशा सफल होतील काय ? नाहीं तरी कुणी म्हणावें ?

---

# प्रकरण ४५ वें.



## साहसाचा परिणाम !

पूर्णपणे शृंगारलेल्या एका भपकेदार दिवाणखान्यांत वृद्ध बादशाहा शिकंदर लोदी आपल्या विश्वासू वजिराशीं कांहीं महत्त्वाच्या गोष्टींचा खल करीत बसला होता.

वजिराचें बोलणें ऐकून घेतल्यानंतर बराच वेळपर्यंत स्तब्ध राहून विचारांत गढून गेलेला बादशहा दीर्घ सुस्कारा सोडून गंभीरपणानें म्हणाला, " रावापासून रंकापर्यंत सर्वांवर खुदाचा सारखाच अम्मल आहे. तुमच्यासारख्या शूर वीरांनाही माझ्या दिलबहारचा शोध लागूं नये यावरून मी तिच्यासाठीं नेहेमीं तळमळतच राहावें असा ईश्वराचा हेतु दिसतो. पण मोठमोठ्या दर्जाचे हुशार लोक माझ्या पदरीं असूनही एकाद्या भणंगभिकाऱ्याप्रमाणेंच मी या कन्याविरहानें तळमळत आहें मग तुम्हीं अगर बादशाही असून नसून सारखीच नाहीं का ? "

वजीर–उल्मुल्क भय–विकम्पितस्वरानें म्हणाला, " शहानशहांचें विधान खरें आहे. अशी हुजराची आज्ञा ! मी सम्राट्चा वजीर म्हणवून घ्यायला नालायक आहें यांत शंका नाहीं; पण जहापनाह ! शहाजादीचा तपास करण्यांत मी थोडीसुद्धां कसूर केलेली नाहीं. कारण तिच्या तपासाआर्थी मी लोक पाठविले नाहीं अशी सगळ्या हिंदुस्थनांत एकही जागा राहिलेली नाहीं. इराण, तुर्कस्तान, अफगाणिस्तानही धुंडून झालें. एकंदरींत शक्य होतें ते प्रयत्न करून झाले. तरी पण अजूनही मी माझ्या प्राणांच्या मोबदल्यांत तिला मिळवायला तयार आहें. यापेक्षां या ह्यातीच्या नफर गुलामाच्या हातून जास्त तें काय होणार ! "

यावर बादशहानें जबाब दिला, " होय ! तुमच्या हातून आणखी काय होणार आहे ! खुदाच्या मनांतच नसलेली गोष्ट कोण साध्य करूं शकेल ! मीही या बाबतींत शक्य तीं बक्षिसें देण्याची लालूच दाखवून पाहिली; पण कोणीही यशस्वी झाला नाहीं. तेव्हां आतां माझी

शेवटची प्रतिज्ञा अशी आहे कीं, जो कोणी मनुष्य मला यापुढें दिलबाहारची बातमी देण्यासाठीं येईल त्यालाच अत्यंत निष्ठुरपणानें जगांतून नाहींसा करावयाचा. बस्स, या कन्याविरहाच्या आठवणीनें होणाऱ्या यातना माझ्यानें आतां सहन करवणार नाहींत. तेव्हां तुम्हीं ही माझी आज्ञा आजच्या आज जाहीर करा."

सम्राटची ही भयंकर प्रतिज्ञा ऐकून वजिरालाहि भीति वाटली. तो हात जोडून थरथर कांपत म्हणाला, "जनाब! असह्य हृदयवेदनांनीं तळमळून गेल्यामुळें जरी हुजूरच्या तोंडून हा हुकूम निघत आहे तरी अम्मलबजावणीच्या वेळीं तो तितकाच कठोर राहील असें मला वाटत नाहीं. तेव्हां दयाळू सम्राटनीं हा हुकूम तूर्त मागें घ्यावा. कारण तसें न केल्यास शहाजादीचा तपास लागणें अगदींच अशक्य होईल."

पण याच वेळीं त्या दिवाणखान्याच्या दरवाजाशीं बरीचशी गडबड झाल्यामुळें वजिराचें भाषण तितकेंच राहिलें. एक मनुष्य आंत येण्याची खटपट करीत असून पहारेकरी त्याला मज्जाव करीत आहेत असा तो प्रसंग होता. बादशहाला मात्र त्याची कांहींच कल्पना न झाल्यामुळें तो वजिराला म्हणाला, "अमीरउद्दौला! हा काय प्रकार आहे?"

सम्राटचे हे शब्द पुरे होतात न होतात तोंच उच्च दर्जाचा मूल्यवान पोषाख केलेला एक तरुण गृहस्थ धडपडत आंत येऊन मोठ्यानें म्हणाला, "तुम्हां सर्वांना बादशहाची शपथ आहे! मला कोणीही अडवूं नका; कारण मी फारच महत्त्वाच्या कामासाठीं येथें आलों आहें. आणि त्या कामांत बादशहाचाच विशेष फायदा आहे. मी उद्धटपणानें आंत आल्याबद्दल मला क्षमा करा. या पहारेकऱ्यांच्या आडदांडपणामुळें मला असें हें धाडस करावें लागत आहे."

बादशहाला या बोलण्याचें व त्या गृहस्थाचें कौतुक वाटून त्यानें पहारेकऱ्यांना दूर जाण्याचा इषारा केला व ते निघून जातांच नव्या आलेल्या त्या सुंदर तरुणाकडे पहात स्मितहास्यपूर्वक प्रश्न केला, "तरुण! तूं कोण आहेस?"

"हा सेवक आपल्या गुलामांचाही गुलाम आहे. अजमीरचा नामांकित व्यापारी अबूअयूब त्याचा सम्राटना विसर पडला नसल्यास त्याच्या मुलाला

आपण सहज ओळखूं शकाल. माझें नांव इब्राहीम ! परवानगीशिवाय आंत येण्याचें धाडस केल्याबद्दल क्षमा असावी. "

" तुमच्या वडलांना मी ओळखतों व दरबारांतही त्यांना मानाची जागा दिलेली होती; पण या अशा अवेळीं तुम्हीं असे आडदांडपणानें इकडे कां आलां ? "

" आपल्या अज्ञातवासी मुलीबद्दलची -शहाजादी दिलबहारबद्दलची- बातमी कळविण्यासाठीं मी इतका धांवपळ करीत आलों आहें. " इब्राही-मनें धापा टाकीतच उत्तर दिलें.

इब्राहीमचें हें उत्तर ऐकतांच सम्राटनें व वजिरानें दचकून एकमेकां-च्या तोंडाकडे पाहिलें. शिवाय बादशहा मनांत म्हणाला, " किती दुर्दैवी तरुण आहे हा ! त्याच्या नशिबानेंच त्याला येथवर ओढून आणलें म्हणायचें ! आतांच केलेल्या हुकुमाची तावडतोब बजावणी करण्याचा प्रसंग आला खरा. कालचक्र किती भयंकर आहे ! मला आतां आपलें हृदय फारच कठोर केलें पाहिजे. "

बराच वेळ स्तब्धतेंत घालविल्यावर बादशाहानें गंभीरपणानें इब्राही-मला विचारलें, " दुर्दैवी तरुणा ! तूं आपल्या स्वतःच्या नेत्रांनीं शहा-जादीला पाहिलें काय ? "

नाहीं. हिरण्मंदिरांतील तिची तसबीर पाहिली व माझ्याकडच्या त्या तसबिरीशीं ती अगदीं बिनचूक जुळत असल्यामुळें माझी खात्री झाली." इब्राहीम कांहींसा घाबरून म्हणाला.

"तुझ्या स्वतःजवळचें हें चित्र तूं कोठून मिळविलेंस?" बादशहाचा गंभीर-पणा वाढत होता आणि या सुंदर तरुणाची काय स्थिति होते न कळे या विचारानें वजिराचें सर्वांग थर थर कांपत होतें.

तितक्यांत इब्राहीमनें उत्तर दिलें, " फकीर शहासुफीजवळ असतांना त्यांच्या एका पुस्तकांत मला हें मिळालें. मी निःसंशय सांगतों कीं, या चित्रांतील रमणी मी माझ्या नेत्रांनीं समक्ष पाहिली असून ती माझ्या ओळखीची आहे. शिवाय या दोन्ही तसबिरी एकमेकींशीं जुळतात याव-रून मी ठरविलें आहे कीं, ती मी पाहिलेली रमणीच शहाजादी दिलबहार असली पाहिजे. "

हें उत्तर ऐकून सम्राट्नें पुन्हां एकदां आश्चर्यानें वजिराच्या चेहेऱ्याकडे पाहिलें व कांहीं वेळ विचार करून इब्राहीमला म्हटलें, "मी आतांच एक कठोर हुकूम जाहीर केला आहे, तो तुला समजला काय? मला वाटतें समजला नसावा ?"

"हुजूरचें अनुमान खरें आहे, हुकूम ऐकण्याची संधि मला मिळालीच नाहीं."

इब्राहीमचें हें उत्तर बादशहाला आवडलें नाहीं. तो क्रुद्ध होऊन आपल्या चेहेऱ्याकडे पाहात म्हणाला, तर मग तो हुकूम तुला आतांच ऐकवितों. वजीर! या अविचारी तरुणाला आतांचा तो हुकूम समजाऊन सांगा."

सम्राट्च्या हुकुमाप्रमाणें वजिरानें तो नवा आदेश त्याला समजविला; पण तो ऐकून इब्राहीम मुळींच भ्याला नाहीं. त्याचा चेहेरा जशाचा तसाच प्रफुल्लित होता.

यांत काय रहस्य आहे हें सम्राट्लाही समजेना. तो पुन्हां इब्राहीमला म्हणाला, "अविचारी तरुणा! ज्याला आपलें हिताहित कळत नाहीं तो काळाच्या स्वाधीन होण्याला लायक आहे असेंच समजलें पाहिजे. तुला दैवानेंच येथें ओढून आणलें. राजाज्ञेची पाहिली अम्मलबजावणी करण्याला तुझ्यासारखा तरुण मिळाला हें सुदैव कीं दुर्दैव! कांहीं असले तरी घातकाच्या कुऱ्हाडीची धार अनुभवून पहायला प्रथम तुलाच आपली मान पुढें करावी लागणार! अग्नि आणि सर्प यांच्याशीं खेळ. खेळणें जितकें भयंकर असतें तितकेंच सम्राटाच्या छायेला राहाणें धोक्याचें आहे हें तुला लवकरच कळून येईल. कन्याविरहानें वेडावलेल्या सम्राटासमोर तूं आलास व बोलूं नये तें बोललास हाच तुझा भयंकर अपराध होय."

असें इब्राहीमला सांगून झाल्यानंतर बादशहानें पहारेकऱ्यांना इशारा केला. लागलीच दोघां भीमकाय पहारेकऱ्यांनीं तावडतोब इब्राहीमला कैद केलें.

नंतर सम्राट् पुन्हां गंभीरपणानें म्हणाला, "माझा हुकूम मी फिरवूं [illegible] कारण नसत्या आशेला बळी पडून हजारों लोकांकडून मी

फसला गेलों आहें. पण सम्राट हा सामान्य लोकांच्या हातांतलें खेळणें नव्हे हें आतां मला कळून चुकल्यामुळें मी हा हुकूम जाहीर केला आहे. तुला आजच ठार मारण्यांत येईल. तुझ्या या सुंदर आणि उमद्या चेहेऱ्याकडे पाहून जर मी तुला ही शिक्षा देणार नाहीं तर दिल्लीचा बादशहा दुबळ्या मनाचा आहे असें लोक म्हणूं लागतील."

इब्राहीमनें बादशाहाचें भाषण ऐकून घेतलें; पण तो भ्याला नाहीं. त्याच्या चेहेऱ्यावर सात्विकतेचें तेज झळकूं लागलें. तो गुडघे टेकून व हात जोडून बादशहाला म्हणाला, "मला आपण जी शिक्षा कराल ती मी भोगायला तयार आहें; पण मी ठार मेल्यावर त्या दुर्दैवी शहाजादीलाही कायमचेंच अज्ञातवासांत राहावें लागेल. म्हणून म्हणतों! जनाब! मी तिची आणि आपली भेट करवितों आणि मग मला ठार मारण्याचा हुकूम द्या. माझ्यामुळें त्या बिचारीच्या जिवाची माती करूं नका. मी जगाचे पुष्कळ रागरंग पाहिले. मला आतां जगून तरी काय करायचें आहे; पण त्या शापभ्रष्ट देवतेला तिच्या सिंहासनावर विराजमान झालेली पाहिल्यानंतर माझे डोळे मिटूं देत! जहांपनाह! माझी एवढी विनंति मान्य कराच."

तो प्रसंग, इब्राहीमची ती खिन्न मुद्रा, मुलीसाठीं बादशहाच्या अन्तःकरणाची होणारी तळमळ आणि तो वांचल्यानें दिलबहारची होणारी भेट हे देखावेच इतके मनोवेधक होते कीं वजिरालाही त्या दुर्दैवी तरुणाची कींव आली व त्याच्याबद्दल रदबदली करावी असें वाटूं लागलें. तोहि गुडघे टेकूनच बादशहाला म्हणाला, "हुजूर! "आपल्या हुकुमाचा जाहीरपणा अद्याप या चार भिंतींच्या बाहेर गेलेला नाहीं; तेव्हां याला तूर्त क्षमा करून हा काय करतो तें तरी पहावें!!"

बादशहाच्याही मनाची चलबिचल होतच होती; त्यांत आणखी वजिराच्या आग्रहाचें निमित्त मिळालें; मग काय विचारता? त्याला एक प्रकारचा हुरूप आला; पण तसें मुद्रेवर कांहीं न दाखवितां पूर्वींच्याच गंभीरपणानें तो म्हणाला, "वजिरांच्या शिफारशीला मान देऊन मी तुला आजपासून सात दिवसांची सवड देतों. या सात दिवसांत जर तूं शहाजादीला माझ्याजवळ घेऊन आलास अथवा ती कुठें आहे तें दाखवून दिलेंस तर [illegible] करीन. पण दरबाराला लायक वाटणारा असा

कोणी तरी बडा गृहस्थ तुला जामीन द्यावा लागेल आणि त्यानें तुझ्या-बद्दलची खात्री देईपर्यंत तूं आमच्या कैदेंत राहिलें पाहिजेस. बोल, तुला हें कबूल आहे ?

इब्राहीम थोडा वेळ विचार करून म्हणाला, " या शहरांत कांहीं माझ्या परिचयाचा असा कोणी मनुष्य मला आढळत नाहीं; पण अजमीरला राहणारा माझा एक मित्र या बाबतींत माझ्यासाठीं जामीन राहील. दरबार त्याला ओळखत असून हुजूरच्याही तो विश्वासांतला आहे. त्याचें नांव इसाक उद्दीन. राहाण्याचें ठिकाण फत्तेपूर. पण ही बातमी त्याला कळविली पाहिजे.

वजीर म्हणाला," इसाकला मी ओळखतों, व हुजूरचाहि तो एक हितचिंतक आहे. जमालखानाच्या बाबतींत जरी त्याच्या हातून थोडीशी नजरचूक झाली असली तरी दरबारला तो लायक वाटत आहे ! जनाब ! माझ्या बोलण्याचा विचार व्हावा ! "

बादशहानें आनंदानें म्हटलें," हरकत नाहीं. इसाक योग्य मनुष्य आहे. तुझ्या जामिनकीबद्दल तो मनुष्य मी मंजूर करतों; पण तो येथें हजर होईपर्यंत तूं नजरकैदेंत राहा. " नंतर वजिराला बादशहानें हुकूम दिला, " इसाककडे ताबडतोब जासूद रवाना करा आणि याच्यावर योग्य पहारा ठेवा. जबाबदारी तुमच्यावर आहे. थोडीसुद्धां नजरचूक होतां नये. "

* * * * *

इब्राहीमला नजरकैदेंत ठेवल्यावर एक दिवस निघून गेला होता. दुसरे दिवशीं दुपारीं इब्राहीम आपल्या बिछान्यावर बसतां बसतां स्वतःशींच म्हणाला, " आतां पुढें काय होणार ! मी विचार न करतां एकदम बादशहापुढें आलों ही चूकच झाली म्हणायची. मोकळा असतों तर वरीचशी खटपट तरी करतां आली असती. इसाक उद्दीन जमालखानाच्या शोधांत असल्यामुळें तो या वेळीं घरींच असेल असें तरी कुणी सांगावें ? आणि बादशहाचा मनुष्य तरी त्याला शोधायला कुठें जाणार. तोंपर्यंत मुदतही टळून जाईल. दालिया येथें आल्यावरच मी हें साहस केलें पाहिजे होतें.

" बरें, कदाचित् दालिया सांपडली नसेल असें ठरविलें तरी या सात दिवसांत मीहि तिला आणूं शकेन; केवळ एका रमणीसाठीं इसाकसारखा

मित्र कांहीं मी गमावणार नाहीं! ती शहाजादी आहे आणि तिची जागा तिला पुन्हां मिळाली आहे एवढें ऐकतांच मला समाधान वाटेल. मग बादशहाचें कठोर शासन मला भोगावें लागलें तरी हरकत नाहीं; पण दलिया! दलिया आधीं जाली पाहिजे. ती शहाजादी नसली तरी चालेल. ती माझ्यासमोर उभी असतांना माझ्या मानेवर कुऱ्हाडीचे घाव बसले तरी मला त्याची इजा होणार नाहीं. तिच्यासाठींच माझा-जीव तळमळत आहे. ती सुखी झालेली मी एकली कीं माझें कार्य संपलें."

इब्राहीम नजरकैदेत असल्यामुळें त्याला कांहीं उद्योग नव्हता, अर्थात् त्याला अनेकविध विचार स्वस्थ बसूं देत नव्हते. 'इथून आपणाला पळून जातां येईल का पहावें' असाहि एक विचार त्याच्या मनांत येऊन त्यानें आरुपासच्या भिंती ठोकून पाहिल्या; पण त्यांत आपणाला यश येईलसें त्याला वाटेना. शिवाय सभोंवार हुषार पहारेकऱ्यांचा कडक बंदोबस्त असल्यामुळें अशी आपली सुटका करून घेणें शक्य नाहीं अशी त्याची खात्री झाली.

* * * *

शहाजादी गुलबहार मोठी अभिमानी. पुरुषजातीचा तिला फार तिटकारा; पण इब्राहीमच्या बाबतींत तिला खालीं मान घालण्याचा प्रसंग आला. जरी तिनें रागानें त्याला बाहेर घालवून दिलें होतें; व त्याचें पुन्हां नांवही घ्यावयाचें नाहीं असें तिनें ठरविलें होतें तरी तो निघून जातांच बाहेर दिसणारी त्याची मूर्ति तिला अंतरंगांत दिसूं लागली. आपल्या हृदयांतून तिच्यानें त्याला दूर करवेना. 'ज्या पुरुषांनीं माझ्या पायाशीं लोटांगणें घातलीं त्यांचा मी धिक्कार केला आणि जो माझे पुरते आभारही मानायला तयार नाहीं, जो नुसत्या चित्रांवर आधक होऊन वेडे वेडे चार करीत भटकत असतो त्याला मी आपलें सर्वस्व वाहून बसावें हें आश्चर्यच नव्हे काय? गुलेनार म्हणते तो एका जवाहिऱ्याचा मुलगा असून उच्छृंखल आहे. आपली सर्व इस्टेट घालवून आतां गांवोंगांव भटकत असतो. शूरपणानें कांहीं कामगिरी करून नांव मिळवावें तर तेंहि नाहीं........' असें किती किती गुलेनार म्हणते; पण माझी समजूतच

होत नाहीं. त्याला पुन्हां येथें बोलावून त्याच्या चरणीं सर्वस्व वाहावें असें मनांत येतें; पण संकोचामुळें कांहींच करवत नाहीं........."

शाहाजादीला कुठेंच करमत नसल्यामुळें ती आपल्या हवाखान्यांत बसून विचार करण्यांत गढून गेली होती. तिच्या विचारांना अन्त नव्हता; पण तिनें ज्यास्त वेळ विचारांत घालवावा असा योगायोग नसल्यामुळें तितक्यांतच तेथें गुलेनार आली आणि म्हणाली, " बाईसाहेब ! इतकी रात्र झाली तरी अजून आपण झोंपला नाहीं ? "

" माझ्या झोंपेची तुला कशाला काळजी ? तूं कां येथें आलीस ? " गुलबहार रागावून म्हणाली, कारण कोणीही मनुष्य आपल्याच विचारांत गढून गेलें असलें म्हणजे मध्येंच बोलणाऱ्याचा फार राग येत असतो.

पण गुलनार कांहीं कमी नव्हती. शहाजादीच्या हृदयांत कसली खळबळ उडालेली आहे, हें ती जाणून असल्यामुळें या तिच्या धमकावणीला मुळींच भ्याली नाहीं; पण बाहेरून तसें कांहीं न दाखवितां हात जोडून भीत भीत म्हणाली, ' अपराधाची माफी असावी; जर हुकूम होत असेल तर एकच प्रश्न विचारीन म्हणतें. "

" विचार, ज्यास्त वेळ बोलत राहूं नको. " गुलबहारनें तिरस्कारानें आज्ञा दिली.

" इब्राहीमसाहेबांची एक दासी आपली भेट घेण्यासाठीं आली आहे तिला येथें आणूं का ? "

इब्राहीमची दासी आणि इतक्या रात्रीं येथें ? आहे काय हा प्रकार गुलेनार !"

" मी कांहीं कामासाठीं अन्तःपुराला लागून असलेल्या बागेंत गेलें तों तेथें मला ती आढळली व त्यांचें नांव सांगितल्यामुळें आपणाला कांहीं उपयोग होईल म्हणून आणली. तिची जरूर नसेल तर घालवून देतें. उगाच त्रास नको. " शहाजादीचें अन्तःकरण ओळखूनच गुलेनार बोलत होती.

गुलबहारला आशा वाटली. इब्राहीमनेंच कांहीं तरी निरोप पाठविला असेल अशी तिची समजूत झाली. आणि ती गुलेनारला म्हणाली, " जा. तिला आंत घेऊन ये. "

" मलाही तसंच वाटलं. " गुलेनार तोंडांतल्या तोंडांत पुटपुटत बाहेर गेली आणि त्या दासीला घेऊन पुन्हां आंत आली. दासीनें डोक्यावरून बुरखा घेतलेला होता. शहाजादीसमोर येतांच तिनें बुरखा थोडासा बाजूला करून कुर्निसात केला आणि हळूंच म्हटलें, " खुदाताला शहाजा-दीचें कल्याण करो. "

तिच्याकडे एक तीव्र दृष्टीनिक्षेप करून गुलबहारनें विचारलें, तूं कोण आहेस, आणि माझी भेट घेण्याचें कारण काय ? "

" मी इब्राहीमसाहेबांची दासी आहें. "

" कोण इब्राहीम ? "

" ज्यांची आपण शुश्रुषा करून त्यांच्या घरीं पोंचतें केलेंत ते महाभाग-त्यांचेंच नांव इब्राहीम ! " दासी बोलण्यांत मोठी हुषार होती. गुलबहा-रचीहि तिनें खात्री केली. त्यामुळें शहाजादीचा आवाजही थोडा मृदु झाला. ती म्हणाली, " होय. मला आतां सर्व कांहीं आठवत आहे; पण या अशा वेळीं तुला जनानखान्यांत येण्याचें कारण काय ? "

" ते सध्यां कैदेंत आहेत, तेव्हां असें एकवार त्यांना जीवदान दिलेंत तसें पुन्हां द्या. कारण त्यांच्याशिवाय मला कुणाचाही आधार नाहीं. आणि असले मालक मला पुन्हां मिळावयाचेही नाहींत तेव्हां या दीन दासीवर—" तिच्यानें पुढें बोलवेना. ती रडूं लागली आणि रडत रडतच तिनें शहाजादीचे पाय धरले. शहाजादीलाही दुःख झालें. तिच्या तोंडून शब्द उमटेना. दासी ओक्साबोक्सी रडत पुन्हां म्हणाली, " खुदाच्या खालोखाल आपलें सामर्थ्य आहे. आपणाला काळही थरथर कांपत असतो. आपण मनांत आणाल तें करूं शकाल; तेव्हां कृपा करून एवढें यश घ्या."

गुलबहार सद्‌गदीत होऊन म्हणाली, " पण त्यांचा अपराध तरी काय ? "

" ते मला माहीत नाहीं. " दासी रडत रडतच म्हणाली.

" कुणाच्या हुकुमानें त्यांना कैदेंत टाकलें ? "

" खुद्द सम्राटांच्या; आपल्या वडलांनींच त्यांचे हे असे हाल चालविले आहेत "

" पण ते सध्यां कोणत्या कारागृहांत आहेत. "

" राजवाड्यांतच नजर कैदेंत असल्याचें मी ऐकलें. "

" तुला हें कसें समजलें ? "

" तें काय सांगूं साहेब ! परिचारकांना त्यांच्या मालकाची हालहवाल कशी समजते हें विचारलें का पाहिजे ? "

गुलबहारला वाटलें ही दासी कांहीं सामान्य नाहीं. हिचें जसें सौंदर्य चमकदार आहे तसेंच बोलणेंहि चटकदार आहे. शहाजादीला तिच्याबद्दल अभिमान वाटला. ती तिला म्हणाली, " बये ! तूं सांगतेस तें सगळें खरें; पण मला माहिती पाहिजेना ? आतां तूं इथेंच बैस. वाड्यांत काय काय प्रकार झालेला आहे तो सगळा मी पाहून येतें. मग काय करायचें तें करीन. तूं निराश होऊं नकोस. मी प्रयत्न करण्यांत मुळींच कसूर करणार नाहीं. "

शाहाजादीच्या या बोलण्याचा दासीला विश्वास वाटला. व ती निघून जातांच आपण बाहेरच्या दालनांत येऊन गालिचावर बसली; पण ही दासी कोण असावी बरें ?

* * * *

गुलबहार आपल्या महालांतून निघाली ती थेट कारागृहाच्या दरवाजाशीं येऊन उभी राहिली. तिला कोणीही आडविणारा नव्हता. दरवाजाशीं येतांच तिच्या मनांत एक नवाच विचार आला आणि ती आपल्याशींच म्हणाली, ही तर मला चांगलीच संधी मिळाली आहे म्हणायची ! मनांत आलें तर या तरुणाला मुक्तही करूं शकेन; पण त्यानें माझी अट मान्य केली तर ! या भयंकर बंदिवासांतून मी त्याला मुक्त केलें तर तो माझी विनंति मान्य करील का ? माझा स्वीकार करण्यांत त्याला माझ्या उपकारांची फेड करावीशी वाटेल का ? आणि नाहीं वाटली तर ? त्यानें माझें म्हणणें अमान्य केलें तर ? नाहीं. त्याच्याकडून मी माझा कधींहि अपमान करून घेणार नाहीं. माझें सांगणें त्यानें मान्यच केलें पाहिजे, नाहीं तर तो या जगांत जिवंत राहाणें कठीण आहे. शाहाजादीला झिडकारणारा तरुण मातींतच मिळाला पाहिजे. त्याला मातीवांचून गति नाहीं. "

शाहाजादी अशा प्रकारचा विचार करीत मोठा दरवाजा उघडून आंत गेली. आंतील मुख्य दरवाजावरचे पहारेकरी शहाजादीला पाहून दचकल्या-

प्राप्त झाले. त्यांनीं तिला लागलीच कुर्निसा करून हळूच विचारलें, काय आज्ञा आहे ? "

" तुमच्या ताब्यांत जो कैदी आहे त्याचें नांव काय ? "

" इब्राहीम ! आज दोन दिवस झाले त्याला येथें ठेवून घेतलें आहे; त्यानें अपराध काय केला असेल कुणाला माहीत ! "

" या खोलीची चावी कुणाजवळ आहे ? "

" माझ्याजवळ " एक पहारेकरी पुढें होऊन म्हणाला.

" तर मग ती चावी माझ्याजवळ द्या. आणि तुम्हीं बाहेरच्या मोठ्या दरवाजांत उभे राहा. मी तुम्हांला बोलावींपर्यंत कोणीही इकडे येतां कामा नये. जा "

पहारेकऱ्यानें लागलीच तिच्या हातावर चावी ठेविली आणि तो सर्वां-ना घेऊन बाहेरच्या मोठ्या दरवाज्याकडे गेला. कारण शहाजादीचा हुकूम अमान्य करण्याचें साहस कुणालाही नव्हतें.

पहारेकरी निघून गेलेले पहातांच गुलबहारनें त्या खोलीचा दरवाजा उघडला आणि ती गजगतीनें आंत गेली. खोलींत जरी एकच दिवा तेवत होता तरी त्याचा प्रकाश उज्ज्वल असल्यामुळें कुठेंहि काळोख नव्हता. यावेळीं इब्राहीम जरी डोळे मिटून बिछान्यावर पडलेला होता तरी त्याला झोंप लागलेली नव्हती.

दरवाजा उघडून मृदुमन्द पावलें टाकीत कोणी तरी आपल्याकडे येत आहे असें इब्राहीमला वाटून त्यानें चमकून डोळे उघडले. झोपेंतून उठला. पहातो तों समोर हिरेजवाहिराच्या महामूल्य अलंकारांनीं चकाकत अस-लेली स्वर्गीय सौंदर्याची ज्योत गुलबहार, आपला अर्धावगुंठित चेहेरा लाजवटपणानें जास्तच मोहक करून समोर उभी असलेली त्याला दिसली.

पाहिल्या प्रथम त्यानें तिला न ओळखून चौकसपणानें म्हटलें, " कोण आपण ? कदाचित् चुकून आपण इकडे आलां असाल. हा कैदखाना आहे. ".

गुलबहार किंचित् हंसून म्हणाली, " नाहीं साहेब! मी चुकलें नाहीं. मला आपण ओळखलें नाहीं का ? इतक्यांत मला विसरलां ? "

कैद्याशीं एका उच्च दर्जाच्या रमणीचें इतकें सलगीचें भाषण!

इब्राहीमला आश्चर्य वाटलें; पण थोड्याच वेळांत त्याला आपल्या आकस्मिक अपघाताची हकीगत आठवली. आपली शुश्रूषा करणारी दयाळू स्त्री हीच असली पाहिजे असें त्याचें मन त्याला सुचवूं लागलें. भाषणांतील साहजिक कोमलता आणि कमनीयता याच रमणींत विशेष होती. तरी पण तो साशंक स्वरानें म्हणाला, "रंगमहालांतील ती दयाळू दासीच आज माझ्यासमोर उभी आहे काय?"

गुलबहारनें कम्पितस्वरानें उत्तर दिलें, "मी तीच खरी; पण मी दासी नसून शहाजादी गुलबहार आहें. मी त्यावेळीं तसें मुद्दाम सांगितलें होतें. आज परिचय देण्याची वेळ आल्यामुळें मानमर्यादा बाजूला सारून मी एकट्या रात्रीं कारागृहांत येण्याचें साहस केलें आहे. इब्राहीम साहेब! माझें सांगणें आपण मान्य कराल का?"

बोलतां बोलतां सौंदर्यसंपन्न गुलबहारनें चटकन आपली ओढणी बाजूला सारली. तें दिव्यसौंदर्य आणि तारुण्य पाहून इब्राहीमची दृष्टी प्रथम चमकल्यासारखी झाली. पण लागलीच भानावर येऊन तो म्हणाला, "शहाजादीनें या निराश्रित गुलामाशीं कसली थट्टा चालविली आहे? मला हें रहस्य उलगडतां येणें शक्य नाहीं"

गुलबहार गंभीरपणानें म्हणाली, "रहस्य कसलं साहेब! मी माझ्या मनांतली अशी खरी गोष्ट आजपर्यंत कुणालाच सांगितली नव्हती. आणि पुढेंहि कुणाला सांगेन कीं नाहीं याची शंकाच आहे. आपण या वेळीं परस्वाधीन आहां हें मी जाणतें; पण या कैदेंतून आपणाला मुक्त करण्याला मी समर्थ आहें. स्वतःचें जीवन वेंचूनही मी आपली मुक्तता करीन. आणि याचा अनुभव पूर्वी एकवार आपल्याला आलेला आहेच."

अजूनही इब्राहीमला या रहस्याचा उलगडा झाला नाहीं. तो मनांत म्हणाला, 'मी तर एक यःकश्चित मनुष्य! मग माझ्यावर इतका अनुग्रह करायला या गर्विष्ठ शहाजादीनें कां तयार व्हावें? तिच्यांत असा अकस्मात् बदल व्हायचें कारण काय?"

आपल्या मनांत आलेल्या या शंकेचा खुलासा व्हावा म्हणून त्यानें तिला हळूच प्रश्न केला, "शहाजादीसाहेब! माझ्यासारख्या एकाद्या क्षुद्र मनुष्याला वांचविण्यासाठीं आपण इतकी तसदी कां बरें घेतली? विलक्षण

योगायोगानें आपली एकवार भेट झाली होती खरी; पण त्याचा संबंध इतका दूर पोंचत नाहीं ! ! ”

गुलबहारनें या प्रश्नाचें साभिमानपूर्वक उत्तर दिलें. ती म्हणाली, “ मी स्वतः होऊन ही गोष्ट बोलूं नये; पण बोलतेंच. कारण या बाबतींत तिसऱ्या मनुष्याची मदत घेणें मला कबूल नाहीं. माझ्या हृदयांत मी एका निराळ्याच आशेचें संजीवन केलें असून ती आशा मला आतां स्वस्थ बसूं देईनाशी झाली आहे. साहेब ! मी आपल्याला कां वांचवीत आहे हें यापेक्षांही उघड्या शब्दांनीं सांगायला पाहिजे काय ? मी माझ्या स्वार्थासाठीं हा उद्योग करीत आहे. मी मुलखाची गर्विष्ठ ! मला कोणीही आपल्या शब्दाप्रमाणें वागवूं शकलें नाहीं. मीच मोठमोठ्या अमीरउमरावांना कीटपतंगांप्रमाणें मानून त्यांच्या मागणीची अवज्ञा केली. मला वाटलें मी या माझ्या अहंकारालाच हृदयाशीं धरून एके दिवशीं मातींत मिळून जाईन; पण आपल्या दर्शनानें तो माझा अभिमान पार नाहींसा झाला असून आपल्या चरणाची दासी होऊन राहाण्यांतच मला आतां अभिमान वाटूं लागला आहे. तेव्हां तुमच्या हृदयांत मला जागा मिळाली पाहिजे आणि त्यासाठींच एवढ्या रात्रीं मी येथें येण्याचें धाडस केलें. ”

गुलबहारची अपूर्व प्रेमकहाणी ऐकून इब्राहीमच्या हृदयांत धक्का बसल्यासारखें झालें. तो मनांत म्हणाला, “ स्त्रीरहस्य अपूर्व आहे म्हणतात तें खोटें नाहीं ! किती मोठमोठे राजपुत्र हिच्या सौंदर्यावर लुब्ध होऊन हिच्याशीं शादी लावायला तयार झाले; पण हिनें त्यांचा धिक्कार केला ! मग हें आज हिचें इतकें परिवर्तन कां व्हावें ? माझ्यासारख्या एका सामान्य मुशाफराला या सुंदरीनें आपल्या हृदयांत जागा द्यावी हें आश्चर्यच नव्हे तर काय ? ”

इब्राहीम कांहींच बोलत नाहीं असें पाहून गुलबहार पुन्हां म्हणाली, “ इब्राहीम ! तुम्हांला जें पाहिजे तें मी देऊं शकेन. माझी इच्छा पूर्ण झाल्यास तुमची कोणतीही इच्छा अपूर्ण रहाणार नाहीं. या माझ्या हृदयांत प्रेमाच्या रत्नसिंहासनावर बसवून मी तुमची नेहेमीं पूजा करीन. एका काळीं या विशाल साम्राज्याचे सम्राट्‌ही आपणच व्हाल. याच पट-

केला तुसती तुम्ही कबुली देतांच रंगमहालांतील अनुपम सुखाची तुम्हांला कबूल करून येईल. सुगंधी दीपकांच्या रांगानीं उज्ज्वल दिसणाऱ्या महालांत हजारों विलासदासी आपली मार्गप्रतीक्षा करीत उभ्या आहेत. तुम्हांला स्वप्नांतही ज्या सुखाची कल्पना झाली नसेल तीं सर्व सुखें याच घटकेला तुमच्यापुढें हात जोडून उभीं राहातील."

इब्राहीमनें विनयपूर्वक उत्तर दिलें, "शहाजादीसाहेब! या सुखाच्या कल्पना या गरीब सेवकाला काय कामाच्या! आपणही आपली पदमर्यादा सोडूं नये हें चांगलें. मी एक दोन दिवसांतच सम्राटच्या हुकुमानें मारला जाणार आहें. मृत्यूच्या दाराशीं धरणें धरून बसलेल्या या हतभाग्याबद्दल आपण कशाला बरें निष्कारण त्रास घेतां?"

"माझ्या सामर्थ्याची मर्यादा तुम्हाला माहीत नाहीं. माझ्या हुकुमानेंच आज सर्व साम्राज्य चालत आहे असें म्हटलें तरी चालेल. मी लोकांच्या स्तुति निंदेची मुळींच पर्वा करीत नाहीं. कारण माझ्याविरुद्ध ज्यानें शब्द उच्चारला तो मुळीं दुसऱ्या दिवशीं जिवंतच राहाणार नाहीं."

बोलतां बोलतां गुलबहारनें आपल्या गळयांतील मोत्यांची माळ काढून हातांत घेतली आणि आवेगपूर्ण शब्दानें ती म्हणाली, "इब्राहीम! तुम्हीं माझ्या म्हणण्याला संमती द्या, म्हणजे हीच मुक्तामाला आपलें दोघांचें ऐक्य करून देईल. खुदाच्या नांवाचा उच्चार करून आम्हीं दोघेंहि या कारागृहांत पतिपत्नी बनल्यावर प्रत्यक्ष ईश्वरालाही आमची ताटातूट करतां येणें शक्य नाहीं; मग बादशहाची ती काय कथा? आपल्या एकुलत्या एक मुलीला विधवा करणारा बाप या जगांत असेल का? इब्राहीम! आतां नसत्या शंका कशाला घेतां? माझ्याबरोबर माझ्या महालांत चला. मी तुमच्या करतां अगदीं अधीर झालें आहें."

हातांत मोत्यांची माळ घेऊन शहाजादी आपल्याकडे येत आहे व तिचा प्रतिकार करणें अशक्य आहे असें वाटल्यावरून इब्राहीम आपल्या बिछान्याजवळून बाजूला झाला आणि किंचित् तीव्र स्वरानें म्हणाला, "गुलबहार! खुदाच्या नांवानें मी शपथ वाहून सांगतों कीं, तुझें म्हणणें मला कधींच कबूल करतां येणार नाहीं. तुला सध्यां सारासार विचार राहिलेला नाहीं, तेव्हां तूं निमूटपणें आपल्या महालांत जाऊन मस्तक शांत कर. व

जे शहाजादे तुझ्या पाणिग्रहणासाठीं उतावीळ होऊन तुझी मर्जी संपादन करीत असतील त्यांपैकीं कोणाशींही विवाह कर. मला तुझ्याशीं विवाह करावयाचा नाहीं व ही प्रेम करण्याची रीतही नव्हे. शिवाय मी विवाहित नसलों तरी दुसऱ्या एका रमणीला माझें हृदय समर्पण केलेलें आहे तेव्हां तुला द्यावया आतां माझ्याजवळ कांहींच शिल्लक राहिलेलें नाहीं. येथें माझें कांहींही होवो, तूं निघून जा. ''

इब्राहीमचें हें बोलणें ऐकून गुलचेहराच्या सर्वांगाचा भडका झाला. क्रोधानें तिचें सर्वांग थरथर कांपूं लागलें. शक्य असतें तर तिनें त्याच वेळीं त्याचा खून केला असता; पण तिच्या हातांत त्या वेळीं कांहींच शस्त्र नव्हतें. नुसती जळफळतच ती तेथून बाहेर पडली व मुख्य दरवाज्याबाहेर असलेल्या पहारेकऱ्यांना कठोर स्वरानें म्हणाली, " हा कैदी मनुष्य नसून सैतान आहे. तेव्हां फारच सावधपणानें पहारा करा नाहीं तर पळून जाईल; हा येथून निसटला तर तुमचे प्राण राहाणार नाहींत. ''

इतकें सांगितल्यानंतर ती दांतओंठ चावीत आपल्या महालांत आली, तोंच इब्राहीमची दासी म्हणून आलेली स्त्री तिला तेथें आढळली. तेव्हां तिचा राग पुन्हां प्रज्वलित झाला, व ती गुलेनारला बोलावून म्हणाली, " मी इब्राहीम वगैरे कोणी ओळखत नाहीं. या दासीबद्दलच मला कांहीं तरी संशय येत आहे; तेव्हां हिरण्मंदिराला लागूनच असलेल्या तळघरांत हिला तूं कैद करून ठेव. जा. येथें आतां कोणीही येऊं नका. मला स्वस्थ पडूं द्या. ''

गुलेनार आपल्याशींच हंसली आणि त्या दासीचा हात धरून तिच्यासह महालाच्या बाहेर पडली. दासी बिचारी घाबरून गेली होती. ' आपण केलें काय आणि झालें काय ' याचाच ती विचार करीत होती; पण तिला विचार करायला तरी सवड कुठें होती. हिरण्महालाशीं येतांच गुलेनार म्हणाली, " तूं मला अगदींच दुर्दैवी दिसतेस. कारण शहाजादीच्या कोपानलांत आतां तुझी आहुती पडणार. तुझ्या त्या इब्राहीमनें तिचा मानभंग केला असला पाहिजे. सुंदर स्त्रियांना प्रेमभंग आणि मानभंग मुळींच सहन करवत नाहीं. त्यांतून शहाजादीसारखी मानी स्त्री तर जगांत कुठेंच आढळणार नाहीं. इब्राहीमची काय स्थिति झाली असेल कुणाला माहीत ! ''

गुलेनारच्या तोंडचे हे शब्द ऐकून ती दासी तेथेंच मूर्च्छित पडली. कारण स्वतःच्या जिवापेक्षांहि तिला इब्राहीमची काळजी वाटत होती; पण ही दासी कोण?

---

# प्रकरण ४६ वें.



## भयंकर आपत्ति.

वजीरसाहेबांचा हुकूम अजमीरच्या सुभेदारामार्फत इसाकला पोंहोंचतांच तो तावडतोब दिल्लीला आला व दरबारांत हजर झाला. वजीर उल्-मुल्कची भेट झाल्यानंतर इब्राहीमच्या संबंधाची सर्व हकीगत त्याला अवगत झाली. अर्थात् स्वतः जामीन राहून इब्राहीमची कैदेतून सुटका करणें हें आपलें पहिलें कर्तव्य आहे असें त्यानें ठरविलें. मित्रासाठीं कितीहि विपत्ति येवोत माघार म्हणून घ्यावयाची नाहीं असा विचार करून त्यानें बादशहापुढें कबुली दिली. लागलीच इब्राहीमला कैदखान्यातून आणवून सात दिवसांच्या मुदतीनें पाहिजे तिकडे जाण्याची मोकळीक देण्यांत आली. इसाकला पहातांच इब्राहीमला प्रेमाचें भरतें आलें व दोघेहि भर दरबारांत एकमेकांना कडकडून भेटले. त्यामुळें तेथें जमलेल्या अमीर उमरावांनाही या मित्रप्रेमाचें कौतुक वाटल्यावांचून राहिलें नाहीं.

दरबार बरखास्त झाल्यानंतर इब्राहीम आपल्या मित्रासह बिऱ्हाडीं आला. मुदतीचे चार दिवस जामिनाची व्यवस्था करण्यांतच संपून गेले असल्यामुळें दोघांनाही एक प्रकारची काळजी वाटत होती. इब्राहीमनें बिऱ्हाडीं येतांच नवीबक्षाची चवकशी केली; पण तो स्त्रीवेषानें आपलाच तपास करण्यासाठीं जनानखान्यांत गेल्याचें त्याच्या नोकराकडून समजलें. इब्राहीमची काळजी दुणावली. पुरुषानें जनानखान्यांत जाणें फार धोक्याचें असतें हें त्याला माहीत होतें. शिवाय गुलबहारचा आपणावर राग आहे तेव्हां तिला हा भेटल्यास ती याला ठार मारल्यावांचून स्वस्थ बसणार

नाहीं, अशी त्याची खात्री झाली; पण आतां काळजी करून काय उपयोग ! ' असा विचार करून इसाकसह त्यानें जेवण आटोपलें आणि दोघेहि पुढच्या विचार करण्यासाठीं खोलींत बसले.

बराच वेळपर्यंत स्तब्ध राहिल्यानंतर इसाक म्हणाला, " इब्राहीम ! तूं उतावीळपणानें अगदींच वेडेपणा केलास. दलियेच्या बाबतींत तूं इतका पुढें जाशील असें मला वाटलें नव्हतें. "

इब्राहीम शरमिंदा होऊन म्हणाला; " इसाक ! होऊं नये ती चूक झाली खरी; आतां कांहीं तरी खटपट करून दलीयेला शोधून काढणें भाग आहे. हां हां म्हणतां तीन दिवस तर निघून गेले नबीबक्ष नांवाचा एक माझा छोटासा दोस्त आहे आणि तो यावेळीं येथें असता तर त्याची मला बरीच मदत झाली असती, पण त्याला काय वेडी बुद्धि सुचली पहा ! माझ्यासाठीं त्यानें रमणी बनून जनानखान्यांत जाण्याचें साहस केलें. त्याचें पुढें काय होतें कुणाला माहीत ! मला कांहीं तो सुखरूप परत येईल असें वाटत नाहीं. " " त्याचा विचार करण्यापूर्वी आधीं स्वतःच्या संरक्षणाचा तूं विचार कर. नुसत्या कल्पनेचें साम्राज्य व्यवहारांत खरें ठरत नसतें. तरवारीची तीक्ष्ण धार आपलें शीर धडावेगळें करण्याला तयार झाली असतां भावभावनेच्या खेळांतच गुंग राहाणें योग्य नाहीं. मलाही त्या जमालखानाला शोधून काढण्याचें काम आहे. दलियेसाठीं तूं काय करणार असशील तें आधीं कर. नाहींतर तूं आणि तुझ्यासाठीं मी व्यर्थ मरून जाईन. कांहीं तरी शूरपणाच्या कृत्यांत मरण आलें तर तें आपल्या कीर्तीला उज्वल करणारें असतें. आणि मला वाईट वाटतें तें याचेंच. " इसाकला वाटलें, मी याच्याजवळ बसून राहिलों तर असेंच कांहीं तरी बोलत राहावें लागेल तेव्हां शहरांत थोडा वेळ फिरून तरी यावें. ' आणि त्यामुळेंच त्यानें बोलत बोलत इब्राहीमचा निरोप घेतला. इब्राहीमच्या खिन्न चेहेऱ्याकडे पहात बसणें त्याला योग्य वाटलें नाहीं.

इब्राहीमला आपल्या मित्राची चाललेली ही तळमळ समजत होती, पण तो तरी काय करितो ! त्यालाही कांहीं सुचत नव्हतें. इसाक निघून गेल्यानंतर तो अगदीं हताश होऊन गेला. त्याला कांहीं सुचेना. तो मनांत म्हणाला, " आज तीन दिवस संपून गेले आणि माझ्या हातून अद्याप

दलियेचा तपास लागला नाहीं, तेव्हां मीच आपण होऊन हें मरण ओढून आणलें असें नाहीं का होत ? खुदा ! मी आजपर्यंत तुझ्यावरच विश्वासून प्रत्येक कृत्य करीत आलों तेव्हां या प्रसंगीं तूं मला सहाय हो आणि इतर बिकट प्रसंगांप्रमाणेंच यांतूनही तूं मला मुक्त कर ”

इब्राहीमची प्रार्थना खुदानें ऐकली असेल कीं नसेल कुणाला माहीत; पण याच वेळीं एक फकीर आंत आला. आणि म्हणाला, “ मुला ! खुदावर विश्वास असेल तर कुणींच कधीं दुःखी राहणार नाहीं. तुझ्यावर सध्यां काय संकट आहे तें वजीर साहेबांकडून नुकतेंच मला समजल्यामुळें मी तुझ्या भेटीला आलों. मी त्या तसबिरीच्या बाबतींत मागेंच तुला सावध केलें होतें; पण माझा विचार तुला मान्य झाला नाहीं आणि त्यामुळें तूं आपल्यावरच नव्हे तर आपल्या मित्रावरही जिवावरचा प्रसंग मुद्दाम ओढून आणला आहेस. इब्राहीम ! तूं इतका उतावळा असशील अशी माझी कल्पना झाली नाहीं. कारण तूं नुकताच एक दोन संकटांतून मोकळा झाला होतास; असो, शहाजादी दिलबहारबद्दल मी बराच तपास केला असून त्या बाबतींत मला यश येण्याचा संभव आहे. ही सर्व खटपट मला केवळ तुझ्यासाठींच करावी लागली. तेव्हां तूं असा खिन्न होऊन बसूं नको. अशीं कोणतही धाडस करूं नये आणि तें केल्यावर मग मध्येंच हताश होऊं नये. हताश होणें हें शूराचें काम नाहीं. इसाक आपल्या उद्योगांत आहे; पण त्यालाही तूं सांग कीं जमालखानाचे डोळे जनानखान्याच्या दरवाजाशीं लकाकत असून त्याचे हात सम्राटाच्या मानेवर तरवार चालविण्याला उत्सुक झालेले आहेत ! त्यामुळें जनानखा-न्यावर नजर ठेवल्यास तो सांपडण्याचा संभव आहे. ”

इब्राहीम आनंदानें अगदीं अधीर होउन गेला होता, त्यामुळें फकीरसा-हेबांचें भाषण केव्हां संपतें याची तो वाटच पाहात होता. ते बोलायचे थांबतांच तो उतावीळपणानें म्हणाला, शाहासाहेब—ते शाहासुफीच होते. आपण माझ्यासाठीं फारच तसदी घेतलेली दिसते. दलियेच्या बाबतींत आपणाला कितपत यश आलें सांगा पाहू.”

मी या बाबतींत बरीच माहिती मिळविली आहे; पण ती सगळी विस्क-ळित असल्यामुळें अद्याप मला ती स्पष्टपणें सांगतां येत नाहीं. यमुनेंत नौका

बुडाल्यावर शाहाजादीचा अचेतन देह बऱ्याच दूरवर वाहात जाऊन एका पडक्या घांटाच्या दगडाला अडकून राहिला. त्याच घांटावर आपली नौका बांधून एक हबशी सरदार रसुई करीत होता, त्याला तो देह आढळतांच त्यानें पाण्यांतून तो वर काढून शेक वगैरे दिला. व बरीच खटपट करून शाहाजादीला त्यानें शुद्धीवर आणलें. आपलें जेवणखाण आटोपल्यावर शाहाजादीला घेऊन तो त्या नौकेंतून गेला. पुढें कंदाहारला जातांना तुझ्या बापाला ही शाहाजादी आढळल्यामुळें त्यानें ती दासी म्हणून विकत घेतली. बऱ्याच प्रयत्नांनीं मला इतकी बातमी समजली. आतां तुझी ती दासिया भेटतांच खात्री होईल."

"अहो खात्री कसली व्हायची तीच ती! पण सध्यां ती कुठें आहे समजत नाहीं" असें म्हणून इब्राहीमनें दासियेच्या बाबतींत झालेली सर्व हकीगत शहासुफींना सांगितली. ती सर्व लक्षपूर्वक ऐकून घेतल्यावर सुफीसाहेब खिन्नतेनें म्हणाले,

" इब्राहीम खरोखरच तूं यावेळीं भयंकर संकटांत आहेस! यांतून तुझी कशी मुक्तता होणार आहे कुणाला माहीत! मी तूर्त बादशहाला कांहीं भेटत नाहीं; पण वजिराशीं या बाबतींत बोलून ठेवणें जरूर आहे. उद्यां सकाळीं मी तुला पुन्हां भेटेन; पण 'पण जनानखान्याबद्दल सावध राहा' म्हणून इसाकला सांगायला मात्र विसरूं नको."

असें म्हणून शाहासुफी माडीच्या खालीं उतरले. इब्राहीम एकटाच आपल्या खोलींत बसून विचारांत गढून गेला होता; पण तितक्यांत तीनचार धटिंगण पुढें आले आणि त्यांनीं एकदम त्याचें तोंड बंद करून व हातपाय बांधून मुसक्यानें त्याला तेथून उचललें आणि जिना उतरून समोर दिसणाऱ्या एका काळोख्या गल्लींत हां हां म्हणतां दिसनासे झाले. इब्राहीमला वाटलें, 'ही एक नवीच आपत्ती आली म्हणायची!'

* * * * * *

काळयाकुट्ट रात्रीं काळीं कुट्ट कृत्यें करणाऱ्या दोन काळया बुरखेवाल्या व्यक्ति हिरणमंदिरानजीकच्या उद्यानांत कसलें तरी गुप्त खलबत करीत बसलेल्या होत्या. त्या कोण होत्या हें जरी सांगतां येणें कठीण आहे तरी त्यांचें

आयण ऐकल्यावर त्यांच्या स्वरूपाचा कांहीं तरी बोध झाल्यावांचून राहाणार नाहीं.

" अशा रीतीनें आपलीं सगळीं कृत्यें यशस्वी रीतीनें पार पडतील असें मला वाटलें नव्हतें, पण तुझें सहाय्य असल्यामुळें मला हें सर्व करतां आलें. आतां मी सम्राट् आणि तूं बेगम ! गुलेनार ! तूं एवढ्या मोठ्या भाग्याला चढशील असें तुला कधीं तरी वाटलें होतें का ? "

" मला त्याची कशी कल्पना होणार साहेब ! पण इतक्यांतच आनंदानें हुरळून जातां नये. इब्राहीमची दासी आणि इब्राहीम अद्याप जिवंत आहेत ! दोघेंहि आपल्या ताब्यांत आलेलीं असलीं तरी त्यांचा अद्याप अंत झालेला नाहीं. "

" इब्राहीमला चांगला बंदोबस्तांत ठेवला असून गुलबहारच्या मोहाला तो बळी पडेल असें मी केलेंच आहे. इसाकचें पत्र इब्राहीमच्या दासीच्या हातांत देऊन तिला बादशहापुढें नेऊन उभी करावी. म्हणजे इब्राहीमचा जामीन म्हणून इसाकला आणि शाहाजादीशीं गुप्त पत्रव्यवहार ठेवण्याला कारण झाली म्हणून त्या दासीला या दोघांनाही बादशहा ठार मारील. तसेंच या तिघांचा असा सूड घेऊन झाल्यानंतर शाहाजादी गुलबहार व बादशहा यांचा आम्हीं दोघे सहजच नाश करूं शकूं. आणखीं कांहीं दासी व खोजे आपल्याकडे वळवून घेऊं म्हणजे झालें; पण तें इसाकचें पत्र कुठें आहे पाहूं."

" आधीं पत्राची काय जरूर ? आपण दोघेंहि आधीं बादशहाच्या मृत्यूची योजना निश्चित करूं. मी म्हणतें त्या इब्राहीमच्या दासीला भुयारांतून बाहेर काढून त्यांत भरपूर दारू भरूं आणि तिघांचा मोक्ष झाल्यानंतर मी कांहीं कौशल्यानें त्या दोघांनाही हिरण्महालांत घेऊन येतें. आपण भुयारांतील दारूला सरबत्ती द्या म्हणजे झालें."

" गुलेनार ! वा, वा; छान युक्ति आहे. हा जमालखान लोदी खात्रीनें बादशहा होऊन गुलेनार बेगमची चोहोंकडे कीर्ति होणार. आपणाला सध्यां दैव अनुकूल आहे यांत शंका नाहीं. माझा मुख्य शत्रु इसाक ! तो ठार मरतांच अजमीरचा सुभेदार काय करतो तें मी पाहातो. खुदादाद आणि उमरशेख हे माझे हस्तक आहेत. माझ्या हस्तकांना कैद करून त्या सुभे-

दारानें माझा मोठाच अपराध केला आहे. तेव्हां मी त्याला मुळींच स्वस्थ बसूं देणार नाहीं. गुलेनार ! तूं आतां माझी झालीस; पण आणखी दोन दिवस अशीच सर्वांवर नजर ठेवून राहा. भुयारांत ठेवलेल्या त्या इब्राहीमच्या दासीला तेथून बाहेर काढून वरच्या खोलींत ठेव. कारण मी आपल्या सवडीप्रमाणें त्या भुयारांत दारू भरून पुढील कार्याची जय्यत तयारी करणार आहें."

बोलणाऱ्या व्यक्ति म्हणजे गुलेनार आणि जमालखान या होत्या हें सांगायला नकोच. दोघांनींही कसल्या भयंकर कृत्याला आरंभ केला होता, याची आतां कल्पना होईलच. गुलेनारला कसलीशी आठवण होऊन ती आपल्या भावी प्रियकराला म्हणाली, "दारूचीं तीनचार पिंपें त्या भुयाराशेजारच्या खुनखान्यांत आहेत. तेव्हां आपण आतां एकदोन दिवस त्याच जागीं राहून तेवढी कामगिरी संपवा. मी मधुन मधून आपल्या भेटीला येईनच. शिवाय आपण तेथें राहिल्यामुळें कोणाच्या दृष्टीलाही पडणार नाहीं. बाहेर काय चाललें आहे त्याची मी आपणाला बातमी देईनच—"

तितक्यांत कुणाचीशी चाहूल त्यांना ऐकूं आली त्यामुळें गुलेनारनें आपलें पुढचें भाषण अगदींच हळू हळू चालविलें. जमालखान इकडे तिकडे पाहात होता; पण त्याला त्या काळोखांत कांहींच दिसलें नाहीं.

* * * *

इब्राहीमची दासी म्हणून सांगून दलियेनेंच जनानखान्यांत प्रवेश करून घेतला; पण या तिच्या धाडसाचा परिणाम चांगला न होतां एका भुयारांत तिला कैद होऊन राहावें लागलें. गुलबहारच्या रोषाला ती पात्र झाली हें मागें सांगितलेंच आहे.

गुलेनारनें या दासीचा-दलियेचा-अशा रीतीनें बंदोबस्त केल्यावर ती तिला चार समाधानाच्या गोष्टी सांगून जमालखानाला आंत आणण्याच्या खटपटीला गेली होती. जमालखानाचे सगळे प्रयत्न निष्फळ ठरल्यानंतर त्यानें गुलेनारला हाताशीं धरून आपला कार्यभाग उरकण्याचें ठरविलें होतें; पण गुलेनारला मात्र हा आपल्याच प्रेमानें मोहित होऊन एवढी मोठी इमारत बांधीत आहे असें वाटत होतें.

गुलेनार निघून गेल्यावर दलिया कपाळावर हात मारून बेऊन रडत

रडत म्हणाली, " खुदा ! मी असा कोणता अपराध केला होता बरें ! माझ्या कोणत्याच प्रयत्नाला यश येऊं नये असें मी पाप तरी काय केलें होतें ! ! मी आतां अशी येथें पडून राहिल्यास मला इब्राहीमसाहेबांसाठीं काय करतां येणार आहे ? त्यांचा तो तळमळणारा आत्मा यावेळीं दालिया, दालिया ! म्हणून ओरडत असेल ! ! मी किती दुर्दैवी ! त्याचवेळीं त्यांना ओळख दिली असती तर कदाचित् आज हा एवढा प्रसंग आलाच नसता. दिलबहार शहाजादीला शोधून काढून मोठें थोरलें बक्षीस आणि सुंदर स्त्री मिळविण्याचा त्यांचा प्रयत्न तडीस तर जाणार नाहींच; पण आतां स्वतःचे प्राण मात्र गमावण्याची वेळ आलेली आहे ! मी या वेळीं मोकळी पाहिजे होतें. सम्राटला शरण जाऊन मी माझ्या कार्यांत कदाचित् यश मिळविलें असतें; पण आतां काय करणार ? "

दालिया तळमळत होती. तिनें तें मुयार चोंहोंकडे चांगलें तपासून पाहिलें; पण त्यांतून बाहेर पडण्याची वाट सांपडेल असें कांहीं तिला वाटलें नाहीं. ती हताश झाली. व स्वतःचीं वस्त्रें फाडण्यांत ती आपली अस्वस्थता व्यक्त करूं लागली. ती तरी आणखी काय करणार ? आपल्याला आतां कुणाचेंहि सहाय्य मिळणें शक्य नाहीं अशी तिची जरी खात्री झाली होती, तरी,' खुदा ! माझा तुझ्यावर पूर्ण विश्वास आहे. तेव्हां हेहि दिवस असेच राहातील असें मला वाटत नाहीं. ' असें म्हणण्याला ती विसरत नसे.

अशाच या दुःखद स्थितींत ती रात्र संपून दुसरा दिवसही गेला. एकवेळ जेवण मिळालें. व तेवढेंच तिला प्रकाशाचें आणि माणसाचें दर्शन झालें. पुन्हां चोंहोंकडे काळाकुट्ट अंधार; पण बऱ्याच मोठ्या रात्रीं कोणी तरी त्या मुयारांत येत असावें असा तिला भास झाला. तिनें आपले डोळे सताड उघडले. तरी पण काळोखामुळें तिला कांहींच दिसणें शक्य नव्हतें.

आगांतुक येणारें मनुष्य कोण असावें याचा ती विचार करीत आहे तोंच एका राकट माणसानें तिचें तोंड दाबून धरलें व तावडतोब एक बोळा तिच्या तोंडांत कोंबून आणि तडफडणारे हातपाय एका दोरीनें बांधून त्यानें तिला उचललें. तितक्यांत एका बुरखेवाल्या व्यक्तीनें दिवा

पुढें केला आणि हळूच म्हटलें, " बाहेरच्या दादरानें चढून वरच्या खोलींत जा, आणि तिथें हिला ठेवून बाहेरून कुलूप घाल. पुढची तजवीज मी उद्यां पाहीन. "

पण या वेळींही कुणा परक्या इसमाची चाहूल ऐकूं आल्यामुळें त्या काळ्या बुरखेवाल्या व्यक्तीला भीति वाटली व तिच्या हातांतील दिवा जमिनीवर पडून विझला.

" आपल्यावर नजर ठेवणारा हा परका मनुष्य कोण असावा बरें " असें त्या दोन्हीं व्यक्ति एकमेकींच्या कानाशीं पुटपुटल्या. त्यांना भीति वाटली; पण दालियेला कांहीं त्यांनीं सोडली नाहीं.

---

# प्रकरण ४७ वें.



## पुढें काय ?

हजारों सुगंधी दिव्यांचा उज्ज्वल प्रकाश एका विचित्र खोलींतून चोंहोंकडे पसरलेला दिसत होता. त्या खोलीच्या भिंती मोठमोठे निर्मळ आरसे लावून सुशोभित केलेल्या असल्यामुळें तो आयन-महालच होता असें म्हणायला हरकत नाहीं आरसे-महालांत थोडासा प्रकाश असला तरी तो किती तरी पटींनीं मोठा दिसतो हा अनुभव सर्वांना आहेच.

अगरूचंदनामिश्रित धुपाचा वास आसमंतांत पसरला होता. ती खोली तर त्या अपूर्व वासानें भरूनच गेली होती म्हटलें तरी चालेल. तेथेंच गुलाबी संगमरवरी दगडाच्या कृत्रिम गुलाबपुष्पांतून गुलाबपाण्याचें ओरबार कारंजें उडत असल्यामुळें आपण नन्दनवनांत आहों कीं काय असा भास होत होता. खांब, आरसे, आणि तसबिरी यांच्या सभोंवार सुगंधी फुलांच्या असंख्य माळा फार कुशलतेनें लावल्यामुळें ती एक अनुपम शोभाच दिसत होती म्हटलें तरी चालेल.

असो. याच खोलींतील एका मखमलीच्या कोचावर एक अत्यंत सुंदर रमणी चिंताक्रांत होऊन बसली असून तिला कोणताही प्रकार आनंदकारक

वाटत नव्हता, असें तिच्या उदास मुद्रेवरून दिसत होतें. ती थोडीसुद्धां हालचाल करीत नसल्यामुळें ही अगदीं निर्जीव पुतळी आहे कीं काय असेंच कुणालाही वाटलें असतें.

ही सुंदर रमणी दुसरी कोणी नसून अभिमानी शहाजादी गुलबहारच होती ती विचार करीत असल्यामुळें बाह्य जगाचें तिला ज्ञानही नव्हतें म्हटलें तरी चालेल. ती आपल्याशींच म्हणत होती, "बादशहाच्या मुलीच्या अभिमानाचा हा असाच शेवट व्हावा ना ? बायकांना मुळीं स्वतःचा अभिमानच असूं नये ? त्यांनीं काय नेहेमीं पुरुषांच्या तंत्रानेंच वागावें ! हाय ! हाय ! ! मला तरी अशी बुद्धी कां व्हावी बरें ? कुठच्या तरी अपरिचित आठवणी काढून त्या त्या प्रसंगीं प्रसंगानुरोधानें झालेल्या भेटींच्या आधारावर आपला मानस व्यक्त करणें ही चूकच नाहीं काय ? प्रेम हें इतकें दुःखकारक आहे काय ? या असह्य यातना मी आतां कशा सहन करूं ! मी प्रेमाचें शिक्षण घेतलेलें नाहीं, तसेंच मी स्त्री असून प्रेमाचें मर्म काय आहे तें जांणून घेण्याचा प्रयत्न केलेला नाहीं आणि त्यामुळेंच कदाचित् आज माझी अशी दुर्दशा झाली असावी. शूराला मानभंग आणि रमणीला प्रेमभंग हीं त्यांचीं अन्तःकरणें जाळून टाकण्याला पुरेशीं कारणें होत. मी आतां काय काम केलें असतां या माझ्या अपमानाचा मला सूड उगवितां येईल ? गुलेनारच्या सांगण्याप्रमाणें त्याला कैद करून तर आणलें. अजूनही त्याला माझ्या प्रेमाची किंमत कळूं नये याला माझा काय इलाज ? आतां माझें सामर्थ्य मला उपयोगांत आणलेंच पाहिजे. गुलेनार म्हणते, या अशा बेमुर्वतखोर लोकांना जिवंत ठेवणें म्हणजे आपल्या जीवनाला कायमचा कलंक लावून घेणें होय. मलाहि तें पटलें. कारण केव्हां ना केव्हां तरी या उद्दट लोकांपुढें मान वांकविण्याचा प्रसंग येणारच. त्यापेक्षां मी ठरविला आहे तोच विचार बरा. या बाबतींत मी इतर कोणाच्याही मनाची पर्वा करणार नाहीं. मला प्रेमयाचना करण्याची मुळीं संवयच नाहीं. आणि मला कुणाच्या प्रेमाची जरूरही नाहीं. माझा अभिमान आजच नाहींसा झाला काय ? माझी याचना इतरांनीं करावी ! इतरांनीं माझी मनधरणी करावी. मी शहाजादी आहें. मी कुणाचेच कधीं पाय धरणार नाहीं. मी मरतांनाही अशीच उभी राहून मरेन.

कोणत्याही प्रसंगांत सांपडलें तरी मला वांचवा हो, असें मुळींच म्हणणार नाहीं. त्या काळोख्या रात्रीं जमालखानाच्या कारस्थानांतून मला सोडविणारा तो वीर माझ्या प्रेमाला योग्य होता; पण त्यानें माझी एकवारही मनधरणी केली नाहीं, एकवारही मला त्यानें आपला चेहेरा दाखविला नाहीं अथवा एकदांही तो माझ्याशीं बोलला नाहीं. मला वाटे हा मला मनानें तरी आपला आशय कळवील. माझ्या सौंदर्याचा आणि वैभवाचा कोणाच्या मनावर परिणाम होणार नाहीं ? त्याच्याही मनावर तो झाला होता, माझ्याबद्दल सहानुभूति दाखवितांना त्याचा आवाज कांपत होता. आणि मला या खोलींत आणून पोंचविल्यावर तो जेव्हां जायला निघाला तेव्हां त्यानें एक दीर्घ सुस्काराही सोडला होता; पण मी त्यावेळीं काय बोलायला पाहिजे होतें ? आपण मला संकटांतून सोडविल्याबद्दल मी आपली आभारी आहें ! माझ्या गरिबाच्या घरचा पाहुणचार स्वीकारल्यावांचून आपण जाऊं नये ' असें म्हणायला पाहिजे होतें ! पण माझा दर्जा कमी का आहे ? शहाजादींचें संरक्षण करणें हें प्रत्येक राजनिष्ठाचें कर्तव्य आहे. मी त्यांत कसलें आभार मानायचें ? पण कांहीं असो, त्यानें जर त्यावेळीं मला कोणतीही विनंती केली असती; तर ती मी मान्य केली असती—आतां तो मला भेटता आणि इब्राहीम इतकीं मी त्याचीं आर्जवें केलीं असतीं तर—आहाहा ! तर ! आणि त्याच वेळीं मी त्याला 'माझ्या उपकारकर्त्याचें मला दर्शन होईल काय ? असें नुसतें बोललें असतें तर ! छेः, गेलीच ती वेळ ! या सैतानानें माझा उपमर्द करायचा होता ना ! जें मी त्याला बोलायचें तें याला बोललें. छेः ती चूकच झाली; पण आतां मात्र तशी चूक होऊं देणार नाहीं. आधीं माझ्या प्रेमभंगाचा सूड घेणार आणि मग मी केलेल्या वीराच्या मानभंगाची क्षमा मागणार. मनांत आणीन तें मला करतां येईल; पण तो वीर कुठें आहे ? छेः, तो विचार नंतरचा ! आधीं या सैतानाचीच वासलात लावली पाहिजे. नाहीं तर माझ्या दुर्बलतेची ती पताका जगभर फडकत राहील. " असा विचार करतां करतां तिनें चटकन खुणेची टाळी वाजविली. यावेळीं तिला कार्यारंभाची फारच घाई झालेली होती. उतावीळ माणसें अविचारी असतात हा तर जगाचा नियमच आहे. गुलबाहारही प्रेमभंगाचा सूड आणि मानभंगाचें संशोधन

करण्यासाठीं उतावीळ झालेली असल्यामुळें आपण काय करीत आहों याचें तिला भानही राहिलेलें नव्हतें.

शहाजादीनें करतालीसंदेशानें गुलेनारला तलब करतांच ती धांवतच तेथें आली. गुलबहारची तब्बेत सांभाळण्यांत ती अगदीं आपल्या जिवाचें रान करीत असावी असें वाटत होतें.

गुलबहारनें रागानेंच उत्तर दिलें, “ मश्ररला मी याच घटकेला बोलवीत आहे असें सांग. जा. ”

कारस्थान गुलेनारचेंच; पण तीहि यावेळीं चकित झाल्यावांचून राहिली नाहीं. तरी पण अधिक उणें बोलण्याची ही वेळ नव्हे असें जाणून ती चतुर दासी तेथून निघून गेली.

गुलबहारला आतां कोचावर बसून राहवेना. ती तेथून उठली आणि खोलीतल्या खोलीतच येरझारा घालीत एकाद्या चवताळलेल्या वेडीप्रमाणें रागारागानें स्वतःशीच बोलूं लागली. “ माझ्या या सौंदर्याचा, तारुण्याचा आणि वैभवाचा मला कांहींच उपयोग नाहीं का ? यःकश्चित एका मुशाफरानें माझा पराभव करावा ! इब्राहीम ! तूं पुरुष नाहीस. तुझ्या पुरुषत्वाला धिक्कार असो. आज मी ह्मणेन तो पुरुष माझ्या पायांशीं लोळण घेईल. माझ्या मखमलीच्या पैंजणाची लाथही त्याला भूषणासारखी वाटेल. माझ्या नुसत्या एका सहानुभूतीच्या शब्दासाठीं हजारों तरुण रंगमहालाभोंवार घिरट्या घालीत आहेत. मी अद्याप कुणाच्याही मागणीला मंजूरी दिलेली नाहीं; पण आतां मात्र त्या वीरपुरुषाचा तपास करून मानभंगाचें संशोधन करावें असें मला वाटत आहे; पण तेंहि तो माझ्या जवळ चालून आला तर ! इब्राहीम् ! मी तुझी मनधरणी करून फसलें. व त्याचें तुला आतां भयंकर प्रायश्चित्तही भोगावें लागणार आहे. यापुढें मी कुणाचीच मनधरणी करणार नाहीं. प्रेमभंगाचा सूड घेणें हेंच माझें आजचें मुख्य काम आहे. माझ्या पाषाणहृदयांत आतां सैतानाचा प्रवेश होऊं दे. मला आतां दयाधर्म हे शब्दच पुसून टाकले पाहिजेत. सूड ! सूड !!

याच वेळीं जनानखान्यावरील मुख्य अधिकारी मश्रर तेथें आला, व जमिनीपर्यंत लवून सलाम केल्यानंतर ह्मणाला, “ माझी आठवण कां बरें झाली शहाजादीसाहेब ! ”

गुलबहार म्हणाली, " तुला ही मोत्याची माळ मी बक्षीस देत आहे. याच्या मोबदल्यांतच तूं माझें काम केलें पाहिजे. ज्या कैद्याला काळ तळ-घरांत आणून ठेविलें आहे त्याला ठार मारून खुनखान्यांत टाकण्याची कामगिरी तूं बजावशील ना ? "

मश्रूर क्रूर खरा; पण एका निरपराधी माणसावर शस्त्र चालवायला त्यालाहि भीति वाटली ! शहाजादीचा हुकूम तर अमान्य करणें शक्य नव्हतें. इब्राहीमबद्दल त्याला सहानुभूती वाटे. बिचारा एका अज्ञात कुमारिकेच्या प्रेमानें वेडा झालेला मनुष्य; कुठें तरी भटकून पोटभरणारा निराश्रित मुशाफर आणि आपल्याच दुःखांत चूर असणारा सद्गुणी तरुण ! शहाजादीनें निष्कारण कां बरें त्याला ठार मारावें ?... ' असे अनेक विचार त्याच्या मनांत आल्यामुळें त्याला एकदम उत्तरच देतां येईना.

पण यामुळें शहाजादीला मात्र ज्यास्तच राग आला. ती कर्कश स्वरानें म्हणाली, " मश्रूर ! कसला विचार चालला आहे ? खुनखाना म्हणजे काय हें तुला माहीत नाहीं ? "

मश्रूरला भीति वाटली. त्यानें गुडघे टेंकले व हात जोडून म्हणाला, " सरकार, मला क्षमा करा. तो किती सुंदर आणि दुःखी तरुण आहे. त्याच्याबद्दल माझ्या मनांत तिळभरही राग नाहीं; मग मी त्याला कसा ठार मारूं ? "

आतां मात्र शहाजादी क्रोधानें अगदीं बेफाम झाली. तिनें आपल्या पायांतील मखमलीचा जोडा हातांत घेतला आणि तो जोरानें मश्रूरच्या तोंडावर मारून म्हटलें, " जा कुत्र्या. त्याला ठारच मारलें पाहिजे. "

इतकें झालें तरी मश्रूरला कांहीं वाटलें नाहीं. त्यानें तो जोडा घेतला आणि हळूच गुलबहारच्या पायांशीं आणून ठेवून म्हटलें, " त्याला एकदार क्षमा केल्यास बरें होईल. "

गुलबहारलाही वाटलें कीं, मश्रूरला जास्त राग आणण्यांत अर्थ नाहीं. शिवाय त्याचा तो विलक्षण शांतपणा पाहून तीहि किंचित् विरमली व म्हणाली, " तर मग एकवार त्याला येथें आण. कारण तूं जें करणार नाहींस तें दुसरा कोणी करूं शकणार नाहीं. "

शहाजादीचा हुकूम होतांच मश्रूरनें थोड्याच वेळांत इब्राहीमला तिच्या-

समोर आणून हजर केलें. गुलबहारनें एकवार त्याच्याकडे तिरस्कारपूर्ण नजरेनें पाहून कठोर स्वरानें विचारलें, " इब्राहीम ! तुला अजून तरी माझें म्हणणें कबूल आहे कीं नाहीं ? "

इब्राहीमनें शांतपणानें जबाब दिला, नाहीं. तूं स्वतः मला मुकेलेली नमून तुझी वासना, नीच वासना—मला आपल्याकडे ओढूं पहात आहे. यामुळें मी तुझें म्हणणें मान्य करायला तयार नाहीं. शिवाय सच्छील मनुष्य कधींही पापाचा पुरस्कार करणार नाहीं. "

" तूं काय बोलत आहेस हें तुझें तुला तरी समजतें का ? तुझ्याकर आज केवढा भयंकर प्रसंग आला आहे त्याची कल्पना कर. विचार करून पहा. "

" नाहीं. हा विचार करायला अद्याप वेळ मिळाला नाहीं. मित्राचे प्राण रक्षण कसे करावे याच विचारांत मी गढून गेलेला आहे. त्यामुळें जगांतील सगळ्याच व्यवहारांना मी पारखा झालों आहें असें म्हटलें तरी चालेल. " इब्राहीम शांतपणानें बोलत होता.

" पण माझें म्हणणें तूं कबूल केलेंस तर तुझे आणि तुझ्या मित्राचेहि मी प्राण वांचवीन; कारण मी विनंति केली असतां माझे बाबा तुम्हां दोघां-नाही जिवंत ठेवतील. "

" तर मग या उदारपणाचें योग्य बक्षीस खुदा तुम्हांला देईल. "

" माझें योग्य बक्षीस आपणच आहां. " गुलबहारनें हळूच सुचविलें.

" नाहीं शहाजादीसाहेब ! या बाबतींत तुमची पुनः पुन्हां दिशाभूल होत आहे. गुलबहार, तुला कसें तरी संतुष्ट करून माझ्या या भावासारख्या मित्राचे प्राण वांचवावे असें मला क्षणभर वाटलें होतें; पण स्वतःच्या स्वार्थानें तुझें अन्तःकरण इतकें नीच बनलें आहे कीं, तें क्षणभरही कोणा समंजस मनुष्याच्यानें हातांत धरवणार नाहीं. खऱ्या प्रेमाची महती तुला काय ठाऊक ! जर कधीं काळीं तुला खऱ्या प्रेमाची किंमत करूं लागेल तर तूं स्वार्थाचें नांवही घेणार नाहींस; पण तूं पाषाणहृदयी आहेस. तुला सुकु-मार फुलांची काय किंमत ! तुझ्या जल्लादांना तूं आज्ञा कर आणि तुला सुचतील तसले छळण्याचे प्रकार करायला सांग अथवा मला हजारों जखमा करून तळमळण्यासाठीं रस्त्यांत फेंकून दे; पण मी खुदाच्या नांवानें शपथ

घेऊन सांगतों कीं, तुझी कोणतीही इच्छा मी तृप्त करणार नाहीं. आतां माझ्या जीवनाच्या मोबदल्यांत जर तूं माझ्या मित्राचे प्राण वांचविण्याची कृपा करीत असशील तर मरतांना मला समाधान वाटेल इतकेंच. ”

शहाजादीचा क्रोध पुन्हां अनावर झाला आणि तिनें मश्रूरला हुकूम केला, कीं, “ जा. या सैतानाला आत्तांचे आत्तां खुनखान्यांत नेऊन ठार मार. हा माझा हाडवैरी आहे. तेव्हां याचें रक्त पाहिल्यावांचून माझ्या मनाला मुळींच समाधान वाटणार नाहीं. ”

मश्रूर इतका कठोर अन्तःकरणाचा खरा; पण त्यालाही निरपराधी इब्राहीमची दया आली आणि शहाजादीचा तिटकारा वाटूं लागला; पण तिच्या हुकमापुढें त्याचें काय चालणार ! तो इब्राहीमला म्हणाला, “ दुर्दैवी तरुणा ! चल माझ्या पुढें; मला हुकमाची अम्मलबजावणी करावयाची आहे. वैभव आणि सुखोपभोग यांचा तिटकारा आलेल्या मनुष्याला अजून तरी काय करायचें आहे ? ”

असें म्हणून त्यानें इब्राहीमचा हात धरून त्याला तेथून खुनखान्याकडे चालविलें. गुलबहारही त्या खोलींतून निघून दुसरीकडे गेली. कारण तिच्या अन्तःकरणाची खळबळ सारखी वाढत होती. अविचारी कृत्यांनीं कुणाला कधीं सुख होत नसतें; मग गुलबहारलाच तें कसें होणार !

असो. मश्रूर इब्राहीमला खुनखान्याकडे नेतांना एका काळोख्या खोलींत नेऊन हळूच म्हणाला, “ इब्राहीमसाहेब ! आपला घात करावा असें मला वाटत नाहीं. आपण कोणत्याही प्रकारचा कधींच अपराध केला नसावा असें माझी मनोदेवता मला सांगत आहे. निरपराधी मनुष्याला त्यांतून आपल्या सारख्या तरुणाला तर मी कधींच हात लावणार नाहीं. तेव्हां शहाजादीचा हुकूम असला तरी मी आपणाला जिवंत जाऊं देणार आहें; पण तुम्हीं इथून बाहेर गेल्यावर कुठें तरी दूर निघून जा. या सैतानी राज्यांत राहूं नका. यावेळीं माझा स्वतःचा प्राण देऊनही मी तुमचें संरक्षण करीन; पण पुढें आपलें काय होईल कुणाला माहीत ! मला तुमच्याबद्दल फारच काळजी वाटते. कारण तुमचा स्वभावच फार उदार आहे. ”

मश्रूरचें भाषण ऐकून इब्राहीमला आश्चर्य वाटलें व ईश्वराच्या विचित्र

आंकांचें त्याला कौतुक वाटलें. तो मश्रूरला जमिनीपर्यंत लवून सलाम करून म्हणाला, " खुदाचें राज्य केवढें विस्तृत आहे आणि तो कुठें असतो हें मला आज कळून आलें. छायेप्रमाणें खुदा मनुष्याच्या मागोमाग फिरत असल्यामुळें जो त्याच्यावर विश्वासून आपलें पाऊल टाकीत असतो त्याला तो कधींच विसरत नाहीं. निर्दोषी मनुष्याला वांचविण्यासाठीं पाषाणालाही पाझर फोडण्याचें सामर्थ्य ईश्वराच्या अंगीं आहे. मश्रूरसाहेब, मी स्वतःच्या जगण्यांची इतकी पर्वा करीत नाहीं; पण या दुर्दैवी इब्राहीम-साठीं स्वतः जीवन तुच्छ मानणारा तो माझा मित्र इसाक त्याच्याकरितां माझें हृदय तळमळत आहे. मी तेथें गेलों नाहीं तर तो कांहीं उद्यां जिवंत राहणार नाहीं. हजारों मृत्यूंहूनही मला याच गोष्टीचें फार दुःख होत आहे." असें म्हणून इब्राहीमनें आपल्यावरची जबाबदारी व इसाकची जामिन-गिरी मश्रूरला समजावून दिली तेव्हां तर त्याचें हृदय अगदींच विरघळलें व इष्काच्या नादीं लागून शहाजादी किती वेडी बनली आहे हेंहि त्याला कळून चुकलें; इतकेंच नव्हे तर इब्राहीमचें त्याला बरेंच महत्त्व वाटलें. तो म्हणाला " वेळ रात्रीची आहे. सगळें जग काळोखांत बुडून गेलें आहे, आणि सगळे पहारेकरीही झोंपीं गेले आहेत. तेव्हां तुम्हाला जाण्याला हीच वेळ योग्य आहे. उजाडल्यावर मला कांहीं करतां येणार नाहीं. "

बोलतां बोलतां मश्रूर काळोखांतच चालूं लागला. इब्राहीमही त्याच्या मागोमाग निघाला. थोड्याच वेळांत दोघेही रंगमहालाच्या बाहेर पडून यमुनेच्या तीरावर आले; पण पूर्वीची तयारी नसल्यामुळें तेथें नाव वगैरे कांहीं नव्हती. त्यामुळें मश्रूरला थोडेंसें वाईट वाटलें व तो म्हणाला, साहेब ! तुम्हीं राहातां कुठें ? तुम्हाला पोंचवायला आल्यावांचून तुम्हीं जाऊं शकाल का ? "

इब्राहीम सद्गदित होऊन म्हणाला, " मश्रूरसाहेब ! मी स्वतंत्र आहें एवढें मला समजलें. आतां कशालाच मी भीत नाहीं. स्वतंत्रता ही किती रमणीय स्थिति आहे म्हणून सांगूं ! माझ्याबद्दलची तुम्हीं आतां काळ-जीच सोडा. मी कसाही गेलों तरी घटका दोन घटकेंत विन्हाडीं जाईन. नंतर इब्राहीमनें मश्रूरचे दोन्ही हात आपल्या हातांत घेऊन विचारलें, शहाजादीनें माझ्यासंबंधानें विचारलें तर तुम्हीं काय उत्तर द्याल ? "

मश्रूर स्मित हास्यपूर्वक म्हणाला, " तुम्ही माझी काळजीच सोडा. जनानखान्याची रहस्यें फारच बिकट असतात ! खुदा मला जशी बुद्धि देईल तसा मी वागत असतो. माझी काळजी वाहाण्यापूर्वी तुम्ही स्वतःचें काय होतें तें पहा. जा. आतां उजाडण्याला फारच थोडा अवधी आहे. नदीच्या बाजूला गारठा फार असल्यामुळें कोणीही पहारेकरी फार वेळ इथें राहात नाहीं. वेळ चांगली आहे; खुदा तुमचें कल्याण करो."

आतां जास्त वेळ बोलत राहाणें योग्य नाहीं असें मनाशीं ठरवून मश्रूर मागें फिरला आणि लवकरच खुनखान्यांत येऊन एका सुऱ्याला त्यानें बराचसा आळिता फासून तो बाजूला ठेवून दिला व बाजूला उभ्या असलेल्या एका पहारेकऱ्याला चुन्याचीं एक दोन पोतीं तेथें आणून ओतण्याला सांगितलें. पहारेकऱ्यानेंहि तीं तावडतोब आणून ओतलीं व लोखंडी दांड्यानें तीं तो चिवडूं लागला.

नंतर मश्रूर तो सुरा हातांत घेऊन शाहाजादीच्या महालांत आला व आपण इब्राहीमला कसकसा मारला तें तिला सांगूं लागला तोंच ती कळवळून म्हणाली.

"मश्रूर ! तुलाही त्याची दया आली नाहीं ना ? "

" आम्ही पडलों हुकुमाचे नोकर ! दया करून काय उपयोग. मी तें काम बेमालूम रीतीनें पार पाडलें असल्याबद्दल हा सुराच साक्ष देईल ! आपल्या हुकुमाची अमान्यता मी कधीं तरी केली आहे का ? पण आज आपल्या डोळ्यांत अश्रू कां दिसतात बरें ? " मश्रूरनें विचारलें.

गुलबहार कांहीं बोलली नाहीं; पण आपला नोकर उभा आहे हें मनातही न आणतां हुंदके देऊन रडूं लागली.

* * * * *

सूर्योदयाच्या सुमारास इब्राहीम आपल्या बिऱ्हाडीं पोंचला; पण तेथें आतांच थोड्याच वेळापूर्वी बादशहाच्या लोकांनीं इसाकला पकडून नेल्याचें त्याला समजल्यामुळें तो धांवतच दरबारमहालाकडे निघाला.

---

# प्रकरण ४७ वें.



## सारेंच विलक्षण !

" शहाजादी गुलबहार, या नांवाला तूं कलंक लावलास. तूं वासनेच्या स्वाधीन होऊन एका तरुणाला ठार मारलेंस. सांग, तुझें खरोखरच त्याच्या वर प्रेम होतें कीं नाहीं ? जर प्रेम असतें तर तूं त्याचें शीर धडावेगळें करण्याचा हुकूम दिला नसतास. ज्या वीरावर तुझें सारें प्रेम होतें त्याला तूं शोधून काढण्याची खटपट करायला पाहिजे होती; पण त्या ठिकाणीं तुझा अभिमान आड येऊं लागला. आतां अपराधी कोण बरें ? "

" हें इसाकउद्दीनचें पत्र जर मला पूर्वींच मिळालें असतें तर फार बरें झालें असतें. माझ्या हातून होऊं नये तें भयंकर कृत्य झालें असें माझें मन मला सांगत असल्यामुळें पश्चात्तापानें मी हळमळत आहें. "

" जर तुला खरोखर पश्चात्ताप झाला असेल आणि आपल्या हातून कांहीं तरी चांगलें कृत्य व्हावें असें आतां वाटत असेल तर इब्राहीमच्या दासीला तरी सोडून दे. तिनें तुझा काय अपराध केला होता ? जीं खरीं अपराधी माणसें तीं राजरोस तुमची सर्वांची राखरांगोळी उडवीत असतां तूं त्यांच्यावर विश्वासून त्यांच्या शब्दाप्रमाणें नाचावें आणि आपल्या खऱ्या माणसांचा खून करावा हें तुला किती लाजिरवाणें आहे बरें ? बादशहा वेडा झाला मुलीच्या शोकानें! तूं अशी क्रूर कशानें बनलीस ? तुमच्या राज्याला हादरून सोडणारा व सर्वस्वीं घात करूं पहाणारा जमालखान राज-रोसपणानें तुझ्या जनानखान्यांत वावरत असतां तूं सद्गुणीमाणसांच्या रक्तानें आपले हात लाल करून घ्यावे काय ? जग शोधूं गेलें असतां त्या इब्राहींमसारखा देवमाणूस मिळणार नाहीं. तुझ्या बहिणीच्या शोधासाठीं त्यानें जिवावरचें धाडस केलें आणि तूं त्याच्या पवित्र प्रेमाची हेटाळणी करून—"

" सुफीसाहेब ! आतां माझे डोळे उघडले. नका मला आतां असें बोलूं. मी त्यावेळीं अविचारी बनलें होतें, मला भान राहिलें नव्हतें. तुम्हीं

सांगाल तें प्रायश्चित्त घ्यायला मी तयार आहें; पण आधीं हें पत्र कुठं मिळालं तें सांगाल का ? "

" हें पत्र तुझ्या त्या गुलेनारनें आज तीन चार दिवस लपवून ठेविलें होतें आणि जमालखानाला तिनेंच येथें आश्रय दिला असल्यामुळे इसाक-च्या नोकराला ठार मारून त्याच्याकडून त्यानें हें पत्र मिळविलें होतें. गुलेनारनें तुझीच बोटें तुझ्या डोळ्यांत घातलीं; इतकेंच नव्हे तर हें पत्र त्या बिचाऱ्या दासीच्या हातांत देऊन दरबारांत बादशहापुढें तिला उभी करण्याचा त्यांचा विचार होता. इब्राहीमला कैद करून तुझ्या स्वाधीन करणारी गुलेनार ही जमालखानाची हस्तक आहे. इसाक आपोआप मरावा व इब्राहीमला तुझ्या हातून मारवावें असा त्यांचा दुहेरी डाव होता. हाय ! हाय ! इब्राहीमला मारून त्या बिचाऱ्या गरीब दासियेला तूं कायमचें रडत ठेविलेंस. उद्यां दरबारची योजना हिरण्महालासमोर झाली असल्यामुळें त्या दोघांनीं मंदिराच्या खालीं सुरुंग भरून ठेविला आहे. दरबारला सुरवात होऊन इसाकला शिक्षा झाली कीं ते तो उडविणार. तेव्हां तूं या कामांत लक्ष घाल आणि गुलेनारवर पूर्ण लक्ष ठेवून मध्यरात्रीच्या वक्तीनें त्या भुयारांतच मुद्देमालासह त्या दोघांनाही कैद कर. मी सिल-क्यांत बादशहाला घेऊन येईन. सांभाळ, यांत जर का तूं चुकलीस तर इब्राहीमचा खून तुझें तोंड काळें केल्यांवाचून राहाणार नाहीं. त्या काळोख्या रात्रीं तुला जमालखानाच्या हातून सोडविणारा वीर इसाक हाच होता. इब्राहीमनें तर तुझी शुश्रूषा केली आणि तुला व मला मृत्यू-च्या दाढेंतून सोडविलें; पण तूं तें कांहींही मनांत न आणतां त्याला मृत्यूच्या दाढेंत घालून चांगलेंच रगडलेंस. खुदाला हें कृत्य सहन होणार नाहीं—"

पण तितक्यांत गुलबहार मूर्छित होऊन धाडकन् जमिनीवर पडल्यामुळें महासूफीसाहेब पुढें कांहींच बोलले नाहींत. तिला शुद्धीवर आणण्याबद्दल दासींना सूचना देऊन आपण हिरण्महालाकडे वळले. कारण दरबार उड-वून लावण्यासाठीं तिकडे सुरुंगाची दारू भरली जात होती. इब्राहीमचा खून झाला अशीच त्यांची समज असल्यामुळें ते अगदीं उद्विग्न झाले होते.



पहांट होईपर्यंत नव्हे पण उजाडेपर्यंतही इब्राहीम आला नाहीं असें पाहून त्याचा मित्र इसाक हा मरणासाठीं तयार झाला. आपल्या मरणानें तरी इब्राहीम सुखी होऊं दे अशी त्यानें खुदाची प्रार्थना केली. इब्राहीमच्या उदार स्वभाव आणि चांगुलपणा त्याला माहीत होता. त्यामुळें तो आपल्या जिवाच्या भीतीनें लपून राहणार नाहीं अशी त्याची खात्री होती. तो कसल्या तरी भयंकर संकटांत सांपडला असावा अशी त्याची खात्री झाली व आपल्या मरणाच्या विचारापेक्षां तो त्याची काळजी करण्यांतच गढून गेला. काय तें त्या दोघांचें विलक्षण मित्रप्रेम ! त्याच्या शोधाला जातां येत नसल्यामुळें इसाकचा तडफडाट होत होता. कदाचित् निराशेच्या अतिरेकानें त्यानें आत्महत्याही केली असेल, असेंहि त्याचें मन त्याला सुचवी; पण प्राणाच्या भयानें तो लपून राहील असें मात्र एक क्षणभरही त्याला वाटलें नाहीं.

असो. नशिबीं असेल तें टळत नाहीं असें म्हणतात तें खोटें नाहीं. कायद्याप्रमाणें दिलेली सात दिवसांची मुदत टळतांच सम्राटच्या पहारेकऱ्यांनीं उजाडतें न उजाडतें तोंच मित्रवियोगदुःखानें तळमळणाऱ्या इसाकला कैद करून दरबारांत नेलें. त्याला त्यांचा प्रतिकार करतां येणें शक्यच नव्हतें.

हिरणमहालाच्या बाजूला असलेल्या मोठ्या उद्यानांत प्राणदंड झालेल्या अपराध्याला शिक्षा देण्याची व्यवस्था करण्यांत आलेली होती. ज्या दिलबहारमुळें हा इतका सगळा प्रकार घडून आला तिच्या स्मारकमूर्तीपुढेंच हा नरमेधयज्ञ करणें बादशहाला योग्य वाटलें. त्या ठिकाणीं मुख्य मुख्य लोकच यावयाचे असल्यामुळें दरबारी तंबूंची वगैरे विशेषशी व्यवस्था करण्यांत आलेली नव्हती. मुख्य वजीर, बादशहा आणि राजदूत यांच्याच खास देखरेखीखालीं ही भयंकर शिक्षा अमलांत यावयाची होती.

कैदी इसाक शिपायांच्या पहाऱ्यांत उभा असलेला सर्वांना दिसत होता. सम्राट आपल्या योग्यतेला शोभेशा आसनावर बसून हुकूम करीत होता. वजीर खिन्न चेहऱ्यानें त्याच्या पाठीशीं उभा राहून हुकुमाची अम्मलबजावणी करण्याबद्दल सूचना देत होता. आणि सभोंवार

असलेले अमीर उमराव पुढें काय प्रकार होतो हें पहाण्यासाठीं उत्कंठेनें उभे होते.

चोहोंकडे पसरलेल्या भीषण शांततेचा भंग करून सम्राट शेवटी कोंदी गंभीरस्वरानें म्हणाला, इसाक! तूं खरोखरच दुर्दैवी आहेस! नाहीं तर तूं आपल्या घरून चालून येऊन या मनुष्याला मित्र समजून जामीन राहिला नसतास. आतां तुझा तो जिवाचा कलिजा इब्राहीम कुठें आहे ? "

सम्राटचें हें टोंचून बोलणें इसाकला सहन झालें नाहीं. विशेषतः यांत आपल्या मित्राचा कमीपणा सिद्ध करण्याचा बादशहाचा विचार आहे हें लक्षांत आल्यावर तर त्याला हें भाषण विषासारखें कडू वाटलें. तो कोहीं-सा तीव्र स्वरानें म्हणाला, शहाजहान ! त्या उदारचरित, परोपकारी, आत्मत्यागी आणि सदाचारी मित्राबद्दल आपण जी अनुदारता दाख-विली ती मला योग्य वाटत नाहीं. मी स्वतः माझ्यापेक्षांहि त्याच्यावर जास्त विश्वास ठेवितो. तो कुठच्या तरी भयंकर संकटांत सांपडल्यामुळें या प्रसंगीं येऊं शकला नाहीं. नाहीं तर तो कधींही असा राहिला नसता. सम्राट ! तो नाहीं तर मी येथें आहें ना ? आपल्या कायद्याची मर्यादा उल्लंघन झाली नाहीं म्हणजे झालें. त्याच्या जागीं मी आहें. तेव्हां आपण कांहींच आक्षेप घेण्याचें कारण नाहीं; आणि मला तर मृत्यूची भीति मुळींच वाटत नाहीं; मग या आपल्या बोलण्याचा अर्थ काय ? "

बादशहा पुन्हां गंभीरपणानें म्हणाला, " वेड्या तरुणा ! बोलून दाख-विण्याचे विचार आणि अनुभवावयाचे आचार यांत किती तरी फरक असतो. तूं ज्याला मृत्यु म्हणत आहेस तो किती भयंकर आहे याची तुला कल्पनाच नाहीं. तुझ्या नजीकच खणलेल्या त्या गर्तेत तुला छातीइतका पुरल्यानंतर अत्यंत क्रूरपणानें तुझें शीर धडावेगळें करण्यांत येईल. पण तत्पूर्वीं तुझ्या प्रत्येक बोटाला तेलानें भिजविलेलें कपडे बांधून ते पेटविण्यांत येतील. सम्राटच्या अन्तःकरणाला शोकाच्या तीव्र यातना देणाऱ्या अपराधा-ला केवढी भयंकर शिक्षा होते हें आतां जरी तुझ्या लक्षांत आलें नसलें तरी तुझ्या बोटांचें मांस जळूं लागलें म्हणजे तुला त्याची चांगली कल्पना होईल. "

आपणाला झालेली भयंकर शिक्षा आणि ती कशी करावयाची तो प्रकार ऐकूनही इसाकचें अन्तःकरण कंपित झालें नाहीं. तो मुळींच भ्याला नाहीं. उलट धीर स्वरानें म्हणाला, "सम्राट्! या दिनदुनयेंत जीवन आणि मृत्यु ही जोडी परस्परांच्या इतकी नजीक राहाते कीं त्याबद्दलची ओळख पटण्याला गुरूची अवश्यकता भासत नाहीं. जगांत जर अबाधित चालणारें कोणतें तत्व असेल तर तें मृत्यु हें होय. अर्थात् दोन दिवसांनंतर होणारी गोष्ट दोन दिवस आधीं घडून आली तर त्यांत आश्चर्य अथवा भीति वाटण्यासारखें काय आहे? शिवाय हा मला येणारा मृत्यु तर फारच आनंदकारक होय. कारण माझ्या मृत्यूमुळें माझा मित्र जिवंत राहात आहे!"

हें बोलणें सम्राटला सहन झालें नाहीं. त्यानें रागानें जळफळतच पहारेकऱ्यांना इषारा केला. लागलींच त्यांनीं त्याला गर्तेजवळ नेलें; पण इसाकनें त्यांना तसदी न देतां तो आपण होऊनच त्या खड्ड्यांत उतरला. त्याला भीती वाटली नाहीं. उलट तोच आपण होऊन त्या जल्लादांना म्हणाला, "आतां तुम्ही उशीर करूं नका. कारण जास्त वेळ लागल्यास इब्राहीम येथें येण्याचा संभव आहे. कारण तो ही घटका कधींच विसरणार नाहीं."

पहारेकऱ्यांनीं तेलानें भिजविलेलें कपडे इसाकच्या बोटांना बांधण्याला सुरवात केली व लोक पुढील प्रकार पहाण्यासाठीं उत्सुक झाले आहेत तोंच इब्राहीम एकाद्या वेड्या मनुष्याप्रमाणें चोहोंकडे पहात व धापा टाकीतच तेथें येऊन पोंहोंचला, आणि सम्राट्च्या सिंहासनापुढें गुडघे टेकून म्हणाला, "सम्राट्! जहांपनाह! न्यायधर्मावतार! खरा अपराधी हा आपल्या समोर आहे. तेव्हां निर्दोषी मनुष्याला सोडून देऊन मला ती शिक्षा द्या."

हा अद्भुत प्रकार पाहून सगळे लोक स्तंभित झाले, व सम्राटच्या गंभीर चेहेऱ्याकडे पाहूं लागले. बादशहाच्या तोंडून आतां कोणता हुकूम निघतो कुणाला माहीत असें त्यांना वाटत होतें.

सम्राट गंभीर स्वरानें म्हणाला, "चांगलें झालें. आमच्या एका विश्वासू मनुष्याला निष्कारण मरण्याचाच प्रसंग येणार होता त्यांतून तो मुक्त

झाला याबद्दल आह्मांला आनंद वाटतो. तुझ्यासारख्या एका नालायक मनुष्यासाठींच त्याला मरावें लागत होतें. आणि त्यामुळें विवेकवाणीच्या तीव्र आघातांनीं मलाही तळमळावें लागलें असतें. इब्राहीम ! तूं आतां मरणार हें ठरलेलेंच; पण या शेवटच्या घटकेला तुझी कोणती अपूर्ण वासना पूर्ण करावयाची असेल तर मला सांग; मी ती पूर्ण करीन. "

इब्राहीम हात जोडून ह्मणाला, " माझी कोणतीच इच्छा अपूर्ण राहिलेली नाहीं. कारण दुर्दैवाच्या भयंकर चक्रांत सांपडून माझ्या सगळ्याच इच्छांचा चक्काचूर झाला आहे. अर्थात् मी निरिच्छच झालों. माझ्या या मित्राला मात्र त्याची पूर्वीची मानाची जागा देऊन गौरव करावा एवढीच माझी विनंति आहे. कारण सम्राटच्या गादीसाठीं त्यानें आपलें रक्त आटविलें आहे. "

सम्राटच्या हुकुमानें तावडतोब इसाकला त्या कडुयांतून काढण्यांत आलें तेव्हां तो इब्राहीमजवळ येऊन सद्गदित स्वरानें म्हणाला, " दुर्दैवी मित्रा ! तूं आणखी दोन घटकांनीं आला असतास तर तुझें आयुष्य वाढलें नसतें का ? तुझा असा दुःखकारक अंत झाल्यावर दालियेची काय स्थिती होईल ! बोलतां बोलतां इसाकला गहिंवर आला व पुढें शद्बच उमटेना.

इब्राहीमचे नेत्रही कोरडे नव्हते तरी पण तो इसाकला आलिंगन देऊन व आत्मसंयमन करून ह्मणाला, " इसाक ! तूं माझ्यासाठीं दुःख करूं नको. तुझें कर्तव्य तूं बजावलें आहेस. मी तुझ्या उपदेशाप्रमाणें वागलों असतों तर आज मला ही स्थिती आली नसती. मी जगांत राहायला योग्य नाहीं. दालियेला शहाजादीच्या थोर जागेवर बसविण्याचें माझें अर्धवट राहिलेलें कर्तव्य तूं शेवटाला ने. ती सुखी व्हावी एवढ्याच साठीं माझी धडपड होती. तुझ्यासारखी निस्वार्थी मित्र आणि दालियेसारखी सेवापरायण व प्रेमळ दासी देऊन खुदानें मला जगांत धन्य केलें होतें, पण मी माझ्याच बुद्धिदोषानें हें खुदाचें दान दूर सारलें. मृत्यूच्या पूर्वी तुझी भेट झाली हें उत्तमच झालें. आतां दालिया भेटली असती तर मी समाधानानें या जगाचा निरोप घेतला असता; पण— "

इब्राहीमचें बोलणें संपलें नाहीं तोंच एक अपूर्व सौंदर्यशालिनी रमणी अगदीं उतरलेल्या चेहेऱ्यानें धांवतच तेथें आली आणि इब्राहीमच्या पांयाजवळ

बसून म्हणाली, " जनाब ! मालिक ! ही आपली दासी हालिया आपल्या पायांचा आश्रय मागण्यासाठीं आली आहे. "

सम्राटाच्या नजरेला हा सगळा पोरखेळ वाटला. त्यामुळें तो मोठ्याने ओरडून म्हणाला, " इब्राहीम ! इसाक ! झाला हा प्रकार पुष्कळ झाला. ही कांहीं रंगभूमि नव्हे. तुम्हीं सर्व बाजूला व्हा आणि अपराध्याला योग्य शासन होऊं द्या. "

पहारेकरी पुढें झाले आणि त्यांनीं इब्राहीमचा हात धरून दालियेच्या केविलवाण्या मुद्रेला न जुमानतां त्याला त्या खड्ड्याकडे चालविलें; पण ते पुढें जाऊं शकले नाहींत. कारण प्रसिद्ध फकीर शहासुफी अकस्मात् तेथे आले आणि मोठ्यानें ओरडून म्हणाले, सम्राट शिकंदर लोदीच्या जग-प्रसिद्ध न्यायासनापुढें होत असलेला हा भयंकर अन्याय बंद होईल काय! बादशहा ! तूं आंधळा तर नाहींस ! तुझी नाहींशी झालेली मुलगी दिल-बहार, तुझ्यापुढें उभी असतां तिला विधवा करण्यासाठीं तूं इतका उतावीळ व्हावास ना; तुला इतका कसला गर्व झाला आहे ! जरा डोळे उघडून पहा. इसाक ! तुझा शत्रु तुला पकडायचा असेल तर हिरणमहालाच्या मागें असलेल्या मुयाराच्या दरवाजाशीं जा. त्या ठिकाणीं हातांत पेटलेला तोडा घेऊन सुरुंग उडविण्यासाठीं तयार होऊन राहिलेला जमालखान तुला आढळेल. जा. एक क्षणही व्यर्थ घालवूं नको. " शहासुफीच्या बोलण्यावर इसाकचा पूर्ण विश्वास असल्यामुळें तो धांवतच तिकडे गेला. इब्राहीम चकित होऊन सुफीसाहेबांच्या चेहेऱ्याकडे पहात राहिला आणि बादशहा सिंहासनावरून उतरून शहासाहेबांच्या पायाशीं नम्र झाला. लोकही चकित झाले. आज हें आपण काय पहात आहों आणि ऐकत आहों याचीच त्यांना कल्पना होईना.

अशा स्थितींत कांहीं वेळ गेल्यावर बादशहानें हळूच विचारलें, " प्रभु-राज ! मी अगदीं वेडा होऊन गेलों आहे. आपण मला हा काय प्रकार आहे हें समजावून द्याल काय ? "

शहासुफीनीं उत्तर दिलें, " जनाब ! डोळे उघडा. ही समोर तुमची मुलगी दिलबहार उभी आहे, हिला पहा आणि ओळखा. ही दालिया या नांवानें या वेळीं पुढें येऊन इब्राहीमच्या पायांशीं बसली आहे. हीच

दिलबहार." असें म्हणून त्यांनीं दालियेचा डावा हात बादशहाला कारण त्या हातावर लहानपणची एक निशाणी होती.

बादशहाला आपल्या मुलीची ओळख पटली, आणि त्यानें आनंदानें अधिर होऊन शहाजादीला पोटाशीं धरलें; पण याच वेळीं जमालखान आणि गुलेनार यांना कैद करून इसाकनें तेथें आणल्यामुळें बादशहा आनंदानें बेहोष होण्यापूर्वीच त्याला रागानें अधिर व्हावें लागलें. तो लागलाच जल्लादांना म्हणाला, " जा. या नीच मनुष्याला त्या खड्यांत वाला आणि कुत्र्यांकडून फाडून खावयाच्या अपराधाचें माप पूर्ण झालें आहे. शेवटीं हें यश इसाकलाच मिळावयाचें होतें; पण गुलेनारची स्थिति अशी कां ? "

इसाक उत्तर देणार होता; पण तितक्यांत बुरखा घेतलेली एक रमणी पुढें आली आणि बादशहाचे पाय धरून म्हणाली, " जनाब ! ही आपली गुलबहार अपराधी आहे; पण तिच्याकडून इतका सगळा घोटाळा होण्याला कारण ही गुलेनार. जमालखानाशीं हिचें संधान आहे हें मला पूर्वीं माहीत नव्हतें; पण शहासूफींची भेट झाल्यावर त्यांच्या सांगण्यावरून मला त्याचा प्रत्यय आला. तेव्हां त्या दुष्ट जमालखानाबरोबरच हिलाहि चवताळलेल्या कुत्र्याकडून ठार मारली पाहिजे. ही जोडी जिवंत राहिल्यास भयंकर नुकसान होईल. याच वेळीं जर या दोघांना कैद केलें नसतें तर गांवीं सुरंग उडवून सगळा जनानखाना व हा छोटा दरबार बेचिराख केला असता. "

गुलबहारला बादशहानें ओळखलें, व तिच्या सांगण्याबद्दल त्याची खात्रीही झाली. लागलीच जमालखानाबरोबरच गुलेनारची वध्यभूमीकडे रवानगी करण्यांत आली. लोक तर स्तंभितच झाले होते. आश्चर्याची परमावधी झाल्यामुळें कुणाशीं काय बोलावें तेंच लोकांना समजत नव्हतें. शहासूफी गंभीर मुद्रेनें प्रत्येकाकडे पाहात, हा प्रसंग किती उठावदार झाला आहे तें अनुभवीत होते. दालियेच्या नेत्रांतून सारखा अश्रुप्रवाह चालू होता इब्राहीमला आपण काय बोलावें हें सुचत नव्हतें. इसाक तर आकस्मिक झालेल्या कल्पनातीत यश प्राप्तीमुळें तटस्थच झाला होता.

कांहीं वेळ विश्रांति घेतल्यानंतर गुलबहार बोलूं लागली, " मी सर्वांची अपराधी आहे ! मला कितीही भयंकर शिक्षा दिली तरी ती थोडीच

होणार आहे. देवचरित इब्राहीमच्या नीच मनोवृत्तीच्या आधीन होऊन भयंकर छळ केला. त्याला जर मी अटक केली नसती तर आज ही इतकी शोभा करून घेण्याचा प्रसंग त्यांच्यावर आलाच नसता. या बाबतींत बऱ्याचशा गोष्टी शहासूफींना माहीत असल्यामुळें आपली जिज्ञासा तेच तृप्त करूं शकतील. "

गुलबहार असें सांगतांच सर्वांची नजर शहासूफींकडे वळली. दिलबहारही उत्सुकतेनें त्यांच्याकडे पाहूं लागली; पण ते विशेष कांहीं न बोलतां फक्त इतकेंच म्हणाले, " सम्राट ! अपराध्यांना योग्य शिक्षा झाल्या आहेत आणि निरपराधी माणसांना चांगली बक्षिसेंहि मिळाली आहेत; पण या तुझ्या वडील मुलीचें–दिलबहारचें–चरित्र इतकें कांहीं मनोवेधक आणि पवित्र आहे कीं, तें कितीही ऐकलें तरी कोणाचीही तृप्ती होणार नाहीं. " असें म्हणून त्यांनीं दिलबहार दिल्लींत आल्यापासूनची त्रोटक हकीकत, इब्राहीमची तिच्यासाठीं होणारी तळमळ, राज्य उलथून पाडण्याची जमालखानाची कारस्थानें व गुलबहारच्या वासना पूर्वीच्या आंधळेपणामुळें गुलेनारसारख्या नीच दासीला मिळालेली सवलत तसेंच त्या सवलतीवर तिनें रचलेली इमारत व शेवटीं सर्वांच्या ठिकऱ्या उडविणारा तो भयंकर सुरुंग वगैरे सगळी हकीकत त्यांनीं बादशहाला विदित केली.

त्यावर कांहीं वेळ स्तब्ध राहून बादशहाला म्हणाला, " खुदाच्या घरचा न्याय किती विलक्षण आहे पहा ! मी अधिकाराच्या धुंदींत मर्जीला येईल तसें वर्तन करूं पहात होतों. पण सच्चरित मंडळीच्या पुण्याईनें अमंगळाचें मंगल होऊन माझेहि डोळे उघडले. जा, गुलबहार, तू आपल्या बहिणीला भेट आणि रंगमहालाचा तिचा दर्जा तिला समजाऊन दे. मी खुदाच्या कृपेनें अजूनपर्यंत पुष्कळ विचित्र प्रकार पाहिले व ऐकले; पण आजच्या इतकी अभिनव हकीकत कधींच कुठें घडलेली माझ्या ऐकण्यांत सुद्धां आलेली नाहीं. आणि हें नाटक असें आनंदपर्यवसायी होईल अशी गेल्या घडीपर्यंत खात्रीहि नव्हती. केव्हां काय होईल हें कुणी सांगावें ! निरपराधी इसाक जिवंत राहिला इतकेंच नव्हे तर त्यानें पत्करलेली जमालखानाला पकडण्याची कामगिरीही शेवटाला नेली. इब्राहीमनें माझ्या एका गर्विष्ठ मुलीचा गर्व पार नाहींसा करून तिचें अन्तःकरण केवळ आपल्या

उदार वर्तनानें लोण्याहूनही मृदू करून सोडलें, तिचें अन्तःकरण आतां केव्हांहि मलिन होणें शक्य नाहीं. ती एका भयंकर विव्यांतूनच पार पडली असें म्हणायला हरकत नाहीं. सर्वांत विशेष आनंदाची गोष्ट म्हणजे या सगळ्या विलक्षण प्रकारामुळेंच मला माझी दिलबहार भेटली नाहीं तर ती आयुष्याच्या आतांपर्यंत अशीच राहिली असती. या बाबतींत इब्राहीमचेंच मला आभार मानले पाहिजेत. मंगलमय खुदानें माझ्या बादशाहिचीचा व न्यायीपणाचा मला झालेला गर्व नाहींसा व्हावा म्हणून तर हा सगळा प्रकार घडून आणला नसेल ना ? कुणी म्हणावें नाहीं म्हणून !"

नंतर बादशहा आपल्या दोन्ही मुलींचे हात धरून हिरणमहालांत गेला त्याच्या मागून शहासुफी व इसाक इब्राहीमची जोडी त्याच महालाकडे निघाली. इतर लोक बाहेरच राहिले; पण बादशहाच्या खास निमंत्रणावरून मुख्य वजिराला आंत यायला मिळालें. आपली मूर्ती पाहून दिलबहारला काय वाटलें असेल बरें !

---

# प्रकरण ४८ वें.



## उपसंहार.

सूर्यप्रकाशानें उज्ज्वल झालेल्या व पुष्पमालांनीं सुशोभित केलेल्या हिरणमहालांत बसून सम्राट शिकंदर लोदीनें आपल्या मुलीचा जीवनेतिहास ऐकला, नंतर इब्राहीमला प्रेमानें आलिंगन देऊन म्हटलें, "माझ्या लाडक्या मुला ! तूंच आतां मला आधार आहेस. या राज्याला तुझ्यासारखा योग्य मनुष्यच सम्राट पाहिजे. तुझ्यामुळेंच मला माहेरीं हरवलेलें रत्न मिळालें. दिलबहारासाठीं मी तळमळत होतों. खुदा तुझें कल्याण करो. हें आतां सर्वस्व तुझें आहे. तुझी सगळी कष्टदशा संपली असेंच तूं समज कसा ! तुझ्यासारखा मित्र या जगांत मिळणें दुर्लभ आहे. तुम्ही दोघेहि एक होऊन ही गादी सांभाळा. माझ्या मुली मला लहानच आहेत. त्यांच्याशीं बोलण्याचालण्यांत मला आतां शेवटचे दिवस सुखानें घालवा-

याला सवड आ. तुम्हां दोघांनाही फारच त्रास झाला आहे. तेव्हां आज तुम्हीं पूर्ण विश्रांती घ्या. हे फकीर तुमच्याबद्दल फारच सहानुभूती दाखवीत होते आज माझ्यातर्फेच तुमची योग्य ती व्यवस्था ठेवतील आणि माझ्या मुलींनाही पण माझें हेंच सांगणें आहे. तुम्हींही दोघींनी आजचा दिवस सुखदु:खाच्या गोष्टी बोलण्यांत घालवा मला या फकीर साहेबांशीं बरेंचसें बोलायचें आहे."

बादशहाच्या सूचनेप्रमाणे सर्व मंडळी निघून गेली. आपणही त्या दोघांना एकांतात सोडून दुसरीकडची मौज मजा पहायला जाऊं या. कारण शहाजादी दिलबहारच्या आगमनाबद्दल शहरांत मोठा उत्साह चालला असल्यामुळें कुठेंहि आपली करमणूक व्हायला हरकत नाहीं.

* * * *

" खुदाची कृपा झाली तर काय होणार नाहीं ? मी दासी होतें; पण आज शहाजादी दिलबहार म्हणून साऱ्या जनानखान्यांत पुकारली जात आहे. त्याचीच ही लीला नव्हे काय ? मला यांत अभिमान कशाला वाटायला पाहिजे ? " दलिया उर्फ दिलबहार स्मित हास्य पूर्वक आपल्याशींच विचार करीत पलंगावर पडली होती. तिला त्या राजोपचारांची एक मौजच वाटत होती म्हटलें तरी चालेल. कारण पवित्र अन्त:करणानें ईश्वरावर विश्वासून राहिलें असतां कसकसे अद्‌भुत चमत्कार घडतात व किती विचित्र रीतीनें आपल्यावर संकटांचें निरसन होऊन उर्जितावस्था प्राप्त होते हें ती जाणून होती.

गुलबहार इतकी शरमिंदी झाली होती कीं, आपल्या बहिणीला भेटायला जायला तिचे पायच उचलत नव्हते. ती आपल्या बिछान्यांत तोंड लपवून रडत होती. कुणालाही आपण भेटूं नये असें तिला वाटत होतें. सगळा जनानखाना आपला उपहास करीत आहे असा तिला भास होत होता. आपल्या हातून भयंकर पाप घडलें असून त्यांतून आपली मुक्तता होणें शक्य नाहीं अशी तिची दृढ समजूत झालेली होती. इसाकचें व इब्राहीमचें नुसतें स्मरण होतांच तिच्या आंगावर शहारे येत होते.

इतर दासींकडून दिलबाहारला ही बातमी समजतांच ती सद्गदीत झाली आणि आपल्या धाकट्या बहिणीला पोटाशीं धरून तिचें सांत्वन करण्या-

साठीं धांवतच तिच्याकडे आली. मिठींत लपविलें गुलबहारचें तोंड तिनें आपल्या छातीशीं धरलें व तिचें डोकें पुसून आणि तिला कुरवाळून ती म्हणाली, " गुल ! मी इतके दिवसांनीं तुला भेटलें; पण माझ्याशीं तर तूं मुळींच बोलत नाहींस ? कां बरं असं ! माझ्यावर तूं रुसलीस होय ! "

गुलबहार काय बोलते ! तिनें चटकन् आपल्या वडील बहिणीचे पाय धरले आणि गहिंवरून म्हटलें, " मला क्षमा करशील का ! मी अगदींच वाईट आहें आतां मी जमिनींत जातां कीं आकाशांत नाहींशीं होऊं असं मला वाटत आहे ! ! मी अविचारानें केवढें भयंकर कृत्य केलं ग ! जर मश्रूरचें हृदय दयाळू बनलें नसतं तर हाय ! मी इतकी कठोर कशी बनलें ! माझ्या या पापाला प्रायश्चित्त नाहीं का ? "

दिलबहार स्मितहास्यपूर्वक म्हणाली, " खरोखरच तूं केलेल्या या अपराधाबद्दल तुला भयंकर शिक्षा दिली पाहिजे. आणि इसाक उद्दिननां सांगून मी त्याची लवकरच व्यवस्था करणार आहें. कारण वडील बहीण या नात्यानें मला माझें कर्तव्य बजवावें लागणारच. "

गुलबाहारचें थोडक्यांत समाधान झालें. आकाश स्वच्छ आहे. जगांत आपला उपहास होत नसून सर्वांना आपल्याबद्दल करुणा उत्पन्न झालेली आहे असें तिला वाटलें. दिलबहारलाहि तिनें आलिंगन दिलें. परिसाचा स्पर्श होतांच लोखंडाचें सोनें व्हायला कितीसा वेळ लागणार ! दिलबहारचें आणि गुलबारचें हितगुज चालू झालें. दोघांचेहि चेहरे प्रफुल्लित झालेले दिसूं लागले. आणि दोघींनींही एकमेकांची चुम्बनें घेण्यांत तो सगळा दिवस घालविला.

❀ ✱ ✱ ❀

शहासूफी, इब्राहीम आणि इसाक हे सर्व्या राजाचे पाहुणे बनले असल्यामुळें त्यांची उठाबस करण्यांत वजिराला किती श्रम पडत होते हें एका खुदालाच माहीत. कारण त्या बिचाऱ्या वृद्ध पुरुषाकडे लक्ष द्यायला कुणाला सवडच नव्हती.

[illegible] या तिघांचाही योग्य मान झाल्यानंतर बादशहानें

गुडघे टेकले, आणि म्हटले, " महात्मन् ! आज आपल्या कृपेनें मला माझी नाहींशी झालेली मुलगी भेटली असून मी सुखी झालों आहें. इतकेंच नव्हे तर मला वेळींच शुद्धीवर आणून दोघां पवित्र जीवांना जीवनदान दिलें. माझ्या नांवाला कलंक लागणार होता; पण तो आपल्या सावधगिरीमुळें लागला नाहीं. यासाठीं हा दासानुदास आपल्या चरणावर या साम्राज्याचें फूल वाहून मोकळा होत आहे. वेळोवेळीं चित्ताला भ्रम होत असल्यामुळें आतां हें राज्य माझ्याकडून चालविलें जाणें शक्य नाहीं. "

शहासूफी गंभीरपणानें म्हणाले, " सर्व सम्राटांचा सम्राट खुदा आहे. तोच सर्वांना त्यांच्या कल्याणाचा मार्ग दाखवीत असतो. मी त्याचा दास असल्यामुळें मला दुसरी कोणतीही उपाधि स्वीकारतां येणें शक्य नाहीं. दिलबहार ही इब्राहीमची ईश्वरनियोजित पत्नी असल्यामुळें ती तूं त्याला अर्पण करून राज्याचा भारही त्याच्यावरच सोंपीव आणि गुलबहारचा हात या इसाकसारख्या रंग्या वीराच्या हातांत देऊन आपल्या जबाबदारींतून मोकळा हो. इब्राहीमला सांभाळणारा इसाकसारखा जिवाला जीव देणारा मित्र असल्यामुळें तुला कोणत्याही प्रकारची काळजी करण्याचें कारण नाहीं; शिवाय पुढें राज्य चालविण्याला यापेक्षां योग्य असा दुसरा कोणीही मनुष्य तुला मिळणार नाहीं. "

शहासुफींचें हें सांगणें बादशहाला मानवलें व शहासुफींच्याच इच्छेप्रमाणें तसा लेखी ठराव करण्यांत येऊन दोघांहि इसाक-इब्राहीमला सम्राटच्या घराण्याचें उपपद लावण्यांत आलें. इसाकला दौलतखान लोदी असा किताब देऊन त्याला पंजाबची सुभेदारी अर्पण करण्यांत आली; पण कांहीं वर्षेंपर्यंत त्यानें इब्राहीमला सोडून जाऊं नये अशी शहासुफींनीं दूरदर्शित्वानें आज्ञा दिली. व बादशहालाही तें योग्य वाटलें.

* * * *

अधिकारदानाची भानगड मिटतांच मोठ्या थाटानें दोघांचे विवाह करण्यांत आले व अनुरूप पत्नींचा लाभ झाल्यामुळें त्या दोघांहि मित्रांना प्रतिकूलतेचें दुःख सहन करण्याची वेळ कधींच आली नाहीं. दिलबहारच्या

बादशहालाहि त्याचें आश्चर्य वाटू लागलें. या समारंभांत दिलबहारनें आग्रहानें खुदादाद प्रभृति दुष्ट मंडळीला बोलवून आणून बादशहा नको नको म्हणत असतां त्यांच्या अपराधाची माफी देवविली व पूर्वींचे अधिकार कायम ठेवले. उमरशेखला व त्याच्या पत्नीला तर मोठीं बक्षिसेंहि दिलीं; त्यामुळें तीं दोघें जास्तच शरमिंदीं झालीं.

मुबारक, इस्कंदर आणि जुल्फुखान या तिघांना या समारंभांत अग्रस्थान देण्यांत आलें असून बादशहापर्यंत त्यांची वर्दी लावण्यांत दिलबहारनें आपली कुशलता दाखविल्यामुळें दरबारांत त्यांना कायमचे अधिकार मिळून गेले; पण तिघांनींहि इब्राहीमला विनंति करून ' आपण आपल्या खास तैनातींतच राहाणार ' असें निक्षून सांगितल्यामुळें त्यांना दिलेल्या इतर कामगिऱ्या दुसऱ्यांवर सोंपविण्यांत आल्या. इब्राहीम या प्रसंगीं मन्सूरला कसा विसरेल बरें ! त्यानें त्याला पुष्कळ बक्षिसें दिलीं व जनानखान्यावरचा त्याचा अधिकार कायम करून तनखा जास्त ठरवून दिला. दिलबहार तर त्याला आपल्या वडील भावाप्रमाणें मानूं लागली. कारण त्याला जर दया आली नसती तर इब्राहीम जिवंत राहाणेंच शक्य नव्हतें.

* * * *

इब्राहीम लोदी व दौलतखान लोदी हे जीवश्चकंठश्च स्नेही असल्याचें इतिहास प्रसिद्धच आहे ! तेव्हां पुढील भाग इतिहासावर हवाला देऊन ही प्रेमळ कहाणी आम्हीं येथेंच संपवितों. कारण पुढचें वर्णन करूं लागल्यास भारत वर्षाला लागलेलें खग्रास ग्रहण आड येईल व या आनंदपर्यवसायी कथानकाचें दुःखांत रूपांतर करावें लागेल. तेव्हां दिलबहारच्या सुखांत विषबिन्दु टाकण्याचें अघोर काम इतिहासावरच सोंपविलेलें बरें. तरी पण दिलबहारसारख्या कुलकुमारिकेच्या चरित्रानें रमणीजनांच्या हृदयांतील कालिकाकल्मष नाहींसें झाल्यास ती दुःखांतही सुख मानण्याला तयार आहे. स्थिमात्र संसाराचा मार्गच मुळीं सुखदुःखमय असतो.

समाप्त.

# सरसवाङ्मयरत्नमाला.



**उत्तम वाङ्मय, गायन किंवा बरवा विलास तरुणींचा।**
**रमवी चित्त न ज्याचें, पशु किंवा मुक्त तो मनुज साचा !!**

एक रुपया प्रवेश फी भरून या ग्रंथमालेचे 'कायम ग्राहक' होतां येतें. कायम ग्राहकांस मालेचीं सर्व पुस्तकें पुढील किं.च्या आकारणीनेंच निम्मे किंमतीस मिळतील; व नवीन पुस्तकें निम्मे किंमतीनें वेळोवेळीं ग्राहकांकडे पाठविलीं जातील. व्ही. पी. खर्च व ट. ह. वेगळा पडतो.

| | | | | रु. आ. |
|---|---|---|---|---|
| (१) | म. गांधींचा बंदीवास. | ... | ... | ०–१२ |
| (२) | स्वर्गीय प्रेम. | ... | ... | २–० |
| (३) | वनज्योत्स्ना–सुभेदार. | ... | ... | १–८ |
| (४) | जीवनलता. | ... | ... | २–० |
| (५) | गृहलक्ष्मी शरयू. | ... | ... | ३–० |
| (६) | रणरंग–बंड सौदामिनी. | ... | ... | ३–० |
| (७) | ताजमहाल. | ... | ... | ३–० |
| (८) | पतित–जर्मनउच्चाटन. | ... | ... | ३–० |
| (९) | रत्नकंकण–कृपणकन्या. | ... | ... | ३–० |
| (११) | तीन शिलेदार. १–२ | ... | ... | ४–८ |
| (१२) | दुर्गादास–प्रेमशृंखला. | ... | ... | २–० |
| (१३) | अल्ला हो अकबर. | ... | ... | ३–० |
| (१४) | प्रेमळ सवत. | ... | ... | ३–० |
| (१५) | गुर्जरवीर अणहील. | ... | ... | ४–० |
| (१६) | साठ वर्षांपूर्वी–१८५७ चें बंड | | ... | ३–० |
| (१७) | सैतानी चक्कर. | ... | ... | ३–० |
| (१८) | व्रतपालन रंगमहालरहस्य. | ... | ... | ३–० |
| (१९) | अस्तनींतील निखारा. | ... | ... | ३–० |
| (२०) | राष्ट्रगुरु ( शिवाजीचें चरित्र ) बालब्रह्मचारिणी. | | | ३–० |
| (२१) | अमृतशोध–इंग्रजांचा जय. | ... | ... | ३–० |
| (२२) | सौभाग्यतिलक. | ... | ... | ३–० |
| [illegible] | [illegible] | ... | ... | ३–० |

| | | |
|---|---|---|
| (२४) | कर्मविपाक–प्रभुपाठिराखा. ... ... | ३–० |
| (२५) | राजसंसार–पातिव्रत्याची कसोटी. ... | ३–० |
| (२६) | प्रेमविनोद, दैवविलसित–मनोरमा. ... | ३–० |
| (२७) | तिरंगी सामना. ... ... | ३–१२ |
| (२८) | अधिकारी व जनता ... ... | ३–४ |
| (२८) | चारुगात्री. ... ... | ३–४ |
| (२९) | खलीपत. ... ... | ३–८ |
| (३१) | योगसामर्थ्य. लाख्या बारगीर. ... | ३–४ |
| (३२) | रत्नखचित सिंहासन–नेपोलियन. ... | ३–८ |
| (३३) | अस्तोदय. ( शिवछत्रपतीचा अंत ) ... | ३–४ |
| (३४) | रहस्यजाल. ( पत्नी कां भगिनी ) ... | ४–० |
| (३५) | लो. टिळकचरित्र व लोखंडी मुगुट ... | ४–० |
| (३६) | मुलांचें बंड व पतिव्रतकसोटी ... | ३–८ |
| (३७) | रत्नमाला–कर्नाटकाचें जवाहीर ... | ३–८ |
| (३८) | मॅडमरोलंद–पतित अबला ... ... | ३–८ |
| (३९) | स्वराज्यस्वप्न–शारदाभक्त–जैनधर्म ... | ३–८ |
| (४०) | मर्दानी सौन्दर्य–लाल गुलाब ... | ३–८ |
| (४१) | वीरविजय–वीरविवाह ... ... | ४–० |
| (४२) | मयूख व कुसुमचंद्र ... ... | ४–० |
| (४३) | दिलबहार ( ऐतिहासिक कादंबरी. ) | ४–० |

याशिवाय समशेरबहाद्दर, दिव्याखालीं अंधेर, जिवाचा जिवलग, गृहसौख्य, बकुल,शीलविजय,ब्रह्महत्या,भुजंगराव भरारी वगैरे चित्ताकर्षक व बोधप्रद कथानकें क्रमशः प्रसिद्ध होतील. ( १ ) विहंगवृंद ३ रु.,(१०) शापित महाराष्ट्र ४ रु., (१५) गुर्जरवीर ४ रु. शिल्लक नाहींत व वरील प्रतीहि थोड्या शिल्लक आहेत. तरी नवीन ग्राहकांनीं वरील पुस्तकें लौकर मागवावींत. ट. ख. वेगळा. महागाईमुळें पुस्तकांच्या निम्मे किंमतीवर ०४, ०८ ची वाढ करणें भाग पडलें आहे. कापडी प्रतीस ०६ अधिक पडतात. ट. ह. निराळें. इतरांस भर किंमत.] तूर्त पत्रव्यवहारास पत्ता:—

**तात्या नेमीनाथ पांगळ, पुणें शहर.**

# सर हॅरी व्हेन धी यंगर

लेखक

लक्ष्मण नारायण जोशी, पुणें.

प्रकाशक

तात्या नेमीनाथ पांगळ,

४३८ रविवार, पुणें.

मुद्रक—द. ग. खांडकर, लॉ प्रिंटिंग प्रेस,

५१० शनिवार पेठ, पुणें.

किंमत आठ आणे.

स्वकर्तव्याभिलाषी इंग्लंडचा स्वदेशभक्त मुत्सद्दी

# महात्मा

# सर हॅरी व्हेन दी यंगर.

---

'Great men have been among us, hands that penned,
And tongues that uttered wisdom—better none.
The later Sidney, Marvell, Harrington,
Young Vane, and others who called Milton "friend."
These moralists should act and comprehend;
They knew how genuine glory was put on;
Taught us how rightfully a nation shone
In splendour.'

कांहीं गोष्टी अशा असतात कीं, त्यांमध्यें दुसऱ्याच्या मतानें जरी चाललें नाहीं तरी चालतें, आणि कांहीं गोष्टी अशा असतात कीं, त्यांमध्यें दुसऱ्याचें मत घेतल्यावांचून गत्यंतरच नसतें. 'सबका सुनना और दिलका करना' ही म्हण सर्वच बाबतींत लागू पडत नाहीं. जो कोणी या हिंदी म्हणीप्रमाणेंच वागण्याचा निश्चय करतो. त्याच्यावर त्याच्या त्या हट्टवादीपणानें आपत्ति ओढवल्यावांचून राहात नाहीं. इंग्लंडच्या सिंहासनावर सतराव्या शतकांत जो **पहिला चार्लस** या नांवाचा राजा होऊन गेला त्याची गोष्ट अशीच झाली हें इतिहास सांगतोच आहे. त्याचें राज्यकारभार करण्याच्या कामांतलें 'हम् करे सो कायदा' हेंच व्रत अखेरीस त्याच्या नाशास मुख्यत्वें कारण झालें. प्रत्येक गोष्टींतलें त्याचें हट्टवादाचें स्वमतच त्याला नडलें आणि त्याचमुळें अखेरीस तो स्वप्रजेकडून ठार मारला गेला.

ज्या थोर, सरळ हृदयाच्या, शांत आणि न्यायी महात्म्याबद्दल आम्ही आतां यापुढें त्याचा चरित्रात्मक लेख लिहिणार आहोंत तो स्वदेशभक्त आणि स्वातंत्र्य-

त्य महात्मा याच वर सांगितलेल्या पहिल्या चार्लस राजाच्या कारकीर्दीत उदयाला येऊन गेला. त्याचें नांव सर हॅरी व्हेन दी यंगर असें होतें. तो महात्मा नेहमीं प्रजेची बाजू घेऊन राज्याच्या अधिकारशाहीशीं झगडत असे, आणि त्याचमुळें त्याचें व राज्याधिकाऱ्याचें खडाष्टक पडलें होतें. सरळ, निःस्वार्थी आणि न्यायी अशा स्वमतांचा महिमा मोठा अतर्क्य आहे. अशाच मतांच्या अनुरोधानें वर्तत गेल्यास फार फायदा होतो. ज्याला स्वमतच नाहीं त्याची स्थिति 'सांगितलेली अक्कल आणि पदरीं बांधिलेली शिदोरी' या न्यायाची होते. आमचा चरित्रनायक मोठा कारस्थानी, मुत्सद्दी, बुद्धिवान्, स्वदेशभक्त, स्वातंत्र्यप्रिय, न्यायी व शांत स्वभावाचा असल्याकारणानें जगाच्या नेहमींच्या पद्धतिप्रमाणेंच त्याच्यावर अनेक संकटें येऊन त्याचा शेवट जरी अत्यंत क्रूरतेचा झाला तरी त्यानें स्वदेशबांधवांच्या स्वातंत्र्याच्या वात्सल्यानें तो मोठ्या अद्वितीय अशा प्रेमपूर्ण शांततेनें सोसला.

बरोबर दोनशेंब्यायशीं वर्षांपूर्वीं म्हणजे इ. स. १६४७ च्या मधुमासांत इंग्लंडचा तत्कालीन राजा जो पहिला चार्लस, त्याला मोठ्या कष्टानें आपल्या मर्जीच्या विरुद्ध आणि लोकाग्रहास्तव पूर्वपद्धतीप्रमाणें पार्लमेंट सभा भरवावी लागली. राज्यशासनांतल्या कोणच्याहि बाबतींत हा राजा प्रजेचा कोणच्याहि प्रकारें सल्ला न घेतां, सर्व जोखीम आपल्याच शिरावर घेऊन राज्य-कारभार करीत असे. याप्रमाणें सुमारें अकरा वर्षें त्यानें जो आपला मनःपूत राज्यकारभार केला, तोच शेवटीं त्याच्या नाशाला कारण झाला. त्याच्या स्व-मतांचा डळमळित मनोरा जेव्हां ढांसळण्याच्या बेतांत आलेला त्याच्या खासगी दोस्तांनीं आणि त्याच्या विश्वासांतल्या नोकरशाहीनें पाहिला, तेव्हां त्याला त्यांनीं अत्याग्रहानें प्रजेच्या प्रतिनिधींच्या निवडणुकीसंबंधानें प्रसिद्धीपत्रक काढायला लाविलें. ज्यांनीं त्याला पार्लमेंट भरविण्याविषयीं आग्रह केला होता त्यांनींच त्याला 'आजपर्यंत झालें तें विसरा. आतां यापुढें त्याबद्दल विचार करीत न बसतां पुढचा मार्ग सुगम होऊन राजा व प्रजा या उभयतांनाहि सुखावह असा राज्यकारभार चालेल असें आतां करूं या!' असें प्रसिद्ध करा-यला जरी लाविलें होतें तरी त्यानें तसें करण्याच्या बाबतींत बरेच अडथळे उप-स्थित केले. नाहीं होय करतां करतां शेवटीं ता. १३ एप्रिल रोजीं एकदांची पार्लमेंट सभेची बैठक बसली. ज्याला स्वमतानें वागण्याची एकदां संवय लागली

किंवा ज्याला तें व्यसनच जडलें, त्याला दुसऱ्याच्या मताप्रमाणें वागणें विषवत् वाटलें तर त्यांत नवल तें कोणचें ? चार्लस राजा व त्याची नौकरशाही यांचेंहि असेंच झालें. पार्लमेंट सभा बोलावण्याचा मोठा थाट करून तिसऱ्याच आठ-वड्यांत तिला स्वमताच्या महांकाळी तोफेच्या गोळ्यानें राजा व त्याची नौकर-शाही यांनीं उडवून लावली. त्या बाबतींत तोच शेवटचा गोळा उडाला असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. ही पार्लमेंटची बैठक शॉर्ट पार्लमेंट म्हणजे प्रजाप्रति-निधी मंडळाचें अल्पायु अधिवेशन या नांवानें इतिहासांत प्रसिद्ध आहे. या वेळीं आमचा चरित्रनायक **महात्मा सर हॅरी व्हेन दी यंगर** हा अवघा अठ्ठा-वीस वर्षांच्या वयाचा असून किंग्स्टन अपॉन् हल्चा तो प्रतिनिधि होता.

चार्लस राजानें याप्रमाणें पार्लमेंट उधळून टाकल्यावर तिच्या संमती-वांचून त्यानें आपला अधिकार सहा महिनेपर्यंत जरी चालविला, तरी आपण ज्या स्थानावर उभे आहोंत तें स्थान प्रजेच्या असंतोषरूपी शेवाळानें अत्यंत बुळबुळीत झालेलें असल्याचें जेव्हां त्याच्या निदर्शनाला आलें, तेव्हां तो जरासा शुद्धीवर येऊन त्याच्या अधिकारमदाला त्यानें जरा आंवरण्याचा प्रयत्न केला. आपण ज्या राज्यसिंहासनावर बसलों आहोंत त्याचे पाय आपली मदोन्मत्त आणि स्वार्थी नौकरशाही नसून प्रजा आहे असें जेव्हां त्याच्या विवेकबुद्धीला वाटलें, तेव्हां त्यानें पुन्हां एक छोटेखानी सभा ता. ३ नोव्हेंबर रोजीं भरविली. ती सभा त्या वेळीं त्याला बहुतेक पथ्यकरच झाली. नेहमींच्या पद्धतीप्रमाणें या वेळीं राजेसाहेबांची स्वारी सभेला कोणच्याहि प्रकारच्या थाटमाटानें आली नाहीं. इतकेंच नव्हे तर सभेच्या मुख्य पीठावर येऊन बसण्याची पूर्वपद्धति अजिबात टाकून देऊन चार्लस राजानें जलमार्गानें वेस्टमिनिस्टर येथें प्रयाण केलें. जनसम्मर्दाच्या दबपथांतून जाण्यापेक्षां एकलकोंडेपणानेंच जाणें त्याला मनापासून आवडत असल्याकारणानें सर्व गोष्टी कानाकोंपऱ्यांत व्हाव्या असें त्याला वाटणें साहजिकच होतें. तो जात्या अत्यंत भित्रा आणि दीनहीन होता. खरें पाहिलें असतां तो ज्या गोष्टीविषयीं सावध होता त्यापेक्षां त्याच्या अंगीं नैसर्गिक उदासपणाच अधिक होता. त्यानें प्रथम जी प्रजाप्रतिनिधींची बैठक बोलावली ती शार्ट पार्लमेंट आणि मागून जी बोलावली ती लॉंग पार्लमेंट अथवा दीर्घायु पार्लमेंट, या नांवानेंच त्या आज कित्येक वर्षें गाजत आहेत. या दोन्ही बैठकी जरी झाल्या तरी त्यांमध्यें अंतस्थपणें—राजा आणि प्रजा—यामध्यें जें

रक्तपाती द्वेषाचें बीं रुजलें गेलें होतें त्याचा शेवट व्हाइट हॉलच्या राज-रस्त्यावरील सज्जावरच्या चार्लस राजाच्या शिरच्छेदानेंच अखेर झाला. पार्लमेंटच्या पहिल्या बैठकीच्या वेळीं ज्याप्रमाणें व्हेन हा हलच्या तर्फे हजर होता त्याचप्रमाणें तो दुसऱ्या बैठकीच्या वेळींहि आपल्या पिम्, क्रॉमवेल, हॅम्पडन वगैरे दोस्तांसह हजर होता.

यंग व्हेन याच्या पित्याचें नांव हेन्री व्हेन असें होतें. त्या दोघां बापलेकां-मध्यें आकृतीचें जरी अगदीं हुबेहुब सादृश्य होतें तरी स्वभाव आणि वर्तणूक या दोन्ही बाबतींत ते परस्परांच्या अगदीं विरुद्ध होते. बाप राजपक्षीय नोकरशाहीचा भक्त होता, तर मुलगा प्रजापक्षीय स्वातंत्र्याभिलाषी जनतेचा सेवक होता. बाप प्रथमपासूनच स्वार्थी राज्यशासकांच्या मर्जीनुरूप वागत असे, तर मुलगा प्रारंभा-पासूनच स्वार्थी राजशासनपद्धतीला झुगारून देण्याचा प्रयत्न करूं लागला होता. तो अंशतः क्रॉमवेल या आपल्या दोस्ताच्याही कांहीं मतांच्या विरुद्ध होता. स्वराज्य आणि स्वदेशबांधवसौख्य यांव्यतिरिक्त त्याच्या अंतःकरणांत तिसरी गोष्टच नव्हती. त्या दोनच गोष्टींना तो स्वार्थ समजत असे. बाप आणि मुलगा यांची जरी वरीलप्रमाणें तुलना केली आहे, तरी त्या तुलनेपासून कांटेरी बोरी-पासून मधुर बोरें अथवा झुडुपांतून मधुर रसानें ओथंबलेले पक्व अंजीर जसे काढावे तशा तऱ्हेची गोष्ट पुढें निष्पन्न झाली. पूर्व आणि उत्तर ध्रुव यांप्रमाणें बाप व मुलगा यांचीं मनें जरी अगदीं भिन्न दिशांचीं होतीं तरी त्या दोघांमध्यें छत्ति-सांचा आंकडा असा कधींच पडला नाहीं. आपण एका बाजूला आहों व आपला मुलगा आपल्या विरुद्ध बाजूला आहे असें जरी हॅरी व्हेनच्या बापाला स्पष्ट दिसत होतें तरी त्याबद्दल त्याला यत्किंचितही दुःख वाटलें नाहीं किंवा वाईटही वाटलें नाहीं. राज्यामध्यें जे प्रजा आणि राजा असे नेहमीं दोन पक्ष असतात, त्यांपैकीं एकाकडे आपण आणि दुसऱ्या बाजूला आपला मुलगा, असें असल्याकार-णानें कोणच्याही पक्षाचा जरी विजय झाला तरी आम्ही एकमेकांना मदत करूं शकूं अशी त्याची समजूत होती. नैसर्गिक न्यायानें कोणच्या तरी एका पक्षाचा कधीं तरी विजय हा व्हायचाच, हें ठरलेलेंच असल्यानें तो आपल्या स्थितींत खुशा-लच होता.

व्हेन हा मुद्देसूद प्रश्न करण्याच्या कामीं त्या वेळीं इंग्लंडांत अग्रगण्य होता. जिनोव्हा येथें त्यानें आपल्या विद्यार्थिदशेंत तत्त्वज्ञानाचा अभ्यास फारच परिश्रम-

पूर्वक केला असल्यानें तो त्याच तत्त्वज्ञानाच्या बौद्धिक गुणानें पुढें फार भरभराटीस आला. त्याचे प्रश्न नेहमीं भारदस्त, सूचक, जितक्यास तितके आणि बिन-पाल्हाळाचे असत. उलथापालथी आणि ढवळाढवळी या कामांच्या कारभारांत तो जरी पंगु होता, तरी तो व्यावहारिक गोष्टींत आणि तत्त्वज्ञानांत निष्णात असल्या-कारणानें त्याची बाजू जरी कांहीं काळ पडलीशी वाटत होती, तरी स्वमतधारि-ष्टाच्या भक्कम पायावर टोलेजंग इमारत उठवण्याचा त्यानें अटोकाट प्रयत्न चाल-विला होता. पुढें जो तो प्रजापक्षाच्या राक्षसी तृष्णेनें बळी पडलेल्या अमानुष प्राण्यांच्या पंक्तीला बसला गेला, त्याचें मूळ तरी त्याच्या याच विजयजिगीषेच्या प्रचंड लालसेंत होतें. कांहीं कांहीं प्रसंगीं तर त्यानें आपल्या अर्थतत्त्वज्ञानाच्या पंखांच्या जोरदार फडफडाटानें इतक्या उंच आणि अद्वितीय भराऱ्या भारल्या आहेत कीं, राष्ट्राच्या वातावरणाचा खळखळाट त्याला ढगांवरून ऐकूं आला असावा. यावरून पुढील सुभाषिताची आठवण होतेः—

शास्त्रवाद्यांचें अर्थ-हरण मोठें ।
काय वर्णावें तरी तेंहि कोठें ? ॥
अव्ययांतुनि अर्थ ते काढितातीं ।
म्हणुनि त्यांना भूवरीं सर्व गाती ॥

तो आपल्या वयाच्या तेविसाव्या वर्षी अमेरिकेला गेला आणि तत्काळ आपल्या अंगच्या विद्येच्या जोरावर जरी म्यासिचुसेटचा सुभेदार बनला तरी त्याला ती जागा लवकरच सोडावी लागली. त्यानें आपल्या तत्त्वज्ञानाचा पसारा जर तेथें मांडला नसता तरच ती सुभेदारी त्याच्याकडे राहिली असती असें म्हणायला हरकत नाहीं; पण एका अर्थी झालें तें ठीकच झालें. कारण तो जर तिकडेच नोकरी करीत राहिला असता तर इंग्लंडच्या राज्यघटनेंत सुव्यवस्था करण्याचे त्याचे जे विचार होते ते त्याला त्याच्या मनांतल्या मनांतच दाबून ठेवावे लागले असते. व्हेनचें कोठेंहि त्याच्या तत्त्वज्ञानाच्या पांडित्यामुळें पटत नसे. त्याचें त्याला हें जरी कळत होतें तरी एकदां धरलेली बाजू सोडून न देण्याचा त्यानें दृढ निश्चय केला असल्यामुळें अखेरपर्यंत तो एकीकडे व सर्व जग दुसरीकडे असाच आढावा प्रसिद्ध कार्लाईल यानें काढला होता. कार्लाईलला जेव्हां जेव्हां व्हेनसंबंधानें बोलण्याच्या प्रसंग येई तेव्हां तेव्हां तो त्याच्यासंबंधानें 'सद्गुणांचें आणि ज्ञानाचें अनंत भांडार' असें म्हणत असे. ज्या काळीं इंग्लं-

च्च्या राष्ट्रीय क्षितिजावर मोठाले अद्वितीय मुत्सद्दी आणि शूर पुरुष चकाकत होते त्याच वेळीं व्हेन हाही त्यांच्या पंक्तींत लकाकत होता; इतकेंच नव्हे, तर त्याच्या काळच्या स्वकर्तव्यदक्ष मुत्सद्यांमध्यें तो आपल्या बुद्धिसामर्थ्यानें पाहल्या प्रतीचा गणला जात होता. ज्या वेळीं मनुष्याच्या हातून जें व्हायला पाहिजे तें केव्हां केव्हां स्वाभाविक चुकीच्या न्यायानें न होतां त्या वेळीं तो जागा राहण्याच्याऐवजी स्वप्रभिमग्नावस्थेंतच जरी राहतो, तरी तो कमी दर्जाचा असतो असें मात्र कोणालाहि म्हणतां यायचें नाहीं. व्हेन हा या अपवादापासून जरी अलिप्त नव्हता तरी तो अत्यंत दूरदर्शी आणि कोणचेंही काम दृढनिश्चयपूर्वक करणारा होता यांत संशय नाहीं. व्हेनचें व्यावहारिक ज्ञान आणि त्याच्या तर्कशास्त्राच्या कोटया यांच्या-संबंधानें प्रसिद्ध मिल्टन कवि आपल्या कवित्वांत म्हणतोः—

Vane young in years, but in sage counsel old
Than whom a better senator ne'er held
The helm of Rome, when gowns, not arms repelled
The fierce Epirot and the Afric bold ;
Whether to settle peace or to unfold ;
The drift of hollow states hard to be spelled,
Then to advice how war may, best upheld,
Move by her two main nerves; iron and gold
In all her equipage : besides to know,
Both spiritual power and Civil what each means ;
What severs each. how hast thou learned which few have done;
The bonds of eather sword to thee we owe ;
Therefore, on thy firm hands Religion leans
In peace, and reckons thee her eldest son.

चार्लस राजाला आमच्या चरित्रनायकाची योग्यता पूर्णपणें माहीत असल्या-कारणानें तो त्याला आपल्या गोटांत सामील करून घेण्याचा आटोकाट प्रयत्न करीत होता. व्हेन हा मॅसॅच्युसेटच्या सुभेदारीच्या जागेला अखेरचा राम राम ठोकून इंग्लंडला परत येतांक्षणींच हलच्या तर्फेनें त्याची पार्लमेंटचा सभासद म्हणून निवडणूक करण्यांत आली. तो अमेरिकेहुन परत इंग्लंडला आल्यापासून चार्लस राजानें तो आपल्या पक्षाला मिळावा म्हणून नानाप्रकारें त्याची हांजी हांजी चाल-वली होती. त्याला त्यानें नाइटच्या पदवीनें विभूषित करून रसेलच्या जोडीला

आरमाराचा खजीनदार नेमिला. त्याच्यापूर्वी चार्लसानें त्याच्याचप्रमाणें स्ट्रॅफर्डच्या अर्लला आपल्या पक्षाला मिळवून घेण्याचा प्रयत्न चालविला होता. त्या प्रयत्नांत चार्लसाला या वेळीं पूर्ण विजयप्राप्ति झाली. स्ट्रॅफर्ड राजाचा लांच खाऊन प्रजा-पक्षाची पायमल्ली करण्यास जसा तयार झाला, तसा व्हेन हा दृढनिश्चयी असल्या कारणानें स्वपक्षापासून च्युत झाला नाहीं. राजाच्या लांचलुचपतींवर त्यानें लत्ता-प्रहार करून आपल्या पक्षाला आपल्या हृदयाशीं अधिकच कवटाळून धरिलें आणि त्यामुळें तो राजपक्षाचा कट्टा शत्रू बनला. युद्धप्रसंगीं त्याला जी वीस लक्ष रुपयांची वार्षिक प्राप्ति व्हायची, तिला त्यानें दूर झुगारून देऊन द्रव्यापेक्षां स्वमताचा महिमा अगाध आहे, असें त्यानें स्वकृतीनें जनतेच्या प्रत्ययाला आणून दिलें. प्रजेकडून अनेक प्रकारांनीं वसूल केलेल्या द्रव्यावर गबर होण्यापेक्षां दारिद्र्यावस्थेंतच राहून स्वजन्मभूमीची सेवा करीत राहणें चांगलें, असें त्यानें आपल्या कृतीनें प्रत्ययाला-आणून दिलें. राष्ट्रप्रधानाचा अगडबंब पगार कमी करून दहा हजार रुपये त्याला द्यावे आणि बाकीचे सार्वजनिक खर्चासाठीं उपयोगांत आणावेत, अशी सूचना पुढें आणण्याचा त्यानें निश्चय केला.

पार्लमेंटच्या बैठकीला सुरुवात झाल्याबरोबर चार्लसानें स्वतःला पाहिजे तशा मागण्या मागण्याची सुरुवात केली. राजा मागेल त्या मागण्या आणि प्रजेवर बसवील ते कर पसंत करून, पार्लमेंटनें राजाच्या मताप्रमाणें वागणें हेंच तिचें आद्य कर्तव्य आहे असें चार्लसाचें मत होतें. चार्लस राजा स्वतःसिद्ध आणि चैनबाज असून आपल्या भोंवतालच्या प्रभावळींतल्या परिगणांच्या मतां-प्रमाणें वागणारा असल्यामुळें प्रजा कोणच्या उपायानें सुखांत राहील हें समज-ण्याला त्याला मार्ग नव्हता, आणि त्याचमुळें तो प्रजेपासून हव्या तशा तऱ्हेनें द्रव्य उकळून काढून स्वतःची चैन करूं लागल्यामुळें प्रजेच्या डोळ्यावर आला. राजा विरुद्ध प्रजा असे दोन तट त्या राष्ट्रांत याचमुळें उद्‌भवले. राजपक्षाप्रमाणें प्रजापक्षाला प्रथम द्रव्य आणि सैन्य यांचा जोराचा पाठिंबा नसल्यामुळें प्रजेला कांहीं दिवस आपल्या द्रव्याच्या थैल्यांचीं तोंडें राजपक्षापासून आंवळून धरितां आलीं नाहींत. 'हम करे सो कायदा' या तत्वाचा चार्लसाचा राज्यकारभार अस-ल्यामुळें, त्याला करभार देण्यासाठीं प्रजेला आपल्या थैल्यांचीं तोंडें नेहमीं मोकळीं ठेवावीं लागत. राजाचें वर्चस्व असल्यानेंच 'जबरदस्ताचा खांद्यावर' या न्यायानें चार्लस त्या मोकळ्या तोंडाच्या थैल्यांतून आपल्या लहरीप्रमाणें हात

घालून, मनसोक्त द्रव्य काढून घेत असे. ही गोष्ट प्रजेला दिवसेंदिवस अत्यंत दुःखद आणि असह्नीय होऊं लागली. ती रात्रंदिवस अनेक प्रकारच्या करांनीं अगदीं पिळून निघूं लागल्यामुळें, सर्वत्र हाहाःकार झाला व त्यामुळें पार्लमेंट सभा सर्वस्वी राजपक्षाच्या विरुद्ध झाली.

'मी सांगेन त्या गोष्टीची पूर्णता माझ्या प्रजाजनांनीं केलीच पाहिजे' हें चार्लस राजाचें म्हणणें जरी अत्यंत चमत्कारिक होतें तरी राजाच्या मागण्या पुरविण्यामध्यें कांहीं अटी असाव्यात असें प्रजाध्यक्ष म्हणूं लागले. राष्ट्रांतल्या सान्या गोष्टी राजपक्षाच्या तंत्रानेंच चालल्या असल्यामुळें हरघडी न्यायसभां-तून आणि प्रधानमंडळांतून परदेशी मालासंबंधानें सटयानें खरेदी करणारांवर व जलमार्गानें स्वदेशी येणाऱ्या आयात मालावर जबरदस्त जकात वाढविण्याचें यंत्र जोरानें सुरू झाल्यामुळें, तो किफायतशीर पद्धतीनें विक्री करण्याचें काम अडचणीचें होऊं लागलें, आणि त्यामुळें तंटे उपस्थित होऊन व्यापारी लोक भराभर तुरुंगांत पडूं लागले. देशाचा व्यापार याचमुळें अजीबात बसला. या गोष्टी लक्षांत आणूनच प्रजापक्षीय प्रतिनिधींनीं, त्या सर्व गोष्टी बंद करून व्यापारावरील कर माफक करण्याचें आणि कैदी केलेले व्यापारी सोडून देण्याचें जर राजा कबूल करील तर राजाच्या सर्व मागण्या कबूल करण्यास प्रजापक्ष तयार आहे अशी एक सूचना पुढें आणली.

ही सूचना पुढें आल्याबरोबर राजपक्षीय सभासद एकदम ओरडून बोलले कीं, "नाहीं; ही गोष्ट कधींच होणें शक्य नाहीं! राजाधिराजांच्या सर्व मागण्या प्रथम प्रजेनें पुऱ्या करून दाखविल्यावर सरकारच्या इच्छेला वाटलें तर प्रजेचें म्हणणें कबूल करण्यांत येईल. इतकेंच नव्हे तर प्रजेला कोणच्या स्थितींत ठेवावें आणि कोणच्या ठेवूं नये, याबद्दलचा सर्व विचार करणें हें प्रत्यक्ष राजाचें काम असून प्रजेनें त्याबद्दल ब्रहि काढतां कामा नये!"

शेतें खायि धरा जरी सम तशी मारी स्वपुत्रा सती।
वेला लंघि सरित्पती सम तसा जाळी कृशानु क्षिती॥
आकाशें जन मस्तकां चुरडिलें खावें विखीं जाहलीं।
अन्याय क्षितिपाल तो जरी करी त्यातें न कोणी बली॥

वरील कवितेंत दिलेल्या अर्थाचें जें एक प्रसिद्ध सुभाषित आहे, त्याचा उदय बहुतेक जैन आणि बौद्ध धर्मांच्या प्रसाराच्या वेळींच झाला असल्यामुळें

'अहिंसा परमो धर्मः' या तत्त्वाच्या प्राबल्यानें भारतवर्षाला गुलामगिरीनें जी एकदां कडकडून मिठी मारिली आहे, ती अद्यापि किती शतकें कायम राहणार आहे, तें कळत नाहीं. खऱ्या आर्यवैदिक धर्माला वरील पद्यांतील तत्त्वांचें रहस्य माहीत नसल्यामुळेंच त्याच्या पोटीं जिन आणि बुद्ध यांच्यासारखे तत्त्ववेत्ते [redacted] जन्माला येईपर्यंत त्या धर्मीयांनीं स्वातंत्र्याचा पूर्णोपभोग घेऊन गुलामगिरीला पाताळांत दडपून टाकली होती हें 'भारवी' कवीच्या 'मध्यम व्यायोग' नांवाच्या नाटकांतल्या सूत्रधाराच्या नांदीच्या श्लोकांवरून सहज कळून येणार आहे. तो श्लोक मूळचा संस्कृत असल्यानें वाचकांकरितां आम्ही त्याचें समवृत्तांत जें पद्य केलें आहे तें येणेंप्रमाणें:—

जो भीववी असुरपत्निहृदां नभींचा ।
तो पाद नीलकुमुदामलखड्ग साचा ॥
वैडूर्यरत्नसम अंबरसागरींचा ।
रक्षो त्रिलोकमणि कीर्ति असा हरीचा ॥

[ अंबररूपी सागरांत वैडूर्य रत्नाप्रमाणें शोभणारा असा आणि निळ्या कमळाच्या शुद्ध कांतीच्या तरवारीप्रमाणें शत्रुस्त्रियांच्या हृदयांत धडकी भरवतो असा जो त्रिलोकमणिकीर्ति हरीचा (वामन अवतारांतला बळीरूपी परकीय आणि क्रूर सत्तेला पाताळांत दडपून टाकणारा) पाय, तो सर्वांचें रक्षण करो ]

असो. बुद्ध आणि जिन यांनीं प्रतिपादिलेल्या धर्मातील तत्त्वांचा अंमल चार्लस राजाच्या कारकीर्दींत इंग्लंडांत पडला नसल्यामुळेंच तेथील प्रजेनें आपल्या मानेवरचें जुलमी राजाचें जोखड दूर भिरकावूनच देण्याच्या प्रयत्नांचा अवलंब केला. राजपक्षीयांनीं मोठ्या दिमाखानें जीं वाक्यें, आपल्या मदोन्मत्ततेनें वर सांगितल्याप्रमाणें प्रजापक्षीय प्रतिनिधींना ऐकविलीं, त्यांनाच प्रत्युत्तर म्हणून प्रजाप्रतिनिधींनींहि एकसमयावच्छेदेंकरून एकाच आवाजानें पुढीलप्रमाणें राजपक्षाला ऐकायला लावलीः—

" ह्या गोष्टी पुरातन काळच्या असून त्या आतां शिळ्या होऊन कुरसून गेल्या आहेत. त्या ऐकून ऐकून आमचे कान किटून गेले आहेत. प्रजेच्या पिशव्यांतलें द्रव्य एकदां राजाच्या खजिनारूपी खिशांत गेलें म्हणजे " रामाय स्वस्ति रावणाय स्वस्ति " अशी हकीकत तें द्रव्य संपेपर्यंत होत असल्याचा प्रजेला आजपर्यंत अनुभव आलेला आहे. द्रव्य शिलकींत असेपर्यंत रावणराजा

महाराज विचारतात, " प्रधानजी, राज्याचा बंदोबस्त कसा काय आहे ? " आणि प्रधानजी सांगतात, " अल्‌ल्‌ल्‌ डुर्र ! फार चांगला आहे ! " पैसा संपेपर्यंत प्रजेच्या सुखदुःखांकडे बघतो कोण ? यासाठीं प्रथम सर्व राज्यांतल्या खर्चाची काटकसरीनें खर्च करण्याची व्यवस्था केली पाहिजे. प्रजा सदोदित धनिक राहील असे उपाय योजिले पाहिजेत. सर्व राज्यांत सध्यां राजमंत्राचाच अंमल चालला असून जिच्या द्रव्यावर राजपक्षाची चैन चालते ती प्रजा गुलामाहूनहि गुलाम बनली असल्याकारणानें तिचीं घरें जीं कोळ्यांच्या जाळ्यांनीं आणि घाणेरड्या सर्पणाच्या धुरानें मलीन होऊन गेलीं आहेत, तीं प्रथम झाडून आरोग्यकारक बनविण्यासाठीं सारवून त्यांवर सफेती चढवली पाहिजे. चालू प्रकार असाच वाढूं दिला तर कांहीं दिवसांनीं सर्व राष्ट्रभर घाणीचा सुकाळ होऊन प्रजाहानिकारक अशी सांथ उद्‌भवेल आणि त्यामुळें राष्ट्राला रानाचें स्वरूप येईल; म्हणून तसें न होऊं देतां वेळींच सर्व गोष्टी प्रथम गोडयागुलाबीनें राजपक्षाच्या कानावर घालून योग्य बंदोबस्त करून घेणें हें आमचें कर्तव्यकर्म आहे, आणि सध्यां तशी वेळहि आली असल्याकारणानें ती गोष्ट शेवटास नेण्याचा प्रयत्न करणें हें कांहीं अनुचित होणार नाहीं असें आमचें मत आहे. "

यानंतर प्रजापक्षीय प्रतिनिधींनीं आत्मबलावरच सर्वतोपरी निधड्या छातीचा उद्योग करण्यास सुरुवात केली. ज्या राजपक्षीय राक्षसी आणि जुलमी कोळ्यांनीं मनःपूतपणें आपलीं जाळीं सर्व राष्ट्रभर पसरलीं होतीं, तीं सारीं लांब खराटा घेऊन मोडून झाडून टाकण्याची त्यांनीं प्रथम सुरुवात केली. प्रजेच्या सर्व तक्रारी ऐकून घेऊन त्यांचा योग्य निकाल लावण्यासाठीं त्यांनीं पंच-कचेऱ्या नेमल्या. ज्या देशाभिमानी आणि धार्मिक लोकांना तुरुंगांत टाकलें होतें, त्यांना सोडून देऊन त्यांची नुकसानभरपाई करून देण्यांत आली आणि त्यांच्या उपजिवीकेचे सर्व मार्ग खुले करण्यांत आले. नाकें कान कापून व डोळे फोडून ज्यांना बंदिवासांत टाकलें होतें त्यांना बंधमुक्त करून त्यांचेंहि झालेलें नुकसान भरून देण्यांत आलें. प्रजाप्रतिनिधि इतकेंच करून थांबले नाहींत, तर गरीब माशारूप जे प्रजाजन यमस्वरूपी राजपक्षीयांनीं आपल्या जाळ्यांत अडकावून टाकले होते त्यांना सोडवून त्यांपैकीं लहान जुलमी कोळ्यांचे हातपाय छाटून टाकण्याचा आणि मोठ्यांना टांचेखालीं सपशेल चिरडून टाकण्याचा त्यांनीं निश्चय केला. राजपक्षीयांना हा प्रजाप्रतिनिधींचा निश्चय समजल्याबरोबर त्यांनीं यःपलायन करण्याचा विचार केला; परंतु राज्यां-

तील न्यायाधीश आणि नाझर यांना प्रजेच्या पांच बोटांच्या संघशक्तीपुढें राजपक्षाच्या एका अंगठ्याची जबरदस्ती चालणें अशक्य आहे असें पक्कें माहित असल्यामुळें त्यांनीं त्यांचा पाठलाग करून त्यांना कैद करवलें.

राष्ट्रीय स्वातंत्र्य मिळविण्याकरितां इंग्लंडचे प्रजाजन जो उद्योग करीत होते, त्यांमध्यें वरील पकडलेल्या लोकांना शिक्षा ठोठावणें कमीपणाचें वाटून त्यांनीं राजपक्षाला गती देणारे जे मुख्य पंख बांधून ठेविले होते ते सोडून टाकले. असें जरी केलें तरी राजपक्षीयांना पकडून त्यांचा न्यायासनापुढें न्याय केलाच पाहिजे असें पार्लमेंटनें अखेरीस ठरविलें.

प्रजा प्रतिनिधी नांवाला मात्र निवडून त्यांच्या सल्ल्यावांचून मनःपूत वाटेल तसें राज्याच्या तारवाचें सुकाणूं फिरविणें, स्वतःच्या ख्यालीखुशालीची चंगळ उडविण्यासाठीं प्रजेवर मनसोक्त कर बसविणें, प्रजेला वाटेल त्या तऱ्हेनें खड्यांत पाडण्याचा प्रयत्न करून स्वार्थ साधणें, प्रजा कर देण्यास माघार घेऊं लागली असतां तिला कैद करणें, तिच्या घरादारांवर जप्त्या आणून पैका वसूल करणें वगैरे अनेक तऱ्हेच्या गांजणुकीच्या आणि त्रासदायक जबरदस्तींच्या गोष्टींचा अत्यंत सुळसुळाट होऊन प्रजा अगदीं हवालदील झाली होती. अशा प्रकारच्या जुलमी राज्यपद्धतीचे मुख्य उत्पादक आर्च बिशप लॉड, अर्ल ऑफ स्ट्रॅफर्ड आणि राजा चार्लस हेच होते. अशा तऱ्हेच्या राज्ययंत्राची रचना करून तें यंत्र चालू करून अखेरपर्यंत त्या यंत्रांत प्रजेला पिळून काढण्याचा प्रयत्न करण्याचा वरील त्रयीचा असा उद्देश होता कीं, चार्लस राजाला स्वतंत्रेनें व स्वमतानें राज्यशकट हाकलणारा सारथी बनवून प्रजेच्या प्रत्येक बाबतींतल्या लगामाच्या दोऱ्या त्याच्या एकट्याच्याच हातीं ठेवायच्या आणि इंग्लंड, स्कॉटलंड व आयर्लंड येथील सर्व धार्मिक देवळें आणि तेथील सर्व पाद्री यांचे हक्क गुंडाळून ठेवून ते सर्व लॉडच्या स्वाधीन ठेवायचे आणि स्ट्रॅफर्डला मुख्य प्रधानकीची जागा द्यायची, एकंदरींत काय कीं, ही राज्य चालविण्याची पद्धति स्वार्थी—अप्पलपोटी—असून, लॉड व स्ट्रॅफर्ड या दोन चाकांच्या गाड्यावर बसणारा सारथी जो चार्लस राजा, त्याच्या हातांत त्या गाड्याला जोडलेल्या प्रजारूपी अश्वांच्या तोंडांतील लगामांच्या दोऱ्या कायमच्या ठेवायच्या असा जो त्यांचा उद्देश होता, व त्याप्रमाणें वागण्याचा जरी ते प्रयत्न करीत होते तरी लगाम प्रजेच्या तोंडांत आणि त्याच्या दोऱ्या राजाच्या हातांत असल्याकारणाणें प्रजारूप अश्वांनीं आपल्या तोंडांतले लगाम

दोन दंतपंक्तींमध्यें दाबून धरून गाडा जो उधळून नेला, तो पुढें बरच्या सारथ्याला खोल खड्यांत झुगारून देऊन शेवटीं त्याच्या जागीं नव्याच एका सारथ्याची स्थापना केली. लॉड हा राजाचा डावा हात असून, स्ट्रॅफर्ड हा मेंदू व उजवा हात आहे असें जेव्हां पार्लमेंटच्या निदर्शनाला आलें, जेव्हां स्ट्रॅफर्डवर विश्वासघाताचा आरोप ठेवून, त्याचा म्हणजे—राजाच्या उजव्या हाताचा–आणि मेंदूचा नाश करून टाकण्याचा तिनें निश्चय केला. अशा तऱ्हेनें स्ट्रॅफर्डसंबंधाचा हेतु पार पडल्यावर लॉडसंबंधानें करावयाच्या गोष्टी सोप्या जातील व त्या दोघांचा निकाल लागल्यावर राजा सहजच आपल्या मताप्रमाणें वागायला सिद्ध होईल असा प्रजेनें आपल्या मनाशीं कयास बांधला होता; परंतु स्ट्रॅफर्डवर भयंकर आरोप शाबीत करून त्याचा शिरच्छेद करण्याच्या आधीं, प्रजापक्षीयांना मुख्य तीन खड्डे कुदून जायचे होते.

स्ट्रॅफर्डला पकडून कैद करणें हाच त्या खाड्यांपैकीं पहिला जंगी खाडा होता. या वेळीं तो इंग्लंडच्या उत्तरेकडच्या प्रदेशाच्या सैन्यावर लेफ्टनंट जनरल ह्या हुद्यावर होता व अखेरपर्यंत तिकडेच राहण्याचा त्याचा बेत होता. त्यासंबंधानें त्यानें राजाला असें लिहिलें होतें कीं, "पार्लमेंटमध्यें असणाऱ्या प्रजाप्रतिनिधींच्या नेहमीं दृष्टीस पडल्यामुळें मी त्यांच्या सदोदित डोळ्यांवर राहीन आणि त्यांच्यापासून दूर असलों म्हणजे माझ्यासंबंधानें त्यांची दृष्टि तितकी कमी होईल. मला जर इकडून तिकडे येण्याचें आपण भागच पाडीत असाल तर लंडन शहरीं राहण्याच्या ऐवजीं मला आयर्लंडांत राहण्याची कृपा करून परवानगी द्यावी."

यावर राजानें त्याला जें पत्र लिहिलें त्याचा आशय असा होता. "तुम्हीं लिहिलेली गोष्ट मला कबूल नाहीं. पत्रदेखत इकडे निघून यावें. तुम्ही माझ्याजवळ राहणेंच इष्ट आहे. मी इंग्लंडचा राजा आहें. सर्व प्रकारचे अधिकार माझे आहेत. तुमच्यावर कोणचेंहि संकट आलें तरी त्यांतून मी तुमचा हरतऱ्हेनें बचाव करीन. तुमच्या एका केसालाही धक्का लावण्याची पार्लमेंटची छाती नाहीं."

हें पत्र स्ट्रॅफर्डला पोंचल्यावर त्याची इच्छा नसतांहि राजाज्ञेप्रमाणें ता. ९ नोव्हेंबर रोजीं तो लंडन शहरीं येऊन पोंचला. तो लंडनमध्यें आलेला पाहतांच दोन दिवसांनींच पिम् यानें त्याच्यावर भयंकर राजद्रोहाचा आरोप ठेवून त्याचा न्याय करण्यासाठीं त्याला कैद करून टॉवरच्या तुरुंगांत घाडून दिलें. याप्रमाणें प्रजापक्षीयांनीं आपलें घोडें पहिल्या खड्यावरून कुदवून, ते करावयाच्या एका गोष्टींतून पार झाले.

आतां त्यांना दुसरा खड्डा ओलांडायची वेळ येऊन ठेपली. तो खड्डा असा होता कीं, स्ट्रॅफर्डनें प्रजेचे हक्क बुडवून त्यांच्या स्वातंत्र्याच्या दुर्मिळ अशा मौक्तिक कंठ्याचा अपहार करण्याचा केलेला बेत त्याच्यावर, शाबीद करायचा आणि तसें करणें हें आजपर्यंत प्रजाजनांना झालेल्या त्रासाचें द्योतक होतें असें सिद्ध करायचें असें जरी करण्याचा प्रजाप्रतिनिधींचा उद्देश होता तरी हें घडून यावें कसें याचीच मोठी पंचाईत होती ! पार्लमेंट जरी प्रजेची बाजू घेऊन उद्दाम राजपक्षाला बुडवायला तयार झाली होती तरी स्वतःचा फायदा पूर्णपणें लक्षांत घेऊन सर्व जनता राजपक्षाच्या विरुद्ध उठेल किंवा नाहीं याची प्रजाप्रतिनिधींना शंका वाटत होती. राजा हा ईश्वराचा प्रतिनिधि असून प्रजा हि त्याच्या ताटाखालचीं मांजरें असल्यानें राजा वागवील तसें तिनें वागलेंच पाहिजे व राजारूप मालकानें किती जरी थपडा लगावल्या तरी कुत्र्याप्रमाणें त्याचा हात चाटायला तिनें तयार असलेंच पाहिजे अशी भावना तत्कालीन इंग्लंडच्या बहुजनसमाजांत वावरत असून, शिवाय आपल्या मालकानें आपल्याला किती जरी मारलें तरी मालकाच्या अंगावर जर कोणी धांवून आलें इतर तर मालकाचें रक्षण करण्यासाठीं त्याच्या अंगावर धावून जाणें हें आपलें पवित्र कर्तव्य आहे अशीहि प्रजाजनांची समजूत अद्यापि त्या जननेंत रूढ होती. आपला राजा जुलमी आहे हें प्रजा जाणत असतांहि ती कदाचित् त्याला ऐनवेळीं मदत करण्यास धांवून जाऊन आपण हातीं घेतलेल्या सार्वजनिक हिताच्या मुद्याला हरताळ फांसायला तयार होईल ही भीति प्रजाप्रतिनिधींच्या नेत्रांपुढें उभी होती.

परंतु तात्त्विक विचार करून पाहिलें असतां राष्ट्रांतील जनतेला या बाबतींत दोष देणें व्यर्थ आहे असेंच कोणचाहि बरवर विचार करणारा माणूस सद्धां सांगू शकेल. कारण धन्याला ओळखणें हीच विश्वासू प्राण्याची खरी वृत्ति होय. ज्याप्रमाणें झोंपेंत स्वप्न पडलें असतां दुसऱ्याच्या तोंडांत मारण्याच्या भावानें आपली थप्पड आपल्याच तोंडांत बसते, त्याचप्रमाणें प्रत्येक बाबतींत राजा जें म्हणून करायला जाई, तें सर्व त्याच्याच गळ्यांत येई. ही गोष्ट प्रजा जरी जाणत होती तरी एका ' धनी ' या शब्दांत ती मिंधी होऊन गेलेली होती. तो तिचा भ्रम प्रथम उडवण्याचें व्रत प्रजाप्रतिनिधींनीं मोठ्या युक्तीनें स्वीकारलें. प्रजापक्षीय प्रतिनिधींच्या सरळ आणि न्यायी खटपटीनें प्रजेंतला तो भ्रम थोडक्याच अवधींत उडाला. प्रजाप्रतिनिधींनीं राजपक्षाची स्वार्थी गूढ प्रमेयें जेव्हां सर्व जन-

तेला मोठ्या निर्भिडपणानें आणि छातीठोक रीतीनें उलगडून दाखविली, तेव्हां जनतेचा विश्वास राजपक्षावरून उडूं लागून आपापसांतच जनतेचे गुप्त कट सुरू झाले. ही बातमी प्रजाप्रतिनिधींना समजल्याबरोबर त्यांच्या मनांतले सर्व किंतु विरघळून गेले आणि लगेच स्ट्रॅफर्डाच्या खटल्याला भयंकर स्वरूप देण्याची त्यांनीं सुरुवात केली.

स्ट्रॅफर्डाचा खटला न्यायासनापुढें सुरू झाला. खटला सुरू असतां इंग्लंड, स्कॉटलंड आणि आयर्लंड या देशांतल्या लोकांचीं मनें त्याच्याविरुद्ध इतकीं खवळून गेलीं होतीं कीं, जणूं काय त्याच्याविषयींचें त्यांचें मत पूर्वीपासूनच वाईट होतें असा भास होत होता. न्यायसभेंत स्ट्रॅफर्डाच्याविरुद्ध पुरावा करण्याचें काम जरी सुरू होतें तरी त्याच्यावर जो अपराध शाबीत करण्याचें प्रजाप्रतिनिधींच्या मनांत होतें त्या बाबतींतला लेखी पुरावा प्रथम त्यांना मिळाला नव्हता आणि त्यामुळें त्यांची बाजू प्रथम घसरल्यासारखी दिसूं लागली होती. स्ट्रॅफर्डजवळहि स्वसंरक्षणार्थ असा फारसा जोरदार पुरावा जरी नव्हता तरी त्यानें आपल्या वक्तृत्वपूर्ण अशा भाषामाधुर्याच्या जोरावर सर्व जनतेचीं जीं मनें त्याच्याविरुद्ध झालीं होतीं तीं आपल्याकडे ओढून घेऊन राजपक्ष खराच अनिंद्य आहे असें कांहीं काळ भासविलें. त्यामुळें एकाएकीं बदलणाऱ्या हवेप्रमाणें जनतेचीं मनें प्रजाप्रतिनिधींच्या विरुद्ध झालीं. प्रजाप्रतिनिधि हेच खरे जुलमी असून स्ट्रॅफर्डादि राजपक्षीयांवर खोटाच जुलमीपणाचा पेहेराव चढवण्याचा प्रजाप्रतिनिधींनीं नीच उद्योग आरंभिला आहे असा सर्वत्र समज झाला. इतक्यांत त्या बदललेल्या वातावरणाला पूर्वस्वरूप देणारा असा एक प्रचंड झंझावात सुरू झाला. त्या झंझावातानें जनतेच्या नेत्रांपुढें आलेल्या घनदाट कृष्णवर्ण मेघपटलाला साफ उडवून लावून पार्लमेंटच्या विजयाच्या सूर्यकिरणांचा प्रकाश जनतेच्या नेत्रांपुढें उभा केला. अशा तऱ्हेनें पार्लमेंटच्या विजयाच्या दिव्य प्रकाशाची चकचकीत प्रभारूप पताक जेव्हां जनतेच्या नेत्रांपुढें फडफडूं लागली तेव्हां जनता पुनः स्ट्रॅफर्डच्या विरुद्ध झाली. त्या वेळीं प्रजाप्रतिनिधींच्या हातीं स्ट्रॅफर्डच्याविरुद्ध जर सबळ पुरावा आला नसता आणि प्रजेचीं बदललेलीं मनें जर राजपक्षालाच चिकटून राहिलीं असतीं तर चार्लस राजाच्या मेंदूनें आणि दोन्ही हातांनीं म्हणजे लॉड आणि स्ट्रॅफर्ड यांनीं काय काय अनर्थ केले असते याची कल्पनाः करणें अशक्य झालें असतें. परंतु अखेरीस सत्य तें सत्यच ठरलें !

त्याइतकें निष्ठुर कोणीहि नसतें. सत्याइतकें क्रूर कोणालाहि बनतां येत नाहीं. त्याचा अत्यंत निपट आणि निर्भीडपणा बाधूं नये म्हणून आपल्या भोंवतीं जरी खोट्या कल्पनांचें आवरण उत्पन्न करण्याचा कोणी प्रयत्न करूं लागलें, तरी त्याचें तें सत्वस्वरूप अस्पष्टहि करण्याची ताकत त्याच्या अंगीं नसते. ते खोटया कल्पनांना चिचकून बाहेर पडतें. 'हें पहा, मी येथें आहें' असें तें हवें तेथें आपलें दांत विचकून निर्भीडपणानें वाटेल त्याला सांगतें. तें कोणाचेंहि ऐकत नाहीं. खोटयाला धडकी बसवून गर्भगळित करण्याची त्याला फार हौस असते. दुर्दैवाच्या कोळशानें रेखाटलेलें अघोर सत्व कधींहि पुसून टाकतां येत नाहीं. त्याच्यावर जों जों दृष्टी खिळवावी, तों तों तें अधिकच स्पष्ट दिसूं लागतें. सत्य हें इतकें कडू असतें कीं, तें असत्य करण्यासाठीं वाटेल तें केलें तरी तें आपला कडूपणा सोडीत नाहीं. हलाहल विषहि वेळीं अमृत बनेल; पण सत्य आपलें खरें स्वरूप कधींहि पालटावयाचें नाहीं. राजा असो कीं रंक असो, सत्याला दोन्ही सारखेच. राजानें स्वभुजपराक्रमानें आणि नीतीनें राज्य चालविलें आहे किंवा तें अनीतीनें चालविलें आहे ही गोष्ट सत्य हें वाऱ्यावर आरूढ होऊन सांगत जसें सर्वत्र संचार करतें, तसेंच त्याचा मोक्षहि तें स्पष्टपणें जगाला नौब-दीच्या ध्वनीनें कथन करतें. जगांतल्या सर्व वाऱ्याची मोट बांधणें किंवा त्याला आवरणें जितकें अशक्य तितकेंच सत्याला छपविणें अशक्य! सत्य हें सदा विजयी असायचेंच हा सिद्धांत कोणालाहि खोडून काढतां यायचा नाहीं.

वर कथन केलेल्या सत्याच्या जोरावरच पिमनें स्ट्रॅफर्डच्या विरुद्ध खटला उभारण्याचें श्रेय घेतलें होतें! स्ट्रॅफर्डचें बोलणें संपल्यावर तो मोठ्या शांततेनें आणि गंभीरपणानें उभा राहून म्हणाला, "**मित्रहो, जरा थांबा! इतके उतावीळ होऊं नका! मीं जो स्वराज्य आणि स्वातंत्र्य यांच्या मार्गांतला जबरदस्त पहाड खणून काढून प्रजाजनांना स्व-मतानें निर्धास्तपणें आपला मार्ग आक्रमण करण्याला सुलभ रस्ता तयार करून देण्याचें काम हातीं घेतलें आहे तें कांहीं असें तसें लेचेंपेचें नाहीं. माझ्यापाशीं राजपक्षीयांच्या स्वार्थी लबाड्यांची सर्व सामुग्री तयार आहे. शेवटचा भयंकर सुरुंग खणून तयार झालेला आहे. आतां त्यांत दारू ओतून त्याला विस्तव लावायचीच काय ती बाकी उरलेली आहे. तेवढें तें**

काम आतां आपणां सर्वांच्या साह्यानें पार पडलें म्हणजे आपण सर्व प्रजासत्ताक स्वराज्याच्या वातावरणाच्या पहिल्या पायरीचें आक्रमण केलेंच म्हणून समजा!"

इतकें बोलून पिमनें आपल्या खिशांतून एक कागद बाहेर काढला आणि पुन्हां तो बोलला, "सुरुंगांतल्या दारूला विस्तव लावणारा हाच कागद आहे. हा जरी निर्जीव पदार्थ आहे असें दिसतें आहे तरी याच्यांत फणींद्राच्या हजारों जिव्हा आहेत. आतां थोडक्याच अवकाशांत तो आपलें खरें स्वरूप प्रगट करील."

पिमूनें पुढें मांडलेला कागद पाहून आणि त्याचें शांतपणाचें पण जोरदार भाषण ऐकून जनतेचीं मतें पुन्हां स्ट्रॅफर्डाच्या विरुद्ध खवळलीं.

स्ट्रॅफर्डच्या खटल्याला ता. १२ मार्च रोजीं सुरुवात झाली होती. ता. १२ एप्रिल रोजीं पिम् उभा राहिला आणि म्हणाला, "गेल्या वर्षीच्या मे महिन्यांत, ज्या दिवशीं शॉर्ट पार्लमेंट राजानें आपल्या नौकरशाहीच्या सल्ल्यानें बरखास्त केली, त्याच दिवशीं सकाळीं स्ट्रॅफर्ड यानें सरकारवाड्यांतल्या खलबतखान्यांत या कागदावर जें कांहीं लिहिलें आहे त्याप्रमाणें चार्लस राजाला वागण्याचा उपदेश केला आहे तो उपदेश प्रजेच्या किती गांजणुकीचा होता तो आतां ऐका!"

इतकें बोलून तो तें पत्र मोठ्यानें वाचूं लागला. 'कोणत्याहि तऱ्हेची दंगाई न करतां व्यापारी जहाजांवर वाटेल तेवढा कर बसविला असतां तो उत्पन्न होणें सध्यांच्या परिस्थितींत अगदीं अशक्य नाहीं. महाराजांनीं प्रजेचीं मनें अजमावून पाहून तीं चुंबकमण्याप्रमाणें आपल्याकडे आकर्षित करून घेतलीं आहेत यांत शंका नाहीं. सध्यां महाराज करतील ती पूर्व दिशा होणार आहे. कारण जनतेंत चांगलीच फूट पडलेली आहे. त्यांतूनहि महाराजांच्या मताप्रमाणें जर जनता वागणार नाहीं, तर तिला तशी वागायला लावणें फारसें कठीण जाणार नाहीं. आयर्लंडमध्यें राखून ठेवलेली महाराजांची ही शेलकी सेना आहे, तिनें जरासें उग्र स्वरूप धारण केलें म्हणजे झालें. कार्यभाग साधायला उशीर लागणार नाहीं.'

ही पत्रांतली पिमूनें वाचून दाखविलेली हकीकत स्ट्रॅफर्डच्या विरुद्ध लागणाऱ्या पुराव्यांत दाखल करण्यांत आली. अशा रीतीनें स्ट्रॅफर्डानें राजाला केलेल्या उपदेशाची लेखी नक्कल त्याला कशी मिळाली हें त्यानें कारणें पुढील

प्रमाणें सांगितलें. तो म्हणाला, ' कांहीं दिवसांपूर्वी माझे परम मित्र सर यंग व्हेन हे हिंवतापानें आजारी पडले असतां मी त्यांना भेटायला गेलों होतों. त्या-वेळीं आतांच जो कागद मीं स्ट्रॅफर्डच्या विरुद्ध पुराव्यांत दाखल केला आहे तो त्यांनीं माझ्या हातीं दिला होता."

यंग व्हेनकडून वरील कागद पिमूला मिळाला असें जेव्हां स्पष्टपणें जाहीर झालें तेव्हां व्हेनजवळ तरी तो कागद कसा आला असावा हें समजून घेण्याची जनतेनें साहजिकपणेंच इच्छा प्रगट केली. यंग व्हेन हा कांहीं राजाचा गुप्त सल्ला-गार नव्हता, आणि तसा जर तो असता तर तें काम पतकरण्यापूर्वी घेण्याच्या शपथेनें तसल्या गोष्टींचें आविष्करण करण्यास त्याला प्रतिबंध केला असता हें जनतेला पुरें माहीत होतें, आणि त्यामुळें त्या कागदाची चमत्कारिक हकीकत समजावून घेण्याची जनतेची जिगीषा जरी दुप्पट जोमानें भडकली तरी ती थोडक्याच अवकाशांत शांत झाली.

व्हेन शांतपणें उभा राहिला आणि अत्यंत गंभीरपणानें म्हणाला, " माझे वडील चार्लस राजाचे गुप्त सल्लागारांपैकीं एक होते हें सर्वप्रसिद्धच आहे. ते इंग्लंडच्या उत्तरेकडच्या प्रदेशांत कांहीं सरकारी कामाचा सरळपणानें निकाल लावण्यास गेले असतां त्या कामीं उपयोगी पडणाऱ्या कांहीं कागदपत्रांची त्यांना आवश्यकता उत्पन्न झाली. तेवढ्याकरितां त्यांनीं आपल्या कपाटाच्या किल्ल्या माझ्याकडे धाडल्या होत्या. त्यांना ज्या कागदांची जरूरी होती ते मी शोधीत असतां, एका तांबड्या मखमलीच्या आवरणामध्यें कांहीं कागद निराळेच गुंडाळून ठेवलेले माझ्या दृष्टीस पडले. माझें साहजिकच त्यांकडे लक्ष गेलें. मी ते उघडून पाहिले. त्यांमध्यें माझ्या वडिलांच्या हातचेच लिहिलेले सर्व कागद मला दिसले. माझ्या वडिलांनीं स्मरणटिप्पणें म्हणून ते कागद लिहून ठेविलेले होते. माझ्या तीर्थरूपांचें हस्ताक्षर राजदरबारांत प्रसिद्ध असल्याकारणानें या दाखल केलेल्या पत्राच्या अक्षराच्या सत्यतेबद्दल शंका घेण्याला जागाच नाहीं. त्या मखमलीनें वेष्टून ठेविलेल्या कागदांतच हा कागद मला सांपडला. स्ट्रॅफर्डनें राजाला केलेल्या उपदेशाचें स्मरणटिप्पण म्हणून तो कागद माझ्या वडिलांनीं स्वदस्तुरानें लिहून ठेविलेला होता. तो कागद वाचून पाहिल्यावर मला त्याचा पुढें केव्हां तरी मोठा उपयोग होईल असें वाटल्यावरून मीं तो कागद आपल्या वडिलांना न कळवितां आपल्या ताब्यांत घेतला. नंतर थोडक्याच दिवसांनीं त्या

कागदाबद्दल माझे परम दोस्त मि. पिम् यांचें मत घ्यावें म्हणून मीं तो त्यांना दाखवून त्याची एक नक्कल करून घेण्यास सांगितलें. त्यांनीं त्याप्रमाण नक्कल करून घेतल्यावर त्याबद्दल विचार करून आपलें मत मला कळविलें. सध्यां तोच अस्सल कागद येथें दाखल करण्यांत आला आहे."

स्ट्रॅफर्डच्या जरी सर्व आशा लयाला गेल्या होत्या तरी ही हकीकत ऐक-तांच त्यानें पुन्हां आपल्या वाक्पांडित्यानें जनतेचीं मनें राजपक्षाकडे आकर्षित करून घेण्याचा अटोकाट प्रयत्न करण्याची जरी जिवापाड मेहनत केली तरी ती सर्व व्यर्थ गेली । आणि सर्वांची अशी समजूत झाली कीं, प्रजापक्षाच्या वृक्षावर कुन्हाड मारून त्याला जायबंदी करूं पाहणारा स्ट्रॅफर्ड हाच मूळांत असल्यानें त्याचेंच प्रथम नायनाट होणें इष्ट आहे. प्रजापक्षीय पुढारी याप्रमाणें हा दुसरा खाडा मोठ्या चातुर्यानें कुदून पार झाले.

आतां प्रजाप्रतिनिधींना तिसरा व शेवटचाच काय तो खाडा कुदून पार होण्याचें बाकी राहिलें होतें. तो तिसरा खाडा असा होता कीं, आतांपर्यंत स्ट्रॅफर्ड-वर शाबीत केलेले आरोप हे त्याला घोर अपराधाखालीं आणितात किंवा नाहीं हें पाहायचें. स्ट्रॅफर्डचें म्हणण असें होतें कीं, प्रजेच्या स्वातंत्र्यावर गदा आण-ण्याचा जरी त्यानें प्रयत्न केला असला, तरी तो त्या वेळच्या इंग्लंडांतल्या कायद्या-प्रमाणें राजद्रोही कधींच ठरणें शक्य नव्हतें; कारण तसा त्याला ठरवायला तो कायदा अपुरा होता. प्रजेच्या हक्कांची पायमल्ली करून प्रजेला त्रास देण्यास जरी तो कारणीभूत झाला असला तरी तत्कालीन कायद्याप्रमाणें तो अपराध फारसा मोठा गणतां येणारा नव्हता. एकंदरींत त्याचें म्हणणें असें होतें कीं, त्याच्यावर जो घोर अपराध लादण्याची खटपट सुरू होती तो त्याच्यावर कोणच्याहि प्रकारें शाबीत होणें शक्य नव्हतें. राजद्रोहासंबंधाचा त्या वेळचा इंग्लंडांतला कायदा पुढील प्रमाणें होता. ' King was everybody and everybody else was nobody." याच कायद्याच्या अन्वयें स्ट्रॅफर्डनें असा मुद्दा पुढें आणला कीं, तो राजाच्या मताप्रमाणें काम करीत होता व त्याच्या स्वमताचा त्यांत लेशहि नसल्यानें त्याच्यावर कोणच्याहि तऱ्हेनें राजद्रोहाचा अथवा प्रजा-द्रोहाचा भयंकर अपराध न्यायदेवतेला शाबीत करता येणें शक्य नव्हतें.

यावर न्यायाधीशांचा असा अभिप्राय पडला कीं, प्रजेच्या विरुद्ध कट करणें हा जरी सध्यांच्या कायद्याप्रमाणें अपराध ठरत नसला, तरी इतउत्तर तो

द्रोहच गणला जाईल. राज्यशकटाच्या कळसाला हात घालणाऱ्यावर, बंडखोरीचा आरोप ठेवून शिक्षा करणें आणि त्या शकटाचीं चाकेंच मोडून टाकणाऱ्यावर अपराध लागू न करतां त्याला सोडून देणें, या दोन्ही गोष्टी कोत्या ज्ञानाच्या आणि अन्यायाच्या द्योतक आहेत. झालें–आटपलें ! कायद्यांत बदल व्हायची वेळ आली. लागलीच वरच्या कृत्यास अनुलक्षून त्या बाबतींत एक नवा कायदा तयार करण्यांत आला आणि तो प्रजापक्षीय पार्लमेंटच्या सभेंत पसार करण्यासाठीं धाडून देण्यांत आला. ज्या परिस्थितींतून तो जावा लागत असे, त्या सर्वांतून तो जाऊन—राजानें जरी—'मी अशा कायद्यावर कधीं सही करणार नाहीं—' असे उद्गार काढले होते, तरी अखेरीस राजा चार्लसाची त्यावर सही होऊन तो पसार झाला. त्या कायद्यावर चार्लस राजानें सही केलेली जेव्हां स्ट्रॅफर्डला समजली, तेव्हां त्यानें एकदम ऊष्ण असा दीर्घश्वास सोडून आकाशाकडे डोळे व हात करून म्हटलें, " कोणीहि कधीं राजावर किंवा स्वतःवांचून इतर कोणावर विश्वास ठेवणें हें काम अत्यंत धोक्याचें आहे. जनावरांवर विश्वास ठेवला असतां तीं उपयोगीं पडतात, परंतु मनुष्य प्राण्यावर विश्वास ठेवण्यानें मुक्तीच्या ऐवजीं रौरव नरकवासच प्राप्त होतो. "

कायदा पसार झाला व स्ट्रॅफर्डला शिरच्छेदाची शिक्षा ठोठावण्यांत आली. व्हेननें जो कागद पुराव्याकरतां म्हणून पुढें आणला होता, त्या कागदांतील मजकूर ज्या दिवशीं घडला त्या दिवसापासून एक वर्ष आणि एकच आठवड्यानें स्ट्रॅफर्डचा टॉवर हिल येथें शिरच्छेद करण्यात आला. याप्रमाणें प्रजाप्रतिनिधी तिन्ही खाड्यांवरून अचुकपणें कुदून पार झाले.

प्रजापक्षाचा कैवार घेऊन भांडणाऱ्या त्या वेळच्या लोकांना आपला शब्द खरा करण्याची फार मोठी संवय लागली होती. ही संवय ज्या–वेळी मनुष्यप्राण्यांत दृग्गोचर होते तेव्हांच त्याचे सर्व हेतु खात्रीनें साधतात, आणि याचप्रमाणें स्ट्रॅफर्डनें प्रजापक्ष सोडून राजपक्षाचा जेव्हां अवलंब केला, तेव्हां पिमूनें त्याला असें बजाविलें होतें कीं, " तूं पाहिजे तर आमचा पक्ष सोड, पण आम्ही मात्र तुझें टाळकें आमच्या ताब्यांत घेतल्यावांचून कधीं राहणार नाहीं हें पक्कें ध्यानांत ठेव ! " पिमूनें शेवटीं हे आपले शब्द कसे खरे केले हें वरील गोष्टीवरून वाचकांच्या लक्षांत आलेंच असेल. यालाच म्हणावें [illegible]

चार्लस राजा ज्या शक्तीचा दास बनून जिच्या अनुरोधानें वागतो आहे, तिचाच नाश केल्यावर तो आपल्या म्हणण्याप्रमाणें वागेल असें जे प्रजापक्षीयांना वाटत होतें, तें स्ट्रॅफर्डचा नाश केल्यानंतरहि चार्लसाच्या पूर्ववत् चालू असलेल्या वागणुकीवरून खोटें ठरलें. तो जरी स्वयंसिद्धतेनें वागण्याची फुशारकी मारीत असे, तरी त्याला बकिंगह्यामचें फार साहाय्य होत असे. बकिंगहॅमचा शिरच्छेद झाल्यावर त्यानें आपलें जें नवें मित्रमंडळ बनविलें होतें, तें त्याचें त्यानें अनुकरण करण्यासाठीं म्हणून बनविलें असून त्यानें स्वतःचा म्हणून जो स्वमतांचा चिरेबंदी रस्ता तयार केला होता त्यावरून आपल्या बिनीमागें येण्यासाठीं बनविलें होतें. स्ट्रॅफर्ड, लॉड, बकिंगहॅम वगैरेंचे जरी प्रजापक्षपाती यांनीं शिरच्छेद करविले तरी चार्लस राजा हा स्वतःला अभिजात समजत असल्याकारणानें त्याचें करणेंहि त्याला तसेंच वाटत होतें. त्याचा स्वेच्छाचारी आणि निरंकुश विहार प्रजेला पूर्णपणें उच्छेदकारक वाटत होता. राजा आणि प्रधानमंडळ यांमधील द्वेषभाव दिवसेंदिवस जास्तच जोरानें वाढूं लागला. एके दिवशी तर त्यानें मंत्रिगृहांत शिरून त्याच्याविरुद्ध जे होते त्या सर्वांना त्यानें एकदम कैद केले. यामुळें राजा व प्रजा यांमध्यें आतां पूर्ण बिघाड झाला. प्रजेनें उग्र स्वरूप धारण केलें राजाच्या दर्पाचा भंग होऊन त्यानें आपलें पाऊल लंडन राजधानींतून काढिलें आणि उत्तर दिशेचा मार्ग धरिला. त्यानें हल्ल नांवाच्या प्रांतांत जाऊन राहण्याचा निश्चय केला. शेवटीं तर इ. स. १६४२ च्या ऑगस्ट महिन्यांत नॉटिंगहॅम येथें त्यानें स्वतः स्वजनप्रकोपाचें (civil war) निशाण उभारलें.

राजा आणि प्रजा यांमधील या जनप्रकोपाच्या संग्रामानें प्रजापक्षाला जी विजयश्रीनें माळ घातली, तिचें अग्रेसरत्व फेअरफॅक्स आणि क्रॉमवेल यांना देणें जरी रास्त असलें, तरी ही गोष्ट खरी आहे कीं, रणमैदानावर तरवार गाजवून विजयी झालेल्या सैनिकांच्या आधीं प्रधानमंडळांतील मुत्सद्यांनींच जय मिळविला होता. त्या स्थितींत युद्धकलाविशारदांच्या इतकेंच जोखमीचें काम मंत्रीमंडळाच्या माथ्यावर होतें. चरित्रनायक व्हेन ह्यानें हातीं समशेर धरून रणमैदानावर कधींहि प्रवेश केला नव्हता किंवा त्यानें तसें करण्याचा प्रयत्न केला असता तरी तो कधींहि योद्धा झाला नसता. अशी जरी खरी गोष्ट होती, तरी प्रजापक्षीय सेनेचें आधिपत्य स्वीकारून ज्या क्रॉमवेलनें पुढें राजपक्षावर विजय संपादन

केला, त्याच्याच इतकी तंतोतंत त्याची कीर्ति गाणें अगदीं योग्य कां आहे हें त्याच्या पुढच्या चरित्रावरून कळून येणार आहे.

राजपक्ष आणि प्रजापक्ष यांच्यामध्यें जरी एकसारखें बारा महिने युद्ध सुरू होतें, तरी प्रजापक्षाच्या युद्धकलेवर विजयश्री लुब्ध होईना. इंग्लंडच्या पश्चिम रणांगणावर राजपक्षाचा पूर्ण अंमल बसून त्याच कठोर आणि जुलमी छत्राखालीं थोडक्याच वेळांत सर्व देश कायमचा पारतंत्र्यांतले तुकडे चघळीत राहणार अशीं स्पष्ट चिन्हें जरी दिसूं लागलीं, तरी तीं मृगजलवत् होतीं असेंच अखेरीस ठरलें. मंत्रिमंडळानें स्कॉटलंडशीं तह करण्याचा घाट घालून तिकडे तशा आशयाची थैलीहि रवाना केली. त्या बाबतींत क्लॅरेंडनानें असे उद्गार काढले आहेत कीं, स्कॉच लोकांशीं सल्ला करण्याच्या बाबतींत जे अधिकारी नेमले गेले होते, त्यांपैकीं व्हेन हा एक असल्याकारणानें इतरांच्या नांवांचें स्पष्टीकरण करण्याचें कारणच नाहीं. कारण सर हॅरी व्हेन हा इतरांचें मुंडकें असून इतर सर्व त्याचीं धडें होतीं. कॉमवेलनें जितक्या कुशलतेनें शरसंधान केलें तितक्याच पराकाष्ठेची व्हेननें आपली मुत्सद्देगिरीची शिकस्त केली. क्लॅरेंडनानें त्याच्याविषयीं आणखी असेंहि म्हटलें आहे कीं, ' He was chosen to cozen and deceive a whole nation, which excelled in craft and cunning, what he did with notable pregnancy and dexterity.'

इंग्लंड आणि स्कॉटलंड या दोन्ही देशांचें ऐक्य होण्यास फक्त काय तीं एकाच गोष्टीची अडचण होती. ती गोष्ट धर्मविषयक होती. चार्ल्स राजानें स्वतः तयार केलेलें धार्मिक प्रार्थनेचें पुस्तक स्कॉच लोकांनीं उपयोगांत आणलेंच पाहिजे असा ज्या वेळीं जुलुमाचा त्रास होऊं लागला त्यावेळीं स्कॉच लोक एकदम मधमाशांसारखे चवताळून उठून, चार्ल्सच्या भोंवतीं त्याला दंश करण्यासाठीं घिरट्या मारूं लागले. ते त्याचे लचके तोडण्याच्या बेतांत आले. एका विंचवानें एके ठिकाणीं नांगी मारलेली पतकरेल; पण हजारों विंचवांच्या नांग्यांचे डंख सहन करणं अशक्य असतें. स्कॉच लोकांनीं चार्ल्स राजाच्या जुलमी कृत्यांना झुगारून देऊन मोठ्या जोरानें एक नवी भीषण स्वरूपाची वावटळ उठविली. त्यांनीं पूर्वीच्या धार्मिक गोष्टींना गुंडाळून ठेवून स्वतंत्रपणें एक नवाच 'सत्यप्रतिज्ञ' (Covenant) या नांवाचा पंथ उपस्थित केला आणि सर्वत्र ' बिशपी ' चा उच्छेद करून प्रिस्बिटेरियन' धर्माचा प्रसार करण्याची तीव्र खटपट सुरू केली. स्कॉच लोक जरी

इंग्लंडच्या प्रजापक्षीयांशी सख्य करायला तयार होते तरी त्यांचें म्हणणें असें होतें कीं, "आम्ही स्थापिलेल्या नव्या 'सत्यप्रतिज्ञ' पंथाचा इंग्लंडनें स्वीकार करून सर्वत्र आमच्या 'प्रिस्बिटेरियन' पंथाचें प्रामाण्य मानिलें पाहिजे."

लंडन शहरांतील आणि इंग्लंडमधील बरेच लोक स्कॉच लोकांच्या वरील म्हणण्याप्रमाणें वागण्यास तयार झाले; परंतु व्हेन आणि क्रॉमवेल यांच्या बाजूच्या स्वातंत्र्याभिमान्यांना तसें करणें इष्ट वाटेना. तसें घडून येणें अशक्य आहे असें त्यांचें म्हणणें पडलें. खरें पाहिलें असतां तसें घडणें जर शक्य असतें तर व्हेननें त्या गोष्टीचा फायदा घेऊन तसा योग जुळवून आणण्यास कधींच माघार घेतली नसती. कारण व्हेनच्या हृदयांत फक्त 'स्वातंत्र्य' याच एका धर्माचें अधिष्ठान होतें. त्याला 'सत्यप्रतिज्ञ' काय किंवा 'प्रिस्बिटेरियन' काय यासारख्यांची कांहींच किंमत नव्हती. त्याचें सर्वस्व काय तें 'स्वातंत्र्य' या शब्दांत असल्याकारणानें वाटेल त्या धर्मपंथाचें त्यांत संमिश्रण होण्याला पुरेपूर जागा होती. त्या 'स्वातंत्र्य' या शब्दाची किंमत त्या काळीं फार मोठी होती. दत्तात्रेयाचें नांव निघालें असतां हिंदु भाविक लोक ज्याप्रमाणें नमस्कार करतात त्याप्रमाणें त्या काळीं 'स्वातंत्र्य' या शब्दाचा उच्चार झाल्याबरोबर इंग्रजी राष्ट्रांतले प्रजाजन नम्रतापूर्वक आपली मान वांकवीत असत; पण यांत कांहीं विशेष होतें असें नाहीं. कारण तो शब्द केव्हांही पूज्यच राहणारा आहे.

खरें पाहिलें असतां हिंदुस्तानांतला मुख्य जो आर्यवैदिक धर्म, तो सर्वस्वी ॐकारमय असून सौरपंथाचा असतांहि त्यांतूनच—शाक्त, गाणपत्य, वैष्णव, शैव, रामानुज, जैन, बौद्ध वगैरे जसे अनेक पंथ निघून धार्मिक गोष्टींमुळें समाजाच्या ऐक्यांत विस्कळितपणा झाला आणि शौर्यधैर्यादि गुणांचा लोप होऊन आपसांतील धार्मिक मात्सर्यानें राष्ट्राचा घात झाला, त्याचप्रमाणें इंग्लंडांतही एकाच ख्रिश्चन धर्मांतून—इपिस्कोपेलियन्स, प्रिस्बिटेरियन्स आणि रोमन कॅथालिक्स असे जे निरनिराळे तीन पंथ निघाले होते ते एकमेकांवर उंच उसळी मारून आपलेंच श्रेष्ठत्व प्रस्थापित करण्याच्या कामीं मोठ्या जबरदस्त जिगीषेची खटपट करीत होते. चार्लस राजाच्या वेळीं इंग्लंडांत अशा तऱ्हेनें धार्मिक गोष्टींनीं गोंधळ उडविला असतां एके दिवशीं ज्यांचे शब्द ऐकले असतां अंगावर थरारून रोमांच उभें राहतें त्या प्रिस्बिटेरियन पंथाच्या लोकांच्या पुढाऱ्यांनीं भर सभेंत 'जुलूम जुलूम' म्हणून फारच कर्कश गर्जना केली.

त्याच ‘ जुलूम ’ या शब्दाच्या गर्जनेला उत्तरादाखल म्हणून व्हेन व त्याच्या पक्षाचे जे लोक ‘ स्वातंत्र्य ’ याच शब्दाला आपलें दैवत मानीत असत, त्यांनीं त्याच वेस्ट मिनिस्टरच्या सभेंत “ त्याच शब्दाला राष्ट्रकोशांतून हुसकावून लावण्यासाठीं आतां सर्व जनतेनें हातीं शस्त्र धरायचें असून सर्व धर्मपंथांना कांहीं काळ विसरून जाऊन सर्वांचें आद्य दैवत ‘ स्वातंत्र्य ’ हेंच करायचें आहे ” असे जोराचे उद्गार जरी काढले, तरी स्वातंत्र्यप्राप्ति करून घेण्याचें काम मोठें बिकट आणि जोखमीचें होतें. प्रबल राजपक्षाशीं असहाय्य प्रजापक्षाला झुंजून कार्यसिद्धि करून घ्यायची होती. व्हेननें संकल्प करून योजिलेलें कार्य मोठें राक्षसी आणि अवघड होतें.

कांहीं वर्षांनीं पुढें व्हेनवर राजद्रोहाचा आरोप येऊन न्यायासनापुढें त्याचा खटला चालला असतां त्यानें पुढीलप्रमाणें भाषण केलें. “ आपण स्थापिलेल्या धर्मपंथांत जर कोणी येत नसेल तर स्वतःच्या मनगटाच्या जोरावर जबरदस्तीनें त्याला कैद करून त्या धर्मपंथांत ओढून घेण्याची जी जुलमी पद्धत आपणांस ‘ सत्यप्रतिज्ञ ’ म्हणवून घेणाऱ्यांनीं सुरू केली आहे, तिच्यामुळें राजकारण आणि धर्मबाबत या दोहोंची सांगड घालण्याच्या बाबतींत स्वतंत्रपणें विचार करणारे जे लोक आहेत त्यांचीं मृदु अंतःकरणें दुखवून भूतदयेला लाथेनें तुडविल्यासारखें होणार आहे. मी नेहमीं ईश्वराचा शब्द खरा मानतों. ‘सत्यप्रतिज्ञ’ मंडळानें आरंभिलेलें काम मोठ्या प्रेमानें शेवटास नेऊन आपापसांतील तंटे विसरून जाऊन आरंभिलेल्या कामांत तरी निदान मतभेद न होऊं देतां मोठ्या धिटाईनें जसें आपलें मत स्वतंत्र आहे तसेंच दुसऱ्याचेंहि असलें पाहिजे या नैसर्गिक न्यायानें दुसऱ्या लोकांनीं आपल्या पंथांत यावें म्हणून आपण जसा त्यांच्यावर जुलूम करतों तसेंच करण्याचा त्यांनाही उलट पक्षीं अधिकार आहे ही गोष्ट प्रत्येकानें ध्यानांत ठेवली पाहिजे.

असो. याप्रमाणें इंग्लंड आणि स्कॉटलंड या दोन्ही देशांत फक्त एका धार्मिक गोष्टीसंबंधानें एकी होण्याची जरी नड पडली होती तरी व्हेन स्वतः कर्णधार होऊन त्यानें पार्लमेंटरूप नौका पैलतीराला मोठ्या चातुर्यानें वल्हवून नेली. स्कॉच लोकांच्या म्हणण्याप्रमाणें त्यानें ‘ सत्यप्रतिज्ञ ’ पंथ जरी स्थापन होऊं दिला नाहीं तरी त्याच्याऐवजी ‘ पवित्रसंघ ’ ( Solemn League ) हा पंथ स्थापन करून त्यांत ‘सत्यप्रतिज्ञ ’ पंथाला संमिश्रित करून घेतलें. असें करण्यांत त्याचे दोन उद्देश होते. राजकीय आणि धार्मिक या दोन बाबतींत त्याला इंग्लं-

कांत जी सुधारणा घडवून आणावयाची होती ती त्यानें वरीलप्रमाणें घडवून आणून आपल्या मताप्रमाणें शेवटास नेली. त्याचें मुख्य तत्त्व ' ईशप्रेरित ' हें असून त्यावरच त्याचा पूर्ण भरंवसा आणि भार असल्यामुळें त्यानें जें जें म्हणून कांहीं केलें तें तें सारें ' प्रिस्बिटेरियन ' पंथीयांना मान्य झालें.

स्कॉच लोकांनीं एकदम एकवीस हजार सैनिकांची हजेरी घेतली आणि त्यांना स्कॉटलंडच्या बर्फाच्छादित प्रदेशांतून दक्षिणेकडे इंग्लंडांत उतरून जाण्याचा हुकूम दिला. राजपक्षीयांची तर पूर्वींपासूनचीच जय्यत तयारी होती. त्यांची व प्रजाजनपक्षीय स्कॉच आणि इंग्लिश यांच्या संमिश्रित सैन्याची पहिली चकमक मार्स्टनमूर येथें झाली. त्या ठिकाणीं क्रॉमवेलनें मोठें रणकौशल्य दाखवून आपल्या प्रजापक्षाची सरशी करून दाखविली हें जरी खरें आहे तरी तसें करण्याचा योग जुळवून आणण्यास व्हेनच्या मेंदूचाच तीनचतुर्थांश उपयोग झाला हेंहि निर्विवाद खरें होतें.

रणभूमीवर जुलमी राजपक्षाच्या विरुद्ध संत्रस्त जनतेला हत्यारें उपसून रणमैदानावर दोन हात करण्यास लावण्याचें महत्कार्य हेंच काय तें व्हेननें प्रथम आणि एवढेंच त्याच मासल्याचें केलें. त्यानंतर त्याला जें एक मोठें धाडसाचें कार्य करायचें होतें, तें प्रजापक्षीय नूतन व्यूहघटना हें होय. स्कॉचांशीं इंग्लिशांनीं केलेल्या तहाप्रमाणें त्याला सेनेची जरी भरती मिळाली होती तरी सेनानायकाची अपेक्षा असल्यामुळें आणि प्रजापक्षीय सेनानायकांनीं आपली समशेरबहादरी अद्यापि योग्यपणें दाखविली नसल्यामुळें व्हेनला फक्त तशा तऱ्हेचीच व्यवस्था करणें भाग पडलें. प्रजापक्षिय सेनानायकांस शब्दोच्चार करण्यास कठिण अशा पदव्या असून शिवाय ते जरी अर्लस, लॉर्डस वगैरे होते, तरी झालेल्या एकाच संग्रामांत त्यांनीं नांवाप्रमाणें कृति मुळींच बजावलेली नव्हती. जणूं काय जयश्री त्यांना माळ घालायला भिते आहे असेंच त्या वेळीं त्यांचें वर्तन दिसलें. मार्स्टनमूर येथें जयश्रीनें त्यांना जरी चुकून माळ घातली, तरी ते तिचा अंगिकार करण्यास ते भीत होते असें त्यांची वृत्ति दर्शवीत होती. जो तो आपल्याच घमेंडींत गर्क असल्यामुळें कोणाचा पायपोस कोणाच्या पायांत नाहीं अशी स्थिति झाली होती. एकमेकांचा उत्कर्ष एकमेकांना सहन होत नसल्याकारणानें राजपक्षाचा पराजय करण्याचा प्रयत्न करण्याच्या ऐवजीं प्रत्येक जण आपापसांत अंतस्थपणें प्रत्येकाला चीत करण्याच्या खटपटी करीत होता. प्रसंग कोणचा आहे आणि आपण कसें वागलें पाहिजे हें ओळखून

योग्य काम बजावणारे लोक त्यांच्यांत फारसे नव्हते व जे कांहीं थोडेसे कर्तृत्ववान् होते, त्यांना आपलें खरें कर्तृत्व दाखविण्याची मनापासून इच्छा नव्हती. ज्या वेळीं जें करायला पाहिजे तें सरळ मार्गानें करण्याची त्यांची इच्छा नसल्यानें केवळ अडदांड पोराला चमकीचा धाक दाखवून वठणीवर आणण्याचा जसा प्रयत्न करण्यांत येतो तसाच चार्लस राजाला वठणीवर आणण्याचा ते प्रयत्न करीत होते. एकंदरींत काय कीं, प्रजापक्षाला ज्या तऱ्हेची त्यांची वागणूक अवश्य पाहिजे होती तशी ती नव्हती.

असल्या या पोरकट गोष्टींचा व्हेन आणि क्रॉमवेल यांना तिटकारा असल्याकारणानें त्यांना त्यांचें वर्तन पसंत पडेना व त्यामुळें ते सेनानायक त्यांच्या मतानें नालायक ठरले. ते दोघे सत्पुरुष दृढनिश्चयी असल्याकारणानें त्या सेनानायकांनीं चालविलेलें भातुकलीचें बालिश नाटक वास्तविक अंगिकारायचें नव्हतें. त्यांच्या त्या बालिशतेचा परिणाम त्यांनाच पुढें भोगावा लागला. व्हेन आणि क्रॉमवेल यांनीं स्वराष्ट्रोद्धाराच्या कामांत मनःपूर्वक हात घातला असल्यामुळें आणि तें कृत्य आपण परमेश्वरी प्रसादानेंच करीत आहोंत अशी त्यांची ठाम समजूत झाली असल्यामुळें, त्यांनीं त्या वंशपरंपरागत सरदारी चालत आलेल्या व नेभळेपणानें दृढालिंगन दिल्यामुळें फक्त तोंडांतच शौर्य उरलेल्या सेनानायकांना रजा देऊन स्वमतानें नूतन व्यूहघटना केली आणि त्याचमुळें अखेरपर्यंत त्यांची सेना अजिंक्य राहिली. ही जी नवीन सेनारचना त्या दोघां नरश्रेष्ठांनीं केली, ती कशी केली व ( Self-denying ordinance ) स्वमत बाजूला ठेवून तिला स्वतःच्या तंत्रानें कशी वागायला लावली याची माहिती येथें देणें जरी कांहीं फारसें अवघड काम नाहीं तरी तशा तऱ्हेचा व्यूह रचण्यास कोणचें व किती अचाट आणि अलौकिक बुद्धिसामर्थ्य असलें पाहिजे याची कल्पना करणें फारच अवघड आहे. या गोष्टीचें श्रेय क्रॉमवेलला देणें जरी कितीहि सयुक्तिक असलें तरी त्याचा अर्धा वांटा अलौकिक बुद्धिमत्तेच्या आमच्या चरित्रनायकालाहि देणें वाजवी आहे.

चार्लस राजा नेहमीं ज्या खुल्या दिलाच्या आपण गोष्टी करीत आहों असें दाखवीत् असे त्या त्याच्या प्रजाजनांना आपल्या विरुद्ध अशा भयंकर कारस्थानाच्याच वाटत असत. त्यानें स्कॉच, ऐरिश, फ्रेंच व डच या राष्ट्रांशीं अगदीं मोकळ्या मनाचा व्यवहार ठेविला होता. इतकेंच नव्हे तर तो आपलें पार्लमेंट, इंग्लिश सेना, प्रिसबिटेरियन्स, कॅथॉलिक्स, फेअरफॅक्स, क्रॉमवेल वगैरे कोणीहि न वगळतां

सर्वांशीं मोठ्या प्रेमानें वागत असे. अशी जरी खरी गोष्ट होती, तरी त्याचा अंतस्थ-पणें पूर्ण ओढा वरील मंडळीच्या विरुद्धपक्षाकडेच होता हें कांहीं खोटें नव्हतें. त्यानें आपलें लक्ष ज्या पक्षाकडे प्राधान्येंकरून दिलें होतें, तो असत्पक्ष सोडून त्यानें जर सत्पक्षाचें अवलंबन केलें असतें, तर त्यानें आपलें पूर्णाभिषिक्त मस्तक स्वतःनेंच आपल्या देहाच्या कबंधावरून गमाविलें नसतें. चार्लस राजाच्या दुष्टपणानेंच त्याला अखेरीस धडावेगळा करण्यास, प्रजाजनांना भाग पडलें. क्रॉमवेलशीं सख्य करून त्याला मोठा मान देण्यांविषयीं ज्या वेळीं तो पत्रें लिही, त्या वेळीं तो आपल्या राणीला असें लिही कीं, 'क्रॉमवेलला एकदा माझ्या हातीं येऊं दे म्हणजे मी त्याचा सन्मान करून त्याला स्वर्गतुल्य सुखांत लोळूं देण्याच्या ऐवजीं नरकाचीच वाट दाखवीन.' क्रॉमवेलनें ज्या वेळीं असा हा नीच व खोडसाळपणाचा राजाचा पत्रव्यवहार पकडला, त्यावेळींच खरें पाहिलें असतां राजा चार्लसाच्या पावलांना वधस्तंभाकडे चालत जाऊं लागण्याच्या दिशेचें वळण मिळालें होतें असें म्हणण्यास हरकत नाहीं.

पार्लमेंटच्या म्हणण्याप्रमाणें ऑक्सब्रिज् येथें जो इ. स. १६४५ च्या जानेवारी महिन्यामध्यें चार्लस राजानें आपलें वर्तन ठेवण्याचा तह व्हायचा होता, त्याचें धुरीणत्व व्हेन याच्याकडे होतें. त्या ठिकाणीं राजाच्या तर्फेचे, स्कॉचांच्या आणि बाजूचे पार्लमेंटच्या पक्षाचे प्रतिनिधि, मध्यस्थी करून आपसांतला तंटा मिटविण्यासाठीं हजर झाले होते. त्यात व्हेन, सेंट जॉन आणि प्रिडॉक्स हे मुख्य होते. तेथें होणाऱ्या तहासंबंधानें प्रथमपासूनच जरी कांहीं एक प्रश्न ठरलेला नव्हता, तरी स्कॉच लोकांचें असें म्हणणें पडलें कीं, 'राजानें सॉलेम लीग आणि कॉव्हिनेन्ट यांवर सही करून, त्यानें स्वतः तयार केलेल्या प्रार्थना-पुस्तकाला फांटा द्यावा आणि सर्वत्र प्रिसबिटेरियन पंथाचा प्रसार करावा. चार्लसाला जर हें कबूल असेल, तर आम्ही तह करायला कबूल आहोंत.'

स्कॉच लोकांच्या या म्हणण्याला नम्र होऊन चार्लस राजा जरी तह करण्यास त्यानें वीस दिवसांच्या मागून घेतलेल्या मुदतीनंतर कबूल झाला तरी व्हेन व त्याचे अनुयायी यांना शिबंदी आणि मतस्वातंत्र्य यांचा खंबीर पाठिंबा असल्यानें त्यांनीं तहाला संमति न देण्याचाच दृढ संकल्प केला. व्हेन यानें प्रिसबिटेरियन्स आणि राजा या दोहोंना अगदीं एकसारख्याच दाबांत ठेवलें असल्यानें त्याच्या दृढनिश्चयाचें त्यांना तावडतोब प्रत्यंतर आलें. खरें पाहिलें असतां

व्हेनचा इच्छित कार्यभाग होण्याची वेळ आतां अगदीं समीप येऊन ठेपली होती. प्रिसबिटेरियन पक्षाला नम्र होण्याची चार्लसची लवमात्र इच्छा नव्हती. ऐक्य करण्याची वीस दिवसांची मुदत संपत आली. शिबंदीसंबंधाचा योग्य विचार करण्यासाठीं पार्लमेंट भरवावें अशाबद्दल राजाचें मत वळवावें म्हणून पराकाष्ठेची खटपट करण्यांत आली. शेवटीं मोठ्या दुःसह आणि अत्यंत कंटाळवाण्या कृतीनें चार्लस नम्र होतो आहे असें जों दिसूं लागतें आहे तोंच मॉंटरोजनें स्कॉटलंडांत त्याच्या बाजूनें जय संपादन केल्याची त्याला वार्ता समजली. त्याबरोबर त्यानें नम्रतेचा त्याग करून नेहमींप्रमाणें तो कुयानें वागूं लागला, आणि संधी करण्याची गोष्ट त्यामुळें रसातळाला जाऊन कोठें दडून बसली तिचा मागमूसही लागेनासा झाला.

ही गोष्ट घडल्यानंतर बारा महिन्यांनीं पूर्वगोष्टीसंबंधानें पुन्हां पार्लमेंटशीं चर्चा करण्याची चार्लसाला इच्छा उत्पन्न झाली. कॉमन्सनीं पूर्वी ठरविल्याप्रमाणें जर आतां तह करण्याचें कबूल केलें तर चार्लस राजा त्याच्याजवळ असलेलें सैन्य दूर करण्यास त्याच्या ताब्यांत असलेली पांच ठाणीं सोडून देण्यास आणि वेस्टमिनिस्तर येथें जाऊन रहाण्यास आपण कबूल असल्याचें दर्शवूं लागला; परंतु पार्लमेंट सभेनें त्याच्याकडे लक्षच दिलें नाहीं. तसें करण्यास त्या सभेला दोन बलवत्तर कारणें होतीं. एक—राजाच्या सैन्याचा पुरा मोड नेस्बी मुक्कामीं आयर्न साइड्सनीं केला होता, आणि दुसरें, त्यामुळें राजाजवळ सैनिकांचा पूर्ण अभाव झालेला होता. एका कवीनें आयर्न साइड्ससंबंधानें पुढीलप्रमाणें वर्णन केलें आहे:—

Their heads all stooping low
Their points all in a row
Like a whirlwind on the trees, like a deluge
on the dykes.

राजाचें सर्व सामर्थ्य खचलें असल्याकारणानें प्रजेला त्याला भिण्याचें जरी कांहींच कारण राहिलें नव्हतें, तरी त्याच्या सूचनेकडे दुर्लक्ष करण्याचें कारण याहिपेक्षां जबरदस्त असें निराळेंच होतें. नेस्बीनंतर आयर्लंडांत त्याचा पराभव होऊन तो जरी आपण तह करण्यास तयार आहोंत असें दाखवीत होता, तरी त्याचें अंतस्थ वर्तन दुटप्पीपणाचेंच कायम होतें हें प्रजाप्रतिनिधींना पूर्णपणें

माहीत होतें. तशीं त्याचीं दुटप्पी वर्तनाचीं नीचतर पत्रें पकडण्यांत आलीं होतीं, व त्याचमुळें त्याच्या शब्दावरचा विश्वास उडाला होता. जीं वचनें पाळ-ण्याचें त्यानें मनापासून अंतर्यामीं नाकारिलें होतें, अशीं वचनें पाळण्याच्या शपथा उघडपणें घ्यायला तो तयार झाला होता असें त्याचीं पकडलेलीं पत्रेंच सिद्ध करीत होतीं. मागें सांगितल्याप्रमाणें पार्लमेंटच्या मताप्रमाणें आपण वागण्यास तयार आहोंत असें जरी तो बोलून दाखवीत होता, तरी त्यानें अंतस्थपणें आय-र्लंडांत आणि इंग्रजी वसाहतींत आपल्या पक्षाचें सैन्य उभारून प्रजापक्षाला पूर्णपणें पादाक्रांत करण्याच्या खटपटी जोरानें चालविल्या असल्याची माहिती प्रजाप्रतिनिधींना समजलेली होती. अशा तऱ्हेच्याच परंतु यापेक्षां कमी किंमतीच्या सूचना स्ट्रॅफर्डानें राजाला केल्यामुळेंच तो शिरच्छेदाच्या शिक्षेनें प्राणाला मुकला गेला. तेव्हां अशा दुष्ट आणि घातकीपणाचें चार्लसाचें वर्तन उघडकीस आल्यानें एकी करण्याचा तह होणें अगदींच अशक्य झालें.

व्हेन हा स्वतंत्र होऊं पाहाणाऱ्या प्रजाजनांचा अध्वर्यु असल्याची चार्ल-साची बालंबाल खात्री झाल्यामुळें सरतेशेवटीं निरुपायानें तो त्याच्याकडे आपल्या मनोरथाचें तोंड घेऊन वळला. राजाला लंडन शहरीं नेण्याची व्हेन युक्ति काढील काय? जर काढीत असेल तर राजसैनिकांनीं स्वातंत्र्याभिलाषी सैनि-कांना मिळून शत्रूपक्षाचे मानिलेले जे प्रिसबिटेरियन्स त्यांचीं जीं रोपें इंग्रजांच्या राज्यांत उगवलीं गेलीं होतीं तीं समूळ उपटून टाकण्यासाठीं झुंज करण्याची मसलत करण्याचें त्यानें योजिलें. चार्लस राजानें व्हेनला एक पत्र लिहिलें. त्यांत तो म्हणतोः—

'Be very confident that all things shall be performed according to my promise. By all that is good I conjure you to despatch that courtesy for me with all speed, or it will be too late. I shall perish before I receive the fruits of it......Trust me, I will repay the favour to the full.'

'विश्वास धर. माझ्या वचनाप्रमाणेंच सर्व गोष्टी घडून येतील. सर्वसाक्षी परमेश्वराची शपथ घेऊन सांगतों कीं, उचित अशा आदरातिथ्याचें व सन्मानाचें होईल. तितक्या घाईनें मला निमंत्रण धाड. नाहीं तर उशीर होईल. मनांत योजि-

लेल्या सत्कृत्यांचीं फळें मिळण्याच्या आधींच घात होईल............मी भरंवसा ठेव, मी तुझ्या उपकाराचा योग्य मोबदला देईन.'

या पत्राचें व्हेननें त्याला असें उत्तर लिहिलें कीं, 'सर्व गोष्टींत पार्लमेंट सभा हीच काय ती अधिकारी असून तिनें ठरविल्याप्रमाणेंच आपण वागलें पाहिजे आणि यापुढें आपण माझ्याशीं पार्लमेंटच्याचमार्फत राफ्ता ठेवावा हें उत्तम.'

अशा तऱ्हेचें व्हेनकडून उत्तर गेल्यावर चार्लस आणि व्हेन या दोघांचा जेव्हां प्रत्यक्ष सामना झाला तेव्हां चार्लसाचें भाग्य खरोखरीच अगदीं हताश स्थितींत जाऊन पोंचलें होतें. दोन वेळां तर तो सबंद रात्रभर निराशेनें विव्हळ होऊन तृणाहारी पशूप्रमाणें उन्हातान्हांतून गाऱ्या गाऱ्या भिंगोऱ्या करीत भटकत हिंडला. तो एकामागून एक असा तीनदां—स्कॉच, पार्लमेंट आणि सैनिक—इतक्यांच्या अगदीं तडाक्यांत सांपडल्यासारखाच झाला होता.

या प्रसंगानंतर चार्लस राजानें आइल ऑफ व्हाइटमध्यें आपल्या शिबिराचा तंबू ठोकला. त्या ठिकाणीं तो कसा जाऊन पोंचला याबद्दलची त्याची त्यालाच कांहीं माहिती नसून त्याला ती कोणी सांगितलीहि नाहीं. इतकेंच नव्हे तर त्या ठिकाणीं तो पाहुणा आहे किंवा कैदी आहे हेंहि त्याचें त्यालाच कळत नव्हतें. त्यानें त्या ठिकाणीं पुन्हां आपलें घातकी आणि दुष्ट असें दुटप्पी वर्तन सुरू केल्यामुळें पुनरपि त्याची स्थिति पहिल्यापेक्षांहि अत्यंत खेदजनक आणि अत्यंत अपरिहार्य अशी झाली. त्यानें वरकरणीं पार्लमेंटशीं तह करण्याचें ढोंग करून गुप्तपणें स्कॉच लोकांशीं तह करून तहनाम्यावर सहीसुद्धां केली. त्याच्या त्या तशा करण्यानें स्वजनप्रकोपाचें ( Civil war ) युद्ध पुन्हां सुरू झालें. क्रॉमवेलनें आपले लोहपार्ष्णी सैनिक ( iron-heeled boots ) बरोबर घेऊन हें उपस्थित झालेलें लचांड पार चिरडून टाकलें.

इतकी हकीकत घडलेली समजलें असतांहि चार्लस ज्या ठिकाणीं होता त्या ठिकाणाचा तो स्वतःला अजून आपण मालक आहोंत असेंच समजत होता. त्या वेळीं स्वातंत्र्याभिलाषी आणि प्रिसबिटेरियन्स यांमध्यें आणि त्याचप्रमाणें सैनिक व पार्लमेंटचें मताधिक्य यांमध्यें मोठा घातकी आणि विषारी तंटा उपस्थित झाला. किलकेनीच्या मूषकभक्षक बिडालांच्या कृतीप्रमाणें हे वरील दोन्ही पक्ष आपापसांत एकमेकांना निर्मूल करतील अशी चार्लसाला आशा उत्पन्न

झाली. तशा त्या त्यांच्या झगड्यांतच त्यांना नामशेष करून टाकण्यासाठीं टपून बसलेल्या त्यांच्या शत्रूंना साह्य करण्यास चार्लस अगदीं उतावळा झाला. त्याच्या मताप्रमाणें जर घडून येतें तर प्रजामतनाशनाचा जो त्याचा खरा हेतु तो सिद्धीस जाणें अगदीं सोपें झालें असतें. त्यानें लंडन शहरीं जाऊन आपण पार्लमेंटच्या मताप्रमाणें वागण्यास तयार आहोंत असें दाखविण्याची खटपट मोठ्या जारीनें सुरू केली. पार्लमेंट याच्या इच्छेप्रमाणें वागण्यास जरी तयार होतें तरी स्वातंत्र्याभिलाषी प्रजेचा म्होरक्या जो व्हेन तो त्याच्या म्हणण्याला व पार्लमेंटच्या मताला अनुकूल झाला नाहीं. तहाच्या अटींनीं जो चार्लस राजा कधींहि बद्ध व्हायचा नाहीं असें ज्यानें आपल्या आजपर्यंतच्या कृतीनें सिद्ध केलें आहे त्याच्याशीं इतउत्तर पार्लमेंटनें जरी सख्य केलें तरी तें निष्फळ होणार आहे असें व्हेननें मोठ्या जोरानें प्रतिपादन केलें. चार्लसानें जरी तह करण्याचें ठरविलें होतें तरी त्या तहाच्या अटी लंडन शहरीं पूर्ण करायच्या नसून आइल ऑफ व्हाईटमध्यें त्या पुऱ्या करायच्या होत्या आणि त्याप्रमाणें न्यूपोर्ट येथें अमीन या पदवीचे ( Commissioners ) अधिकारी धाडण्यांतहि आले होते. प्रत्येकानें राजाबरोबर सख्य करावें हीच त्यांची इच्छा होती आणि त्यांच्या मताप्रमाणें त्यांची कार्यसिद्धि होईल अशी कांहींना आशा वाटत होती व कांहींना तर खात्री वाटत होती. या बाबतींत व्हेन एकटाच काय तो निराश होता. चार्लस राजा कधींहि कोणाला नम्र येणारा नसून आपण नम्र आलों आहोंत, असें जरी त्यानें बाह्यात्कारें दर्शविलें तरी संधी येतांच सपाट्यासरसा तो आपलें वचन मोडण्यास आणि वर्तणूक बदलण्यास तयार होईल अशाबद्दल व्हेनची खात्री होती.

पुढें ज्या ज्या गोष्टी घडून आल्या त्या त्यांवरून व्हेननें जो त्याच्या वर्तणुकीचा अदमास ठरविला होता तोच प्रत्ययाला आला व व्हेनचें मत आणि म्हणणें या गोष्टी खऱ्या ठरल्या. तह झाल्यादिवसापासून त्याची पूर्तता होऊन त्यावर तीस दिवस लोटेपर्यंत तो निसटून जाण्याच्या खटपटी करणार नाहीं अशी त्यानें म्हणजे चार्लसानें जरी शपथ घेतली होती तरीपण त्यानें आयर्लंडांत फौज उभारण्याचा आणि पार्लमेंटच्या तावडींतून निसटून जाण्याचा प्रथमपासूनच बेत चालविला होता. एकामागून एक अशा त्यानें कमिशनर्सच्या गांठी घेऊन त्यांच्याशीं पवित्र गूढ सभांमधून ( Solemn Conclave ) वाग्युद्धें करून

एकदां चांगला स्वच्छ करारनामा त्यांच्यापासून करून घेण्यासाठीं आपण फारच उतावळे झालों आहोंत असें त्यानें त्यांना दर्शविलें; परंतु खरें पाहिलें असतां अशा तऱ्हेचा करारनामा करून घेण्याचें त्याच्या मनांत मुळींच नव्हतें. त्यानें आपल्या एका खाजगी मसलतगाराला गुप्तपणें This new negotiation will be derisive, like the rest, there is no change in my designs हा नवा संधिक्रम इतरांप्रमाणेंच उपहासगर्भवत् होइल, माझ्या ठाम मतांत लवमात्र फरक नाहीं असें लिहिलें. कधीं कधीं तो इकडे आपण नम्र आलों आहों असें दाखवून तिकडे आपल्या मित्रांना लागलींच तशी आपली इच्छा कधींच नव्हती असें लिही.

ता. ९ ऑक्टोबर रोजीं सकाळीं सर्व सैन्याचा ताबा दोनशें वर्षेपर्यंत पार्लमेंटच्या हातीं असावा असें त्यानें आपलें मत दिलें व लगेच सायंकाळीं त्यानें वुइल्यम हॉप्‌किन्सनला असें लिहिलें कीं, ' My great concession this morning was made only with a view to facilitate my approaching escape '–आज प्रातःकाळीं मीं जी मोठी कबूली दिली आहे तिचा उद्देश अगदीं समीप येऊन ठेपलेल्या माझ्या सुटकेचा रस्ता सुगम व्हावा यापेक्षां अधिक नाहीं. चार्लसानें याशिवाय त्याच्या बाजूनें होणारे आयर्लंडांतील बंडावे जागच्या जागीं दडपून टाकण्याचें वचन देऊन लगेच ऑयर्लंडच्या मार्क्विसला असें लिहिलें कीं, " Obey my wife's orders, not mine, nor trouble yourself about any concessions as to Ireland, they will lead to nothing. " माझ्या बायकोचे हुकूम मान, माझे नको, आणि आयर्लंडाच्या कबुलीसंबंधानें त्रास करून घेऊं नको, त्यांत कांहीं तथ्य नाहीं.

स्वातंत्र्याभिलाषी आणि सैनिक यांना याबद्दलचा बराच संशय येऊन त्यांचीं मनें अस्वस्थ झालीं. सर्वांबरोबर आकुंचित दृष्टीच्या राजालाहि जागृत करून त्यांनीं स्पष्टपणें असें जाहीर केलें कीं, त्याची इच्छा पूर्णपणें कालस्वरूपाची करालहृदयी असून अनेक दिवस उपोषणें पडलेल्या व्याघ्रमुखाची झालेली आहे. चार्लस राजानें चालविलेल्या नीचतर भ्रमणाची घरघर जर यापुढें बंद केली नाहीं तर ते तावडतोब आपल्या मताप्रमाणें सर्व गोष्टींचा योग्य वाटेल तसा बंदोबस्त करतील. हें ऐकून चार्लस घाबरला. तो नम्र आला असें म्हणण्यापेक्षां नम्र येण्याचें त्यानें ढोंग

केलें हेंच म्हणणें सयुक्तिक होईल. त्याच दिवशीं म्हणजे ता १४ नोव्हेंबर रोजीं सर्व अमीन (Commissioners) लंडनकडे जाण्यासाठीं मोठ्या त्वरेनें निघाले.

सर्व अमीन लोक लंडन येथें येऊन पोंचतांक्षणींच त्यांनीं कॉमन्सनां राजाचें उत्तर कळविलें. ता. १ डिसेंबर रोजीं प्रिस्बिटेरियन पंथाच्या एका धुरीणानें तें राजाचें उत्तर मनःशांति होण्याजोग्या मतांनीं ग्राह्य धरलें तर चालेल असा एक वाद पुढें मांडला. व्हेननें ज्यांचें धुरीणत्व पतकरलें होतें असे जे स्वातंत्र्याभिलाषी, ते लागलींच त्याबद्दल मोठ्या भीषणतेच्या कडाक्याचा वादविवाद करूं लागले. तो वाद तीन दिवस आणि एक रात्र इतका वेळ मोठ्या कराल स्वरूपाचा झाला. त्यावेळीं व्हेननें जें जोराचें संभाषण केलें त्यापैकीं फक्त दहा वीस शब्दांचें जें एक सारभूत वाक्य आम्हांला क्ल्यारिंडनच्या पृष्ठावर वाचायला सांपडलें तें येणंप्रमाणें–

'By this debate we shall understand who are the king's party in the house and who for the people.

या वाग्वादानें राजपक्षीय कोण आहेत आणि प्रजापक्षीय कोण आहेत याचा आम्हांला उलगडा झाला.

त्यानें केलेला तह आणखी कांहीं महिने तसाच चालला; परंतु अखेरीस रुकार देण्यास राजा कबूल आहे असें जरी दिसूं लागलें होतें तरी आजपर्यंत त्यानें स्वतः दिलेल्या वचनांनीं तो कधींच बद्ध होऊन राहिला नसल्याचा अनेकदां अनुभव आला असल्याकारणानें त्यांनीं त्याचें म्हणणें नाकारलें. "राजावर विश्वास ठेवूं नका" असें व्हेनप्रमाणेंच हजारों लोक गर्जना करूं लागल्यामुळें राजाला पुनः बोलवायचा नाहीं असा जो पार्लमेंटनें आपला निश्चय केला होता तोच कायम करण्याचें ठरलें. व्हेननें तीच गोष्ट पुढें मांडून सर्वांस त्याप्रमाणें वागण्यास उद्युक्त केलें आणि इतउत्तर राजाशीं कोणच्याहि प्रकारचें दळणवळण ठेवायचें नाहीं असें ठरवून "प्रजाप्रभुत्व" ('Common wealth) करण्याचा जो मार्ग आंखला होता त्याच मार्गानें राजावांचून आक्रमण करण्याचें ठरविण्यांत आलें.

पार्लमेंटच्या दोनशेंचव्वेचाळीस मतदार सभासदांपैकीं फक्त छत्तीस मतांनेंच मताधिक्य ठरवून राजाचें उत्तर मनाची शांतता करण्याजोगें असून शांतता आणि तह करण्यास योग्य आहे असें प्रसिद्ध करण्यांत आलें. सैनिकांनीं त्यामुळें सर्वच राजयंत्राचा ताबा आपल्या हातीं घेतला. ते स्वातंत्र्याकरतां लढले

होते, त्यांनीं तें मिळविलें होतें आणि आतां तमासगिरांप्रमाणें बाजूला उभे राहून त्यांनीं मिळविलेल्या जयाचीं फळें नासधूस झालेलीं पाहण्यास ते मुळींच तयार नव्हते. पार्लमेंटचे जे सभासद राजाच्या मर्जीप्रमाणें वागण्यास तयार झाले होते त्यांना ता. ६ डिसेंबर रोजीं सकाळीं कर्नल प्राईड यानें सभेंतून हांकून लाविलें. त्यावेळीं राष्ट्राकरतां सैन्याला वास्तविक जरी स्वातंत्र्य मिळालें असतें तरी तच मिळविण्यासाठीं फौजेला स्वतःच्या शत्रुत्वाची अल्पशी संवय करायची होती.

याच वेळीं व्हेन हा आपल्या पक्षापासून दूर झाला; कारण त्याला सेनेचें प्रभुत्व नको होतें. राष्ट्रामध्यें सर्व लोकांच्या मतस्वातंत्र्यानें उभारलेली प्रजाहितैषी व्यक्तींची जी सभा तीच ( House of commons ) हौस ऑफ कॉमन्स हांच अधिकारमध्यवर्ति शक्ति आणि तीच राजा समजावा असें एक उत्कृष्ट तत्त्व व्हेन धरून बसला होता. त्याच सभेच्या हातीं राष्ट्रराज्यचालकाचे सर्व अधिकार असावेत असें त्यानें आपलें मत प्रगट केलें होतें. राज्यव्यवस्थाचालक व्यक्तींच्या हातून मूर्खपणानें जर अधिकाराचा दुरुपयोग होऊं लागला आहे असें दृष्टोत्पत्तीस येऊं लागलें तर तो होऊं न देण्याची व्यवस्था करण्याचा हक्क फौजेकडे न राहतां ज्यांनीं त्या व्यक्तींची निवड केली असेल त्यांच्याकडेच त्यांना कामावरून दूर करण्याचा अधिकार राहिला पाहिजे असें त्याचें म्हणणें होतें.

चार्लसानें जें करण्याचा प्रयत्न केला होता तेंच करण्याचा फौजेनें सध्यां प्रयत्न चालविला होता. राजानें जें करण्याचें योजिलें होतें तें जर झालें असतें तर त्याला जर 'बलापहार' अशी संज्ञा बिनदिक्कत देण्यास कमी केलें नसतें तर सैनिकांच्याहि हातून जर तसेंच घडेल तर त्या कृत्यालाहि 'बलापहार' असेंच म्हणायला पाहिजे होतें.

अशा स्थितींत व्हेन हा जरी आपला पक्ष सोडून अलग झाला होता तरी तो त्या पक्षाच्या कधीं विरुद्ध गेला नाहीं. आतां तर कॉमन्स आणि सैनिक या दोहोंशींहि त्याचा बेबनाव झाला. चार्लस राजावर विश्वास ठेवण्यांत कॉमन्स मूर्खपणा करताहेत हें तो जाणून होता. कॉमन्सच्या मतावर अवलंबून राहण्यांत सेनाहि घोडचूक करते आहे याबद्दल त्याची खात्री होती. त्याला जो रस्ता खुला आणि बिनधोक दिसला त्याचें त्यानें अवलंबन केलें. त्यानें सार्वजनिक चळवळीकडे आपली पाठ करून डिसेंबरच्या प्रारंभींच तो एकांताच्या आणि शांत अशा रेबी नांवाच्या किल्ल्यांत स्वस्थपणें जाऊन राहिला.

रेवी किल्ल्यांतील व्हेनची विविक्तप्राप्ति फार दिवस टिकली नाहीं. सुमारें तीन महिन्यांतच पुनः राजकीय घटनाचातुर्यांत उघडपणें पडण्याबद्दल त्याचें मन वळविण्यांत अ लें. ज्या शोकपर्यवसायी आणि रक्तपाती प्रवेशांत चार्लस राजा नायक होता तो प्रवेश व्हेनच्या पुनरागमनानें पूर्ण झाला. इंग्लंडांतील प्रजेच्या नांवानें जाहीरनामा काढून चार्लस राजावर-प्रजापीडक, मिथ्याप्रतिज्ञ आणि वधोद्यत असे तीन आरोप ठेवण्यांत आले आणि इ. स. १७८९ फेब्रुवारी तारीख ९ रोजीं व्हाइटहॉल येथें त्याचा शिरच्छेद करण्यांत आला. ही गोष्ट ऐकून जगामध्यें सुधारणेनें भिले बनलेले लोक भ्याडपणाचे सुस्कारे टाकूं लागून अचंब्यानें थक्क झाले आणि प्रजापीडन हेंच आपलें कर्तव्य आहे असें समजणारे राजे आपापल्या सिंहासनांवरून अंतस्थ वेदनांनीं डळमळूं लागले व प्रलय काळ समीप आला असा त्यांना भास होऊं लागला.

खम् ठोकून राजकीय आखाड्यांत कुस्ती करण्यासाठीं उतरणें हें जरी व्हेनला आतां पुनः मोठें अवघड काम आहे असें वाटत होतें तरी क्रॉमवेलनें त्याचीच पूर्ण मदत घेण्याचा निश्चय केला होता. नवें राज्यचालकमंडळ निवडून त्याच्याच तंत्रानें राज्यचक्र चालविण्याचा क्रॉमवेल व त्याची मित्रमंडळी यांनीं जो बेत केला होता त्यामुळें व्हेनच्या बुद्धिकौशल्याला किंवा लौकिकाला यत्किंचितहि धक्का लागण्याचा संभव नव्हता. यानंतर कांहीं कालानें राज्यसंस्थानाच्या व्यवस्थापकांमध्यें व्हेननें अंतर्भूत व्हावें म्हणून क्रॉमवेलनें त्याचा एकसारखा पिच्छा पुरविला होता. परंतु राजसंस्थानाचा सभासद होण्यास जी शपथ घ्यावी लागत असे तिची आडकाठी दाखवून व्हेननें जें क्रॉमवेलचें म्हणणें साफ नाकारलें त्याचें कारण त्याला शपथ घेण्याचा मायना पसंत नव्हता हें होतें. क्रॉमवेलनें स्थापन केलेल्या मंडळाची ठराविक शब्दांत शपथ घेतली असतां राजाच्या निंदाव्यंजक वर्तणुकीबद्दलच्या न्यायाच्या आणि शिरच्छेदाच्या बाबतींत आपली पूर्ण संमति होती असें सिद्ध होईल अशी जी व्हेनला मानसिक भीति वाटत होती त्याचें प्रत्यंतर त्याच्यावर पुढें आरोप येऊन त्याचा जेव्हां न्यायासनापुढें न्याय चालला होता तेव्हां आलें. त्याच्यावर आलेल्या आरोपाचा जेव्हां न्यायदरबारांत न्याय चालला होता, तेव्हां 'I utterly refused, and would not accept of sitting in the Council upon these terms'-ती गोष्ट मीं पूर्णपणें नाकारून त्या कलमांप्रमाणें शिष्टमंडळांत बसण्यास तयार नव्हतों.

इतकेंच नव्हे तर ' I had not in the least any consent in, or approbation to the death of the king and I occasioned a new oath to be drawn '—राजाचा शिरच्छेद करण्यांतहि माझा सल्ला नसून मला तें कृत्य कोणाच्याही तऱ्हेनें आवडलें नाहीं. त्यावेळीं घेण्याच्या शपथेपेक्षां निराळीच एक शपथ घेण्याची मीं सूचना केली असतां तिचा त्याग करण्यांत आला, असेंहि त्यानें स्वच्छपणें सांगितलें. त्या नरश्रेष्ठांत जे अद्वितीय गुण प्रकाशमान होत होते तेच त्याच्या सर्व आयुष्याची वाखाणणी करणारे असे सर्वतोमुखीं आश्चर्यकारक होऊन बसले होते.

दैवदुर्विपाक फार मोठा चमत्कारिक आहे. इंग्लंड त्या वेळीं त्याच्याच फेन्यांत सांपडल्यामुळें त्याला व्हेनकडून आपली सेवा फार वर्षे करून घेण्यापासून परांङ्मुख व्हावें लागलें. चार्लस राजाच्या नीच आणि कपटी वर्तनानें राष्ट्रांत जो दंगा झाला त्याच्या मुळाशीं प्रथमपासूनच क्रॉमवेल आणि व्हेन हे दोघे एकमतानें जरी कार्यभाग उरकीत होते तरी आतां मात्र त्यांच्या त्या एकमताचीं दोन मतें होण्याजोगा दोघांच्या अंतःकरणांत तीक्ष्ण फरक पडला. नुसतें राज्यपदच नव्हे तर पार्लमेंट आणि त्यांतील स्वातंत्र्यप्रिय लोकांचीं मनेंहि चोरून सर्वस्व आपल्याकडे असावें अशा तऱ्हेच्या खटपटी क्रॉमवेल करीत असल्याचा व्हेनला वास येऊं लागला. व्हेन आणि त्याचे निःसीम अनुयायी यांनीं त्या त्याच्या खटपटी बंद करण्याचा शांतपणें उपक्रम सुरू केला. व्हेन आणि क्रॉमवेल यांचा त्या बाबतींत स्पष्टपणें जरी उघडा उघड सामना झाला नाहीं तरी हलके हलके त्या द्वेषाच्या ज्वाला भडकूं लागून अखेरीस त्यांचा तीक्ष्ण प्रचंड लोळ दिसूं लागला. ज्या मुद्यामुळें त्या दोघांत स्पष्टपणें तंटा लागला होता तो असा होता कीं, लॉंग पार्लमेंटचा उच्छेद करून तींत बसण्यास नवे सभासद कसे निवडतां येतील ? सर्व राज्याचें धुरीणत्व आपल्याकडे घेऊन सर्वस्वाचे मालक आपणच व्हावें आणि आपण आपल्या मनाप्रमाणें राज्यकारभाराचा गाडा चालवावा अशाबद्दल क्रॉमवेल फारच उतावळा झाला होता.

क्रॉमवेलला जी ही महत्वाकांक्षा उत्पन्न झाली तिच्याबद्दल खरें पाहिलें असतां लौकिकी न्यायानें त्याला दोष देणें व्यर्थ होणार आहे. कारण प्रजाप्रभुत्वाचें तारूं जर अक्षोभित अशा पाण्यांतून चालवायचें असेल तर तें चालविणाऱ्या बलवंतानें नुसत्या राजमुगुटावरच दृष्टी न ठेवतां, त्याच्या मनाला जें न्यायाचें असें

दिसून येईल आणि जो मार्ग उत्तम आहे असें त्याची बुद्धी त्याला सांगेल तोच त्यानें पत्करून, पार्लमेंट किंवा इतर कोणीहि तें तारूं शांतपणें बल्हविणाऱ्याला अवाक्षरहि बोलतां उपयोगी नाहीं असें तो समजत होता. नेहमींच्या व्यवहारांत दृष्टीस न पडणारा असा एखादा रोग जर एखादा वैद्य आपल्या औषधोपचारांनीं बरा करण्याच्या मनापासून खटपटी करूं लागला तर त्याला तो रोग बरा करण्याच्या कामांत, विद्यालयांत काळजीपूर्वक शिकलेल्या कांहीं साधनांचा कांहीं प्रसंगीं त्याग करावा लागून समयोचित असा कांहीं नवाच व जनतेच्या नापसंतीचा आणि नव्याच व्यवस्थेचा अवलंब करावा लागतो. इंग्लंडला कोणचा रोग जडला आहे व त्यांतून त्याला कसा बरा केला पाहिजे याची चिकित्सा क्रॉमवेलला त्या वेळीं बरोबर कळली होती. क्रॉमवेल राजकीय वातावरणाच्या नाडीपरीक्षेंत त्या वेळीं उत्तम वाकब नाडीपरीक्षक वैद्य बनला होता. प्रिस्बिटेरियन्स किंवा रॉयलिस्टस् यांनीं जो राज्यभार वाहण्याचा मार्ग धरला असता त्यापेक्षां प्रजाप्रमुखाचें राज्य चालविण्याचा क्रॉमवेलानें अवलंबिलेला मार्ग अत्यंत अवर्णनीय होता यांत संशय नाहीं असें कांहीं इतिहासकारांनीं स्पष्ट म्हटलें आहे. दोन्ही तटांत ऐक्य केल्यानें सर्व राज्यांत मताधिक्य कधींहि होणार नाहीं असें जें त्याचें मत होतें तेंच बरोबर होतें. कारण, बाह्य त्कारें दोन्ही पक्षांचा समेट होऊन, पार्लमेंटांत जरी उघडपणें मताधिक्य ठरवितां आलें असतें तरी त्या मताधिक्यानें ठरविलेल्या कायद्याचा प्रभाव पडण्याच्या आधींच सर्व राज्य लयाला गेलें असतें; पण नाहीं ! तसें होतां उपयोगाचें नव्हतें ! राज्यांतली सर्व अव्यवस्था मोडून टाकून त्याचा सर्व भार आपण कोणच्या युक्तीनें उचलून कोणच्या मार्गानें व कसा वाहून नेतों आहोंत याबद्दलचा मासला प्रजाजनांनीं चाखला पाहिजे आणि तसें होईपर्यंत आपण व्यावहारिक रीत्या निर्बंध असा राज्यकारभार केला पाहिजे असें क्रॉमवेलला वाटलें.

क्रॉमवेलच्या या मताशीं व्हेनचें मत मिळेना. पण त्याबद्दल त्यालाहि दोष देणें व्यर्थच होय. कारण असें करण्यांत क्रॉमवेलचे हेतु आमच्या म्हणण्याप्रमाणें शुद्ध स्वरूपाचेच होते हें समजण्यास व्हेनला त्या वेळीं कांहींच मार्ग नव्हता. व्हेनला जर त्या वेळीं क्रॉमवेलच्या शुद्धान्तःकरणाचें योग्य ज्ञान झालें असतें आणि त्यानें त्याच्या मताला आपल्या मताचा जर पाठिंबा दिला असता तर राज्याचा अध्यक्ष खरोखरच फार मोठ्या किंमतीच्या योग्यतेचा निवडला गेला असता. पार्लमेंटांत जमलेले प्रजापक्षीय प्रतिनिधी राष्ट्राच्या स्वातंत्र्याचे खरे रक्षक आहेत असें

तो समजत होता. परंतु हें तत्त्वहि बाजूला ठेवून कांहीं अडचणींच्या प्रसंगीं अनेक व्यक्तींच्या हातून कारभार काढून एकाच व्यक्तीच्या माथीं मारणें हें ज्याप्रमाणें उचित असूं शकतें त्याचप्रमाणें व्हेनला याप्रसंगीं करतां आलें नसतें काय? पण नाहीं! या वेळीं राष्ट्रीय स्वातंत्र्यापासून काडी मोडून घेऊन क्रॉमवेल हा त्याचें नुसतें बाह्यात्कारीं स्तोम दाखवीत होता. ज्या जुन्या बलापहांराला त्यानें छिन्नविच्छिन्न केलें होतें त्यालाच त्यानें तो आपल्या हृदयाशीं घट्ट धरून त्याचीच त्यानें पुन्हां प्राणप्रतिष्ठा करण्याची जारीनें खटपट चालविली होती.

यानंतर कांहीं वर्षांनीं राज्यसंरक्षक परलोकीं जाऊन व्हेनला पार्लमेंटाची प्राप्ति झाल्यावर रिचर्ड क्रॉमवेलला जेव्हां कामावरून दूर करण्यांत आलें आणि पदच्युत झालेल्या चार्लस राजाच्या मुलाला गादी मिळाली तेव्हां व्हेनचीं स्वतःचीं तत्त्वें जरी पूर्णपणें विकसित झालेलीं होतीं तरी कांहीं अडचणींच्या प्रसंगीं कांहीं काळ स्वमत बाजूला ठेवावें लागतें हें त्याच्या लक्षांत येऊन आपलीं मतें कांहीं काळ बाजूला कशीं ठेवावींत याबद्दचा विचार करण्यांत तो निमग्न झाला. शेवटीं इंग्लंडचें स्वातंत्र्य सद्यःस्थितीप्रमाणें पुढेंहि कायम राहण्यास पार्लमेंटचें सध्यांचें श्रेष्ठत्व कुचकामाचें असून, क्रॉमवेलनें पतकरलेला रस्ताच खऱ्या फायद्याचा होता असें त्यानें ठरवलें.

प्रजाप्रतिनिधींच्या हातीं राज्याचा अधिकार ठेवून नंतर जर क्रॉमवेलनें नुसतें राज्यसंरक्षकाचेंच नव्हे तर राजाचेंहि स्थान व्यापलें असतें तरी व्हेननें त्याला कधींच अडथळा केला नसता. कारण प्रजेनें एकमतानें निवडून दिलेले प्रतिनिधि ह्या आपल्या आदितत्वाच्या इमारतीच्या पायाच्या कोनशिलाच होत असें तो समजत होता. प्रजेमध्यें जर एकी असेल आणि प्रजाजनांच्या मतांप्रमाणें जर आपण वागलों तर सरदार लोकच काय परंतु राजाहि स्थानापन्न असूं शकेल अशी त्याची समजूत होती. व्यावहारिक रीत्याच नव्हे तर अंतर्बाह्य स्वरूपातसुद्धां राज्याचा सर्व अधिकार प्रजाप्रतिनिधींच्या हातीं असेपर्यंत क्रॉमवेलच्या इच्छेच्या आड येण्याची व्हेनची इच्छा नव्हती. इंग्लंडमध्यें सध्यां ज्या तऱ्हेनें राज्य हांकलें जातें आहे ती वेळ त्या काळीं असती तर खचींत व्हेनचेंच म्हणणें सर्वसंमत झालें असतें. व्हेन हा चार्लसाच्या विरुद्ध झाला खरा, पण तो राजा होता म्हणून नव्हे तर त्यानें स्वतःसंबंधानें प्रजापीडकत्व दाखवून आपण स्वतंत्र आहोंत असें दाखविण्याचा

प्रयत्न केला म्हणून ! आम्हीं जें व्हेनसंबंधानें तो स्वातंत्र्याभिलाषी होता असें म्हटलें आहे, तें त्याचें अभिलाषित्व कोणच्या प्रकारचें होतें हें मात्र नीट ध्यानांत ठेवलें पाहिजे. इंग्लंडचें राज्य प्रजाप्रतिनिधींच्याच संमतीनें पूर्णपणें चाललें असतें आणि त्या प्रतिनिधींच्या संमतीशीं राजाचें ऐक्य असतें अथवा नसतें तरी व्हेनला किमपीहि वाईट वाटलें नसतें. कारण तें राजयंत्र मग नियंत्रित वीर्याचें सार होऊन त्याच शक्तीवर तो आनंदांत स्वस्थ राहिला असता आणि त्यानें त्याबद्दल यत्किंचितहि भांडण केलें नसतें. व्हेन भेदरला खरा, पण खात्रीनें निष्कारणपणें नव्हे ! क्रॉमवेलनें पार्लमेंटवर स्वार होऊन प्रतिक्रिया करण्याचा जो बेत केला त्याला तो भ्याला.

इ. स. १६५३ च्या एप्रिलच्या २० व्या तारखेस या बाबतींत मोठा कडावयाचा तंटा उपस्थित झाला. ‘ राज्यांतील स्वास्थ्य आणि त्याचा अव्याहत नियंत्रित क्रम चालण्यास राजेपणाच्या अधिकारानें यत्किंचितहि फायदा होणार नाहीं ’ अशा तऱ्हेचे जे वादविवाद नेहमीं चालत असत त्याचअन्वयें एके प्रसंगीं प्रतिनिधींच्या बैठकींत क्रॉमवेल वादविवाद करीत असतां, एकाएकीं एक हरकाऱ्या अतित्वरेनें अशी एक बातमी घेऊन तेथें आला कीं, ज्या योगानें क्रॉमवेलाचें महत्व अजिबात दडपून टाकिलें जाईल अशा तऱ्हेच्या खटपटी प्रजाजन मोठ्या झपाट्यानें करीत आहेत. या कामांत प्रतिनिधिमंडळानें ती हकीकत पूर्णपणें ऐकून घेऊन आपली संमति दर्शविण्याची घाई करावी म्हणून व्हेननें भारीच जोराची आणि उतावळीची खटपट चालविली होती. क्रॉमवेलनें प्रतिनिधींशीं वादविवाद करण्याचें एकदम बंद केलें. तो एकदम प्रजाप्रतिनिधींच्या गृहाजवळ हत्यारबंद सैनिकांची एक तुकडी घेऊन गेला. त्या तुकडीला त्या गृहाच्या उपगृहांत ठेवून तो मंडलागारांत गेला आणि स्वस्थानापन्न झाला. तेथें चाललेला वादविवाद त्यानें कांहीं वेळपर्यंत स्वस्थपणें ऐकला. प्रश्नोत्तरांची वेळ आल्याबरोबर त्यानें एकदम स्वतः उठून बोलण्याची सुरुवात केली. त्यानें प्रथम तेथें सुरू असलेल्या विषयावर बोलण्यास सुरुवात करून लागलीच तो त्या विषयाकडून वळला, आणि ज्या योगानें आजपर्यंत केलेल्या सर्व कृत्यांची राखरांगोळी होणार आहे असा प्रिस्बिटेरियन पंथ अमलांत आणण्याच्या खटपटी सुरू असल्याबद्दल त्यानें तेथील मंत्रीमंडळावर [illegible] [illegible] करण्याची सुरुवात केली.

" ज्याला सर्व प्रजाजनांकडून अलौकिक मान मिळाला आहे अशा मंत्रिमंडळापैकींच एका थोराच्या तोंडून असे उद्गार निघणें हें मोठें आश्चर्यकारक आहे " असें व्हेन मध्येंच जोरानें बोलला.

व्हेनचें तें वाक्य ऐकून क्रॉमवेलच्या तळव्याची आग मस्तकाला गेली. त्यानें आपलें शिरोभूषण चढविलें आणि हातपाय आपटीत तो मोठ्या जोरदार आवाजानें म्हणाला, " मी आपल्याला साफ सांगतों कीं, आपण एकटे म्हणजे कांहीं संयुक्त पार्लमेंट नव्हे. आपल्या बडबडण्याचा मी आतांच शेवट लावतों. आपल्याला लज्जेची थोडी जरी चाड असेल तर हें गृह आपण एकदम सोडून चालते व्हा आणि विश्वसनीय आत्म्यांना बसायला जागा खुली करा."

इतकें बोलून त्यानें अधिकाराची अल्प मूल्य अशीं आभरणें ( Bauble ) आणि राजदंड हीं काढून घेतलीं. त्यावेळीं लेंट हॉल म्हणून जो वक्ता भाषण करीत होता त्याला त्याच्या आसनावरून त्यानें दूर ढकलून दिलें आणि सर्व मंत्रिमंडळाला तेथून निघून जाण्यास फर्माविलें. नंतर त्यानें स्वतः प्रत्येक प्रतिनिधीचा झगा आपल्या हातीं धरून त्यांची नालस्ती करीत, त्यांना गचांड्या मारून एकामागून एक असे त्या सभागृहांतून हांकून लाविलें.

व्हेनचा झगा धरून त्याला गचांडी मारण्यासाठीं जेव्हां तो त्याच्या जवळ गेला तव्हां व्हेन म्हणाला, " हें तुमचें वर्तन अविश्वसनीय असून, सर्व-साधारण विश्वास आणि सद्व्यवहारशास्त्र या दोहोंची पायमल्ली करणारें आहे. हें तुमचें वर्तन अत्यंत गर्हणीय आणि अयोग्य आहे "

" हाय हाय ! सर हॅरी व्हेन ! सर हॅरी व्हेन ! " क्रॉमवेल उद्वेगानें म्हणाला, "तूं मला प्रत्यक्ष ऐंद्रजालिक सर्पमुखी दिसतो आहेस ! तुझ्यांत सर्वसाधारण विश्वासाचा लवलेशहि दिसत नाहीं. परमेश्वरा, याच्या तडाक्यांतून मला सोडीव ! "

प्रजाप्रतिनिधीमंडळाच्या गृहाचे दरवाजे बंद होतां क्षणींच व्हेन आणि क्रॉमवेल या दोघांमधल्या फार दिवसांच्या स्नेहाचें नातें व प्रेम यांचींहि कपाटें लागलीं गेलीं. क्रॉमवेलच्या मदोन्मत्तपणानें व्हेनच्या हृदयावर वज्राघात झाला. क्रॉमवेलनें पार्लमेंट सभा पार उधळून लावली. राजानें स्वातंत्र्याचें झाड. तोडून त्याच्या फांद्या जरी इतस्ततः खुडून टाकल्या होत्या तरी क्रॉमवेलनें तें झाडच समूळ उपटून मोठ्या तिरस्कारानें एकीकडे फेंकून दिलेलें पाहून व्हेन हताश झाला आणि मोठ्या दुःखानें भग्नहृदय होत्साता तो पुन्हां एकवार रेबी नामक किल्ल्यांत विविक्तवृत्तीत रहाण्यास चालता झाला.

यानंतर सुमारें साडेतीन वर्षांनीं व्हेनला दुर्दैवानें कॅरिसब्रूक नांवाच्या किल्ल्यांत राजकीय कैदी होऊन रहावें लागलें. हें कृत्य क्रॉमवेलनेंच केलें. उपशम प्रश्न-( A healing question ) या शिरोलेखाचें व्हेनच्या हातचें जें एक पत्रक ऑलिव्हर क्रॉमवेलच्या दृष्टीस पडलें व त्यानें त्याला जो संताप उत्पन्न झाला तोच व्हेनच्या कारागृहवासाचें कारण होय. व्हेन हा स्वभावतः अती सभ्य आणि सरळ असल्या कारणानें, आपल्या लेखाचा परिणाम क्रॉमवेलच्या मनावर चांगलाच होईल असें त्याला वाटलें, आणि म्हणूनच त्यानें तो प्रसिद्ध केला. व्हेनसारख्या आपल्या जुन्या व हुशार जोडीदाराला तुरुंगांत टाकतांना क्रॉमवेलला जरी दुःख झाल्यावांचून राहिलें नाहीं, तरी उपाय काय? त्यावेळीं व्हेनला जर त्याच्या मताप्रमाणें आसरा मिळाला असता तर त्याला तुरुंगवास खात्रीनेंच भोगावा लागला नसता. त्यानंतर कांहीं महिन्यांनीं राज्यसंरक्षक क्रॉमवेलानें व्हेनला कारागृहवासांतून मोकळें केलें. त्यानंतरहि कांहीं महिन्यांनीं क्रॉमवेलला पुन्हां त्याला तुरुंगांत टाकण्याची वासना झाली असती; परंतु ती गोष्ट त्याच्या हातुन होणें शक्य नव्हतें. कारण तो त्याच्या सुटकेनंतर अल्पावकाशांतच मृत्युमुखीं पडला.

दुसऱ्या चार्लस राजाला जेव्हां सिंहासनाधीश करायचें ठरलें जेव्हां, स्टुअर्ट घराण्याला जर आपल्या शब्दाची किंमत असती तर व्हेन सुरक्षित राहिला असता हें खास! क्रॉमवेलनें किंवा राजपक्षीयांनीं व्हेनचे चालविलेले रानटीपणाचे हाल बंद करून त्याला मुक्त करावा असें जें पार्लमेंटनें दुसऱ्या चार्लस राजाला सुचविलें होतें तें त्यानें कबूल करून पार्लमेंटच्या मताप्रमाणें व्हेनची सुटका करण्याचें त्यानें वचनहि दिलें होतें; परंतु स्टुअर्ट घराण्याच्या शपथा म्हणजे केवळ थट्टास्पद म्हणीप्रमाणें फोलकटेंच असल्याकारणानें दुसरा चार्लस हा अभिषिक्त राजा झाल्यानंतरहि बरच आठवडेपर्यंत व्हेन हा लंडनमधील टॉवर नांवाच्या तुरुंगांत अत्यंत कष्टदायक स्थितीचा उपभोग घेत खिचपत पडला होता. क्रॉमवेलनें व्हेनची तुरुंगांतहि जी अवर्णनीय अशी उत्तम व्यवस्था ठेविली होती तिच्यांत आणि त्याच्या सध्यांच्या दुसऱ्या चार्लस राजाच्या कारकीर्दींतल्या तुरुंगवासाच्या स्थितींत माणूस आणि सैतान यांच्या अंतराइतकें अंतर होतें. सिली बेटांपैकीं एका ओसाड आणि निर्जन किल्ल्यांत व्हेनची टॉवरच्या तुरुंगांतून रवानगी करण्यांत आली. त्या वेळीं त्याच्या कुटुंबाशीं आणि त्याच्या मित्रमंडळीशीं त्याची फारकत झाल्यामुळें त्यानें आपला वेळ लेखनव्यवसायांत घालविण्याचा

निश्चय केला. पारमार्थिक आणि आत्मैकाग्रता या दोन शास्त्रांमध्यें त्याचें जें उदोदितचें शांत वर्तन आणि निःसीम स्वरूप दिसत असे त्यालाच अनुसरून त्याचे विचार तेथें प्रगल्भावस्थेंत कागदावर उतरूं लागले. जें पुराणें शास्त्र अत्यंत परिपक्वदशेस जाऊन पोंचलें होतें त्या पारमार्थिक आणि आत्मैकाग्रतेच्या शास्त्रांच्या संमिश्रणाच्या उदात्त विचाराचे लेख त्याच्या त्या कारागृहवासांत मकरंदपरिप्लुत अशा त्याच्या ओजस्वी लेखणींतून बाहेर पडूं लागले. ज्या निर्दय आणि दुष्ट राजानें त्याला बंदिवासांत टाकलें होतें, त्याच्या क्रोधसत्रांतून पार पडण्याची व्हेनला फारच थोडी आशा असल्याकारणानें त्यानें जे अनेक उतारे राजाच्या दृष्टोत्पत्तीस आणले होते त्यांतले कांहीं मासल्यासाठीं म्हणून आमच्या वाचकांकरितां पुढीलप्रमाणें देतों:—

'हे आत्म्या, ज्या ठिकाणीं असंख्य आत्मे जातात अशा ठिकाणीं जायला तूं डरतोस ? या जगांत अवतीर्ण होणाऱ्या उदार आणि शूर आत्म्यांच्या भूमिका जीविताच्या पूर्वी कांहीं तरी विशिष्ट गोष्टींची घडण घडवून आणण्याची तपश्चर्या करीत असतात.'

प्राणभक्षक काळाच्या जबड्यांत ढकलला जाऊन मांगांकडून आपलें देहहवन होण्याची वेळ आतां समीप आली आहे असें जेव्हां व्हेनला वाटलें तेव्हां तो म्हणाला, "दुःखामध्यें आयुष्य कंठीत बसण्यापेक्षां उत्कृष्ट अवस्थेंत उत्तम मरण येणें हें मोठें नशिबाचें आणि पुण्याईचें काम आहे. आपल्या जगण्याची किंमत मृत्यूपेक्षां जास्त आहे असें जोंपर्यंत वाटत असतें तोंपर्यंतच शहाणा माणूस जिवंत राहतो. दीर्घायुषी होणें हें सदासर्वदां इष्ट होतेंच असें नाहीं."

यापेक्षां जास्त किंमतीचीं वाक्यें कोणचीं असूं शकणार ! असल्या प्रकारच्या व्हेनच्या वाक्यांचीं किंमत त्याच्या मृत्यूनंतर जनतेला अधिक प्रमाणानें पटली. जगाचें रहाटगाडगें असेंच आहे. कोणच्याही गोष्टीची किंमत जगाला तिच्या नाशानंतरच कळते असा फार जुना अनुभव असतांहि जगाला तो नेहमीं नव्यानेंच शिकावा लागतो हें मोठें गौडबंगाल नव्हे काय ?

आपला शेवट कसा होणार यासंबंधानें व्हेननें केलेलें भाकीत अगदीं खरें ठरलें. व्हेनला तुरुंगांत टाकल्यानंतर दोन वर्षांनीं त्याला लंडन शहरीं नेण्यांत येऊन राजसभेमध्यें त्याच्यावर ठेवलेल्या आरोपाचा न्याय करण्याचें काम सुरू करण्यांत आलें. न्यायदेवतेच्या मुखांतून कधींहि निघणें शक्य नव्हतें अशा एका निर्घृण दोषाचें बालंट त्या सद्गृहस्थावर लादण्यांत आलें. तो दोषारोप आपल्यावर कोणच्या आधा-

रानें करण्यांत आला आहे हें समजून घेण्याचा व्हेननें जरी प्रयत्न केला तरी ज्या कागदावर तो लिहिला होता तो कागद अथवा त्याची नक्कलहि त्या न्यायसभेनें त्याला बघायला देण्याचें नाकारलें. कारण तें प्रकरण एखाद्याला दाखविणें म्हणजे निव्वळ मूर्खपणाचेंच कृत्य होतें ही गोष्ट ती न्यायसभा पूर्णपणें ओळखून असल्या-कारणानेंच तिच्याकडून तसें करण्यांत आलें होतें. दुसऱ्या चार्लस राजाच्या जीवितनाशाच्या इच्छेचा आणि खटपटीचा दोषारोप व्हेनवर करण्यांत आला होता. ज्यानें ब्लेककडून जगामध्यें अजिंक्य असें जगद्विजयी आणि पहिल्या प्रतीचें ब्रिटनचें आरमार तयार करविलें आणि जो निःस्वार्थबुद्धीनें देशहिताकरितां झगडला त्याच्यावर असला घाणेरडा आरोप लादण्याचें व खोटे कागद तयार करण्याचें महत्पातक करण्याच्या खटपटी करणें यांसारखें महान् पातक दुसरें कोणचें असणार? व्हेनवर जो अपराध लादला होता त्याचा न्याय करणें ही गोष्ट केवळ थट्टास्पद अशा एका शोकपर्यवसायी प्रहसनाचाच अंक झाली होती. त्याच्या तर्फेनें भाषण करण्यास वकील देण्याची सुद्धां त्याला बंदी केलेली होती.

खरें पाहिलें असतां व्हेनला वकीलीच्या मदतीची अपेक्षाच नव्हती. त्याच्या विरुद्ध स्थापित झालेल्या राक्षसी आरोपांचीं जगद्विरहित स्वरूपें स्वच्छ रीतीनें दाखविण्यास त्याचा तोच जबरदस्त वकील होता. पहिल्या चार्लसाच्या शिरच्छे-दाच्या संबंधांत त्याचें कोणच्याहि प्रकारें अंग नव्हतें हें त्यानें सप्रमाण सिद्ध करून दाखविलें. ज्या वेळीं इंग्लंडांत पार्लमेंट सभा सर्वाधिकारी असून तिच्याच तंत्रानें राज्यव्यवहार चालत असे त्या वेळीं त्यानें जें काय केलें तें सारें तिचा नोकर या नात्यानें केलें होतें. यासाठीं आतां त्याच्यावर आणलेल्या आरोपांचें यथा-न्याय विवरण करण्यास पार्लमेंटसभेशिवाय इतर कोणच्याहि सभेला हक्क नाहीं असें त्यानें स्पष्टपणें सांगितलें.

व्हेननें जो हा आपला मुद्दा पुढें मांडला त्याबद्दल त्याच्यावर अपराध लाद-णाऱ्यांकडून कांहींच उत्तर मिळालें नाहीं. व्हेनची आत्मसंरक्षणाची युक्ति व्हेनलाच विघातक झाली. इंग्लंडांतील प्रजाप्रतिनिधिमंडळ म्हणजेच उच्चाधिकारस्थान होय, असें जें त्याचें तत्व त्याच तत्त्वावर त्याच्या आत्मसंरक्षणाचा हवाला होता. सरदार लोकांच्या प्रतिनिधिमंडळापेक्षां ( House of Lords ) प्रजाप्रतिनिधिमंडळ (House of Commons) हेंच इंग्लंडच्या राज्यव्यवस्थेचें हृदय असून त्याची शक्ति जर उत्तम तऱ्हेनें कायम राहील तरच सर्व राज्यव्यवस्था सुरळीत चालेल आणि नंतर राजा किंवा सरदार जरी नसले तरी अडायचें नाहीं असें त्याचें तत्त्व

होतें. त्यानें जितक्या शुद्ध तत्त्वानें वरील आपलें मत स्थापित केलें होतें तितक्याच जोरानें त्यानें त्याचें पोषणहि केलें होतें. त्या वेळच्या स्टुअर्ट राजघराण्यांतल्या राज्यपद्धतींतले न्यायाधीश त्याच्या त्या तत्त्वाचा अत्यंत तिरस्कार करणारे होते.

व्हेनवरच्या अपराधाच्या शाबीतीचा खटला ज्या वेळीं संपविण्यांत आला त्या वेळीं मुख्य वकिलानें म्हणजे सॉलिसिटर जनरलनें असें स्वच्छ सांगितलें कीं, 'या कैद्यानें स्वतःचें सार्वजनिक देहहवन केलें पाहिजे.' मताधिक्य करून घेण्यासाठीं प्रमाणपुरुष ( Jury-men ) बाजूला गेल्यावर त्या दुष्ट राजाच्या प्रीतींतला हाच श्रेष्ठ वकील त्यांच्या कानांत हलकेंच असें म्हणाला कीं, "काय वाटेल तें होवो! सध्यां न्यायसभा ज्या स्थितींत आहे त्याच स्थितींत सध्यांच्या कैद्यासंबंधानें केव्हांहि 'तो दोषी आहे' असेंच न्यायाचे अखेरचे शब्द ती उच्चारील असें घडून आलें पाहिजे!"

व्हेनला शिक्षा ताबडतोब न सांगतां दोन तीन दिवस त्याला तसाच ठेवण्यांत आला; परंतु तितक्या अवधींत त्यानें स्वसंरक्षणार्थ म्हणून एक पुरावा, हॅम्प्टन कोर्ट येथें जो हलकट आणि छांदिष्ट राजा जाऊन राहिला होता तेथें त्याच्याकडे धाडिला. त्यासंबंधानें त्या दुष्ट राजानें क्लॅरेंडनाला सूचनेदाखल म्हणून जें एक पत्र लिहिलें तें पुढीलप्रमाणें होतें:—

'The relation that hath been made to me of Sir Harry Vane's carriage yesterday in the hall is the occasion of this letter, which if I am rightly informed was so insolent, as to justify all that he had done, acknowledging no supreme power in England but Parliament, and many things to that purpose. You have had a true account of all, and if he has given new occasion to be hanged, certainly he is too dangerous a man to let live, if we can honestly put him out of the way. Think of this and give me some account of it to-morrow. C. R.

यानंतर शिक्षा सांगण्यासाठीं व्हेनला न्यायमंदिरांत आणण्यांत आलें. शिक्षा सुनावण्याच्या आधीं व्हेननें न्यायाधीशाला पुढीलप्रमाणें दोन प्रश्न विचारले:—

( १ ) हलक्या प्रतीच्या कचेऱ्यांबद्दल पार्लमेंटला उत्तर विचारतां येईल किंवा नाहीं ?

( २ ) राजाला स्वामित्व नसतां—

दुसरा प्रश्न अर्धवट उच्चारला जातो आहे नाहीं तोंच मुख्य न्यायाधीश " राजाचें स्वामित्व कधींच नष्ट झालें नव्हतें, " असें मोठ्या जोरानें ओरडून बोलला. तें ऐकून व्हेन आपल्या नेहमींच्या शांततेंत राहूनच म्हणाला, "असें जर आहे तर माझ्यावर, मीं राजाचें स्वामित्व नष्ट केलें असा आरोप कसा शाबीत करण्यांत आला आहे ? तुमच्याच भाषणाला अनुसरून तें तुमचें अभियोगपत्र आतां जमिनीवर धूळ फांकीतच पडलें पाहिजे! "

व्हेनचें हें भाषण ऐकून ती कचेरी कांहीं वेळ निरुत्तर होत्साती शांतरसांत निमग्न झाली. तरी पण त्या सभेच्या न्यायपद्धतीप्रमाणें खुनाचा सरळ आरोप शाबीत करण्याचें काम पुनः पूर्ववत् कांहीं वेळानें सुरू झालें. शेवटीं नाइलाजानें व्हेननें आपल्या पुढचे कागद मोडून खिशांत घातले आणि ज्या लोकांच्या पुढें तो बसला होता तेथूनच त्यानें परमेश्वरापाशीं न्याय भाकला. नंतर पुनः कचेरीच्या कामाला सुरवात झाली. शेवटीं त्याच दिवशीं म्हणजे बुधवारीं सायंकाळीं त्याला त्या दिवसांपासून तिसऱ्या दिवशीं म्हणजे शनिवारीं टॉवर हिलवर त्याचा शिरच्छेद करण्यांत येईल अशी शिक्षा सुनावण्यांत आली.

न्यायसभेंत त्यानें आपलें दाखविलेलें वर्तन आणि केलेला पुरावा या दोन्ही गोष्टींनी प्रजाजनांच्या मनावर मोठा दांडगा ठसा उमटला. त्याचें कुशल इच्छिणारे अनेक लोक त्याच्या मरणाच्या दिवशींच्या त्याच्या धिंडीच्या समारंभाबरोबर भग्नहृदय होत्साते दुःखाश्रू ढाळीत चालले होते. रस्त्यांतल्या खिडक्या, गवाक्षें, सौध वगैरे सर्व जागा मनुष्यांच्या गर्दीनें अगदीं फुलून गेल्या होत्या. सर्व प्रेक्षकांच्या मुखांतून दुःखोद्गार निघत असल्यामुळें इंग्लंडांतल्यासारख्या थंड हवेंतसुद्धां उष्णतेचा पूर्ण भास होत होता. दुःखी जनसंमर्दांतून व्हेनची धिंड मिरवत चालली असतां त्यानें जेव्हां जनतेच्या दुःखाश्रुपातांचें प्रदर्शन अवलोकन केलें, तेव्हां त्यानें आपल्या डोक्यावरची टोपी काढली आणि तो सर्वांना सलामी करीत चालला. तसा तो चालला असतांना, " परमेश्वर तुझें रक्षण करो ! जीजस-क्राइस्ट तुझ्या आत्म्याच्या संनिध असो ! स्वर्ग आणि पृथ्वी यांचें रक्षण करणारा थोर देव तुझ्या देहांत अवतीर्ण होवो ! " असे जनतेचे उद्गार त्याच्या कानावर एकसारखे पडत होते.

त्या मिरवणुकीच्या गर्दीतूनच एक माणूस इतक्या मोठ्यानें घसा फोडून ओरडला कीं, " आजपर्यंत ज्या ज्या उच्च स्थानांवर तुझें आरोहण झालें आहे त्या सर्वांपेक्षांहि सध्यांचें तुझें स्थान वैभवश्रेष्ठ आहे "

" यांत काय संशय ! " व्हेननेंहि लगेच उत्तरादाखल म्हटलें.

ज्या अनेक लोकांच्या तोंडून दुःखोद्गार निघत होते त्या सर्वांनाच व्हेन हा मूर्तिमंत प्रत्यक्ष माहित नसल्याकारणानें कांहींच्या तोंडून व्हेनबद्दल " तो पहा कशी आनंदाची भरती आलेला समुद्र दिसतो आहे ! ज्याचा शिरच्छेद व्हायचा आहे तो माणूस हा नसला पाहिजे !" असे उद्गार एकसारखे निघत होते.

सरते शेवटीं " यमनगरींत प्रवेश करूं पाहणाऱ्या प्राण्याचे शेवटचे शब्द ऐकण्याची ज्या कारणानें प्रवृत्ति होऊं देत नाहींत, तीं कारणें वाईट होत. " असें तो स्पष्टपणें बोलला.

धिंडीची मिरवणूक संपून व्हेन वधस्थानापाशीं येऊन पोंचल्यानंतर त्याच्या खिशांतलीं कागदपत्रें जरी एकदां काढून घेण्यांत आलीं होतीं, तरी पुनः कांहीं दस्त-ऐवजांचा तपास लागावा म्हणून कांहीं दुष्ट हात त्याच्या खिशांत घुसलेच. हें सर्व होईपर्यंत व्हेननें आपली नेहमींची शांतवृत्ति कायम राखिली होती. नंतर ज्या-प्रमाणें एखादें दमलेलें लेंकरूं स्वस्थपणें झोंपी जाण्याकरितां आपल्या उशीवर आनं-दानें डोकें टेंकून पडतें त्याप्रमाणें व्हेननें देवाची शेवटची प्रार्थना करून वध करण्यासाठीं योजिलेल्या लांकडी ठोकळ्यावर आपली मान प्रेमानें ठेविली.

" हे सर्वोत्पादका, सर्वोत्तमा, मनुष्यप्राण्यांच्या नजरेंत या तुझ्या दासाचें वैभव वाढीव, म्हणजे तुझी आणि देशाची सेवा करण्याचें जें काम तें मीं यथा-योग्य बजाविलें असें होऊन मला मोठी धन्यता वाटेल !" हे व्हेनचे शेवटचेच शब्द होते. इतकें बोलून त्यानें आपले हात लांब करून जोडले आणि कुऱ्हाडीच्या एकाच घावानें त्याचें मस्तक धडावेगळें केलें.

पेपी नांवाच्या एका गृहस्थानें ही वधाची हकीकत प्रत्यक्ष बघितली असल्यामुळें त्यानें त्याबद्दल असें लिहून ठेविलेलें प्रसिद्ध झालें आहे कीं, " व्हेन याची मुखश्री अखेरपर्यंत जशी उज्वलतेनें परिपूर्ण दिसत होती तद्वतच त्याचा नेहमींचा बाणेदार-पणाहि शेवटपर्यंत जशाचा तसाच कायम होता. आपण जीजस क्राईस्टच्या समीप असून आपलें जीवित क्षणभंगुर झालेलें आहे ही कल्पना त्यावेळीं त्याच्या मनां-तून पार लयाला गेलेली दिसत होती. तो ज्या तऱ्हेनें मेला तशा तऱ्हेनें मरणा-ऱ्यांत कधीं दृष्टीस न पडणारे असे—दृढनिश्चय, वीर्य, धाडस वगैरे गुण त्याच्यांत शेवटपर्यंत कायम असलेले दिसत होते. तुटून पडलेल्या त्याच्या मुंडक्याच्या मुखश्रीवर सतेजपणा झळकत होता आणि नेत्रांतून एकहि अश्रुबिंदु गळलेला दिसत नव्हता. थोरपणा आणि शालीनता यांची ती प्रत्यक्ष मूर्तीच होती."

व्हेनचा खून पाडवणारा चार्लस राजा आणि व्हेन यांच्या परस्पर मृत्यू-
शय्या आणि वधस्थान यांची तुलना करतांना एका कवीनें पुढीलप्रमाणें कवित्व
केलें आहे:—

Better by far is the scaffold of Vane
Than the couch where Charles Stuert sank with pain ;
With a lie in his mouth and a lie on his heart,
And a weak hand uplifted to word off the dart ;
And his harlot attendants who pressed but to peep,
And to pillage his form as he slept his last sleep.
Great God ! I had rather the scaffold of Vane,
Or I'd rot to my death in a dungeon and chain.

या जगाचा त्याग करून व्हेन परलोकीं गेला खरा, परंतु अद्यापि त्याच्या
गुणांचें कौतुक वर्णिलें जात असल्याकारणानें, तो जिवंत असतांनाहि त्याच्या
भाषणाचा जो ठसा जगाच्या हृत्पटलावर उमटला नाहीं असा पूर्ण ठसा आतां
उमटला असल्याकारणानें, तो मरेपर्यंत जीं आपलीं तत्त्वें जगाला सांगत होता,
त्यापेक्षांहि सध्यां तीं त्यानें सर्व आयुष्यांत सांगितलीं नसतील इतक्या जोरानें तो
सांगतो आहे असा भास होतो. हॅरी व्हेनचा चार्लसानें जो शिरच्छेद करविला,
तो त्यानें करविला नसता आणि त्याला जिवंत ठेविलें असतें तर बरें झालें असतें
असें जें मागून चार्लसला वाटूं लागलें त्याचें तसेंच कारण होतें. व्हेनच्या खट-
ल्याची हकीकत छापली जाऊन ती सर्वत्र प्रसिद्धपणें वांटण्यांत आली. ती हकी-
कत सर्वत्र वाचण्यांत आल्याकारणानें ज्याची कल्पना होणार नाहीं असा चम-
त्कारिक परिणाम त्या हकीकतीनें इंग्लंडच्या प्रजाजनांच्या मनांवर घडवून आणला.
त्या बाबतींत पेपी असें म्हणतो कीं, “इ. स. १६६३ च्या फेब्रुवारी
महिन्यांत एके रात्रीं माझ्या बायकोनें व्हेनच्या खटल्याची हकीकत मला वाचून
दाखविली. ती ऐकून मला मोठें आश्चर्य वाटलें. खरोखर ती हकीकत जशी
श्राव्य होती तशीच वाचनीयहि असून तीवरून तो मोठा शहाणा माणूस होता
अशी माझी बालंबाल खात्री झाली.”

व्हेनचीं दूषित मानलेलीं तत्त्वें त्याच्या पश्चात् लोकशिक्षणाचें काम करूं
लागलीं. त्या शिक्षणाचा परिणाम सर्व राष्ट्रांवर होत चालला. बर्नेट नांवाचा एक
लेखक म्हणतो, “व्हेनच्या मृत्यूपासून इंग्लंडला जें कांहीं मिळालें असा समज
होता तो खोटा ठरून उलटपक्षीं जें कधीं भरून यायचें नाहीं असें इंग्लंडचें नुकसान
मात्र त्याच्या मृत्यूमुळें झालें असा सर्वत्र समज झाला आहे.”

पेपीनें एके ठिकाणीं या जुन्या हकीकतीसंबंधानें असे उद्गार काढले आहेत कीं, " बोलवा असा आहे कीं, दुसऱ्या चार्लस राजाच्या नशीबीं जी अप्राप्य वस्तू लाभायचा योग नव्हता किंवा जी वस्तू प्राप्त करून घ्यायला त्याला अनेक जन्म तपश्चर्याच करावी लागली असती अशी जी व्हेनची सजीव मूर्ति ती या जगांतून नाहींशी झालीच पाहिजे असा जो चार्लसानें आग्रह धरला होता तो त्याच्या दुर्दैवानेंच त्याला धरायला लावला होता. त्यापासून त्याचें जें नुकसान व्हायचें तें तर झालें; पण कधींही भरून न येणारें असें सर्व राष्ट्राचें मात्र त्याच्या मृत्यूनें भयंकर नुकसान झालें."

मत्सरी क्रोधानें अंध झालेल्या दुसऱ्या चार्लस राजाच्या लेखणींतून ' असा भयंकर माणूस जिवंत ठेवणें अप्रशस्त आहे ' अशी जी शब्दांची मौक्तिकावली कागदावर पडली ती त्याच्या दुर्दैवानेंच खास पडली असें म्हणण्यापलीकडे काय म्हणावें ? व्हेनसारखा प्रचंड बुद्धिमत्तेचा पुरुष भयंकर रीतीनें मारला गेल्यामुळें जें अमोप नुकसान झालें, तें तो जिवंत असता तर कधींहि न होतां उलट फार मोठा फायदाच झाला असता, असें चार्लस राजाला त्याच्या मृत्यूनंतर फारच अल्पा-वधींत आढळून आलें; पण उपयोग काय ?

पौरजनाधिकारांच्या वाढीला, मुद्रणस्वातंत्र्याला आणि इंग्लंडच्या प्रजासत्ताक राज्यतंत्राला ज्या जुलमी कायद्यांचे वारंवार धक्के बसतात ते कायदे तपासून त्यांची सुधारणा करण्याच्या ज्या गोष्टी व्हेननें आपल्या अद्वितीय बुद्धिमत्तेनें लिहून काढल्या होत्या, त्याच व्हेनच्या गुर्वर्थ अशा तत्त्वांवर सध्यांच्या इंग्लंडचा राज्य-कारभार तंतोतंत चाललेला असून, इतर गोष्टींतही व्हेननें घालून दिलेलें वळण अद्यापि इंग्लंडच्या राज्यकारभारांत पूर्णपणें गिरविलें जात आहे.

व्हेनच्या मृत्यूनंतर सुमारें एकशेंसत्तर वर्षांनीं इंग्लंडांत जी एक गोष्ट त्याच्या कर्तबगारीचें द्योतक म्हणून घडून आली ती सदोदित ध्यानांत ठेवण्या-सारखी आहे. ज्या टॉवर हिल नांवाच्या जागेवर आमच्या सर हॅरी व्हेन नांवाच्या स्वकर्तव्याभिलाषी मुत्सद्यानें स्वमतरक्षणार्थ आपला देहत्याग केला, तेंच ठिकाण त्याच्या अगदीं सरळ पिढींतल्या एका हेन्री व्हेन नांवाच्या वंशजाला इंग्लंडनें जहागीर म्हणून दिलें. सर हॅरी व्हेननें स्वराज्यसुधारण्याच्या कामीं जें कांहीं करण्याचें योजून आपल्या घरीं गुलदस्तांत लिहून ठेविलें होतें, त्या कामांत पुढाकार घेऊन तें काम यथायोग्य बजावल्याबद्दल ती जहागीर त्याला देण्यांत आली.

व्हेनच्या मृत्यूनंतर सुमारें एकशेंसत्तर वर्षांनी हें जें चिरस्मरणीय कृत्य घडून आलें तें सदोदित ध्यानांत ठेवण्यासारखें नाहीं असें कोण म्हणेल?

इ. स. १८३२ मध्यें सुधारणेच्या कायद्यासंबंधानें ( Reform bill ) मागसलेल्या परगण्यांतून पार्लमेंटांत जे प्रतिनिधि निवडून घेण्यांत आले त्यांत वुइल्यम हेन्री व्हेननें बरेंच तारतम्य दाखविलें. इतकेंच नव्हे तर इ. स. १८३२ च्या ता. ४ जूनला त्या सुधारणा बिलासंबंधानें त्यानें आपलें मतहि दिलें आणि त्याच वर्षाच्या पुढच्या सालीं त्याला वर सांगितलेली जहागीर दे[illegible]न, ज्या रेबी नांवाच्या किल्ल्यांत आमचा चरित्रनायक कांहीं काळ विविक्त[illegible] जाऊन राहिला होता तो किल्लाहि त्या जहागिरीबरोबर त्याला बहाल करण्यांत आला. सर हॅरी व्हेनच्या वंशजांना ड्यूक्स ऑफ क्लीव्हलंड असें बहुमानाचें विशेषणहि मिळालें तो किल्ला आणि ती जहागीर त्याच घराण्याकडे अद्यापि चालत असून, रेबी किल्ला हा त्या घराण्याचें उत्तरेकडील विश्रामस्थान म्हणून गाजतो आहे.

ज्या गोष्टी ज्या काळीं घडायला पाहिजेत असें आपण इच्छितों त्याप्रमाणेंच त्या सदासर्वकाळ घडतातच असें नाहीं, आणि म्हणूनच व्हेन ह्या मनुष्यप्राण्यासंबंधानें तो ज्या वेळीं उत्पन्न व्हायला पाहिजे होता त्या वेळेच्या आधीं या जगांत अवतीर्ण झाला असें म्हणणें हें प्राचारिकच आहे. सुधारणेचा रस्ता साफ करण्याची स्फूर्ति उत्पन्न करण्यासाठींच परमेश्वरानें त्याला निर्माण केला होता असें म्हटलें असतां त्यांत वावगें काय होईल? आजपर्यंतच्या अनुभवावरून असें खात्रीनें सांगतां येतें कीं, व्हेनप्रमाणेंच कालचक्राला गति देणारे कोणत्याहि देशांतले स्वातंत्र्यभक्त शेवटीं आपलें कार्य तडीस नेण्याकरितां आपल्या प्राणांचे जरी बळी देतात आणि दुनियापार होऊन जातात तरी त्यांनीं कालचक्राला दिलेली गति तशीच आपला मार्ग धरून अकुंठितपणें सुरू असते. हीच गोष्ट आमचा चरित्रनायक जो इंग्लंडचा महात्मा सर हॅरी व्हेन दी यंगर याच्यासंबंधानें ध्यानांत ठेवण्यासारखी आहे. जुलमी आणि स्वार्थी राज्यपद्धति मोडून टाकून तिच्या जागीं प्रजेला सुखावह होईल आणि देशाला भरभराटीला आणून सर्वमान्य करील अशी राज्यपद्धति अमलांत आणण्यासाठीं जे कोणी ज्या देशांत आपलें शिर तळहातावर घेऊन झगडा करायला बाहेर पडतात, त्यांच्यासंबंधानें प्रसिद्ध कवि बायरन म्हणतोः—

Freedom's battle once begun,
Bequeathed by bleeding sire to son
Though baffled oft is ever won.

---